श्री नन्द कुमार अवस्थी जी को सादर
लाडली नाथ रेणु
१२/११/१९८७

# वाल्मीकी रामायण : शाप आणि वर


श्रीपाद रघुनाथ भिडे, एम्. ए.

निवृत्त प्राध्यापक, संगन बसवेश्वर महाविद्यालय, विजापूर.





कॉन्टिनेन्टल प्रकाशन

वाल्मीकी रामायण : शाप आणि वर

जानेवारी, १९८७

मूल्य : रु. ८०-००

प्रकाशन क्र. १०१२



प्रकाशक : रत्नाकर अनंत कुलकर्णी
कॉन्टिनेन्टल प्रकाशन,
विजयानगर, पुणे ४११ ०३०

मुद्रक : शांताराम देवीदास जोशी
गायत्री मुद्रणालय,
२०६० सदाशिव पेठ,
विजयानगर कॉलनी,
पुणे ४११ ०३०



# आज मी शापमुक्त जाहलो....

गेली चार–साडे चार वर्षे तसा मी 'शापित' नसलो तरी 'शाप-ग्रस्त' खचितच आहे. विजापूर जिल्ह्यात मुद्देबिहाळ नावाचे एक तालुक्याचे गाव आहे. तेथील मातोश्री गंगव्वा महाविद्यालयाचे तरुण ग्रंथपाल श्री. पंडित सिद्दप्पा कनमडी एकदा माझेकडे आले आणि त्यांनी मला 'शाप' दिला. 'शाप आणि वर ह्यासंबधीची संकल्पना फार प्राचीन असून रामायण-महाभारतासारख्या ग्रंथांत त्यांचा विपुल उपयोग केला असूनही त्या संबंधी कन्नड साहित्यात एकत्रित स्वरूपात कोठेच काही माहिती उपलब्ध नसल्याबद्दलची खंत' त्यांनी व्यक्त केली. मराठी साहित्यात असा एखादा ग्रंथ आहे काय, अशी पृच्छा केली आणि नसेल, तर ते काम मी करावे, अशी गळही घातली. त्यांचा माझ्यासंबंधीचा आदर आणि विश्वास यांनी मी सुखावलो गेलो असलो व विषयाच्या नाविन्याने प्रभावित झालो असलो, तरी रामायण, महाभारता-सारख्या प्राचीन ग्रंथांचा आपला अभ्यास नसावा, यास्तव शरमलो. त्यांना एकदम होकार किंवा नकार न देता थोडा अवधी मागून घेतला आणि जे जमेल ते करण्याचे आश्वासन दिले. पुढे काही कामानिमित्त पुण्यास गेलो असता आदरणीय पंडित महादेवशास्त्री जोशी यांना भेटलो. 'शापा'ची कथा आणि माझ्या मनाची व्यथा त्यांना निःसंकोचपणे सांगितली. तोपर्यंत मी समग्र वाल्मीकी रामायण वाचलेही नव्हते. शास्त्रीबोवांनीही मराठी साहित्यात असा एकही ग्रंथ नसल्याचे सांगितले. आणि मी ते काम हाती घ्यावे असे आग्रहपूर्वक सुचविले. मात्र वराच्या अभ्यासा-शिवाय शापाचा अभ्यास अपूर्ण असल्याने केवळ शापाचाच विचार न करता 'शाप आणि वर' ह्या दोहोंचाही अभ्यास करण्यास सांगितले. अशा रीतीने पंडित महादेव-शास्त्री जोशी यांचे कडून मला 'वर' मिळाला. दोन 'पंडितां'कडून मला शाप/वर यांचा लाभ झाला आणि रामायणातील तृणबिंदुकन्येप्रमाणे माझ्याबाबत 'शाप'ही 'वर' प्रद ठरला.

शास्त्रीबोवांचे मार्गदर्शन मला माझ्या विद्यार्थी दशेपासून गेली पन्नास वर्षे लाभत आले आहे. त्यांच्या उत्तेजनाने मी वाचनास प्रारंभ केला. शाप आणि वर यांचा विचार म्हणजे वेद, पुराणे, उपनिषदे, रामायण, महाभारत, भागवत या साऱ्या प्राचीन ग्रंथांचा अभ्यास करावयास हवा. तो माझ्या आवाक्याबाहेरचा होता, मला पेलण्यासारखाही नव्हता. तेव्हा मी केवळ एका ग्रंथावर–आदी महाकाव्यावर आपले लक्ष केंद्रित केले. विषयाची विशालता आणि माझी असमर्थता यामुळे हे काम आपणास जमणार नाही, असे वारंवार वाटू लागले. हा नाद सोडून देण्याच्या विचारात असता केवळ योगायोगाने दोन विद्वानांचा परिचय झाला, अल्पावधीत त्याचे गाढ स्नेहात रूपांतर झाले आणि केवळ त्यांच्या प्रोत्साहनामुळे मी येथवर येऊन पोहोचलो.

उडुपी येथील श्री पूर्णप्रज्ञा संस्कृत महाविद्यालयाचे निवृत्त प्राचार्य श्री. कवलगी शेषाचार्य यांच्या भेटीमुळे मला रामायणाच्या सौंदर्याचे दर्शन घडले. त्यांचा संस्कृत वाङ्मयाचा प्रदीर्घ चिकित्सक अभ्यास, विविध भाषा प्रभुत्व, पराकाष्ठेचे सौजन्य आणि निरपेक्ष साहाय्य करण्याची निरलस वृत्ती या अनेक दुर्मिळ सद्‌गुणांचा त्यांचे ठायी संगम झाला असल्याने त्यांच्या विषयीचा आदर वृद्धिंगत झाला, दुणावला. त्यांच्या प्रोत्साहनाशिवाय आणि साहाय्याच्या अभावी माझ्या हातून हे लेखन होऊ शकले नसते. पुस्तकाचे मुद्रण पुण्यास चालू असता त्यांनी मैसूरहून शुद्धिपत्र करून धाडले. वयाची पंचाहत्तरी उलटून गेली असूनही त्यांचा व्यासंग, उत्साह, सामर्थ्य आणि कामाचा उरक पाहिला म्हणजे मी नतमस्तक होतो.

त्याच प्रमाणे पोद्दार महाविद्यालय, मुंबई या संस्थेचे हिंदी विभाग प्रमुख आणि कनिष्ठ महाविद्यालयाचे प्राचार्य सेवा निवृत्त डॉ. ग. न. साठे यांचा परिचय तर केवळ पत्र रूपाने झाला. त्यांचे पत्र इतके बोलके होते की जणू प्रत्यक्ष भेट झाली असता बोलणे व्हावे असे. डॉ. साठे यांचा रामायणाचा व्यासंग प्रदीर्घ असून भारतातील विविध भाषांतून प्रसिद्ध झालेल्या रामायणांचा तौलनिक अभ्यास; हिंदी भाषेवर मराठी इतकेच प्रभुत्व आणि सततोद्योग यामुळे त्यांचा परिचय व स्नेह मला वरदायक ठरला. माझे सारे लेखन सूक्ष्म रीतीने पाहून त्यांनी बहुमोल सूचना तर केल्याच, खेरीज माझे वास्तव्य विजापूरला असल्याने मुद्रण व्यवस्था तेथून करणे शक्य नव्हते, ही माझी अडचण लक्षात घेऊन त्यांनी स्वयंस्फूर्तीने सहकार्याचा हात पुढे केला आणि सारी मुद्रण व्यवस्था जणू आपला स्वतःचाच ग्रंथ आहे एवढ्या कळकळीने पाहिली. त्यांनी माझ्यासाठी घेतलेले परिश्रम आणि खर्च केलेला वेळ याला सीमा नाही. कोणत्याही शब्दांत त्यांचे उतराई होणे केवळ अशक्य आहे कारण सांप्रत ते संत एकनाथ महाराजांच्या 'भावार्थ रामायणा'चा हिन्दी अनुवाद करीत आहेत. हे स्वतःचे काम बाजूस ठेवून त्यांनी माझ्या ग्रंथाची मुद्रण व्यवस्था चोखपणे संभाळली. माझ्या या ग्रंथांचे अंतरंग शुद्ध करून त्याला सौष्ठव प्राप्त करून देण्याचे सारे श्रेय ह्या दोन प्राचार्यांचे आहे.

कॉन्टिनेन्टल प्रकाशन पुणे ह्या मान्यवर संस्थेने माझे पुस्तक प्रसिद्ध करावे, हा मी माझा सन्मान समजतो. या संस्थेला जे स्थान व प्रतिष्ठा प्राप्त झाली आहे, स्थैर्य लाभले आहे त्यामागे मित्रवर्य श्री. अनंतराव कुलकर्णी यांचे ग्रंथ-प्रेम, रसिकता सौंदर्यदृष्टी, स्वच्छ आणि स्पष्ट व्यवहार व निरलसता या गुणांसह पन्नास वर्षांची तपश्चर्या आहे. श्री. अनंतराव सालकरांकडून त्यांनीच आकर्षक मुखपृष्ठ तयार करवून घेतले. अशा रीतीने 'अनंत' हस्ते पुस्तकाचे सौंदर्य व सौष्ठव प्राप्त झाले आहे.

खेरीज माझे स्नेही श्री. वि. वा. गोखले, धारवाड, श्री. मधु कृष्ण जोशी विजापूर, श्री. अमरेंद्र गाडगीळ, पुणे आणि प्रा. गोपालन, विजापूर यांनी हस्त लिखित वाचून अनेक उपयुक्त सूचना केल्या. माझ्या कुटुंबातील व्यक्तींनीही मला लेखनास केवळ प्रोत्साहनच दिले नसून माझ्या दृष्टीतून निसटलेल्या अनेक बाबी निदर्शनास आणून दिल्या. माझ्या छोट्या नातवाने–चि. अमेयने–मला लक्ष्मणरेषेची सतत आठवण दिली. गायत्री मुद्रणालयाचे श्री. शां. दे. जोशी यांनी सुबक मुद्रण केले.

पुस्तक वाचकांच्या हाती देताना खरोखरच 'आज मी शापमुक्त' होत आहे

श्री. र. भिडे

# लेखन मर्यादा

शाप आणि वरांच्या संदर्भात रामायणाचा अभ्यास करण्याचा हा एक प्रयत्न आहे. या ग्रंथाचे स्वरूप संकलनात्मक आहे, हा रामायणावरील प्रबंध नव्हे. अभ्यासासाठी काही मर्यादा आखून घेतल्या असून सारे विवेचन त्या चौकटीतच केले आहे.

१. हा अभ्यास केवळ वाल्मीकी रामायणाचा आहे. वाल्मीकी रामायणाखेरीज अन्य रामायणांचा किंवा 'शाप आणि वर' ह्या विषयाशी संबंधित नसलेल्या वाल्मीकी रामायणातीलही अन्य विषयांचा विचार येथे केलेला नाही.

२. वाल्मीकी रामायणातील समस्त शाप/वर एकत्रित करण्याच्या प्रयत्नात आवश्यक ती सर्व काळजी घेऊनही एखाद-दुसऱ्या शाप/वराची नोंद करण्याचे राहून गेले असण्याची शक्यता नाकारता येत नाही.

३. येथे वाल्मीकी रामायणातील ६१ शाप व ८४ वरांचे विवेचन विस्तृतपणे करण्याचा प्रयत्न केला आहे. प्रत्येक शाप/वराचा पूर्व संदर्भ, संस्कृत संहिता आणि मराठी अनुवाद दिला असून आवश्यक तेथे वैशिष्ठ्यपूर्ण माहिती दिली आहे. त्याचप्रमाणे शपथ, सत्यक्रिया, आशीर्वाद, नवस, आकाशवाणी, पुष्पवृष्टी इत्यादींचे विवेचन केवळ त्यांचे शाप/वर यांच्याशी असणारे साधर्म्य आणि भेद स्पष्ट करण्यास आवश्यक इतकेच केले आहे. त्यांची दिलेली उदाहरणे समग्र नाहीत. शाप/वर यांच्या विवेचनात ज्या व्यक्तींचा, स्थलांचा उल्लेख आला आहे त्यांची त्रोटक माहिती एका स्वतंत्र विभागात आकारविल्हे दिली आहे. खेरीज काही शंकास्पद शाप/वर आणि अभ्यासास व विवेचनास पूरक असे सात तक्ते परिशिष्टात दिले आहेत. शाप/वरांशी संबंधित अनेक विषयांचा परामर्ष प्रदीर्घ प्रस्तावनेत – शापादपि वरादपि । – मध्ये केला आहे. शाप/वरांची सूची देऊन ग्रंथ परिपूर्ण करण्याचा प्रयत्न केला आहे.

४. वाल्मीकी रामायणाची संस्कृत संहिता असलेली अनेक संस्करणे वेळोवेळी प्रसिद्ध झाली असून त्यातील काही संस्करणात संस्कृत टीका, भारतीय भाषांतील अनुवाद यांचा अंतर्भाव केलेला आढळतो. निर्णयसागर प्रेस, मुंबई, गुजराती प्रिंटिंग प्रेस, मुंबई; गीता प्रेस, गोरखपूर; श्री रामकोश मंडळ, पुणे ही संस्करणे त्याचप्रमाणे मद्रास, कुंभकोणम्, कलकत्ता, बडोदा येथून प्रसिद्ध झालेली संस्करणे विशेष उल्लेखनीय होत. बडोदे ओरिएंटल इन्स्टिटयूट, बडोदे यांच्या संस्करणात संशोधित शुद्ध पाठ आहे, त्यामुळे

ह्या संस्करणातील संहिता अधिकृत मानली जाते. ह्या संस्करणातील संहिताच स्वीकारणे योग्य असले, तरी ह्या संस्करणाच्या प्रती अत्यंत सुसज्ज अशा मोठ्या ग्रंथालयातच आहेत. अनेक महाविद्यालयांच्या ग्रंथालयांतून – विशेषत: ग्रामीण भागातील संस्थांतून – ही प्रत पहावयासही मिळत नाही. हा ग्रंथ आता दुर्मिळ झाला असल्याने सर्व सामान्यांना तो उपलब्ध होऊ शकत नाही.' वाल्मीकी रामायण : शाप आणि वर ' हा ग्रंथ प्रामुख्याने सर्व सामान्य वाचकांसाठी असल्याने त्यांना सहजप्राप्य अशाच संहितेचा स्वीकार करणे अगत्याचे होते केवळ एवढ्याच उद्देशाने गीता प्रेस, गोरखपूर ह्या प्रतीतील संस्कृत संहितेचा स्वीकार, तिच्यातील त्रुटी लक्षात घेऊनही केला आहे.

५. वाल्मीकी रामायणाचे जे चार सहा मराठी अनुवाद आज उपलब्ध आहेत, त्यातील कै. काशिनाथशास्त्री लेले यांचा अनुवाद सर्वात प्रथम प्रसिद्ध झालेला आहे, व विवेचनात त्याचाच स्वीकार केला आहे.

६. व्यक्तिविशेष आणि स्थलविशेष हा विभाग तयार करताना कै. सिद्धेश्वर शास्त्री चित्राव यांचा 'प्राचीन चरित्र कोश,' पं. महादेवशास्त्री जोशी संपादित 'भारतीय संस्कृति कोश' आणि श्री अमरेंद्र गाडगीळ यांनी संपादन केलेला 'श्री रामकोश' या संदर्भ ग्रंथाचा आधार घेतला आहे. काही ठिकाणी मजकूर जसाच्या तसा घेतला असून अन्यत्र फेरबदल केले आहेत. प्रस्तावनेसाठी ज्या अन्य ग्रंथांचे साहाय्य घेतले आहे त्यांची स्वतंत्र यादी अन्यत्र दिली आहे. ह्या सर्व ग्रंथांचे व ग्रंथकर्त्यांचे ऋण कधीही न फिटणारे आहे. त्यांच्या साहाय्यास्तव कृतज्ञ आहे.

७. शाप/वरांच्या विवेचनात < अशा खुणेचा उपयोग केला आहे. ह्या खुणेचे गणितशास्त्रातील एका चिन्हाशी साम्य असले तरी तेथील अर्थ येथे अभिप्रेत नाही. ज्या व्यक्तीच्या मुखातून शाप/वर प्रकट झाला आहे, त्या व्यक्तीच्या नावापुढे अशी < खूण योजिली आहे.

८. महत्त्वाचे मुद्रणदोष शुद्धिपत्रात दिले आहेत.

# ऋणं कृत्वा....

मिळेल तेथून आणि मिळेल तेवढं ऋण घेत राहणं मला आवडतं. मातृ, पितृ, आचार्य यांच्या ऋणांइतकंच ग्रंथ आणि मित्र ऋणही मोलाचं आहे, विलोभनीय आहे. माझं सुदैव असं की मी ज्यांच्या ज्यांच्यापुढं हात पसरला त्यांनी मला अत्यंत तत्परतेनं, प्रसन्नपणं मुक्त हस्ते दिलं, भरपेट दिलं. कधी कुणी नाकारलं नाही की अव्हेरलं नाही. कुणाकडूनही मला रिक्त हस्ते परतण्याची वेळच आली नाही. काही ऋणं अशी असतात की ती फेडावी अशी इच्छाच नसते, तर काही कधी फिटूच शकत नाहीत. ग्रंथ आणि मित्र ऋण हे दुसऱ्या प्रकारचं असतं. शिवाय ते 'निर्व्याज' असतं, मग मी तरी कशाला चिंता करू?

हा ग्रंथ तयार करताना मला अनेकांचं अनेक प्रकारे साहाय्य घ्यावं लागलं व मी ते घेतलंही. लेखन, मुद्रण आणि प्रकाशन ह्या ग्रंथनिर्मितीच्या प्रत्येक अवस्थेत ज्यांनी ज्यांनी मला साहाय्य केलं त्या सर्वांच्या नावांची नोंद कितीही सूक्ष्मपणे करण्याचे ठरविले तरी ती यादी समग्र व परिपूर्ण होण्याची सुतराम शक्यता नाही. विस्मृतीनं किंवा अनवधानतेनं चुकून जरी एखाद्या नावाचा उल्लेख राहून गेला तरी त्या व्यक्तीवर, संस्थेवर अन्याय केल्यासारखं, कृतघ्नपणाचं होईल. केवळ एवढ्याच कारणास्तव 'श्रेय नामावली' देण्याचे मी जाणून बुजून टाळत आहे. क्षमस्व. ज्या ज्या व्यक्तींचे व संस्थांचे मला साहाय्य लाभले त्या सर्वांच्या ऋणात सदैव राहणं आणि कृतज्ञतेनं हात जोडणं मी पसंत करतो.

ऋण करून ठेवणं सोपं होतं, माझ्या हाती होतं नि ते मी भरपूर करून ठेवलं. मी माझ्या कृतीनं वरील उक्तीचा पूर्वार्ध सार्थ केला आहे. उतरार्धही सार्थ व्हावा असे मला मनोमन वाटते, परंतु ते करणे माझ्या हाती नाही. तो अधिकार सर्वस्वी वाचक, रसिक आणि समीक्षक यांचा आहे. त्यांनी मला 'वरदान' द्यावे एवढीच मी याचना करू शकतो.

**श्री. र. भिडे**

# शा पा द पि  व रा द पि ।

भारतीयांचे सांस्कृतिक जीवन घडविण्यात वेद, उपनिषदे, पुराणे, रामायण, महाभारत, भगवद्गीता, भागवतादी ग्रंथांनी केलेले कार्य अतुलनीय आहे. हे ग्रंथ भारतीय संस्कृतीचे अविभाज्य अंग आहेत. तसे पाहिले तर भगवद्गीता हा काही स्वतंत्र ग्रंथ नव्हे; महाभारताच्या भीष्मपर्वातील एक भाग, परंतु स्वतंत्र ग्रंथाची प्रतिष्ठा त्याला लाभली, याचे कारण त्यातील मौलिक विचारधन. शतकानुशतके लोटलीं तरी त्यांची टवटवी आणि लोकप्रियता यत्किंचितही कमी झालेली नाही. ह्या ग्रंथांच्या निर्मितीपासून आजतागायत श्रेष्ठ धार्मिक ग्रंथ म्हणून त्यांच्याकडे पाहिले गेल्याने ते पूज्य व वंदनीय झाले; परंतु केवळ एवढ्याच कारणास्तव त्यांना भारतीयांच्या हृदयात अढळ स्थान प्राप्त झालेले नाही. ह्या ग्रंथांतून मानवी जीवनाचे जे दर्शन घडविले आहे, जे आदर्श समाजापुढे उभे केले आहेत, जे तत्त्वज्ञान प्रतिपादिले आहे, जी जीवनमूल्ये जोपासली आहेत आणि मानवी स्वभावाच्या ज्या असंख्य छटा वर्णिल्या आहेत, त्या सत्याधिष्ठित आहेत. ह्या ग्रंथांवर धार्मिकतेचा शिक्का मारला गेल्याने, ते देवांचे गुणगान करणारे, त्यांचे श्रेष्ठत्व ठसविणारे, दैवी शक्तीने भरलेले व भारलेले ग्रंथ आहेत, असा जो समज आहे, त्यात केवळ अंशात्मकच सत्य आहे. हे ग्रंथ सर्वस्वी मानवांचे आहेत. ते मानवांनी, मानवांसाठी लिहिलेले, मानवी ग्रंथ आहेत. यांत देवांच्या लीलांपेक्षा मानवांच्या कार्यांचा, शौर्याचा आणि गुणांचा गौरव आहे. ह्यांतून देवांना आवाहने केलेली आढळली, तरी मानवांनी दिलेली आणि स्वीकारलेली आव्हाने विलोभनीय आहेत. ह्या ग्रंथांच्या लौकिक स्वरूपातच त्यांचे अलौकित्व साठविलेले आहे. ह्या ग्रंथांतून वर्णिलेल्या कथा, चरित्रे, तत्त्वज्ञान हे संपूर्णतया मानवाचे आहे. ह्यातील सुख-दुःखे, यशापयश, गुणावगुण हे तुमचे-आमचे आहेत. ह्या ग्रंथांतील अतिमानवी (Superhuman) भाग हा वास्तविक महामानवी आहे. साहित्य म्हणूनही ह्या ग्रंथांचे श्रेष्ठत्व अनन्यसाधारण आहे. काळाने त्यांचे चिरंजीवित्व सिद्ध केले आहे. हे ग्रंथ रत्नाकरासारखे गर्भश्रीमंत आहेत. ह्या ग्रंथांतील सौंदर्याचे विविध पैलू विद्वानांनी आपल्यापुढे वेळोवेळी उघडे केले आहेत. संशोधकांनी अत्यंत परिश्रमपूर्वक ह्या ग्रंथांच्या शुद्ध प्रती केल्या आहेत. काव्य नाटकादी ललित कृतींना विषयांचा पुरवठा केला आहे. ह्या ग्रंथांवरील रसिकांचे प्रेम कधीही न ओसरणारे आहे. त्यांची गोडी अवीट आहे. ह्या ग्रंथांचे वर्णन करण्यास शब्द अपुरे पडतात.

आदिकवी वाल्मीकीने रचलेले रामायण हे महाकाव्य मानवाला दीपस्तंभाप्रमाणे शेकडो वर्षे सातत्याने मार्गदर्शन करीत आले आहे. ह्या ग्रंथाचे श्रेष्ठत्व

वर्णनातीत आहे. 'जोपर्यंत भूतलावर पर्वत व नद्या राहतील, तोपर्यंत रामायण कथा लोकांत प्रचारात राहील', ही ब्रह्मदेवाची भविष्यवाणी किती यथार्थ होती हे कालाने सिद्ध केले आहे. हा ग्रंथ म्हणजे जे जे उदात्त व आदर्श आहे, त्यांचा कोशच आहे. **'वाल्मीकी ऋषी झाला नसता। तरी आम्हासि कैंची रामकथा ?'** अशा शब्दांत वाल्मीकीचा रामदासांनी गौरव करून ती **'ब्रह्मांड भेदूनी पैलाड न्यावी'**, अशी उत्कट इच्छा व्यक्त केली आहे. 'जनतेला आपला भाऊ खरा वाटत नाही, पण भरत-लक्ष्मण खरे वाटतात; आपली पत्नी खरी वाटत नाही, पण सीता खरी वाटते; आपला पती खरा वाटत नाही, इतका राम खरा वाटतो. अशी त्रिकालाबाधित संस्कृती रामायणात वाल्मीकींनी चित्रित केली आहे. रामायण हा भारतीय संस्कृतीचा आदर्श आहे. त्याने भारताच्या संस्कृतीला वळण देऊन भारतीय सामाजिक जीवनाला उदात्तपणा आणला आहे.' अशा शब्दांत रवींद्रनाथ टागोरांनी हा ग्रंथ प्रशंसिला आहे. श्रीरामकोशाचे संपादक श्री. अमरेंद्र गाडगीळ 'रामायण म्हणजे सत्यघटनेवरती महाकाव्याचा साज चढविलेले ऐतिहासिक महाकाव्य, आमचा प्राचीन राष्ट्रीय इतिहास.' अशा शब्दांत ह्या ग्रंथाचा महिमा गातात. 'वाल्मीकी रामायण म्हणजे भारतीय संकृतीचे, भारतीय जीवनादर्शाचे चित्र होय. वाल्मीकीने काव्य म्हणूनच त्याची रचना केली. हे काव्य आदर्श महाकाव्य म्हणून गणले गेले. दण्डी इत्यादींनी महाकाव्याची लक्षणे यावरूनच निश्चित केली. ह्या महाकाव्याचा जगातील पंच महाकाव्यांत समावेश केला जातो. म्हणून काव्य या दृष्टीने भारतीय काव्य-मर्मज्ञ याला शिरोधार्य मानतातच, पण परदेशांतील रसिक जनांनीही याचा रसास्वाद घेऊन गौरव केला आहे.' असे उद्‌गार रामायणाचे एक गाढे अभ्यासक डॉ. ग. न. साठे यांनी काढले आहेत.

रामकथेचे अस्तित्व वाल्मीकीपूर्व आहे. वाल्मीकीला ही कथा नारदाने सांगितली होती व त्याच्यापासून श्रवण केल्याप्रमाणे रामाचे वृत्त कथन करण्यास ब्रह्मदेवाने त्याला प्रोत्साहित केले. रामायणाच्या जडण-घडणीत शाप आणि वर यांना महत्त्वपूर्ण स्थान आहे. नारदाच्या संक्षिप्त कथेत शापांचा उल्लेख नसला तरी वरांचा आहे. वाल्मीकीने निषादाला दिलेला शाप हा रामायणाच्या रचनेस स्फूर्तिदायक ठरला; तर रामायणाचा शेवट, दुर्वासाने न दिलेल्या शापाने झाला. दुर्वासाच्या शापाने—तो सशर्त होता—रघुकुलाचा नाश होऊ नये, यास्तव लक्ष्मणाने आपला बळी देऊन शर्तीचे पालन केले आणि रघुवंशावरील अघोर सावट टाळले. ब्रह्मदेवाच्या वराने वाल्मीकीने रामायण रचले असले तरी ते प्रत्यक्ष घडले ते दशरथाने कैकेयीला देऊ केलेल्या वरांमुळे. रावणाला प्राप्त झालेल्या मर्यादित अमरत्वामुळेच त्याचे वर्तन अमर्याद झाले, मेघनादाने देवांना जिकले आणि कुंभकर्ण दीर्घ निद्रेच्या आहारी गेला. हनुमानाच्या स्वयंभू सामर्थ्यात अष्ट देवतांच्या वरांची भर पडल्याने त्याला असाध्य ते साध्य होऊ शकले. ह्या ग्रंथात शाप/वर इतक्या विपुल

प्रमाणात आहेत की रामायण ही एक शापकथा आहे, वरकथा आहे असे म्हटल्यास अतिशयोक्ती होणार नाही. रामायणातील कित्येक घटनाप्रसंगांना शाप/वर यांचा भक्कम आधार लाभला आहे. व्यक्तिचित्रणावरही त्यांचा ठसा स्पष्ट उमटलेला आहे. शाप/वर यांना स्वतंत्र अस्तित्व नसले, तरी ते कथेशी इतके एकजीव झाले आहेत की त्यांना वेगळे काढणे अशक्य आहे. शाप/वर वगळल्यास कथेचे दुवे, धागे-दोरे, त्यांचे संदर्भ, यांची संगती नीट लावता येणार नाही. शाप/वर संकल्पना पुरातन असली तरी वाल्मीकीने आपल्या प्रतिभेने शाप/वर यांची अत्यंत कौशल्य-पूर्ण योजना करून ह्या ग्रंथाचे सौंदर्य, सौष्ठव आणि सामर्थ्य वृद्धिगत केले आहे.

वेद, उपनिषदे, आणि विशेषे करून रामायण, महाभारत, तसेच भागवत इत्यादी पुराणे या प्राचीन ग्रंथभांडारात शाप/वर यांचे उल्लेख जागोजाग आढळ-तात. ते सर्व अभ्यासून एकत्र केल्यास एक उत्कृष्ट संदर्भ ग्रंथ होईल. शाप/वर यांच्या अभ्यासातून ग्रंथांचे स्वरूप, त्यांतून व्यक्त होणारे सामाजिक, सांस्कृतिक, धार्मिक व नैतिक जीवन, स्वभाववैशिष्टचे यावर बराच उपयुक्त प्रकाश पडू शकेल. व्यास, वाल्मीकी यांसारख्या प्रज्ञावंतांनी आपल्या ग्रंथांतून शाप/वर यांना कोणत्या कारणास्तव स्थान दिले? शाप/वर ही कल्पना उदयास कशी आली? शाप/वर हे ह्या ग्रंथांचे अविभाज्य अंग आहे काय? नसल्यास, त्यांच्याविषयी इतके जबर-दस्त आकर्षण का? साहित्य-निर्मितीच्या दृष्टीने शाप/वर ह्यांचे महत्त्व कोणते? शाप/वर देण्याची कारणे व त्यांचे होणारे परिणाम कोणते? शाप/वर देण्याची शक्ती कोणाला, कशी आणि किती प्रमाणात प्राप्त होऊ शकते? तिचा अतिरिक्त उपयोग केल्यास ती नष्ट होऊ शकते काय? असे अनेक प्रश्न हे ग्रंथ वाचत असताना मनात उद्भवतात. त्यांची उत्तरे शोधण्यापूर्वी शाप/वर यांचे स्वरूप जाणून घेणे अगत्याचे आहे.

मानवाच्या शक्तीचा आवाका मर्यादित असतो आणि त्या मानाने त्याच्या आकांक्षा, ईप्सिते अमर्याद असतात. कित्येकदा प्राथमिक गरजा भागविण्यासही मानवी शक्ती, प्रयत्न पुरेसे पडत नाहीत. अशा वेळी मानवी शक्तीपेक्षा अधिक बलवान, प्रभावी आणि हमखास यश प्राप्त होईल, अशा शक्तीचा शोध मानव घेऊ लागतो. प्राचीन काळी मानवाच्या गरजा अत्यंत माफक असत. अन्न, वस्त्र, निवारा आणि वंशवृद्धी ह्या प्राथमिक गरजा. परंतु त्या भागविण्यास हाती असलेली साधने आणि मानवी शक्ती अपुरी पडत असल्याने अन्य प्रभावी साधनांचा आणि साम-र्थ्याचा शोध सुरू झाला. वस्तुमात्राच्या ठायी एक सुप्त शक्ती असते व ती जागृत केल्यास ईप्सिते पूर्ण होऊ शकतील, असा विश्वास बळावू लागला व ह्या सुप्त शक्तीला जागृत करण्याची साधने, मार्ग उपलब्ध करून घेण्याची धडपड सुरू झाली. मंत्र-तंत्रांचा उपयोग, दैवी शक्तींना आवाहन केल्याने कामना-परिपूर्ती होऊ शकते, अशी श्रद्धा बळावू लागली. साधनांचा उपयोग आणि ईप्सितांची पूर्ती यांतील

कार्य-कारणभाव अनाकलनीय असल्याने, ह्या प्रयत्नांच्या भोवती गूढता, अद्‌भुतता, चमत्कार, अतींद्रिय सामर्थ्य इत्यादींची वलये पसरू लागली. ऐहिक सुखसंवर्धनासाठी ही सारी खटपट होती; वैज्ञानिकांचेही सारे परिश्रम याच कारणांसाठी असतात. परंतु दोहोंत महत्त्वाचे फरक आहेत. वैज्ञानिकांचे सारे प्रयत्न कार्य आणि कारण यांची संगती लावण्यासाठी असतात. जरूर ती कारणे आवश्यक त्या प्रमाणात असली, तर त्यांच्या सुयोग्य संगतीने इच्छित फल मिळणारच, यावर त्याची श्रद्धा असते. वैज्ञानिकांनी लावलेले अनेक शोध सामान्य माणसाला थक्क करून सोडणारे विलक्षण चमत्कार वाटतात. भिंतीपलीकडचे दृश्य किंवा आवाज सामान्य माणसाला दिसत नाही, ऐकू येत नाही. परंतु वैज्ञानिक साता समुद्रापलीकडचे दर्शन क्षणात घडवितो, बोलणे ऐकवितो ही केवढी अद्‌भुत घटना आहे! केवढे प्रचंड सामर्थ्य वैज्ञानिकांनी निर्माण केले आहे! प्रयत्नांना यश आल्याचा विलक्षण आनंद असला तरी त्यात वैज्ञानिकाला चमत्कार वाटत नाही. कारण त्याला कार्य-कारणभाव कळलेला असतो. सामान्य माणसाला तो ज्ञात नसल्याने तो आश्चर्य-चकित होतो.

इच्छापूर्तीचे साध्य आणि त्यासाठी उपयोगात आणलेली साधने यातील कार्य-कारणभाव न उलगडल्याने प्राचीन काळी प्राप्त झालेल्या यशाची संभावना 'चमत्कार' या सदरात जमा झाली. मानवी शक्तीने साध्य न होणाऱ्या गोष्टी जेव्हा साध्य होऊ लागल्या, तेव्हा त्या चमत्कारामागे काही दिव्य, दैवी, अद्‌भुत, अचाट शक्ती असली पाहिजे, असा समज रूढ झाला, आणि ती प्राप्त करून घेण्याचे जे प्रयत्न झाले त्यांतून यातू, यज्ञ, दान, तप इत्यादी कल्पना उदयास आल्या. शाप/वर ही कल्पना यातुविद्येतून उदयास आल्याने यातूचे स्वरूप जाणून घेतले पाहिजे.

## यातु-क्रिया

यातू म्हणजे जादू. वस्तुमात्राचे ठायी जी सुप्त शक्ती असते तिला यातुशक्ती म्हणतात. तिचे ज्ञान ती यातुविद्या, ती जाणणारा तो यातुधान. राक्षसांना यातुधान म्हणण्याचे कारण त्यांना ही शक्ती अवगत असे. या शक्तीमुळेच त्यांना इच्छेनुरूप वेगवेगळी रूपे धारण करता येत. मारीचाला ही विद्या अवगत असल्याने त्याने कांचनमृगाचे रूप धारण करून सीतेला भुरळ पाडली आणि त्यामुळेच पुढे सारे रामायण घडले. विश्वातील प्रत्येक वस्तुच्या ठिकाणी काही सुप्त शक्ती असते व मंत्रांच्या अचूक उच्चाराने ती जागृत करता येते आणि त्यायोगे कामनापूर्ती होऊ शकते, असे यातुक्रियेचे गणित आहे. यातू हा आदिमानवाच्या जीवनाचा मूलाधार होय. गूढ, अनाकलनीय शक्तीवर त्याचा पूर्ण विश्वास होता. त्याच्या कल्पनेत ईश्वर नसल्याने भक्तीने त्याला वश करून घेण्याला अवकाशच नव्हता. ईश्वर, पूजा, आवाहन, यज्ञ या कल्पना सांस्कृतिक विकासानंतर अस्तित्वात आल्या. विधि-

युक्त मंत्रांचे अचूक शब्दोच्चार केल्यास इच्छाशक्ती वृद्धिगत होतेच, त्यात कोणाच्या इच्छेचा, कृपेचा वा अवकृपेचा प्रश्नच निर्माण होत नाही, असे त्याला मनोमन वाटत असे. म्हणूनच यातूसंबंधीच्या, कल्पनेत ईश्वराची प्रसन्नता किंवा कोप यांना स्थान नाही, नैतिकतेलाही अवसर नाही. What is ritually correct is ethically right.

यातुशक्ती ही धर्मकल्पनेची प्राथमिक अवस्था होय. फ्रेजरच्या मते ही विज्ञानाचीही पूर्वस्थिती होय. इच्छापूर्ती हे दोहोंचेही उद्दिष्ट आणि वस्तूच्या ठायी असलेल्या उपजत सामर्थ्यावर दोहोंतही दृढ श्रद्धा असते. फरक आहे तो त्यांच्या साधनेत. वैज्ञानिकाचा सारा भर अनुभव, प्रयोग यांवर असतो, तर यातुक्रियेत मदार मंत्र-तंत्रावर असते. बौद्धिक आधाराने वैज्ञानिक वाटचाल करतो, तर गूढता, अडाणीपणा, अंधश्रद्धा यातुक्रियेला खतपाणी पुरवतात. फ्रेजरने अत्यंत मार्मिक शब्दांत दोहोंतील भेद पुढीलप्रमाणे व्यक्त केला आहे. Legitimately applied they yield science, illegitimataly applied they yield magic, the bastard sistor of science. विशिष्ट मंत्र आणि त्यांचे विशिष्ट विधी म्हणजेच तंत्र. या यात्वात्मिक क्रियेने प्राथमिक अवस्थेतील मानव आपली इच्छापूर्ती करून घेई. तंत्रविद्येत शिव-शक्ती, प्रकृति-पुरुष, यांच्या संयोगाला महत्त्व दिलेले आढळते. त्यातूनच शिवपूजा, लिंगपूजा, शक्तिपूजा, पशुबली, नरबली देण्याच्या कल्पना प्रसृत झाल्या. शक्तिपूजेतील वामाचार, स्वैराचार यायोगे अनेक अनिष्ट प्रथा सुरू झाल्या.

## यज्ञ-कर्म

भारतातील आर्येतर जमाती आपल्या प्राथमिक गरजा आणि इच्छापूर्ती 'तंत्र' विद्येने साध्य करून घेत, तर वैदिक आर्य त्यासाठी ज्या साधनाचा अवलंब करीत त्यास 'यज्ञ' असे संबोधले जाते. यज्ञ-संस्थेचा उदय यात्वात्मक कल्पनेतूनच झाला आहे. प्रसिद्ध मानववंश-शास्त्रज्ञ अँड्र्यू लँग यज्ञविधीविषयी असे म्हणतो,[1] 'On the whole the religion of the Rishis is practical; it might also be said, is magical. They desire temporal blessings, rain, sunshine, long life, power, wealth in flocks and herds. The whole purpose of the sacrifices, which occupy so much of their time and the thought is to obtain good things. The sacrifice and the sacrificer came between Gods and men. On the man's side is faith, munificence, a compelling force of prayer and intenseness of will; the sacrifice invigorates the gods to do the will of the sacrificer.' एकंदरीत पाहता ऋषींच्या धर्माचे

१. वैदिक यज्ञ – तंत्रसाधना – भक्तियोग, पृ. ५२

स्वरूप व्यावहारिक आहे, यात्वात्मक आहे, असेही म्हणण्यास हरकत नाही. कालानुरूप वर-आशीर्वाद, वर्षा, सूर्यप्रकाश, दीर्घायुष्य, सामर्थ्य आणि पशूंच्या कळपांच्या रूपाने संपत्ती–ह्यांची प्राप्ती व्हावी, ही त्यांची इच्छा. ज्या यज्ञविधीत त्यांचा बराच वेळ आणि विचारशक्ती यांचा व्यय होई, त्यांचा उद्देश चांगल्या गोष्टींची प्राप्ती व्हावी, एवढाच असे. यज्ञ आणि यज्ञकर्ता हे देव आणि मानव यातील मध्यस्थ. श्रद्धा, औदार्य, प्रार्थना, सामर्थ्य आणि उत्कट इच्छा ही मानवाची जमेची बाजू; आणि यज्ञकर्त्याची इच्छा पूर्ण करण्यास देवाला भाग पाडण्याचे समर्थ साधन म्हणजे यज्ञ.

'यज्ञ' हा शब्द 'यज्' ह्या धातूपासून उत्पन्न झाला आहे. यज् धातूचा अर्थ देवपूजा, संगतीकरण व दान असा सांगितला आहे. आपल्यापेक्षा जो श्रेष्ठ आहे, तो देवासारखा आहे असे समजून त्याची पूजा करणे; आपल्या बरोबरीच्या लोकांना प्रेमाने जोडणे, एकत्र करणे; तसेच आपल्यापेक्षा जो लहान आहे, त्याला काही तरी देणे असा यज्ञ शब्दाने व्यक्त होणाऱ्या अर्थाचा आशय आहे. म्हणजेच सन्मान, संघटन आणि दान या तीन तत्त्वांनी युक्त असे हे यज्ञकर्म आहे. व्यक्तीच्या स्वताविषयीच्या कर्तव्याबरोबर सामाजिक कर्तव्याची जाणीव ठेवणे ही कल्पना यज्ञ या शब्दातून ध्वनित होते.[२] यज्ञ हे मुख्यत: त्यागप्रधान कर्म असून प्रथम ते असुरांकडे होते. नंतर ते देवांकडे आले आणि पुढे ऋषींनी–मानवांनी त्यांच्याकडून मिळवले. परंतु याबाबत मतभेद आहेत. यज्ञात याचना असल्याने 'याच्' ह्या धातूपासूनही हा शब्द व्युत्पादिला जातो. अग्नीच्या ठायी असणाऱ्या प्रचंड शक्तीचा शोध लागताच मानवी जीवनात विलक्षण क्रांती घडून आली आणि अग्नीला देवत्व प्राप्त झाले. त्याला संतुष्ट करण्यासाठी निरनिराळ्या उपासना सुरू झाल्या. अग्नी प्रसन्न झाला, तर कामनापूर्ती होते अशी श्रद्धा बळावली. अग्नीचा कोप झाल्यास काही तरी अरिष्ट कोसळणार, अशी भीती वाटू लागली. यामुळे इष्ट देवतेला संतुष्ट करण्याचे जे नवे माध्यम गवसले ते म्हणजे यज्ञ. अग्नीला आहुती दिल्यास तो इष्ट देवतेला ती पोहोचवितो व कामनापूर्ती होते, असा विश्वास जोपासला गेला. यात निव्वळ देवघेवीचा भाग नसून यात्वात्मक क्रियेने देवांचे सामर्थ्य वृद्धिगत करण्याचाही भाग असे.

**देवान्भावयतानेन ते देवा भावयन्तु वः।**
**परस्परं भावयन्तः श्रेयः परमवाप्स्यथ ॥**

–भगवद्गीता ३ / ११

यातील 'भावयत्' शब्दाचा अर्थ 'शक्तिमान करणे' असा आहे. ऋग्वेदातही सर्वत्र आढळणाऱ्या देवघेवीच्या भावनेमागे 'भावित' करण्याची कल्पना आहेच.

---

२. भारतीय संस्कृतिकोश, खंड ७, पृ. ५९९

आहुती देऊन देवतेला संतुष्ट केले, म्हणजे इच्छित कार्य सफल होईलच, अशी खात्री असल्याने सदेह स्वर्गाला जाण्याची अवास्तव इच्छा त्रिशंकू मनात बाळगून होता. ती पूर्ण व्हावी म्हणूनच त्याने यज्ञ आरंभला.

कर्तव्य-बुद्धीने प्रेरित होऊन केलेल्या फलाशा-रहित कर्मालाच भगवद्गीतेने यज्ञ संबोधले आहे. यज्ञ म्हणजे पूज्य व्यक्तीसाठी करावा लागणारा त्याग. धर्म कल्पनाही यज्ञाशी संबंधित आहे. यज्ञात परमेश्वराचे अधिष्ठान असावे लागते व त्याच्याच कृपेने सृष्टिचक्र चालू राहते.

**अन्नाद्भवन्ति भूतानि पर्जन्यादन्नसंभवः ।**
**यज्ञाद्भवति पर्जन्यो यज्ञः कर्मसमुद्भवः ।। १४**
**कर्म ब्रह्मोद्भवं विद्धि ब्रह्माक्षरसमुद्भवम् ।**
**तस्मात्सर्वगतं ब्रह्म नित्यं यज्ञे प्रतिष्ठितम् ।। १५** (अध्याय ३)

विश्वनिर्मितीतील यज्ञ हे पहिले कर्म असून त्यामुळे समाजाचे भरण-पोषणही ह्या क्रियेत होत असते. ऋग्वेदात '**यज्ञेन यज्ञमयजन्त देवास्तानि धर्माणि प्रथमान्यासन्**' असे म्हटले आहे.

ऐहिक सुखसंपादनासाठी जसे वैयक्तिक रीत्या यज्ञ केले जात, त्याचप्रमाणे काही यज्ञ समाज-कल्याणासाठीही केले जात, आणि त्यांच्या फलाचा लाभ एकाहून अधिक व्यक्तींना होत असे. कुटुंब, समाज, देश, राज्य, विश्व यांच्या कल्याणासाठी यज्ञ होत असत. पर्जन्यवृष्टी, रोगनिवारण, शत्रूच्या धाडींपासून संरक्षण, सामाजिक नाशापासून मुक्तता, राज्याचा अभ्युदय व्हावा, राज्याची हानी होऊ नये, यास्तव यज्ञाचा अवलंब केला जाई.

यज्ञाविषयी डॉ. स. रा. गाडगीळ म्हणतात—' विशिष्ट मंत्र आणि यथासांग कर्म यांच्या तंत्रशुद्ध प्रयोगाने निसर्गातील शक्तीवर प्रभुत्व स्थापन करता येते, या यात्वात्मक कल्पनेवर यज्ञविधी उभारला आहे. कामनापूर्तीसाठी परमेश्वरासारख्या दयाघन व्यक्तिरूप शक्तीची (Personal agent) यातुविधीमध्ये जशी आवश्यकता नसते, तशीच ती यज्ञातही नसते. यज्ञातील मंत्रयुक्त विधीमध्ये स्वयंभू सामर्थ्य आहे. याचकाच्या कामना पूर्ण करणे अगर न करणे हा देवतेच्या इच्छेचा प्रश्नच नाही. अगदी अचूकपणे जर कर्माचरण झाले तर फलप्राप्ती झालीच पाहिजे. महत्त्व मंत्रांच्या अचूक उच्चारांना आणि विधियुक्त कर्माचरणाला आहे. त्यांत यत्किंचितही दोष राहता उपयोगी नाही. यज्ञामध्ये कर्मातील सदोषता टाळण्यासाठी ब्रह्मा नावाचा ऋत्विज यज्ञवेदीच्या दक्षिण दिशेला बसलेला असतो. यज्ञकर्म विधियुक्त होते आहे किंवा नाही यावर लक्ष ठेवणे, एवढेच या ऋत्विजाचे कार्य. यज्ञकर्मामध्ये दोष निर्माण झाल्यास फलप्राप्तीऐवजी स्वता यज्ञकर्त्यावरच मृत्यूचे संकट ओढवण्याची भीती असते. मृत्यूची दक्षिण दिशा संभाळण्यासाठी ब्रह्मा दक्षिणेला बसलेला असतो. ' वेडे वाकुडे गाईन, परि तुझाचि म्हणवीन ' ह्या भक्ति-

विचाराला येथे थारा नाही. कारण फल देण्याचे कार्य देवतांकडे नाहीच. देवता नाममात्र आहेत.' [३] आपल्या विधानाच्या पुष्ट्यर्थ त्यांनी डॉ. रा. ना. दाण्डेकर यांचे मत दिले आहे. 'Sacrifice is regarded as possessing a mystical potence superior even to gods who, it is sometimes stated attained to their Divine rank by means of sacrifice.' यज्ञामुळेच देवांना देवपण प्राप्त झाले आहे, ही कल्पना सर्वत्र आढळते.

तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी यांना डॉ. गाडगीळ यांचे मत पूर्णतः मान्य नाही.[३] ते म्हणतात, 'भक्ती हा प्रेम भावनेचा विशिष्ट प्रकार आहे. ह्या विशिष्ट प्रकारास निष्ठा असेही म्हणतात. ऋग्वेदातील यज्ञविधीमध्ये हा निष्ठेचाच प्रकार वारंवार व्यक्त झालेला दिसून येतो. मानवशास्त्राप्रमाणे वैदिक यज्ञविधी हा केवळ यातुविधीच ठरत नाही. कारण अलौकिक शक्तीला स्वताच्या ताब्यात संपूर्णपणे घेण्याची प्रक्रिया यातुक्रियेत असते, तशी ती वैदिक यज्ञविधीत नसते. देवतांना शरण जाण्याची भावना त्यात प्रधान आहे. यज्ञाने देवता वश होतात, ह्याचे कारण यज्ञ हा अर्पणविधी आहे. त्यात यातुक्रियाही समाविष्ट आहे, यात शंका नाही. पण वैदिक यज्ञ म्हणजे केवळ यातुक्रिया नाही....जगात असा कोणताही धर्म नाही की त्यात कमी-जास्त प्रमाणात यातू नाही. यातूनेच चमत्कार घडतो व सगळेच धर्म, चमत्कार घडतो, असा विश्वास ठेवतात. मानवी इच्छेची सर्वशक्तिमत्ता (omnipotence of will) हे जादूचे तत्त्व आहे आणि याचेच व्यक्तिरूप परमेश्वराची संकल्पना उन्नत रूप होय...यातूचेच विकसित स्वरूप भक्तिप्रधान धर्म होय.'

## तपश्चर्या

भारतीय संस्कृतीच्या तीन प्रधान अंगांपैकी तप हे एक होय.[४] शब्दकल्पद्रुमात तपाची व्याख्या '**तपति तापयति वा**'– जे तापते व तापवते ते तप – अशी दिली आहे. सर्वलक्षणसंग्रहात '**क्षुत्पिपासा शीतोष्णादिद्वन्द्वसहनम्**'– भूक-तहान शीत-उष्ण इत्यादी द्वंद्वे सहन करणे म्हणजे तप असे वर्णिले आहे. धर्म, अर्थ, काम, मोक्ष हे चार पुरुषार्थ आणि ब्रह्मचर्य, गार्हस्थ्य, वानप्रस्थ आणि संन्यास हे चार आश्रम यांच्याशी तपाचा संबंध आहे. मानवी जीवन निर्मल आणि निष्कलंक व्हावयाचे असेल, तर तपाग्नीने ते तापविले पाहिजे. उपनिषत्कारांच्या मते तप हे वानप्रस्थाश्रमाचे एक अविभाज्य अंग आहे.

**तपःश्रद्धे ये ह्युपवसन्त्यरण्ये शान्ता विद्वांसो भैक्ष्यचर्यां चरन्तः।**
**सूर्यद्वारेण ते विरजाः प्रयान्ति यत्रामृतः स पुरुषोऽह्यव्ययात्मा ॥**

–मंडुकोनिषद १/११

---

३. वैदिक यज्ञ – तंत्र साधना – भक्तियोग, पृ. ४७; प्रस्तावना, पृ. १५
४. भारतीय संस्कृति–कोश, खंड ४, पृष्ठे ३५–३७ च्या आधारे.

जे शांत व विद्वान पुरुष वनात राहून भिक्षावृत्तीने निर्वाह करतात आणि श्रद्धापूर्वक तप आचरतात, ते पापरहित होऊन सूर्यद्वाराने अमर्त्य व अव्यय अशा पुरुषाकडे पोहोचतात. महानारायणीय उपनिषदात तपाचे व्यापक स्वरूप पुढीलप्रमाणे दिले आहे–

**ऋतं तपः सत्यं तपः श्रुतं तपः शान्तं तपो दमस्तपः ।**
**शमस्तपो दानं तपो यज्ञं तपो भूर्भुवस्सुवर्ब्रह्मैतदुपास्यैतत्तपः ॥**

ऋत, सत्य, श्रुत, शांत, दम, शम, दान, यज्ञ ही तपे असून सच्चिदानंदस्वरूप ब्रह्माची उपासना करणे हेही तपच होय. **तपसि सर्वं प्रतिष्ठितं तस्मात्तपः परमं वदन्ति ।** तपामध्येच सर्व प्रतिष्ठित आहे; त्यामुळे तप हे श्रेष्ठ होय, असे याच उपनिषदात म्हटले आहे. धर्मसूत्रकारांनी पापनिष्कृतीसाठीही तप करण्यास सांगितले आहे.

**देवद्विजगुरुप्राज्ञपूजनं शौचमार्जवम् ।**
**ब्रह्मचर्यमहिंसा च शारीरं तप उच्यते ॥ १४ ॥**
**अनुद्वेगकरं वाक्यं सत्यं प्रियहितं च यत् ।**
**स्वाध्यायाभ्यसनं चैव वाङ्मय तप उच्यते ॥ १५ ॥**
**मनप्रसादः सौम्यत्वं मौनमात्मविनिग्रहः ।**
**भावसंशुद्धिरित्येतत्तपो मानसमुच्यते ॥ १६ ॥** (अध्याय १७)

'देव, ब्राह्मण, गुरू व विद्वान यांची पूजा, शुद्धी, ऋजुत्व, ब्रह्मचर्य व अहिंसा हे शारीर तप होय. उद्वेग न आणणारी वाणी, सत्य व प्रिय भाषण आणि स्वाध्याय हे वाचिक तप होय. मनाची प्रसन्नता, सौम्यता, मौन, आत्मनिग्रह व भावसंशुद्धी हे मानसिक तप होय. फलाची आशा न धरता अत्यंत श्रद्धापूर्वक काया-वाचा-मने केलेले तप सात्त्विक; सत्कार, पूजा, सन्मान इत्यादी ऐहिक हेतूने व दांभिकपणे केलेले तप राजस व मूर्खपणाने स्वताला कष्टवून किंवा दुसऱ्याला त्रास देण्याच्या इच्छेने केलेले तप तामस होय' असे भगवद्गीतेत तपाबाबत सांगितले आहे.

**यद्दुस्तरं यद्दुरापं यद्दुर्गं यच्च दुष्करम् ।**
**सर्वं तत्तपसा साध्यं तपो हि दुरतिक्रमम् ॥** मनुस्मृती

जे दुस्तर, दुष्प्राप्य, दुर्गम व दुष्कर आहे ते सर्व तपाने साध्य होते. तपाचे अतिक्रमण मात्र कोणालाही करता येत नाही– असे मनूने तपाचे सामर्थ्य सांगितले आहे. तपाने चिंतनाला सामर्थ्य प्राप्त होते, ज्ञान वाढीस लागते. व्यासांनी प्रचंड परिश्रम घेतल्यामुळे प्राचीन वाङ्मयाचा संग्रह होऊ शकला. प्राचीन ग्रंथांतील अनेक व्यक्तींच्या जीवनातून तपाचे सामर्थ्य प्रतीत होते.

मानवी शक्तीने ज्या गोष्टी प्राप्त होऊ शकत नाहीत, त्या तपश्चर्येने साध्य होऊ शकतात. तपाचा आश्रय मानवांप्रमाणे देव-दानवांनीही केला. ब्रह्मदेवाला सृष्टि-निर्मितीचे सामर्थ्य तपामुळेच प्राप्त झाले. 'ब्रह्मर्षी' होण्याच्या इच्छेनेच

विश्वामित्राने घोर तपश्चर्या केली. रावणाने उग्र तपश्चर्या करूनच मर्यादित अमरत्व पदरी पाडून घेतले. शिवाच्या प्रसन्नतेचा लाभ मिळावा, यास्तव पार्वतीने तप आचरिले. अनसूयेने तपश्चर्येने शिवाला प्रसन्न तर केलेच, परंतु दुष्काळ निवारण्यासाठी स्वर्गाहून गंगा आणली. पातिव्रत्याची परीक्षा घेण्यासाठी आलेल्या ब्रह्मा-विष्णु-महेशांना लहान बालके करून त्यांची खोड मोडली ती तपाच्या सामर्थ्यानेच. मांडव्याच्या शापामुळे एका मैत्रिणीवर आलेला वैधव्याचा परिहार केला, तो तपानेच. सदेह स्वर्गाला जाण्याच्या इच्छेने आरंभलेली शंबूकाची तपश्चर्या मात्र व्यर्थ झाली, कारण त्याने अधिकाराचे अतिक्रमण केले.

तपश्चर्येत काया-क्लेशाला विशेष महत्त्व आहे. कायाक्लेश जेवढे अधिक, अधिक काल टिकणारे व अधिक तीव्र, तेवढे तपाचे सामर्थ्य जास्त. उन्हाळ्यात पंचाग्नि-साधन, हिवाळ्यात अंगावर ओले वस्त्र घेणे, पावसाळ्यात उघड्या आकाशाखाली बसणे, एक किंवा दोन्ही बाहू उभारून दीर्घ काळ उभे राहणे, एका पायावर उभे राहणे, अग्नीवरून चालणे, पाण्यात उभे राहणे, मौन पाळणे, दंडवत घालत तीर्थयात्रा करणे, वायुभुक्त राहणे, उञ्छवृत्तीने (पक्षी दाणे वेचतात त्याप्रमाणे शेतात पडलेले धान्य गोळा करून) राहणे इत्यादी अनेक रीतींनी तपस्साधना केली जाते. आहाराचे नियमन, त्याग हाही तपाचा एक प्रकार आहे. स्त्री-पुरुष या दोघांनाही तपस्साधनेचा अधिकार असला तरी शूद्रांना मात्र तो नाकारला गेला, असे शंबूकाच्या कथेवरून स्पष्ट होते. वैदिक युगात मात्र हा अधिकार शूद्रांना होता. ते वेदाध्ययन करीत. काही मंत्रद्रष्टे शूद्र होते. कालौघात शूद्रांवर अनेक बंधने लादली गेली व त्यात त्यांचा हा अधिकार गेला असावा.

तप जितके उपयुक्त तितकेच ते उपद्रवी आहे. त्यांचे ठायी संरक्षक आणि संहारक अशा दोन्ही शक्ती असतात, आणि आचरलेल्या तपाच्या प्रमाणात त्यांचे सामर्थ्य कमी-अधिक होते, कमी-जास्त काळ टिकते. तपःक्षय होऊ नये, यास्तव तपस्वी फार जागरूक असतात. तपःक्षय अनेक प्रकारे होऊ शकतो. विश्वामित्राच्या तपाचा क्षय व्हावा, म्हणून इंद्राने रंभेकडून त्याचा तपोभंग केला.

ऐहिक सुख-संवर्धन, शत्रुनाश, संकट-निवारण इत्यादी कारणांकरिता मानवी शक्तीहून अधिक प्रभावी शक्ती प्राप्त करून घेण्याच्या उद्देशाने यातू, यज्ञ, तप यांचा अवलंब केला जाई. याखेरीज अन्य कारणासाठीही उपयोग केला गेला तरी त्याचे प्रमाण कमी असे, दुय्यम असे. यातुक्रियेत मंत्र-तंत्रांच्या साहाय्याने, यज्ञकर्मात इष्ट देवतेच्या कृपा-प्रसादाने आणि तपश्चर्येत काया-क्लेशाने उद्दिष्ट साध्य केले जात असे. लौकिक अभिवृद्धी हाच तिन्हींचा मुख्य हेतू. यातुक्रियेत वस्तुमात्राच्या ठायी असलेली सुप्त शक्ती जागृत झाल्याशिवाय किंवा यज्ञकर्मात इष्ट देवता प्रसन्न झाल्याशिवाय उद्दिष्ट साध्य होत नाही. यातू आणि यज्ञ हे मार्ग बरेचसे परावलंबी होत. तपश्चर्येतसुद्धा देवतेची प्रसन्नता अपेक्षित व आवश्यक असली तरी ती प्रसन्न

करून घेण्याचे साधन पुष्कळसे इच्छुकाच्या–तपस्व्याच्या स्वाधीन असते. इच्छापूर्तीपर्यंत साधना करता येते. यज्ञात दैहिकतेचे प्राचुर्य असून द्रव्य, देवता आणि विधान यांना महत्त्व असते, तर तप ही एक मानसिक क्रिया आहे. ही दोन्ही सिद्धीची साधने आहेत. भगीरथाने उग्र तपश्चर्या करून गंगेला पृथ्वीवर आणले आणि सगरपुत्रांची उदकक्रिया करून त्यांना अक्षय्य स्वर्गसुखाची प्राप्ती करून दिली.

## शाप आणि वर : संकल्पना व स्वरूप

शाप आणि वर यांचा यातुक्रिया, यज्ञकर्म आणि तपश्चर्या यांच्याशी अत्यंत जवळचा संबंध आहे. शाप/वर या संकल्पनांचे मूळ यातुक्रियेत असून ते देण्याचे सामर्थ्य प्राधान्येकरून तपश्चर्येने प्राप्त होते. यज्ञानेही शाप/वर देण्याची शक्ती प्राप्त होत असली, तरी तिचे प्रमाण अत्यल्प आहे. A curse or blessing is a wish expressed in words that evil or good may befall a certain person.[५] एखाद्याचे भले किंवा वाईट करणारी, शब्दोच्चारातून व्यक्त होणारी इच्छा म्हणजे वर/शाप होय. शाप/वर देण्याच्या प्रक्रियेत देणाऱ्याची प्रबल इच्छाशक्ती, तिची अभिव्यक्ती म्हणजे शब्दोच्चार आणि देणाऱ्या व्यक्तीचा अधिकार ह्या तीन बाबी महत्त्वाच्या आहेत. शाप/वर देण्याची इच्छाशक्ती कितीही प्रबल असली व तो देणारी व्यक्ती अधिकारसंपन्न असली, तरी जोपर्यंत इच्छा शब्दोच्चाराने व्यक्त केली जात नाही, तोपर्यंत ती परिणामकारक होऊ शकत नाही; आणि म्हणून अभिव्यक्तीला, शब्दोच्चाराला फार महत्त्वाचे स्थान आहे. शब्दांद्वारे इच्छाशक्ती प्रकट झाली, म्हणजे ती मागे घेता येत नाही किंवा तिच्यात बदलही करता येत नाही. तसेच तिचे परिणाम टाळता येत नाहीत. शब्दोच्चाराचा परिणाम कधीही खोटा ठरत नाही. खोटा ठरल्यास तो शाप/वर होऊच शकत नाही. क्रौंच पक्ष्यांच्या काममोहित मिथुनापैकी नराचा वेध घेणाऱ्या निषादाला उद्देशून वाल्मीकीच्या मुखातून जी शापवाणी प्रकट झाली, ती व्हावयास नको होती, अशी ऋषीला नंतर खंत वाटू लागली; परंतु ती त्याला परत घेता आली नाही किंवा तिच्यात बदलही करता आला नाही. रामायणात वर खोटे ठरण्याची वेळ दोन प्रसंगी उद्भवली होती. यम आणि रावणाच्या युद्धात रावणाचा वध करण्यासाठी यमाने कालदंड हाती घेतला. ब्रह्मदेवानेच कालदंड निर्माण केला होता. त्याचा उपयोग केला असता तर रावणाचा मृत्यू अटळ होता. परंतु रावणाला मनुष्याखेरीज इतरांपासून मृत्यू येणार नाही, असा त्यानेच वर दिला असल्याने रावणाचा मृत्यू झाल्यास तो खोटा ठरणार होता. तेव्हा आपल्या वराची सत्यता टिकवण्यासाठी ब्रह्मदेवाने मध्यस्थी करून यमाला युद्धापासून परावृत्त केले. दुसरा प्रसंग निवातकवच आणि रावण यांच्या युद्धाचा. दोघांनाही

---

५. Encyclopedia of Religion & Ethics, Page 367.

वर प्राप्त झाले असल्याने अनेक दिवस युद्ध होऊनही कोणाचाच जय किंवा पराजय होईना. कोणाचाही जय झाला असता तर एक वर खोटा ठरला असता. ब्रह्मदेवाने उभयतांमध्ये सख्य घडवून आणून वरांची सत्यता टिकवली. (वा. रा. उत्तर. सर्ग २२, २३).

मनात केवळ इच्छा उत्पन्न झाली व ती जर व्यक्त झाली नाही, तिचा शब्दोच्चार झाला नाही तर तिला शाप/वर ही संज्ञा प्राप्त होऊ शकत नाही. केवळ प्रबल इच्छा म्हणजे शाप/वर नव्हे.

इच्छा जेव्हा शब्दांतून प्रकट होते, तेव्हाच तिला शाप/वर म्हटले जाते. मनात इच्छा येऊनही परिणामाचा विचार करून ती शब्दाने व्यक्त न करण्याचा प्रयत्न केला जातो. शाप दिल्याने तप-व्यय होतो, पुण्य-क्षय होतो, असा समज असल्याने कित्येकदा शाप देण्याची इच्छा मनात उत्पन्न होऊनही त्याचा उच्चार केला जात नाही. रामायणात अशी बरीच उदाहरणे आढळतात. त्यांची सविस्तर चर्चा पुढे केली आहे. मनात विचार येऊनही वेदवती आणि कुशकन्यांनी रावणाला आणि वायूला शाप देण्याचे टाळले आहे. मनात इच्छा उत्पन्न होऊनही वर न दिल्याचे उदाहरण मात्र आढळले नाही.

केवळ प्रबल इच्छा आणि तिची शब्दांद्वारे होणारी अभिव्यक्ती शाप/वर देण्यास पुरेशी नसते. शाप/वर देणाऱ्या व्यक्तीला अधिकार असावा लागतो. तपश्चर्येने आणि क्वचित यज्ञविधीने हा अधिकार प्राप्त करून घेता येतो. अतिशय राग आला असता सामान्य व्यक्तीच्या तोंडून जे उद्‌गार बाहेर पडतात, ते शाप नव्हेत; कारण शब्दोच्चाराप्रमाणे परिणाम घडवून आणण्याचे सामर्थ्य त्यांच्या ठायी नसते. अशा उद्‌गारांना तळतळाट म्हटले जाते. कावळ्याच्या शापाने गाय मरत नाही, असे जे म्हटले जाते, त्याचे कारण अधिकाराचा अभाव हे होय. अत्यंत संतुष्ट होऊन एखाद्याचे भले व्हावे, म्हणून सामान्य माणूस ज्या इच्छा व्यक्त करतो, त्या केवळ सदिच्छा असतात, आशीर्वाद असतात, परंतु वर नसतात. तळतळाट, आशीर्वाद, सदिच्छा शब्दोच्चाराप्रमाणे परिणामकारक होतीलच, ही खात्री नसते, बहुधा होतही नाहीत. क्वचित झाल्याच तर त्या केवळ काकतालीय न्यायाने, योगायोगाने. शाप/वर यांचे परिणाम अटळ असतात. संतप्त गौतमाने इंद्राला उद्देशून आणि विश्वामित्राने रंभेला उद्देशून उच्चारलेले शब्द हे शाप होत. तपस्येने त्यांनी अधिकार प्राप्त करून घेतला असल्याने त्यांची वाणी खरी ठरते. नमस्कार करावयास आलेल्या मुलीचे कल्याण व्हावे, यास्तव 'अष्टपुत्रा सौभाग्यवती भव', 'आयुष्मान् भव' असे जे शब्दोच्चार सामान्यांच्या मुखातून निघतात, त्या केवळ सदिच्छा असतात. त्याचा इष्ट तो परिणाम होईलच, ही खात्री नसते, परंतु भृगूच्या वराने सगर राजाच्या सुमती नावाच्या भार्येला साठ हजार पुत्र झाले; कारण त्याने तसा अधिकार प्राप्त केला होता. विवाह न ... किंवा

(नंतरसुद्धा) कुणाचीही भार्या न होता पुत्रप्राप्ती व्हावी ही सोमदा गंधर्वीची थोडी विचित्र इच्छा चूली ऋषीने पूर्ण केली, कारण तो अधिकारी होता.

देवांच्या ठायी हा अधिकार जन्मजात असतो, असे मानले जात असले, तरी मानवांप्रमाणे देवांनाही तपश्चर्या करूनच या शक्तीचे सामर्थ्य वाढवावे लागते. शाप/वर देण्याचा अधिकार तपःप्राप्त होय. देव, दानव, मानव – सर्वांना त्याचा आश्रय घेतल्याशिवाय स्वसामर्थ्य वाढवता येत नाही. राक्षसांनीही उग्र तपश्चर्या करून वर-प्राप्ती करून घेतली असली तरी दुसऱ्यांना शाप/वर देण्याचे सामर्थ्य मात्र त्यांना प्राप्त झालेले दिसत नाही. राक्षसांनी दिलेल्या शाप/वराचे रामायणात एकही उदाहरण नाही, हिरण्यकश्यपूने मरीची ऋषीच्या मुलांना शाप दिल्याचा उल्लेख हरिवंशात आहे. राक्षसांना शाप देण्याचे सामर्थ्य असावे, असा तर्क करणारे दोन प्रसंग रामायणात आहेत, परंतु प्रत्यक्षात शाप दिलेले नाहीत. ब्राह्मणवेषात आलेल्या अतिथीच्या (रावणाच्या) प्रश्नांना उत्तरे न दिल्यास तो शाप देईल, अशी सीतेला भीती वाटत होती, पण ती केवळ भीतीच होती. तिने व्यवस्थित उत्तरे दिल्याने शाप देण्याचा प्रसंगच उद्‌भवला नाही. जीविताला धोका उत्पन्न होईल की काय, अशी भीती वाटू लागताच रावणाचा दूत म्हणून आलेल्या शुकाने 'जन्मभरात केलेली माझी पापे तुझ्या ठायी संक्रांत होतील', अशी रामाला जी धमकी दिली होती, ती रामाने त्याला अभय देऊन परिणाम-शून्य केली. पुष्कर विमान रावणाने हिरावून घेतले असता कुबेराने त्याची जी शापतुल्य शब्दांत निर्भर्त्सना केली, तिचा विचार करण्याचे कारण नाही. कुबेर हा रावणाचा सावत्र भाऊ असला तरी राक्षस नव्हता. खेरीज तो लोकपाल असल्याने त्याला हा अधिकार प्राप्त झाला होता. त्याने कृकलास (सरडा), हनुमान यांना वर आणि तुंबरू गंधर्वाला शाप दिला आहे.

शाप/वर देण्याचा अधिकार देव आणि मानव यांनी मिळवला असला तरी देवांचा कल वर देण्याकडे तर मानवांचा शाप देण्याकडे दिसतो. राक्षसांनी शाप/वर दिलेलेच नाहीत. यावरून सत्त्व, रज, तम या गुणांप्रमाणे वर, शाप दिले जात असावे. रामायणात ८४ वरांपैकी देवांनी दिलेले वर ६०, तर मानवांनी दिलेले फक्त १९ आहेत. ६१ शापांपैकी देवांनी दिलेले फक्त ७ शाप असून मानवांनी दिलेल्या शापांची संख्या ४४ आहे. त्यांनी दिलेल्या शापांतून देवही सुटलेले नाहीत. ब्रह्मदेव हा सृष्टिनिर्माता, सर्वाधिकारी म्हणून त्याने दिलेल्या वरांची संख्या २० अर्थात् सर्वात जास्ती असावी, हे स्वाभाविकच होय.

तपश्चर्येप्रमाणेच सच्चारित्र्य, सत्यसंधता, कर्तव्यपालन, पातिव्रत्य इत्यादी गुणांमुळे त्यांचे पालन करणाऱ्या व्यक्तींच्या शब्दोच्चारांना शाप/वर देण्याचा अधिकार प्राप्त होतो असे मानले जाते. दशरथ आणि रामाला असे अधिकार प्राप्त झाले होते. दशरथाने कैकेयीला वर दिले आहेत. त्या वरांची व पाति–

व्रत्याच्या अधिकाराची चर्चा पुढे विस्ताराने केली आहे. रामाने आपल्या अधिकाराचा फारसा उपयोग केलेला नाही. प्रस्रवण पर्वत आणि नदीला (प्रत्यक्षात न) दिलेला शाप सशर्त होता व शर्तीचे पालन झाल्याने त्याचे परिणाम टळले. रामाने मरुप्रदेशाला आणि प्रजाजनांना वर दिला असून शंबूकाची वर-याचना त्याने धुडकावून लावली, तर सीतेचा वर मात्र तिच्या दृष्टीने शापच ठरला.

शाप/वर ह्या एकाच नाण्याच्या दोन बाजू आहेत. एकाचे स्वरूप संहारक, तर दुसऱ्याचे संरक्षक. शत्रुनाश, मृत्यू, वध, त्रास, विध्वंसन, उपद्रव हा शापांचा प्रधान उद्देश असतो; तर वर देण्यामागे कल्याणाची भावना असल्याने मांगल्य, सदिच्छा, उपकार, अभीष्ट-चिंतन असे त्याचे सामान्य स्वरूप असते. मृत्यू हा वास्तविक पाहता शापाचा विषय, वराचा नाही. परंतु रामायणातील एक वर मृत्यूबाबत आहे. ब्रह्मदेवाने मेघनादाला मृत्यूचा वर दिला आहे (पहा—वर क्र. ६५). हा वर अपवादात्मक असून संपूर्ण अमरत्व मिळू शकत नाही, हे कळल्यावर आपल्याला कोणत्या परिस्थितीत मृत्यू यावा, हे मेघनादानेच स्पष्ट केले आहे व ब्रह्मदेवाने त्यास अनुमती दिली आहे.

शाप/वर देण्याच्या प्रक्रियेत शब्दोच्चाराच्या जोडीला काही अन्य माध्यमांचा उपयोग केला जातो. शाप/वर देणारी व्यक्ती आणि तो प्राप्त होणारी व्यक्ती ह्या दोन घटकांचा प्रत्यक्ष शारीरिक स्पर्श हा अत्यंत परिणामकारक मानला जातो. Physical contact is the most efficacious means of transmission.[६] स्पर्शाच्या ठिकाणी वाहकशक्ती ही फार मोठ्या प्रमाणात असते. आशीर्वाद देताना डोक्यावर हात ठेवणे, पाठीवरून हात फिरवणे, अशा क्रिया केल्या जातात; तर शाप देताना हात उगारले जातात. स्पर्शाप्रमाणेच 'पाणी'ही उत्कृष्ट माध्यम मानले जाते. सायणाचार्यांच्या मते ऋग्वेदातील 'जल' शब्दाचा अर्थ 'शाप' असाच आहे. देवतांना केलेल्या अभिषेकाच्या पाण्याला तीर्थत्व प्राप्त होते. सूर्योपासनेत अर्घ्य दिले जाते, तर श्राद्धविधीत तर्पण करताना पाण्याचा उपयोग केला जातो. शाप देताना हातात पाणी घेतात. सौदास राजाने वसिष्ठाला प्रतिशाप देण्यासाठी हातात पाणी घेतले होते.

**ततः क्रुद्धस्तु सौदासस्तोयं जग्राह पाणिना।**
**वसिष्ठं शप्तुमारेभे भार्या चैनमवारयत्॥**
**ततः क्रोधमयं तोयं तेजोबलसमन्वितम्।**
**व्यसर्जयत धर्मात्मा ततः पादौ सिषेच च॥**

'सौदास राजानेही क्रुद्ध होऊन वसिष्ठ मुनीला शाप देण्याकरिता हातात पाणी घेतले; (उत्तर—६५/२९, ३१) परंतु त्याच्या भार्येने त्याचा निषेध केला... तदनंतर तेज व बल ह्यांनी युक्त असलेले ते क्रोधमय उदक त्या धर्मात्म्याने

६. Encyclopedia of Religion & Ethics, Page 369.

आपल्या पायावरच घेतले ' आणि तो कल्माषपाद झाला. शाप ज्या व्यक्तीला द्यावयाचा ती जवळ नसतानाही कित्येकदा शाप दिला जात असे. श्रमक ऋषींचा मुलगा शृंगीऋषी याने परीक्षिताला 'सात दिवसांत मृत्यू येईल', असा जो शाप दिला, त्या वेळी तो तेथे नव्हता. भरताने यौवराज्यपदाचा स्वीकार केल्यास त्याने केलेल्या श्राद्धादी क्रिया मला न पोहोचो, अशी जी शापवाणी दशरथाने उच्चारली त्या वेळी भरत आजोळी होता. ज्या व्यक्तीला शाप/वर द्यावयाचा ती व्यक्ती जवळ नसल्यास प्रतीकांच्या मार्फतही शाप/वर दिले जातात. प्रतीकामार्फत दिलेला शाप/वर इच्छित व्यक्तीला पोहोचतो, असे मानले जाते. अन्न, पेय, फळे, बाहुल्या इत्यादी वस्तूंचा प्रतीक म्हणून उपयोग केला जातो.

शापित व्यक्तीला शाप स्वीकारावाच लागतो. तो नाकारण्याचे स्वातंत्र्य तिला नसते, त्यामुळे सर्व शाप हे स्वीकृतच असतात. वर स्वीकारणे अगर नाकारणे हे वरप्राप्त व्यक्तीच्या इच्छेवर अवलंबून असते. त्याला वर योग्य न वाटल्यास तो वराचा स्वीकार करीत नाही. याचित वर हे सहसा नाकारले जात नाहीत, कारण त्यामुळे याचकाची कामनापूर्ती होत असते. परंतु रामायणात एक अपवादात्मक याचित वर असा आहे की तो याचकाने नाकारला आहे. स्थल-माहात्म्यामुळे एका विशिष्ट प्रदेशात गेल्यावर 'इल' राजाला स्त्रीत्व प्राप्त झाले असता, संनिध असलेल्या शिवाजवळ त्याने वर मागितला. शिवाने पुरुषत्व सोडून कोणताही वर मागण्यास सांगितले असता, इल राजाने वराचा स्वीकार केला नाही; कारण त्याला पुरुषत्वच हवे होते. शरभंगऋषीने देऊ केलेल्या वराचा रामाने, अनसूयेच्या वराचा सीतेने स्वीकार केलेला नाही. रामायणात अस्वीकृत वर बरेच आहेत. वर याचित आणि अयाचित असे दोन प्रकारचे असतात. त्याची चर्चा पुढे केली आहे. शाप मिळावा अशी कोणाची इच्छा नसल्याने सर्व शाप अयाचितच असतात. याचित शाप असा प्रकार नाही. उःशाप मात्र याचित व अयाचित असे दोन्ही प्रकारचे असतात. सामान्यतः नमस्कार केल्यावर आशीर्वाद दिले जात असल्याने ते अयाचितच असतात, औपचारिकही असतात. कित्येकदा आशीर्वाद मागितले जातात; त्यामुळे ते याचित असले, तरी त्यांचे स्वरूप अयाचित आशीर्वादासारखेच असते. सदिच्छा ही स्वयंस्फूर्त असल्याने ती अयाचितच असते.

शाप आणि वर देण्याच्या प्रक्रियेत प्रचंड भावनोद्रेक असतो, परंतु दोहोंतील त्याचे स्वरूप, गती, अभिव्यक्तीचा प्रकार आणि परिणाम भिन्न असतात. शापाचा उद्भव कोपातून होत असल्याने कित्येकदा मनाची प्रक्षुब्धता इतकी वाढते की मनावर ताबा रहात नाही. भान सुटते, तोल जातो. क्रोधाचे प्रमाण जितके अधिक तितके मनावरचे नियंत्रण कमी. क्रोध आला असता आपण काय करतो, काय बोलतो, याचे भान रहात नसल्याने मुखावाटे नकळत शब्द बाहेर पडतात.

**क्रोधाद्भवति संमोहः संमोहात्स्मृतिविभ्रमः । –भ. गी. २/६३**

क्रोधापासून संमोह निर्माण होतो आणि संमोहातून स्मृति-विभ्रम होतो. ते इतक्या वेगाने बाहेर पडत असतात की ते आवरता येत नाहीत. उच्चारलेल्या शब्दांचे काय परिणाम होतील, हाही विचार असत नाही. भावना इतकी भडकलेली असते की विचाराला थाराच मिळत नाही. शब्दोच्चार तडकाफडकी मुखातून बाहेर पडतात. त्यांची गती विलक्षण असते. कालापव्यय होऊच शकत नाही. वर देताना मनाची अवस्था प्रसन्न असते, तुष्ट असते, त्यामुळे भावनांचा उद्रेक शांत व संथ असतो. शब्दोच्चार करण्यापूर्वी विचार करण्यास फुरसत असते. परिणामांचा अंदाज उच्चारापूर्वी बांधता येतो. मन संयमित असते. शाप आणि वर देताना मनाची अवस्था भिन्न असल्याने त्यांचे स्वरूप आणि परिणाम वेगवेगळे होतात. वास्तविक अयाचित वर देताना तो विचारपूर्वक देणे शक्य असते, परंतु राक्षसांना वर देताना ब्रह्मदेवाचे भान सुटलेले दिसते. त्यामुळे कुंभकर्णाला वर देणाऱ्या ब्रह्मदेवाला अन्य देवांनी 'वर देऊ नका' अशी विनंती करण्याची आणि रावणाला दिलेल्या वरांचा विलक्षण उपद्रव होऊ लागल्याने त्यातून मार्ग काढण्याची वेळ आली.

शापात शिक्षा अभिप्रेत असते, तर वरात कल्याण इच्छिलेले असते. वरात शब्द अधिक सामर्थ्यवान असतात, तर शापात इच्छा प्रबल असते. Blessing by words is more powerful; but the curse by thought is more powerful than that by words. [७] शापात विचार महत्त्वाचा असला, तरी तो विचारपूर्वक दिला जातो, असे म्हणता येत नाही.

## शाप

'ज्याने कोणी खोडी काढली असेल, निष्कारण त्रास दिला असेल किंवा अपकृत्य केले असेल, अशा माणसाचा नाश व्हावा, त्याला शिक्षा मिळावी, या भावनेने उच्चारलेले वाईट शब्द म्हणजे शाप होय.' शापाचा उद्‌भव क्रोधातून होत असल्याने त्यात आक्रोश असतो. शाप दोन प्रकारचे असतात. जादू विद्येवरील – यात्वात्मक– अंधश्रद्धेने दिलेल्या शापाला अभिचारात्मक म्हणतात; आणि दुसरे धार्मिक शाप. काही शाप सशर्त असतात. शर्तीचे यथायोग्य पालन केले गेले तर शापाचे परिणाम भोवत नाहीत. ज्या व्यक्तीला शाप द्यावयाचा ती सुधारावी, तिला त्रास होऊ नये, अशी सहानुभूती धार्मिक व सशर्त शापात असते. शाप-दात्याच्या मनात शापित व्यक्तीविषयी प्रेम, सहानुभूती असते, त्याला नैतिक जाणीव असते; म्हणूनच धार्मिक, सशर्त शाप दिले जातात. स्वताच्या ऐहिक सुखप्राप्तीसाठी, इच्छापूर्तीसाठी नाश, मृत्यू, वध, पराभव इत्यादी उद्देशाने अभिचारात्मक शाप दिले जातात. क्रोधाधीन झालेल्या ऋषी-मुनींच्या शापांचे स्वरूप प्रायः अभिचारात्मक असते. वसिष्ठाने सौदास आणि निमिराजाला दिलेले शाप, आणि विश्वामित्राने स्वताच्या आणि

---

७ Encyclopedia of Religion & Ethics, Page 369.

वसिष्ठाच्या मुलांना दिलेले शाप अभिचारात्मक आहेत, उलट भृगू आणि अंगिरस वंशांतील मुनींनी हनुमानाला दिलेला शाप सहानुभूतिपूर्ण आहे. हनुमानाने आश्रमातील यज्ञपात्रे, वल्कले इत्यादी उध्वस्त केल्याने मुनी क्रुद्ध झाले असले तरी शाप सौम्य असावा, ही त्यांना जाणीव होती. वाल्मीकीने त्यांच्या मनःस्थितीचे वर्णन पुढीलप्रमाणे केले आहे. **शेपुरेनं रघुश्रेष्ठ नातिक्रुद्धातिमन्यवः ।** –'त्याचा घात करण्याची विशेष इच्छा न धरता आणि संतापही फार न आणता' त्यांनी शाप दिला आहे. इतकेच नव्हे तर शापाच्या उत्तरार्धात उःशापही आहे.

शाप देण्याच्या प्रक्रियेत इच्छाशक्तीइतकेच माध्यमाला महत्त्व असते. जल हे अत्यंत प्रभावी व प्रवाही माध्यम मानले जाते. वेस्टरमार्क म्हणतो–'The efficacy of a wish or a curse depends not only upon the potency which it possesses from the beginning owing to certain qualities in the person from whom it originates but also on the vehicle by which it is conducted, just as the strength of an electric shock depends both on the original intensity of the current and the condition of the conductor. As particularly efficient conductors are regarded blood, bodily contact, food and drink.[८] रक्त, शारीरिक स्पर्श, अन्न आणि पाणी ही प्रभावी माध्यमे होत.

शापाचे परिणाम अटळ असतात. शापोद्गाराप्रमाणे परिणाम होणारच, यात संदेह नसतो. शापवाणीप्रमाणे परिणाम घडून न आल्यास तो शाप नव्हेच. कारण शाप कधीही खोटा ठरत नाही. उच्चारलेले शब्द मागे घेता येत नाहीत किंवा बदलही करता येत नाहीत. केवळ उःशाप किंवा अन्य वर देऊन शापाची तीव्रता, कालावधी कमी करता येतो. सशर्त शापाचे परिणाम त्यातील शर्तीच्या पालनावर अवलंबून असतात. शापाचा परिणाम हा भविष्यकालीन असतो. कधी हा भविष्यकाल जवळचा असतो, तर कधी तो पुढील जन्मातूनही भोगावा लागतो. गौतमाच्या शापाने इंद्राचे वृषण तात्काळ गळून पडले, वसिष्ठ-पुत्रांच्या शापांनी त्रिशंकूला एका रात्रीत चांडालयोनी प्राप्त झाली. भार्गवाने दंड राजाला व दंडकारण्याला दिलेल्या शापाचा परिणाम सात दिवसांत दिसून आला, तर विश्वामित्राने वसिष्ठ-पुत्रांना दिलेल्या शापाचा कालावधी सात शे जन्म टिकणारा आहे. शापाचा प्रारंभ शाप दिलेल्या दिवशीच सुरू झाला.

**अद्य ते कालपाशेन नीता वैवस्वतक्षयम् ।।**–१८ (वाल.५९)
**सप्तजातिशतान्येव मृतपाः सम्भवन्तु ते ।**–१९

---

८ Encyclopedia of Religion & Ethics, P. 369

दुर्वासाने जर शाप दिला असता तर तो संततीला भोवणार होता. शाप देण्याच्या परिणामकारक शक्तीविषयी वेस्टरमार्क म्हणतो– ... Purely magical power, independent of any superhuman will ... ... is rooted in the close association between the wish, more particularly the spoken wish and the idea of its fulfilment. The wish is looked upon in the light of energy which may be transferred by material contact or by the eye or by means of speech to the person concerned and then becomes a fact.[९]

शाप देण्याचे सामर्थ्य तपश्चर्येप्रमाणेच शुद्ध चारित्र्यानेही प्राप्त होऊ शकते. पतिव्रतेची वाणी खोटी ठरत नाही, असे जे मानले जाते, याचे कारण ते एक व्रत होय. व्रतपालनाने आत्मिक बलसंवर्धनच होते. प्राचीन भारतीय समाज-व्यवस्थेत ब्राह्मणांना श्रेष्ठत्व व पूज्यत्व प्राप्त झाले होते. त्यांना भूदेव मानले जाई. त्यांची वाणी असत्य होत नसे. नृगराजाला दोन ब्राह्मणांनी शाप दिला, याचे कारण त्यांचे ब्राह्मण्य होय. माता, पिता, गुरू, ज्ञानी अशा श्रेष्ठ व ज्येष्ठ व्यक्तींच्या उद्गारात शापाची धार असू शकते. मरणोन्मुख व्यक्तींच्या तोंडून बाहेर पडणारे उद्गार शापासारखे परिणामकारक असतात. श्रावणाच्या पित्याने दशरथ राजाला, आणि अनरण्य राजाने रावणाला उद्देशून काढलेले उद्गार मरणोन्मुख अवस्थेतील आहेत. वेदवतीची प्रतिज्ञाही मृत्युपूर्वीची, अग्निप्रवेश करण्यापूर्वीची आहे.

कित्येकदा शापांचा परिणाम वरासारखा होतो. 'जी कन्या दृष्टीस पडेल, तिला गर्भधारणा होईल.' अशी पुलस्त्याची शापवाणी ऐकू न आल्याने त्याच्या दृष्टिपथात येताच तृणबिंदू-कन्या गर्भवती झाली. परंतु अल्पावधीत तिला त्याची भार्या होण्याचे भाग्य लाभले. वाल्मीकीच्या शापाची परिणती रामायणाच्या निर्मितीत झाल्याने तो शाप जगाला ललामभूत झाला. 'हन्त तर्हि मण्डितः संसारः ।[१०] अशा शब्दांत भवभूतीने ह्या शापाचा गौरव केला आहे. ब्रह्मदेवानेही संतुष्ट होऊन वाल्मीकीला वर दिला व रामायण लिहिण्यास प्रवृत्त केले. भृगूने विष्णूला शाप दिल्याने तो मानव झाला. दुष्टांचे निर्दालन करून आपल्या उज्ज्वल, निष्कलंक चारित्र्याने त्याने मानवाचा आदर्श निर्माण करून जगाचे कल्याण केले.

शाप देणे हे चांगले समजले जात नाही. वैदिक आर्यांनी शापाचा निषेध केला आहे. 'सकारण अथवा निष्कारण शाप देणारा वीज पडलेल्या वृक्षाप्रमाणे जळून जावो', अशी प्रार्थना अथर्ववेदात आहे.[११] शाप देणाऱ्यावरच तो उलटण्याची

---

९ Encyclopedia of Religion & Ethics, page 366
१० उत्तररामचरितम् – अंक २
११ भारतीय संस्कृति कोश, खंड [illegible] पृ. [illegible]

भीती असल्याने शाप जपून दिले जात. ग्रिम म्हणतो, ' Curses like chikens come home to roost. They turn home as birds to the nest.'[१२]

## शापांची कारणे

शाप देण्याबाबत काही संकेत आहेत. धर्माचे पालन, अधर्माचे नियमन आणि सामाजिक स्वास्थ्याचे संरक्षण करण्याच्या हेतूने धार्मिक शाप, तर व्यक्तिगत ऐहिक कामनापूर्तीसाठी अभिचारात्मक शाप दिले जात असत. सामाजिक स्वास्थ्य-संरक्षणासाठी ब्रह्मदेवाने कुंभकर्णाला घोर निद्रेचा शाप देऊन त्याच्या अघोरी कृत्यांना पायबंद घातला. कर्णाच्या जन्माचे रहस्य कुंतीने भारतीय युद्धापूर्वी सांगितले असते, तर प्रचंड मानवी संहार टाळता आला असता. तिने वेळीच रहस्यभेद न केल्याने प्रचंड हानी झाली, म्हणूनच युधिष्ठिराने कुंतीला शाप दिला. [१३]

रामायणात ६१ शाप आढळतात. ते देण्याची कारणे विविध आहेत. वध, नाश, आक्रमण, अमर्याद वर्तन, उर्मटपणा, अकारण भिवविणे, अवास्तव मागणी, परस्त्रीची अभिलाषा, संभोगाची मागणी, बलात्कार, रतिक्रीडेत व्यत्यय, माता-पिता, गुरू अशा ज्येष्ठ वंदनीय व्यक्तींचा अनादर, क्रोध, अट्टाहास, अनिष्ट भोजन, अनिष्ट वेळ इत्यादी अनेक कारणांस्तव शाप दिलेले आहेत. अन्य कोणतेही कारण असले तरी क्रोध हे शापाचे मुख्य कारण. क्रौंच पक्ष्यांच्या मिथुनापैकी नराचा निषादाने केलेला वध पाहूनच वाल्मीकीने शापवाणी उच्चारली. अगस्त्याला घेराव घालून त्याच्या भक्षणाचा केलेला प्रयत्न हेच ताटकेला शाप मिळण्याचे कारण. एकुलत्या एका पुत्राच्या वधाची वार्ता ऐकून अत्यंत दुःखी झालेल्या श्रावणाच्या पित्याने दशरथाला शाप दिला. वालीने दुंदुभी राक्षसाला मारून भिरकावून दिले असता त्याच्या रक्ताचे थेंब आश्रमात पडल्यानेच मतंग ऋषींचा क्रोध उफाळून आला व त्याने वालीला शाप दिला. बलात्कार करून प्रिय भर्त्यासह आप्तेष्टांचा वध करणाऱ्या रावणाला पतिव्रतांनी शाप दिले. विष्णूला शाप मिळण्याचे कारण त्याने भृगु-पत्नीचा केलेला वध हे होय. भरताने कैकेयीला उद्देशून जे निर्भर्त्सनात्मक उद्गार काढले आहेत, त्याची तीव्रता शापासारखीच आहे. असे उद्गार काढण्याचे कारण दशरथाचा मृत्यू हे एक होय.

पुंजिकस्थला, रंभा आणि अनेक पतिव्रतांनी रावणाला जे शाप दिले ते त्याने त्यांच्यावर बलात्कार केले म्हणूनच व वेदवतीने प्रत्यक्ष शाप दिला नसला तरी रावणाने तिची केलेली विटंबना, अंगावर टाकलेला हात यामुळेच तिने शापाहून दाहक अशी प्रतिज्ञा केली. अहल्या इंद्राशी आणि उर्वशी वरुणाशी रत झाल्याने त्या गौतम आणि मित्राच्या शापाला बळी पडल्या. धर्ममान्य रतिक्रीडेत व्यत्यय आण-

---

१२ Encyclopedia of Religion & Ethies १३ महाभारत, स्त्रीपर्व / २७

णाऱ्या देवांना आणि अप्रत्यक्ष रीत्या त्यांना साहाय्य करणाऱ्या पृथ्वीला उमेने शाप दिला. कुबेर पिंगलाक्ष झाला, याचे कारण त्याने पार्वतीकडे डोळे मिचकावून पाहिले हे होय.

यज्ञकर्म, तपश्चर्या यात विघ्ने निर्माण करणाऱ्यांची ऋषींनी गय केली नाही. रंभेला विश्वामित्राने शाप दिला. याचे कारण इंद्राच्या आज्ञेने ती त्याचा तपोभंग करण्यास आली होती. आश्रमातील यज्ञपात्रादी वस्तू उध्वस्त करण्याबद्दल हनुमानाला मुनींचा शाप प्राप्त झाला. पुलस्त्याच्या तपश्चर्येत व्यत्यय निर्माण होत होता, म्हणूनच त्याने, दृष्टिपथात येणाऱ्या कन्येला गर्भधारणा होईल, अशी शापवाणी उच्चारली. तपःक्षय होऊ नये म्हणून विश्वामित्राने मारीच व सुबाहू यांना, वेदवतीने रावणाला आणि दंडकारण्यातील मुनींनी त्याच प्रदेशातील राक्षसांना शाप देण्याचे टाळले. कुशकन्यांनी ह्याच कारणास्तव वायूला शाप दिला नाही.

विश्वावसू गंधर्वाला अमर्याद वर्तनासाठी शाप मिळाला. तो इंद्रावर चाल करून गेला होता. शंकराविषयी अनुदार उद्‌गार काढल्यामुळे नंदीश्वराने रावणाला चांगलीच अद्दल घडवली. ब्राह्मणांचा अनादर करण्याबद्दल नृग राजाला शाप भोगावा लागला. पित्याची आज्ञा न मानणाऱ्या विश्वामित्राच्या मुलांना आणि विश्वामित्राच्या यज्ञाचे आमंत्रण नाकारणाऱ्या वसिष्ठपुत्रांना शापाला बळी पडावे लागले. यदूला शाप मिळण्याचे कारण पित्राज्ञेचा भंग हे होय. गुरूचा अवमान व त्याच्या आज्ञेचा भंग ह्या कारणास्तव वसिष्ठाने निमिराजाला शाप दिला. ऋषींना भिवविणाऱ्या त्रास देण्याच्या कृत्याबद्दल मारीचाला अगस्त्याच्या आणि विश्वावसू गंधर्वाला स्थूलशिरा ऋषीच्या शापाचे धनी व्हावे लागले.

विश्वामित्र, वसिष्ठ, मतंग ह्या ऋषींच्या शापांचे मुख्य कारण त्यांना आलेला अनावर क्रोध. अट्टाहासापायी कैकेयीला दशरथाने शाप दिला. सदेह स्वर्गाला जाण्याच्या अवास्तव आकांक्षेने त्रिशंकू शापित झाला. ताटकेच्या वास्तव्याने ताटकवन, दंड राजाच्या संपर्कामुळे दंडकारण्य आणि रावणामुळे लंका यांना शाप प्राप्त झाले. अनिष्ट भोजन देऊ केल्याच्या दोषामुळे ब्रह्मदत्त आणि सौदास यांना शाप भोगावे लागले. ब्राह्मणाला शाप देऊ नये, असा संकेत असला, तरी श्वानाला काठीने प्रहार करण्याच्या दोषामुळे ब्राह्मणाला शाप मिळाल्याचेही उदाहरण आढळते.

वाल्मीकी रामायणात आलेल्या काही शापांची कारणे स्पष्ट नाहीत.

## शापांचे परिणाम

शापांचे परिणाम अत्यंत दूरगामी व दारुण असतात. मृत्यू, वध, विनाश, वियोग, विरूपता, सौंदर्यहानी, हीन योनीत जन्म, हीन जीवन, निकृष्ट आहार,

शारीरिक दौर्बल्य, अपत्यहानी, निर्वंशता, संग्रामात अपयश इत्यादी विविध परिणाम भोगावे लागतात.

दशरथाला अकाली आलेला मृत्यु हा श्रावणपित्याच्या शापाचा परिणाम होय. ब्रह्मदेव, नलकूबर आणि अनेक पतिव्रता यांच्या शापांचा परिणाम म्हणून रावणाला मृत्यूला सामोरे जावे लागले. रावणाला ब्रह्मदेव व नलकूबराने दिलेले शाप सशर्त असले तरी रावणाकडून शर्तींच्या पालनापेक्षा त्यांचे उल्लंघन होण्याचीच शक्यता अधिक होती. परंतु त्याने ह्या शापांची विलक्षण धास्ती घेतली असल्याने त्याने शर्तींचे पालन केले. वेदवतीने रावणाचा वध करण्याच्या हेतूनेच पुनर्जन्म घेण्याची प्रतिज्ञा केली. मरणोन्मुख अनरण्य राजाचे उद्‌गारही रावणाला भोवले. रावणाचा मृत्यू हा अनेक शापांचा परिपाक होय. वसिष्ठ आणि निमी राजा एकमेकांना शाप देऊन निश्चेतन झाले.

वसिष्ठ-पुत्र, विश्वामित्र-पुत्र, मारीच, दनू यांना शापांचे परिणाम दुसऱ्या जन्मातही भोगावे लागून हीन योनी प्राप्त झाली, निकृष्ट आहार सेवन करीत हीन जीवन भोगणे नशिबी आले. स्वर्गस्थ अप्सरा आणि देव यांनाही शापाचे परिणाम भोगावेच लागले. विष्णू, उर्वशी आणि पुंजिकस्थला यांना मर्त्यलोकी येऊन रहाणे भाग पडले. ब्रह्मदत्त आणि नृग ह्या राजघराण्यातील पुरुषांवर गिधाड आणि सरडा होण्याची पाळी आली. इंद्राला मेषवृषण व्हावे लागले, कुबेराचा एक डोळा जळून खाक झाला, तर दुसरा पिंगल. श्वानाला काठीने प्रहार करणाऱ्या ब्राह्मणाला पुढील जन्मी कुलपती होऊन साक्षात नरकवास भोगावा लागला. अहल्येचे सौंदर्य नष्ट होऊन तिला राखेत लोळत पडावे लागले. विश्वावसू गंधर्व आणि तुंबरू यांचे अधःपतन तर झालेच, खेरीज घृणास्पद विद्रूपता पदरी पडली. हा त्यांना मिळालेल्या शापांचा परिणाम होय. सुक्याबरोबर ओले जळावे या न्यायाने दुष्टांचा सहवास ताटकावन, दंडकारण्य आणि लंकेला भोवला. अहल्येला केवळ वायुभुक्त होऊन रहावे लागले. यदूचा वंश उद्ध्वस्त झाला. पृथ्वीला अनेकांची भार्या होऊनही अपत्यहीन जीवन कंठावे लागले. नंदीश्वराच्या शापाने रावणाचा कुलसंहार झाला. पुलस्त्याच्या केवळ दृष्टिपाताने तृणबिंदूकन्येला गर्भधारणा झाली.

वाल्मीकी रामायणात आलेल्या काही शापांचे परिणाम स्पष्ट नाहीत.

## सशर्त शाप

सशर्त शाप (Conditional curse) हा शब्दप्रयोग प्रथम वेस्टरमार्कने केला. अन्य शापांहून वेगळे असे नैतिक अधिष्ठान सशर्त शापात असते. ज्या व्यक्तीला शाप द्यावयाचा, त्या व्यक्तीविषयी शाप देणाऱ्याच्या मनात सहानुभूती असते. त्याचे कल्याण व्हावे अशी कळकळ असते. त्याला शापाचे दुष्परिणाम भोगावे लागू नयेत, असे मनोमन वाटत असते, म्हणूनच शापाच्या संभाव्य परिणा-

माची त्याला पूर्वकल्पना देऊन तो टाळण्याचे उपाय सुचविलेले असतात. योग्य ती खबरदारी घेतल्यास शर्तीचे यथायोग्य पालन केल्यास शापाचे परिणाम भोगण्याचा प्रसंग येत नाही, इतकेच नव्हे तर तो शापच उरत नाही. शर्तीचे पालन झाले नाही तरच शापाचा परिणाम होतो. वेस्टरमार्क म्हणतो– Conditional curse is an important development of the principle of cursing and blessing and has had considerable influence in the making of morality, especially in the sphere of good faith, honesty and truthfulness... ... The energy of a conditional curse is the supernatural energy of an ordinary curse or of its embodiment, in a latent state. This is discharged by the act, if or when it takes place, against which the curse is directed.[१४]

सशर्त शापात सामाजिक व नैतिक जाण असते. शापाचे परिणाम टाळता येत नाहीत. परंतु सशर्त शापाचे परिणाम टाळणे सर्वस्वी शापित व्यक्तीचे ठायी असते. उःशापाने शापाची तीव्रता, कालखंड कमी करता येत असला तरी तो देणे शापदात्याच्या इच्छेवर अवलंबून असते आणि शापित त्याच्या कृपेवर अवलंबून राहातो. मग तो उःशाप याचित असो वा अयाचित असो. सशर्त शापांप्रमाणे सशर्त वरही असू शकतात, परंतु त्यांचे प्रमाण फार कमी असते.

वाल्मीकी रामायणात दहा शाप सशर्त आहेत. दशरथाने कैकेयीला तिच्याशी असलेले पत्नीत्वाचे संबंध तोडून टाकण्याचा जो इशारा दिला तो सशर्त आहे. तिने जर आपला अट्टाहास सोडला असता तर तिला त्याचे परिणाम भोगावे लागले नसते. मृत्यूनंतर भरताने केलेले और्ध्वदेहिक, श्राद्धादी क्रिया आपणास पोहचू नये, असा दिलेला शाप भरताने यौवराज्यपद स्वीकारले असते तरच त्याला भोवला असता. त्याने यौवराज्यपदाचा स्वीकार न केल्याने त्याला हा शाप लागूच पडला नाही. रामाने प्रस्रवण पर्वत आणि नदी यांना दिलेल्या शापांत त्यांनी प्रश्नांची उत्तरे द्यावीत, अशी शर्त होती. पर्वताने खुणांनी रामाला सुचविल्याने शाप परिणारकारक होऊ शकला नाही. मतंगाच्या शर्ती वालीने यथातथ्य पाळल्याने त्याला त्याचा शाप भोवला नाही. रावणाने सीतेच्या इच्छेविरुद्ध तिच्या शरीराला स्पर्श करण्याचे कटाक्षाने टाळले, म्हणूनच ब्रह्मदेव आणि नलकूबराच्या शापांचा त्याच्यावर परिणाम होऊ शकला नाही. त्याच्या मस्तकाचे तुकडे झाले नाहीत. लक्ष्मणाने स्वताचा बळी देऊन दुर्वासाच्या शापातील हवाच काढून घेतली.

यज्ञाला आरंभ न केल्यास, विश्वामित्राची आज्ञा न पाळल्यास तो शाप देईल

---

१४ Encyclopedia of Religion & Ethics, Page 372

अशी भीती वाटणाऱ्या ऋषि-मुनींनी त्यांनी आज्ञा भंग होऊ नये ही काळजी घेतली. मातेच्या इच्छेचे उल्लंघन करून राम जर वनवासाला जाणार असेल, तर त्याला नरकात जावे लागेल अशा अर्थाची शापतुल्य वाणी कौसल्येने उच्चारली आहे. ती सशर्त आहे. रामाने वनवासात जाऊ नये ही अट आणि तो गेला तर नरकवास हा परिणाम. सशर्त शापात शर्तीचे उल्लंघन झाल्यास परिणाम अटळ असतात. परंतु ह्या शापतुल्य उद्‌गारातील अट रामाने पाळली नसताही त्याला परिणाम भोगावे लागलेले नाहीत. रामाला नरकवास लाभला नाही. शर्तीचे उल्लंघन करूनही शापाचे परिणाम न होणारा हा एकमेव सशर्त शाप रामायणात आढळतो. म्हणून त्याचा थोडा बारकाईने विचार करायला हवा. राम वनवासाला गेला हे स्पष्टच असल्याने शर्तीचे उल्लंघन झालेलेच आहे. त्यामुळे उत्तरार्धात व्यक्त झालेला नरकवास रामाला लाभला किंवा नाही हे पाहावयास हवे. रामाला नरकवास तर लाभला नाहीच, परंतु स्वर्गात त्याचे भव्य स्वागत झाले, हे स्पष्ट करणारा भक्कम पुरावा वाल्मीकी रामायणातच आहे. अवतार समाप्तीचा समय जवळ आल्याची सूचना देण्यास प्रत्यक्ष काल रामाच्या भेटीला आला. त्याने ब्रह्मदेवाचा संदेश एकांतात रामाला सांगितला व त्यानुसार लक्ष्मणाचे पाठोपाठ रामाने महाप्रस्थान ठेवले. तो सरयूच्या पाण्यात उतरत असताना अंतरिक्षातून ब्रह्मदेव म्हणाला–'**आगच्छ विष्णो भद्रं ते दिष्टया प्राप्तोऽसि राघव**' हे विष्णो, ये, राघवा, तुझे कल्याण असो. तू स्वर्गलोकी येण्यास तयार झाला आहेस ही फार आनंदाची गोष्ट आहे.[१५] एवढेच नव्हे तर रामाला त्याच्या इच्छेप्रमाणे वाटेल त्या तनूचा स्वीकार करण्याची पूर्ण मुभा देण्यात आली होती. रामाने वैष्णव तेजात प्रवेश केल्यानंतर देवांनी काढलेले उद्‌गार पुढील प्रमाणे आहेत.

**सर्वं पुष्टं प्रमुदितं सुसम्पूर्णमनोरथम् ।**
**साधुसाध्विति तैर्देवैस्त्रिदिवं गतकल्मषम् ।।**

'तू आल्यामुळे सर्व स्वर्गलोक पुष्ट, हर्षयुक्त, कृतकृत्य आणि पापरहित झाला आहे. ह्यास्तव तुझी धन्य होय.[१५] देवांची कबुली लक्षात घेता रामाला स्वर्गवास लाभला याबाबत कोणताही संदेह उरत नाही. या शापातील शर्तीची व परिणामाची संगती लावायची तर कौसल्येला शाप देण्याचा अधिकार प्राप्त झाला नसावा किंवा तिचे उद्‌गार हे पुत्राविषयीच्या आत्यंतिक प्रेमातून निर्माण झाले असल्याने ते दाहक असूनही शाप संज्ञेला पात्र नाहीत, असे मानायला हवे. ते केवळ शापतुल्य आहेत. शापाप्रमाणे अमोघ परिणाम घडवून आणणारे नाहीत.

## न दिलेला शाप

शाप दिला असता पुण्यक्षय होतो, तपव्यय होतो, असा समज असल्याने

---

१५ उत्तरकाण्ड ११०/८ आणि १५

कित्येकदा शाप देण्याचा विचार मनात येऊनही तो देण्याचे विचारपूर्वक टाळले जाते. जोपर्यंत मनातील इच्छा शब्दोच्चारांनी प्रकट केली जात नाही, तोपर्यंत तिला 'शाप' रूप प्राप्त होत नाही. मनात इच्छा उत्पन्न होणे दोषास्पद नाही, अशीही समजूत आहे. शाप/वर ही वाक्-शक्ती असल्याने त्यांचा परिणाम शब्दोच्चारानंतर होतो, म्हणूनच ऋषिमुनी, राजे, व्रतस्थ व्यक्ती शाप फार जपून देतात. क्रोध अनावर झाला असता, शब्दोच्चार मुखावाटे केव्हा बाहेर पडतात, हे कळतच नसल्याने इलाज नसतो. शाप देणे हे निंद्य होय असे मानले जात असल्याने मनात विचार येऊनही शाप उच्चारले जात नाहीत. रामायणात न दिलेल्या शापांची दहा उदाहरणे आढळतात.

विश्वामित्राला स्वसामर्थ्याने मारीच व सुबाहू यांचे पारिपत्य करणे, त्यांना शाप देणे सहज शक्य होते. परंतु तो व्रतस्थ असल्याने त्याने स्वसामर्थ्याचा उपयोग केला नाही. दशरथाकडे रामाचे साहाय्य मागितले. तप-व्यय होऊ नये यास्तव वेदवतीने रावणाला शाप न देता वेगळी प्रतिज्ञा केली. दंडकारण्यातील मुनी आणि कुशकन्यांनी शाप देण्याचे हेतुपुरस्सर टाळले. काही न दिलेले शाप असे आहेत की ते शापदात्यांच्या मनातही उद्भवले असतील, असे निःसंदेहपणे सांगता येत नाही, परंतु शापितांनाच तशी भीती वाटत असावी. अतिथि-वेषाने आलेल्या रावणाची सीतेला, त्रिशंकूच्या यज्ञासाठी आलेल्या विश्वामित्राची ऋषींना–शाप देईल अशी भीती वाटत होती. गुरूला शाप देणे योग्य नाही हे वाटल्यामुळे सौदासाने शाप देण्याची सर्व तयारी करूनही शाप दिला नाही. लक्ष्मणाने दुर्वासाची विनंती मान्य केल्याने मनात येऊनही त्याने शाप दिला नाही, देण्याची वेळच आली नाही. एकुलत्या एका पुत्राच्या वधाची वार्ता कळल्यास आपला पिता दशरथ राजाला शाप देईल, अशी भीती श्रावणाला वाटत होती, त्याचप्रमाणे त्याला शाप मिळू नये, अशीही त्याची इच्छा होती. त्याने दशरथ राजाला शाप टाळण्याचा उपाय सुचविला आहे.

**पितुस्त्वमेव मे गत्वा शीघ्रमाचक्ष्व राघव ॥ –४३ ;**
**तं प्रसादय गत्वा त्वं न त्वां संकुपितः शपेत् । –४५**

'हे रघुवंशजा, तूच माझ्या पित्याकडे सत्वर जाऊन त्याला हा वृत्तान्त कळव ....ज्या रीतीने तो क्रुद्ध होऊन तुला शाप न देईल, त्या रीतीने तू त्याला प्रसन्न करून घे ! १६

## प्रतिशाप

शाप देण्याची जी अनेक कारणे असू शकतात, त्यांत एक शाप हे दुसऱ्या

---

१६ अयोध्याकाण्ड / ६३

शापाचे कारण होऊ शकते. शापाला प्रत्युत्तर म्हणून दिलेला शाप म्हणजे प्रतिशाप. वाल्मीकी रामायणात प्रतिशाप देण्यासारखी परिस्थिती दोनदा निर्माण झालेली आढळते. एका प्रसंगात प्रतिशाप दिला गेला असून दुसऱ्या प्रसंगी तो देण्याचे टाळले आहे. हे दोन्ही प्रसंग वसिष्ठाने दिलेल्या शापांतून उद्‌भवले आहेत.

निमिराजाने ब्रह्मर्षिश्रेष्ठ वसिष्ठाला आपल्या दीर्घसत्राचे ऋत्विग्वरण प्रथम दिले होते. परंतु त्याने हे कळण्यापूर्वीच इंद्राचे ऋत्विग्वरण स्वीकारले असल्याने त्याला राजाची विनंती ताबडतोब मान्य करता येत नव्हती. त्याने त्याला काही काल वाट पाहण्यास सांगितले. परंतु निमिराजाने गौतम ऋषीकडून आपला याग करविला. हे वृत्त समजताच वसिष्ठाला अतिशय राग आला. राजाला जाब विचारण्यासाठी तो त्याच्याकडे गेला असता, राजा झोपी गेला असल्याने भेट होऊ शकली नाही. तेव्हा क्रुद्ध होऊन वसिष्ठाने त्याला शाप दिला, 'ज्या अर्थी माझी अवज्ञा करून तू दुसरा ऋत्विज वरला आहेस, त्या अर्थी तुझा देह अचेतन होऊन राहील.' जाग आल्यावर निमिराजाला वसिष्ठाचा शाप कळला, तेव्हा तोही अतिशय रागावला आणि 'आपण आल्याचे मला ठाऊक नसता आणि मी निद्रिस्त असता ज्या अर्थी आपण क्रोधाने व्याप्त होऊन प्रतियमदंडाप्रमाणे माझ्यावर शापाग्नी सोडला, त्या अर्थी हे ब्रह्मर्षे, आपला मनोहर देह निःसंशय अचेतन होऊन राहील,' असा शाप दिला.[१७]

मृगयेसाठी वनात संचार करीत असता सौदास राजाने एका राक्षसाचा वध केला. त्यामुळे त्याच्या मित्राने त्याचेवर सूड उगवण्याची प्रतिज्ञा केली. राक्षसांना रूपे बदलता येत असल्याने त्याने वसिष्ठाच्या वेषाने राजाची भेट घेऊन भोजनाची मागणी केली. राजाने पाकसिद्धीची आज्ञा दिली असता राक्षसाने आचाऱ्याचे रूप घेऊन नरमांस शिजवले व राजाकडून ते खऱ्या वसिष्ठाला देवविले. भोजन पदार्थ पाहून वसिष्ठ क्रुद्ध झाला व त्याने राजाला 'असले भोजन निःसंशय तुलाच प्राप्त होईल,' असा शाप दिला. राजाला आपल्या हातून काय अपराध घडला हेच कळेना. शाप अकारण प्राप्त झालेला मानून वसिष्ठाला प्रतिशाप देण्यासाठी त्याने हातात उदक घेतले. परंतु त्याच्या पत्नीने गुरूला शाप देणे अयोग्य असल्याचे त्याला पटवून दिले, म्हणून राजाने प्रतिशाप दिला नाही.[१७]

## उःशाप

शापिताचे कल्याण व्हावे, दोषाबद्दल शिक्षा झाली, तरी चूक सुधारली जावी अशी जाण असल्याने, शापाचे परिणाम अटळ असल्याने, त्यात बदल करता येत नसल्याने, शाप देण्याचे सामर्थ्य अंगी असूनही क्षुद्र कारणास्तव त्याचा उपयोग

---

१७ पहा : शाप क्र ५० आणि ५७

करणे निंद्य मानले जात असे. अनावर क्रोधामुळे परिणामाची क्षिती न बाळगता कित्येकदा घोर शाप दिले जात. नंतर पश्चात्ताप होई. शापाच्या परिणामाची तीव्रता कमी करण्याचा उपाय म्हणजे उःशाप. क्वचित दुसरा वर देऊनही हे कार्य केले जाई. उःशापाने शापाच्या परिणामाचा कालावधीही कमी, मर्यादित होऊ शकतो. शापित व्यक्तींना आपली चूक कळून आल्यास शापाचा परिणाम, कालावधी सौम्य व्हावा, कमी व्हावा, यास्तव त्यांनी केलेली प्रार्थना लक्षात घेऊन दिलेले उःशाप याचित होत, तर शापदात्यांना पश्चात्ताप झाल्यास किंवा अन्य कारणास्तव शापांचे परिणाम तीव्र होऊ नयेत, असे वाटल्यास जे उःशाप दिले जातात ते अयाचित होत. कित्येकदा उःशाप हा शापाबरोबर उत्तरार्धात समाविष्ट असतो. उःशाप कोणत्याही प्रकारचा असला तरी तो देणे, न देणे, त्यात बदल करणे हे सर्वस्वी शापदात्याच्या इच्छेवर अवलंबून असते. प्रत्येक शापाला उःशाप असत नाही. रामायणातील ६१ शापांपैकी केवळ अकरा शापांना उःशाप आहेत. उःशापाला स्वतंत्र अस्तित्व नसते, तो शापावलंबितच असतो. शापाचे मानाने त्याचे स्थान गौण, दुय्यम असले तरी त्याचे कार्य महत्त्वपूर्ण असते.

स्थूलशिरा ऋषीच्या शापाने विश्वावसू गंधर्व कबंध राक्षस झाला. परंतु त्याच्या विनंतीनुसार ‘ राम जेव्हा निर्जन वनात तुझे हात तोडून दहन करील तेव्हा तुला स्वताचे भव्य व शुभ रूप प्राप्त होईल ’, असा जो उःशाप त्याला मिळाला तो याचित होय. ह्याच गंधर्वाला इंद्राचाही शाप होता व त्याचेकडूनही त्याने उःशाप मिळवला होता. तोसुद्धा याचितच होय. पुंजिकस्थला अप्सरेला शापकालात इच्छेनुरूप मानवी अथवा वानरी रूप घेण्याचे मिळालेले स्वातंत्र्य. कुंभकर्णाच्या वतीने रावणाने केलेल्या विनंतीनुसार सहा महिन्याने निद्रेतून जाग आल्यावर एक दिवस मुक्तपणे संहार करण्याची कुंभकर्णाला मुभा, आणि केकसीच्या इच्छेप्रमाणे बापाच्या वंशाला साजेशा एका पुत्राची (बिभीषण) प्राप्ती, अज्ञानाच्या पोटी गौतमाला अनिष्ट भोजन दिल्याने त्याला गिधाड होण्याचा जो शाप मिळाला होता त्यातून ‘ रामाच्या दर्शनाने होणारी मुक्ती ’ हे सारे उःशाप याचित आहेत.

अहल्येच्या शापाची कथा रामायणात दोनदा आली असून त्यात भिन्नता आहे.[१८] त्यामुळे उःशाप समानार्थी असूनही त्यांच्या स्वरूपात फरक पडला आहे. बालकांडातील उःशाप अयाचित असून उत्तरकांडातील याचित आहे. बालकांडातील कथेप्रमाणे गौतमाच्या वेषात आश्रमात आलेली व्यक्ती इंद्र असल्याचे अहल्येला ज्ञात होते, इतकेच नव्हे तर देवराजाने तिची अभिलाषा धरावी याचे तिला कौतुक वाटत होते. तिचा अपराध मोठा होता व तिला घोर शिक्षा देणे प्राप्त

१८ बालकाण्ड / ४८, ४९; उत्तरकाण्ड / ३०

होते. इतरांच्या दृष्टीस न पडता हजारो वर्षे केवळ वायुभक्षण करीत जीवन कंठ-ण्याचा गौतमाने तिला शाप दिला. परंतु त्याचबरोबर श्रीरामाच्या दर्शनाने शुद्धी व पूर्वस्वरूपाची प्राप्ती होईल, असा उ:शापही दिला. इतक्या मोठ्या अपराधाला गौतमाने अयाचित उ:शाप कसा दिला, याचे आश्चर्य वाटते ! आश्रमात गौतम वेषधारी आलेली व्यक्ती इंद्र असल्याचे अहल्येला ठाऊक नव्हते, असे उत्तरकांडा-तील कथेत दिले आहे. वस्तुस्थिती निश्चित काय होती हे कळण्याला मार्ग नसला तरी वाल्मीकीचाच आधार घ्यावयास हवा. अहल्येने उ:शाप देण्याबाबत गौतमाला विनंती केली आहे. स्वताच्या इच्छेने तिने इंद्राला भोग दिला नव्हता आणि म्हणून शाप सौम्य व्हावा, अशी तिने प्रार्थना केली. तेव्हा गौतमाने जो उ:शाप तिला दिला तो याचित आहे. 'मनुष्यरूप धारण केलेला महापराक्रमी विष्णू ब्राह्मणांकरिता वनात येईल, तेव्हा तू पवित्र होशील. तू जे दुष्कर्म केले आहेस त्याबद्दल शुद्धी कर-ण्याचे सामर्थ्य त्यालाच आहे. त्याचे आदरातिथ्य केल्यास तू माझ्या समीप येशील आणि माझ्याबरोबर वास्तव्य करशील.'

विश्वामित्राने तपात विघ्न निर्माण करणाऱ्या रंभेला 'हजारो वर्षे पाषाण होशील', असा शाप दिला असला तरी एका तेजस्वी ब्राह्मणाकडून तुझा उद्धार होईल, असा दिलासाही दिला आहे. यज्ञात विघ्ने निर्माण करणाऱ्या हनुमानाला ऋषींनी शाप दिला तरी 'कोणी स्मरण करून दिल्यास स्वसामर्थ्याची जाणीव होईल.' असा उ:शापही दिला. ब्राह्मणांच्या शापाचे फल म्हणून नृगराजाला दीर्घ-काल 'सरडा' म्हणून जीवन व्यतीत करावे लागले असले तरी पापनिष्कृती होताच शापमुक्तीचे आश्वासनही दिले होते. हे सर्व उ:शाप आणि बालकांडातील अहल्येचा मिळालेला उ:शाप शापांच्या उत्तरार्धातच समाविष्ट आहेत. सौदास राजाने वसि-ष्ठाला जे भोजन देऊ केले, त्यात त्याचा स्वताचा काही दोष नव्हता, हे पटवून दिल्यावर शाप देण्यात घाई झाली, चूक झाली हे वसिष्ठाला उमगले. परंतु त्याला शाप परत घेता येईना. त्याने उ:शापही दिला नाही. दुसरा एक वर देऊन शापाच्या परिणामाचा कालावधी बारा वर्षांचा करून पूर्वीचे स्मरण राहाणार नाही, असे आश्वासन दिले.

या सर्व उ:शापांतून रामाचे दर्शन, स्पर्श यांना महत्त्व दिलेले आढळते. राम-कथेत रामाचा गुण-गौरव अधिक प्रमाणात असावा, हे स्वाभाविकच होय.

## शपथ, प्रतिज्ञा

शाप आणि शपथ हे दोन्ही शब्द 'शप्' ह्या एकाच धातूपासून उत्पन्न झाले आहेत. शपथ हा प्रतिज्ञा-निदर्शक शब्द आहे. 'आपण जे बोललो ते सत्य आहे, हे पटवून देण्यासाठी उच्चारलेला व असत्य ठरल्यास आपणावर अरिष्ट

कोसळो, असे जाहीर करणारा शब्द-प्रयोग म्हणजे शपथ होय.'[१९] शपथेची ही व्याख्या शपथक्रियेतील काही महत्त्वाच्या घटकांचा निर्देश करत असली तरी अव्याप्त आहे. अनेक शपथांची व्यवस्था ह्या व्याख्येने लावता येत नाही. रामाने लक्ष्मणाला वाल्मीकी आश्रमाजवळच्या निर्जन प्रदेशात सीतेला सोडून येण्याची आज्ञा केली. त्यानुसार लक्ष्मण सीतेला घेऊन वनात आला, परंतु रामाची आज्ञा तिला सांगणे त्याला फार अवघड झाले. लक्ष्मण नेहमीसारखा बोलत नाही, त्याला काही तरी झाले असावे, अशी सीतेला शंका आली. ती त्याला म्हणाली. 'तू मला स्वस्थचित्त दिसत नाहीस. तू खरे सांग. राजाचे क्षेम आहे ना? **शापितोऽसि नरेन्द्रेण यत्त्वं सन्तापमागतः** तुला राजाची शपथ आहे. तुला इतका संताप का आला आहे?'[२०] ह्या शपथेत सत्य पटवून देण्याचा किंवा असत्य ठरल्यास स्वतावर अरिष्ट कोसळो, अशा अर्थाचे शब्द नाहीत, परंतु ही शपथच आहे. 'एखाद्या देवतेला किंवा पवित्र वस्तूला आवाहन करून आपल्या वचनातील सत्यता व दृढता याबद्दलची खात्री पटवणे म्हणजे शपथ', अशी व्याख्या ओडने केली आहे. वेस्टरमार्क शपथेविषयी म्हणतो– 'An oath may be regarded as essentially a coditional self-imprecation, a curse by which a person calls down upon himself some evil in the event of what he says not being true.[२१] 'मी बोललेले असत्य असेल तर माझ्यावर अमुक अमुक आपत्ती कोसळेल, अशा प्रकारचा शाप स्वतावर घेणे म्हणजे शपथ होय.'[२२] ह्या व्याख्येत देवतेला किंवा एखाद्या पवित्र वस्तूला आवाहन नसून स्वताच्या वर्तनावरचा विश्वास, सत्यता पणास लावली आहे. सीतेच्या शुद्ध चारित्र्याची ग्वाही देताना वाल्मीकी सांगतो[२३]–

**बहुवर्षसहस्राणि तपश्चर्या मया कृता।**
**नोपाश्नीयां फलं तस्या दुष्टेयं यदि मैथिली ॥**
**मनसा कर्मणा वाचा भूतपूर्वं न किल्बिषम्।**
**तस्याहं फलमश्नामि अपापा मैथिली यदि ॥**

'ही मैथिली जर दोषयुक्त असेल तर अनेक सहस्रवर्षांपर्यंत जी मी तपश्चर्या केली आहे, त्याचे फळ मला मिळणार नाही! मैथिली जर पापरहित असेल, तरच आजपर्यंत जे कायिक, वाचिक वा मानसिक पातक माझ्या हातून घडले नाही,

---

१९ भारतीय संस्कृति-कोश, खंड ९. पृ. २१५
२० उत्तरकाण्ड ४७/९
२१ Encyclopedia of Religion & Ethics.
२२ भारतीय संस्कृति-कोश, खंड ९. पृ. २१५
२३ उत्तर काण्ड ९६/२०, २१

त्याचे फळ मला प्राप्त होईल.' येथे वाल्मीकीने स्वताच्या वर्तनावरचा दृढ विश्वास शपथेतून व्यक्त केला आहे.

अशाही काही शपथा असतात की ज्यांत देवतांना आवाहन नसते, स्वताला शाप नसतो किंवा अभिचारालाही स्थान नसते. वैयक्तिक प्रतिष्ठा, नैतिक जबाबदारी, भावनात्मक संबंध ह्यांचे दर्शन काही शपथांतून घडते. भरत - भेटीनंतर निरोप देण्याचे वेळी राम शत्रुघ्नाला म्हणतो,

**'मातरं रक्ष कैकेयीं मा रोषं कुरु तां प्रति ।।–२७**
**मया च सीतया चैव शप्तोऽसि रघुनंदन । –२८**

कैकेयी मातेचे रक्षण कर. तिच्यावर क्रोध करू नको.[२४] तुला माझी व सीतेची शपथ आहे.' त्याचप्रमाणे रामावरील निःसीम प्रेमाची खात्री पटवून देताना लक्ष्मण कौसल्येला म्हणतो–

**अनुरक्तोऽस्मि भावेन भ्रातरं देवि तत्त्वतः ।**
**सत्येन धनुषा चैव दत्तेनेष्टेन ते शपे ।। १६**

'हे देवी, मी मनापासून आपल्या भ्रात्यावर प्रेम करीत आहे, हे मी तुला सत्य, धनुष्य, दान आणि यज्ञयाग यांची शपथ घेऊन सांगतो.'[२५] ह्या दोन्ही उदाहरणांत अत्यंत प्रिय व्यक्तींचा उल्लेख आहे. माता-पिता, गुरू, पती, पत्नी, पुत्र, कन्या, सखा, देव-देवता, भक्त, धर्मग्रंथ, प्रिय वस्तू, उपजीविकेची साधने अशांचा उल्लेख असलेली शपथ ही अधिक प्रभावी मानली जाते. बिभीषणाला आश्वासन देताना रामाने आपल्या तिन्ही भावांची शपथ पुढीलप्रमाणे घेतली आहे.

**अहत्वा रावणं संख्ये सपुत्रजनबान्धवम् ।**
**अयोध्यां न प्रवेक्ष्यामि त्रिभिस्तै र्भ्रातृभिः शपे ।। २१**

'पुत्र, स्वजन आणि बांधव ह्यांसहवर्तमान रावणाचा संग्रामात वध केल्याशिवाय मी अयोध्यानगरीत प्रवेश करणार नाही, हे त्या तीन भ्रात्यांची शपथ घेऊन सांगतो.'[२६] स्वताच्या बोलण्याची सत्यता, स्वताचे चारित्र्य, सामर्थ्य इत्यादी सिद्ध करण्यासाठी स्वताला उद्देशून अशा शपथा घेतल्या जातात. न्यायदानाच्या कार्यात आजही अशा शपथांना स्थान आहे. धर्मग्रंथाला स्पर्श करून I speak the truth, the only truth, and nothing but the truth अशी शपथ घेण्याची प्रथा आहे. अधिकार-ग्रहणाचे वेळीही शपथ देणे व शपथ घेणे हा प्रकार असतो.

शपथ घेणे आणि शपथ घालणे असे शपथांचे दोन प्रकार संभवतात. वरील उदाहरणांत प्रिय व्यक्ती, वस्तू इ. चा उल्लेख करून शपथा घेतलेल्या आहेत.

---

२४ अयोध्याकाण्ड / ११२
२५ अयोध्याकाण्ड / २१
२६ युद्धकाण्ड / १९

स्वताच्या प्राणाची, प्रिय-आदरणीय व्यक्तीच्या प्राणांची शपथ घेतली जाते, घातली जाते. त्याचप्रमाणे शरीराच्या अवयवांचा उल्लेखही शपथांतून केला जातो. 'पायां'चा उल्लेख अत्यंत महत्त्वाचा मानला जातो. पायांच्या शपथेत ज्येष्ठ-कनिष्ठ संबंधाला महत्त्व असते. वास्तविक पाहता शपथ कोणीही घेऊ शकतो, कोणालाही घालू शकतो; परंतु पायांची शपथ फक्त ज्येष्ठ व्यक्तीच कनिष्ठाला घालू शकते. ही ज्येष्ठता वयाची, ज्ञानाची, अधिकाराची–कोणत्या तरी प्रकारची असावी लागते. कनिष्ठ ज्येष्ठाला पायाची शपथ घालू शकत नाही. सीतेला वाल्मीकी मुनीच्या आश्रमाजवळ सोडून येण्याची लक्ष्मणाला आज्ञा करताना त्यांचेकडून विरोध होईल, अशी रामाला भीती वाटत होती, म्हणून त्याला बोलण्याची संधी न देताच राम म्हणतो–'**शापिता हि मया यूयं पादाभ्यां जीवितेन च ।**' 'मी आपल्या पायांची व जीविताची शपथ घातली आहे.'[२७] खरदूषणांनी आक्रमण केले असता त्यांचा समाचार घेण्यास लक्ष्मण समर्थ होता. परंतु रामाला स्वतालाच त्यांचे पारिपत्य करावयाचे होते. ह्याही प्रसंगी लक्ष्मणाला काही बोलण्यास अवकाश न देता राम म्हणाला–

**प्रतिकूलितुमिच्छामि न हि वाक्यमिदं त्वया ।**
**शापितो मम पादाभ्यां गम्यतां वत्स मा चिरम् ।। १३**

'माझ्या सांगण्याच्या विरुद्ध तू वागावेस अशी माझी इच्छा नाही. माझ्या पायांची तुला शपथ आहे.[२८]

शपथ आणि प्रतिज्ञा हे शब्द समानार्थी नाहीत. शपथेत प्रकट अथवा सुप्त प्रतिज्ञा असतेच, परंतु प्रतिज्ञेत शपथ असतेच असे नाही. शपथेत शापाची छटा असते, तशी ती प्रतिज्ञेत नसते. शपथ आणि प्रतिज्ञा या शब्दांच्या अर्थच्छटा, अर्थव्याप्ती वाल्मीकीला अभिप्रेत होती, त्यामुळे या शब्दांचा त्याने अचूकपणे उपयोग केला आहे. रामायणात अनेक प्रतिज्ञा आहेत. वेदवतीची प्रतिज्ञा तर सर्वश्रुतच आहे.

**यस्मात्तु धर्षिता चाहं त्वया पापात्मना वने ।।–३१**
**तस्मात्तव वधार्थं हि समुत्पत्स्ये ह्यहं पुनः ।–३२**

'ज्या अर्थी वनामध्ये तू दुरात्म्याने माझ्या अंगावर हात टाकला आहेस, या अर्थी तुझ्या वधाकरता मी पुनरपि उत्पन्न होईन.'[२९] भरतभेटीच्या वेळी भरत रामाला अयोध्येला परत येण्याचा आग्रह विविध रीतीने करतो. राम तितक्याच निग्रहाने नकार देतो. तो भरताला म्हणतो –

**पुरा भ्रातः पिता नः स मातरं ते समुद्वहन् ।**
**मातामहे समाश्रौषीद्राज्यशुल्कमनुत्तमम् ।। ३**

---

२७ उत्तरकाण्ड ४५ / २१
२८ अरण्यकाण्ड / २४
२९ उत्तरकाण्ड / १७

'पूर्वी आपल्या पित्याने जेव्हा तुझ्या मातेचे पाणिग्रहण केले तेव्हा, हिचे ठिकाणी जो पुत्र होईल त्याला मी राज्य देईन, अशी तुझ्या आजापाशी प्रतिज्ञा केलेली आहे.'[३०] दण्डकारण्यात वास्तव्य करताना राम व लक्ष्मण यांनी मुनिव्रत स्वीकारले होते. तेथील मुनींच्या विनंतीवरून त्यांना त्रास देणाऱ्या राक्षसांचे पारिपत्य करण्यास उद्युक्त झालेल्या रामाला सीतेने राक्षसांची हिंसा करणे योग्य नसल्याने, त्यांनी अपराध केला नसल्याने त्यांना शासन करू नये अशी विनंती केली. तेव्हा राम सीतेला म्हणाला

**ऋषीणां दण्डकारण्ये संश्रुतं जनकात्मजे ।**
**संश्रुत्य च न शक्ष्यामि जीवमानः प्रतिश्रवम् ॥ १७**
**मुनीनामन्यथा कर्तुं सत्यमिष्टं हि मे सदा ।**
**अप्यहं जीवितं जह्यां त्वां वा सीते सलक्ष्मणाम् ॥ १८**
**न तु प्रतिज्ञां संश्रुत्य ब्राह्मणेभ्यो विशेषतः ।—१९**

'सीते, (ऋषींचे) हे भाषण श्रवण केल्यावर दंडकारण्यामध्ये त्यांचे सर्वस्वी पालन करण्याची मी प्रतिज्ञा केली आहे. एकदा जी मुनींशी प्रतिज्ञा केली, त्या प्रतिज्ञेचे जिवात जीव आहे तोपर्यंत माझ्याने उल्लंघन होणे शक्य नाही. कारण सत्य हे मला नेहमीच इष्ट आहे. सीते, मी आपल्या जीविताचा अथवा लक्ष्मणासहवर्तमान तुझा त्याग करीन, परंतु केलेली प्रतिज्ञा–त्यातही ब्राह्मणांशी केलेली प्रतिज्ञा मी फिरवणार नाही.'[३१]

गाईचे खाद्य, विवाह, ब्राह्मण-संरक्षण, प्रेयसीच्या बरोबरचा वार्तालाप अशा काही प्रसंगी खोटी शपथ घेतली तरी ती दोषार्ह नसते. खोटी शपथ घेणे त्याज्य मानले आहे. त्याचप्रमाणे क्षुद्र कारणास्तव शपथ घेणेही निषिद्ध आहे. शपथ केव्हा घ्यावी व केव्हा घेऊ नये याचे संकेत आहेत. सामान्यतः चारित्र्याची, पातिव्रत्याची खात्री पटवून देणे, आपत्काल, अपमानाचा सूड, मैत्री-संपादन, मसलतीतील गुप्ततापालन, अब्रूचे संरक्षण, राज्याभिषेक इत्यादी प्रसंगी शपथ घेत असत. रामायण महाभारतासारख्या ग्रंथांत शापांप्रमाणे शपथाही विपुल आहेत. रामायणातील बहुतेक सर्व प्रमुख व्यक्तींनी कोणत्या ना कोणत्या कारणास्तव शपथा घेतल्या आहेत.

शाप आणि शपथ हे अभिचारात्मक असून त्यांत यातुक्रियेची वैशिष्टये आढळतात. कित्येकदा हे दोन शब्द समानार्थीही योजिले जातात. परंतु ते समानार्थी तर नाहीतच, त्यात बरेच भेद आहेत. 'शपथ ही एक प्रकारची हमी आहे, तर शाप ही शिक्षा आहे. शपथेत शाप असतो, पण शापात शपथ असत नाही. शपथे-

---

३० अयोध्याकाण्ड / १०७

३१ अरण्यकाण्ड / १०

मधील शापाची शिक्षा प्राधान्याने स्वताच्या पुरती मर्यादित असते आणि शापाची शिक्षा दुसऱ्यासाठी असते. शाप देण्याचे सामर्थ्य अंगी येण्यासाठी फार मोठे तप करावे लागते. पण शपथेला त्याची आवश्यकता नसते. शाप दिल्याने तपस्येचे सामर्थ्य कमी होते, पण शपथेच्या संदर्भात हे संभवत नाही. शापाला उःशाप असू शकतो, परंतु शपथेतून सुटका नसते. शाप उलटण्याची भीती असते, पण शपथ उलटत नाही. शपथा वर्णभेदानुसार भिन्न असू शकतात, पण शापांत वर्णभेद नसतो. शपथ माध्यमामुळे प्रभावी ठरते, तर शाप तपाने प्रभावी ठरतो '[३२]–अशा शब्दांत संस्कृति-कोशकारांनी दोहोंतील भेद स्पष्ट केला आहे.

## सत्यक्रिया

सत्यक्रिया, दिव्य हे शपथेचेच प्रकार होत. प्राचीन भारतीय साहित्यात ह्यांची उदाहरणे विपुल आढळतात. डॉ. रा. चिं. ढेरे यांनी 'संतसाहित्य आणि सत्यक्रिया' ह्या लेखात ह्या विषयाची विस्ताराने आणि उदाहरणांसह चिकित्सक चर्चा केली आहे. त्यांच्याच शब्दांत सत्यक्रिया आणि दिव्य यांचे स्वरूप जाणून घेणे उचित होईल.[३३] 'सत्याचा उच्चार हा हवे ते चमत्कार घडवून आणू शकतो, अशी धारणा प्राचीन परंपराशील लोकमानसात स्थिरावली होती. आपले वा इतरांचे कोणतेही संकट दूर करण्यासाठी अथवा आपले निरपराधित्व सिद्ध करण्यासाठी लोक सत्योक्तीचा वापर करीत असत. सत्य उच्चारून दिलेल्या परीक्षेला 'सत्यक्रिया' असे म्हणत असत .. सत्यक्रिया ही जलस्पर्शपूर्वक अथवा जलाला साक्षी ठेवून करण्याची प्रथा असावी. जल-दिव्याची प्रथा यातूनच निघाली असण्याचा संभव आहे. कारण जल-दिव्यात दिव्य करणाऱ्या व्यक्तीने जलाचा स्वामी वरुण याचीच प्रार्थना करायची असते.... वरुण ऋताचे रक्षण करण्याचे काम पाण्यात राहून करतो. सत्याचे रक्षण करणारा आणि पाण्यात वास करणारा वरुण ही एक शपथ-देवता आहे. कारण पाण्याच्या साक्षीने शपथ घेण्याची चाल फार प्राचीन काळापासून चालत आली आहे. ... पाण्याच्या सान्निध्यात शपथ घेण्याचा प्रकार यज्ञविधीत आढळतो. वरुणाचा वास पाण्यात असून खोटे बोलणाऱ्याला किंवा खोटी शपथ घेणाऱ्याला तो पाण्यातून म्हणजे आपल्या स्थानातून बाहेर काढतो. दिव्य करणाऱ्या माणसाला पाण्यात म्हणजे स्वताच्या घरात वरुणाने राहू दिले, तर त्यावरून त्याने त्याचे निर्दोषत्व व्यक्त केले, असे समजण्यात येत असे....सत्यक्रियेचा जसा अग्निदिव्यांशी संबंध आहे तसाच तो जलदिव्यांशी आहे... दिव्य हा सत्यक्रियेचाच विधी असल्याने असा संबंध आढळणे अगदी स्वाभाविक आहे. सत्यक्रियेचा दिव्यांशी संबंध राहून

---

३२ भारतीय संस्कृति-कोश, खंड ९ पृ. २१८

३३ संत साहित्य आणि लोकसाहित्य. पृ. १७७, १८२-८३,१८४

अधिक प्रमाणात असला पाहिजे .. दिव्य ही एक प्रकारची दैवी परीक्षा आहे. त्या परीक्षेतून जो उत्तीर्ण होतो, तो निरपराधी, निर्दोष, निष्पाप मानला जातो ... सत्यक्रियेचा संबंध सत्याच्या असाधारण सामर्थ्यावरील श्रद्धेशी अर्थात् सत्यनिष्ठेशी असला तरी वाङ्मयात अनेकदा सत्यक्रियेचा वापर एक कल्पनाबंध ( motif ) म्हणूनच झालेला आढळतो. शपथ ही केवळ वाच्य असते तर सत्यक्रियेत उच्चाराला कृतीची जोड असते.

सीतेच्या जीवनात सत्यक्रिया करण्याचे प्रसंग दोन-तीन वेळा आले आहेत. कुश-लवांच्या तोंडून रामकथा ऐकल्यानंतर भारावलेल्या रामाने दूतांकरवी वाल्मीकी ऋषीला निरोप धाडला, सीतेचे आचरण स्वाभाविकच शुद्ध असेल अथवा आश्रमातील वास्तव्यामुळे जर ती निर्दोष झाली असेल तर येथे येऊन

**श्वः प्रभाते तु शपथं मैथिली जनकात्मजा ।**
**करोतु परिषन्मध्ये शोधनार्थं ममैव च ।। ६**

'उदयिक प्रभात काली जनक-कन्या मैथिलीने सभेमध्ये स्वतावरील व माझ्यावरील अपवाद दूर करण्याकरिता शपथ घ्यावी '[३४] निरोपाप्रमाणे वाल्मीकी सीतेला घेऊन आला. तिच्या शुद्ध चारित्र्याविषयी आपल्या तपश्चर्येची शपथ घेऊन सीतेचे निर्दोषत्व रामाला पटवून देण्याचा त्याने प्रयत्न केला. सीतेने आपली शुद्धता सिद्ध करण्यासाठी सत्यक्रिया केली. धरणीला उद्देशून तिने पुढील उद्गार काढले —

**यथाहं राघवादन्यं मनसापि न चिन्तये ।**
**तथा मे माधवी देवी विवरं दातुमर्हति ।। १४**
**मनसा कर्मणा वाचा यथा रामं समर्चये ।**
**तथा मे माधवी देवी विवरं दातुमर्हति ।। १५**
**यथैतत्सत्यमुक्तं मे वेद्मि रामात्पर न च ।**
**तथा मे माधवी देवी विवरं दातुमर्हति ।। १६**

'रघूत्तम रामाशिवाय जर मी इतर पुरुष मनात आणला नसेल तर ही विष्णुपत्नी भूदेवी मला विवर देईल. मनाने, कायेने वा वाचेने जर मी रामाचेच आराधन करीत असेन, तर ही विष्णुपत्नी भूमाता मला द्वार देईल. रामाशिवाय दुसऱ्या पुरुषाची मला ओळखही नाही, हे जर माझे म्हणणे सत्य असेल तर ह्या विष्णुपत्नी भूमीने मला प्रवेश करण्यास मार्ग द्यावा.'[३५]

अशाच प्रकारची आणखी एक सत्यक्रिया सीतेनेच हनुमानाच्या शेपटीची

---

३४ उत्तरकाण्ड / ९५
३५ उत्तरकाण्ड / ९७

आग कमी व्हावी, अग्नीने त्याचे संरक्षण करावे यासाठी केली आहे. सीता अग्नीची प्रार्थना करून म्हणते –

यद्यस्ति पतिशुश्रूषा यद्यस्ति चरितं तप: ।
यदि वा'त्वेकपत्नीत्वं शीतो भव हनूमत: ॥ २७

'मी जर पतीची शुश्रूषा केली असेल, जर काही तप केले असेल अथवा माझे ठिकाणी जर पातिव्रत्य असेल, तर हे अग्ने, तू हनुमानाला शीतल हो.'[३६]

सीतेचे अग्निदिव्य हा वाल्मीकी रामायणातील एक अतुलनीय प्रसंग आहे. यातील चमत्काराचा भाग बाजूला ठेवला तरी सीतेला आपल्या चारित्र्याचा केवढा आत्मविश्वास होता आणि त्याच्या सामर्थ्यावर कोणत्याही संकटातून आपण निश्चित तावून-सुलाखून पार पडू, ही खात्री होती! एक प्रकारे तिने अग्नीला आवाहन करताना आव्हानही दिले आहे. आपल्या शुद्धतेची खात्री पटवून देण्याची जबाबदारी तिने त्याच्यावरच टाकली आहे. ती म्हणते–

यथा मे हृदयं नित्यं नापसर्पति राघवात् ।
तथा लोकस्य साक्षी मां सर्वत: पातु पावक: ॥ २५
यथा मां शुद्धचारित्रां दुष्टां जानाति राघव: ।
तथा लोकस्य साक्षी मां सर्वत: पातु पावक: ॥ २६
कर्मणा मनसा वाचा यथा नातिचराम्यहम् ।
राघवं सर्वधर्मज्ञं तथा मां पातु पावक: ॥ २७

'माझे चित्त जर रामापासून दूर जात नसेल, तर जगत्साक्षी अग्नी माझे सर्व प्रकारे रक्षण करील. माझे वर्तन शुद्ध असून राम मला दुष्ट समजत आहे. हे जर खरे असेल तर लोकसाक्षी अग्नी माझे सर्व प्रकारे रक्षण करील. काया-वाचा-मने करून मी जर धर्मज्ञ रामाचे अतिक्रमण केले नसेल, तर लोकसाक्षी अग्नी माझे सर्व प्रकारे रक्षण करील'[३७]

## वर

प्रसन्न, संतुष्ट मनाची अभिव्यक्ती ज्या शब्दोच्चारांनी होते त्यांना वर, आशीर्वाद, सदिच्छा असे म्हटले जाते. परंतु हे तिन्ही शब्द समानार्थी नाहीत. त्यांची अर्थव्याप्ती, स्वरूप आणि परिणाम वेगवेगळे आहेत. शापाप्रमाणे वर देणारी व्यक्ती अधिकारसंपन्न असावी लागते. देवाच्या ठायी हा अधिकार थोडया फार प्रमाणात उपजतच असतो, असे मानले जात असले, तरी त्यांनाही तपश्चर्या करूनच अधिकाराची श्रेणी उंचावता येते, अधिकार-क्षेत्राचा विस्तार करता येतो. सृष्टीची

---

३६ सुन्दरकाण्ड / ५३
३७ युद्धकाण्ड / ११६

निर्मिती करणाऱ्या ब्रह्मदेवाने आणि सृष्टिसंहारक शंकरानेही तपश्चर्या केली आहे.

'वर' हा शब्द संस्कृत 'वृ' ह्या धातूपासून आला आहे. ह्या शब्दाचे अनेक अर्थ संभवतात– कृपा, प्रसाद, पसंती, निवड, अनुग्रह, सदिच्छा इत्यादी. **व्रियते इति वर: । मनाक् अभीष्टे वर: । तपोभि: इष्यते यस्तु देवेभ्य: स: वरो मत: ।**

कामनापूर्तीसाठी एखाद्याला प्रसन्न करून घेणे व संतुष्ट होऊन दुसऱ्याचे भले करणे हा अर्थ 'वरदाना'च्या प्रक्रियेत अभिप्रेत आहे. ही प्रसन्नता तपश्चर्या, प्रार्थना, स्तुती, पूजा, यज्ञकर्म, सद्गुण, सत्कार्य इत्यादी अनेक कारणांमुळे प्राप्त होऊ शकते. ह्या प्रसन्नतेचे व्यक्त स्वरूप म्हणजे वर. उत्स्फूर्त, स्वयंस्फूर्त प्रसन्नतेतून प्रकट होणारे वर अयाचित असून तप - यज्ञादीमुळे प्राप्त होणाऱ्या प्रसन्नतेतून याचित वरांची निर्मिती होते. अयाचित वर हे अर्थातच याचित वरांपेक्षा उच्च श्रेणीतील होत. वर याचित असो वा अयाचित असो, वरदात्याची इच्छा प्रधान, महत्त्वाची आणि निर्णायक असते. केवळ आपली इच्छा बोलून दाखवण्याचे स्वातंत्र्य याचकाला असते. त्याच्या इच्छेनुसार वर दिलाच पाहिजे असे बंधन वरदात्यावर असत नाही. तो याचकाची इच्छा पूर्णांशाने, किंवा अल्पांशाने मान्य करील अगर करणारही नाही. रावण आणि मेघनाद यांनी संपूर्ण अमरत्वाची प्राप्ती व्हावी अशी विनंती केली असता ब्रह्मदेवाने केवळ मर्यादित स्वरूपातच त्यांची इच्छा सफल केली आहे. शंबूकाने सदेह स्वर्गाला जाण्याची इच्छा व त्याप्रीत्यर्थ आरंभिलेली तपश्चर्या बोलून दाखवली असता, त्याची इच्छा तर पूर्ण झाली नाहीच, उलट त्याचा वधच झाला. मधुदैत्याने वर म्हणून दिलेला शूल माझ्या वंशामध्ये नेहमी असावा, अशी रुद्राची प्रार्थना केली, तेव्हा 'असे होणार नाही' असे त्याने स्पष्टपणे सांगतले व मर्यादित स्वरूपात त्याची विनंती मान्य केली. अयाचित वरात इच्छुकाला आपली इच्छा व्यक्त करण्यास अवकाशच नसतो. केवळ वरदात्याची इच्छाच प्रमाण असते. वरदात्याने वर देऊ केला, तर स्वीकारणे अगर न स्वीकारणे हे मात्र वरप्राप्त व्यक्तीच्या इच्छेवर अवलंबून असते. वर स्वीकारलाच पाहिजे, असे त्याच्यावर बंधन असत नाही. त्यामुळे काही वर स्वीकारले जात नाहीत. स्वीकृत आणि अस्वीकृत असे दोन प्रकारचे वर असू शकतात. अस्वीकृत वर हा प्रकार फक्त अयाचित वरांचे बाबतच संभवनीय आहे. याचित वरात तो न स्वीकारण्याचा प्रश्नच उद्भवत नाही. अनसूयेने सीतेला वर देऊ केले असता तिने त्यांचा स्वीकार केलेला नाही. शरभंग ऋषीने तपश्चर्येने संपादलेले ब्रह्मलोक व स्वर्गलोक रामाला देऊ केले असता रामाने 'मीच तपश्चर्येने सर्व लोक संपादन करीन' असे नम्रतापूर्वक सांगून वर नाकारला आहे. शाप नाकारता येतच नाही. त्यामुळे सर्व शाप स्वीकृतच असतात. शाप देण्याच्या प्रक्रियेत शाप देण्याचा विचार मनात येऊनही तो न दिल्याची उदाहरणे दिसतात, तशी 'न दिलेल्या वराची' उदाहरणे आढळत नाहीत. कारण वर दिल्याने तप:क्षय, पुण्यक्षय होत नाही. मनात आलेली इच्छा प्रकट केल्याने काही

विपरीत परिणाम होण्याची शक्यता नसते. तरीही क्वचित वर दिल्याचा अथवा मागितल्याचा पश्चात्ताप होतो. रावणाला मर्यादित स्वरूपाचा अमरत्वाचा वर देऊनही ब्रह्मदेवापुढे समस्या उत्पन्न झाली होती, वर दीर्घ निद्रेचा वर मागितल्याबद्दल कुंभकर्णाला दुःख झाले आहे.

वर देण्याच्या उत्कट इच्छपेक्षा तिची शब्दोच्चारातून होणारी अभिव्यक्ती अधिक प्रभावी असते. Blessing by words is more powerful than blessing by thought. आसन्नमरण व्यक्तीचे उद्गार अतिशय परिणामकारी असतात असे मानले जाते. दशरथाने मृत्यूपूर्वी रामाबद्दल काढलेले उद्गार हे 'वर' नसले तरी तरी ते 'वरा' समान आहेत.[३८] पवित्रतेच्या शब्दांनाही तिच्या पातिव्रत्यामुळे वराचे तेज प्राप्त होते, असे मानले जाते. वाल्मीकी रामायणात स्त्रियांनी – पविव्रता स्त्रियांनी दिलेले पाच वर आहेत. हेमा अप्सरा आणि कैकेयी यांना वर देण्याचा अधिकार कसा प्राप्त झाला, हे स्पष्ट नाही; परंतु त्यांनी अनुक्रमे स्वयंप्रभा व मंथरा यांना वर दिल्याचे उल्लेख आहेत. उरलेल्या तीन वरांत पार्वतीने दिलेला दीड वर आणि अनसूयेचा एक वर आहे, परंतु ते त्यांनी केवळ पतिव्रत्यामुळे प्राप्त झालेल्या अधिकारानेच दिले आहेत असे म्हणता येत नाही. अनसूयेने तर पातिव्रत्याखेरीज **'नियमैर्विविधैराप्तं तपो हि महदस्ति मे !'**–१४ अशी स्पष्ट कबुली दिली आहे.[३९] पार्वतीनेही जे वर दिले आहेत, त्याला कारण तिची तपश्चर्या व देवयोनी असावी. तिने राक्षसींना एक वर दिला असून अर्धा वर इल राजाला दिला आहे.[४०]

वरदाता हा ज्याला वर दिला जातो, त्याच्यापेक्षा ज्येष्ठ, श्रेष्ठ असतो. ही ज्येष्ठता, श्रेष्ठता वय, ज्ञान, स्थान, अधिकार इत्यादी करणांनी प्राप्त झालेली असते.

## वरांची कारणे

तपश्चर्या हे वर प्राप्त करून घेण्याचे प्रमुख साधन आहे. तपश्चर्येने इष्ट देवतेला संतुष्ट केले असता ईप्सित साध्य होऊ शकते, अशी भारतीयांची श्रद्धा आहे. इच्छापूर्तीसाठी वाटेल तेवढे आणि वाटेल तितका वेळ कायाक्लेश सहन करण्याची तापसांची तयारी आणि निष्ठा असे. तपःसाधना अतिशय उग्र व खडतर असे. तपश्चर्येप्रमाणे यज्ञयाग, पूजाअर्चा इ. मार्गानेही इच्छित वर मिळवण्याचे प्रयत्न केले जात. अशा प्रकारे प्राप्त होणारे वर प्रायः याचित असत. रामायणातील ८४ वरांपैकी १५ वर तपश्चर्या, यज्ञ या मार्गांनी प्राप्त झालेले आहेत आणि

---

३८. अयोध्याकाण्ड / ६४
३९. अयोध्याकाण्ड / ११८
४०. उत्तरकाण्ड / ४ व ८७

त्याचा लाभ राक्षसांना अधिक प्रमाणात झाला आहे. रावण, कुंभकर्ण, इंद्रजित, बिभीषण, मारीच, सुमाली, माल्यवान इत्यादी राक्षसांनी उग्र तपश्चर्येने वर संपादन केले आहेत. विराध, दुंदुभी यांनीही तपश्चर्येचा अवलंब केला आहे. राक्षसांप्रमाणेच विश्वामित्र, वसिष्ठ, शरभंग, कश्यपादी ऋषींनी आपली ईप्सिते साध्य करून घेतली आहेत. पितरांना स्वर्गप्राप्ती व्हावी, या इच्छेने भगीरथाने उग्र तप केले. मांधात्याने वरप्राप्तीसाठीच तपश्चर्या केली असावी. तपश्चर्या करूनही वरप्राप्ती न झाल्याचे एकमेव उदाहरण म्हणजे शंबूक. त्रिशंकूचा यज्ञाने सदेह स्वर्गाला जाण्याचा प्रयत्न अयशस्वी झाला. दशरथाला पायसाची प्राप्ती पुत्रकामेष्टी यज्ञामुळे झाली असली व त्यामुळे पुढे त्याला अपत्यप्राप्ती झाली असली तरी पायसप्राप्ती हा वर नसून अनुग्रह आहे. याची सविस्तर चर्चा अन्यत्र केली आहे.[४१] इंद्रजिताने सात याग करून मर्यादित अमरत्व प्राप्त करून घेतले. इंद्रजिताला प्राप्त झालेला वर याचित आहे. देह अचेतन झाल्यानंतरही निमिराजाच्या अंतरात्म्याला वर लाभला आहे, याचे कारण त्याने आरंभिलेला याग अन्य ऋषींनी त्याच्या मृत्यूनंतरही चालू ठेवला होता. हा वर अर्थातच अयाचित आहे.

अपत्यप्राप्तीच्या हेतूने सुकेतू, सगर, दिती, कालिंदी यांनी केलेली तपश्चर्या, दितीचा अपवाद सोडल्यास, फलद्रूप झाली आहे. दितीचा वर सशर्त होता आणि तिच्या हातून शर्तीचे यथायोग्य पालन झाले नाही. हे सारे वर याचित आहेत. डोहाळे पुरविण्याच्या उद्देशाने सीतेला वर मागण्यास रामानेच सांगितले असल्याने हा वर अयाचित आहे. सीतेच्या दृष्टीने मात्र तो शापच ठरला आहे. भविष्यकाळातील कार्यसिद्धी व्हावी, यास्तव दिलेल्या वरांची संख्या बरीच आहे. संपातीचा एक अपवाद वगळल्यास बहुतेक सर्व वर हनुमानाला लाभले आहेत. हे सर्व वर, संपातीला मिळालेल्या वरासह, रामाच्या कार्याला सौकर्य लाभावे, या उद्देशानेच दिले आहेत.[४२] मैनाक पर्वताला मिळालेला वर हनुमानाला लंकेच्या प्रवासात साहाय्य व्हावे, यासाठीच आहे. हनुमानाने त्याचा उपयोग केला नाही, ही गोष्ट वेगळी. निषादाला शाप दिल्याची वाल्मीकीला खंत वाटली, त्यास्तव त्याचे सांत्वन करणे आणि त्याने रामकथा लिहावी, या दुहेरी हेतूने ब्रह्मदेवाने त्याला वर दिला. सौदास राजाला दिलेल्या शापाच्या विमोचनासाठी वसिष्ठाने त्याला वर दिला.

सद्वर्तन, सुवार्ताकथन, उत्कृष्ट सेवा, सत्पुरुषदर्शन, विघ्नहरण, अनुग्रह, प्रार्थना, उत्कट प्रीती, दुष्टांचे निर्दालन आणि सुष्टांचे संरक्षण इत्यादी कारणांनी संतुष्ट होऊन देवांनी, मुनींनी अनेक वर दिलेले आढळतात. रामाला देऊ केलेले वर हे त्याच्या सद्वर्तनासाठीच आहेत. दुष्टांचे निर्दालन करून मानवजातीचे संरक्षण

---

४१. परिशिष्ट १. पायसप्राप्ती.

४२. पहा : हनुमानाचे वर आणि शाप.

केल्यास्तव रावणवधानंतर देवांनी रामाविषयी धन्यतेचे उद्‌गार काढले आहेत. कुश-लवांनी रामकथेच्या केलेल्या गायनाने संतुष्ट झालेल्या मुनींनी त्यांना वर दिले आहेत. रामासारख्या सत्पुरुषाचे दर्शन व्हावे, ह्यास्तव शरभंगाने ब्रह्मलोकाला नेण्यास आलेल्या इंद्रापाशी काही कालावधी मागून घेतला. सीतेच्या सद्वर्तनाने अनसूया आणि रामाच्या अलौकिकतेने भरद्वाज संतुष्ट झाला व त्यांनी वर देऊ केले. रामाला यौवराज्यपद प्राप्त होणार, ही सुवार्ता प्रथम येऊन सांगणाऱ्या मंथरेला कैकेयीने वर देऊ केला होता. तिने तो स्वीकारला नाही, ही गोष्ट वेगळी. सोमदा आणि शबरी यांना त्यांच्या उत्कृष्ट सेवेचे फल लाभले. सोमदेला कुणाचीही भार्या न होता वरदानाने पुत्रप्राप्ती झाली. तृणबिंदू-कन्येच्या बाबतीत पुलस्त्याचा शाप परिणामत: वरच ठरला आणि ती त्याची भार्या झाली. नि:स्वार्थी सेवा हा स्त्रीधर्म असल्याने उत्कृष्ट सेवेचे वर त्यांनाच अधिक लाभावे, हे स्वाभाविक आहे. लक्ष्मणाइतकी उत्कृष्ट सेवा, हनुमानाचा अपवाद वगळता, रामायणातील कोणत्याही व्यक्तीची नाही, परंतु त्याला एकही वर प्राप्त झालेला नाही, हे खटकल्याशिवाय राहात नाही.

वाल्मीकी रामायणातील कित्येक वरांची कारणे स्पष्ट नाहीत.

## वरांचे परिणाम

मर्त्य सृष्टीतील प्राणिमात्रांना अप्राप्य असे जे अमरत्व, ते लाभावे यास्तव वाटेल ते आणि वाटेल तितके शारीरिक व मानसिक क्लेश सहन करण्याची त्यांची तयारी असते. पार्थिव जीवन हे क्षणभंगुर आहे, विनाशी आहे, हे ज्ञात असूनही येथील वास्तव्य जास्तीत जास्त लांबवण्याचा त्याचा प्रयत्न सतत चालू असतो. मर्त्य जगात सुखाने जगता यावे, ह्यासाठी त्याची अविश्रांत धडपड चालू असते. मृत्यूची पूर्वसूचना देणारी जरा शुक्राचार्यांच्या शापाने प्राप्त झाली असता ययातीने आपल्या मुलाजवळ तारुण्याची भीक मागून आपली कामनापूर्ती करून घेतली. जीवनाबद्दलची ही तीव्र आसक्ती जबरदस्त असल्याने अमरत्वाच्या प्राप्तीसाठी तपश्चर्येचा अवलंब केला जातो. रावण आणि मेघनादाने संपूर्ण अमरत्व प्राप्त व्हावे, यासाठी प्रयत्न केले व ते मिळू शकत नाही, ही खात्री झाल्यावर मिळेल त्या मर्यादेतील अमरत्व स्वीकारले. त्यासाठी घोर तपश्चर्या केली, यज्ञयाग केले. वर-प्राप्तीने अचाट आणि अफाट सामर्थ्य मिळवून उर्वरित आयुष्य मन मानेल त्या रीतीने घालविता यावे, यास्तव हे प्रयत्न होते. इतर राक्षसांनीही यासाठी बरेच प्रयत्न करून भरपूर यश मिळविले आहे. रामायणातील एकूण वरांच्या संख्येच्या एक चतुर्थांश वर राक्षसांनी मिळवले आहेत. अमरत्वाप्रमाणेच दीर्घायुष्यासाठीही पुष्कळ प्रयत्न केले जात. सामान्यत: दीर्घायुष्य, अमरत्व स्वताला प्राप्त व्हावे इतकेच नव्हे, तर वराचा फायदा स्वताला व्हावा ह्या स्वार्थी हेतूने प्रयत्न केलेले दिसतात-

रामाचा अपवाद विशेष उठून दिसतो. त्याने कोणाजवळही वर-याचना केली नाही. कोणी वर देऊ केले तरी स्वीकारण्याबाबत तो निरुत्साही होता व जेव्हा त्याने अयाचित वर स्वीकारले तेव्हा त्यांचा फायदा स्वतासाठी न घेता इतरांच्या कल्याणासाठी व्हावा, अशा हेतूनेच स्वीकार केला. ब्राह्मणाचा मृत मुलगा जिवंत व्हावा, युद्धात धारातीर्थी पडलेले वानर पुन्हा जिवंत व्हावे, अयोध्येच्या मार्गावरील वृक्षांना ऋतू नसताही फुले, फळे येऊन जनतेला लाभ व्हावा, नद्यांना पाणी असावे यासाठी रामाने वर स्वीकारले. बिभीषणाने सतत कोणत्याही परिस्थितीत धर्माकडेच बुद्धी रहावी अशी इच्छा प्रदर्शित केलेला वर उठून दिसतो. ब्रह्मदेव, अन्य देवता आणि लोकपाल यांच्या वरांनी हनुमानाच्या सामर्थ्याला महत्त्वपूर्ण जोड मिळाली. मैंद आणि द्विविद या वानरांना ब्रह्मदेवाने दिलेला वर मर्यादित स्वरूपाचा असला तरी त्यामुळे त्यांच्या मागची बरीच पीडा टळण्यास साहाय्य झाले. इंद्राच्या वराने मयूराच्या पिसांना नेत्रलाभ तर झालाच, खेरीज सर्पांपासून अभयत्व प्राप्त झाले.

अपत्यप्राप्ती हे रामायणातील दहा वरांचे फलित आहे. जया, सुप्रभा, केशिनी, सुमती आणि कालिंदी यांना वरांमुळेच अपत्यलाभ झाला. अपत्यांची संख्याही एकापासून साठ हजारापर्यंत आहे. सोमदेला विवाह न करता पुत्रलाभ झाला. सुकेतूला पुत्र हवा होता, परंतु त्याला कन्यारत्न प्राप्त झाले. ही कन्या ताटका. तिचे बळ सहस्र गजांएवढे होते. विश्रवानें कैकयीची पुत्रप्राप्तीची इच्छा पुरवली असली, तरी ती अल्पांशानेच. विश्रव्यासारखे पुत्र व्हावे, ह्या इच्छेने ती त्याच्याकडे आली होती. परंतु ती आली ती वेळ क्रूर होती, म्हणून तिला क्रूरकर्मा पुत्र झाले. तिच्या विनंतीवरून केवळ एकच पुत्र – बिभीषण त्याच्यासारखा झाला. दितीला दिलेला वर सशर्त होता. तिने शर्तीचे पालन योग्य रीतीने न केल्याने गर्भावस्थेत असतानाच इंद्राने तिच्या पोटी येणाऱ्या पुत्राचे सात तुकडे केले.

ब्रह्मदेवाच्या वरांमुळे विश्वामित्राला ब्रह्मर्षिपदाचा, तर वैश्रवणाला लोकपालपदाचा लाभ झाला. विश्वामित्राच्या इच्छेला वसिष्ठानेही मान्यता दिली त्रिशंकू आणि शंबूक यांचे सदेह स्वर्गाला जाण्याचे प्रयत्न मात्र सर्वस्वी फसले आहेत इंद्राच्या वराने मलद-करुष हे प्रदेश समृद्ध झाले. शबरीला अक्षय्य लोकाची प्राप्ती होऊन ती कृतार्थ झाली. एका अंधाला वरप्राप्तीचे फल म्हणून एका राजाचे नेत्र लाभले. सूर्याच्या प्रसादाने मेरुपर्वत सुवर्णमय झाला, तर वैश्रवणाच्या वराने सरड्याला(कृकलासाला) सुवर्ण वर्ण प्राप्त झाला. इंद्राच्या तुष्टतेमुळे हंसाला फेसाप्रमाणे कांती आणि चंद्राप्रमाणे तेज प्राप्त झाले. कावळ्याला मर्यादित अवध्यत्व लाभले, याचे कारण यमाचा वर. वसिष्ठाच्या वरामुळे कल्माषपाद शापमुक्त झाला आणि राक्षसांनी हनुमानाला अस्त्रबंधनांनी जखडून टाकले असताही ब्रह्मदेवाच्या वराने तो त्यातून सुटला.

सामान्यतः ज्या अप्राप्य इच्छा मानवी प्रयत्नांनी प्राप्त होऊ शकत नाहीत;

त्या वरांच्या योगे हस्तगत झाल्याची उदाहरणे रामायणात आढळतात. कैकेय राजाला पशु-पक्ष्यांच्या भाषेचा अर्थ एका ऋषीच्या वरामुळे समजू लागला. मयासुरांला शिल्पशास्त्र अवगत झाले. सुरसेला समोर येईल त्या व्यक्तीला मुखात टाकण्याचे विचित्र सामर्थ्य प्राप्त झाले. मरुप्रदेश फुले, फळे, सुगंध इत्यादींनी बहरला, तो वरदानामुळेच. सीतेला इंद्राकडून झालेली हविष्यान्नाची प्राप्ती; प्राणिमात्रांच्या नेत्रांत वसतिस्थान मिळावे ही निमिराजाची इच्छा, ब्रह्महत्येला प्राप्त झालेली चार आश्रयस्थाने आणि राम जाईल तिकडे त्याच्याबरोबर जाण्याची प्रजाजनांना लाभलेली सुसंधी, ही वरप्राप्तीचीच उदाहरणे होत. मानवावतारी राम पृथ्वीचे पालन करू शकला कारण त्याला देवांचा तसा वर लाभला होता. उमेने दिलेल्या दोन्ही वरांचे स्वरूप अन्य वरांहून सर्वस्वी वेगळे आहे. एका वरामुळे राक्षसींना 'समागम होताक्षणी गर्भप्राप्ती, गर्भधारणा होताच लगेच प्रसूती आणि जन्मतःच उत्पन्न झालेल्या अपत्याला मातेच्या वयाची प्रौढता' प्राप्त होईल, असे सूचित केले गेले, तर दुसऱ्या अर्ध्या वराने इल राजाला एक महिना स्त्रीत्व व एक महिना पुरुषत्वाचा लाभ होऊन पुरुषत्वाच्या कालात स्त्रीत्वाची व स्त्री असताना पुरुषत्वाची विस्मृती व्हावी, अशी गमतीदार योजना लाभली.[४३]

भरताला यौवराज्यपद मिळवून देण्याची कैकेयीची महत्त्वाकांक्षा केवळ तिला दशरथाने देऊ केलेल्या वरांमुळे जोपासली गेली. लंकादेवीला राक्षसांचा विनाशकाल जवळ आल्याची पूर्वसूचना वरामुळेच मिळू शकली. एकच परिणाम घडवून आणणारा आणि एकाच व्यक्तीने दिलेला शाप आणि वर मिळण्याचे भाग्य कुंभकर्णाला लाभले आहे. ब्रह्मदेवानेच त्याला दीर्घ निद्रेचा शाप आणि वर दिले आहेत. रामायणातील हे एकमेव आणि अपवादात्मक उदाहरण होय.[४४] नल वानराला हवी ती वस्तू निर्माण करण्याचे प्राप्त झालेले सामर्थ्य, स्वयंप्रभेला लाभलेले संरक्षण-सामर्थ्य, हनुमानाला सूर्याकडून लाभलेला त्याच्या तेजाचा शंभरावा अंश, वक्तृत्वशक्ती, अतुल शास्त्रज्ञान ही वरदानाचीच फळे होत.

वाल्मीकी रामायणातील काही वरांचे परिणाम स्पष्ट नाहीत.

## सशर्त वर

सशर्त शापांप्रमाणे सशर्त वरही असू शकतात, परंतु त्यांचे प्रमाण अत्यल्प असते. वाल्मीकी रामायणात सशर्त वरांची फक्त तीनच उदाहरणे आढळतात. अमृतप्राप्तीसाठी झालेल्या देवासुरांच्या युद्धात अदितीच्या मुलांनी (देवांनी) दितीच्या मुलांचा (असुरांचा) वध केला असता दिती अत्यंत दुःखी-कष्टी झाली. तिने आपल्या पतीजवळ-कश्यपाजवळ तपश्चर्येच्या योगाने इंद्रविघातक पुत्र व्हावा, अशी आपली

---

४३ उत्तरकाण्ड / ४ आणि ८७

४४ शाप क्र. ३७, पृ. ४९–५० आणि वर क्र. ५६, पृ. १९९

इच्छा व्यक्त केली. कश्यपाने तिचे कल्याण चिंतून इच्छेप्रमाणे पुत्र होईल, असा वर तिला दिला. मात्र त्यासाठी तिने एक हजार वर्षे शुचिर्भूत राहिले पाहिजे, अशी अट घातली व ती तिने मान्य केली. तपोवनात जाऊन ती तपश्चर्या करू लागली असता ९९० वर्षे शुचिर्भूत रीतीने राहून तिने आपले व्रत पूर्ण करीत आणले होते. या कालावधीत इंद्र तिची यथायोग्य सेवा करीत होता. एकदा मध्यान्ही ती उशाकडे पाय करून झोपल्याने अशुची निर्माण झाली. इंद्राला आनंद झाला व त्याने तिच्या शरीरात प्रवेश करून तिच्या गर्भाचे सात तुकडे केले. शेवटपर्यंत शर्तीचे पालन दितीला योग्य रीतीने करता न आल्याने तिला वरप्राप्ती झाली नाही (बालकाण्ड / ४६). तपश्चर्येच्या योगाने मेघनादाला संतुष्ट केले असता ब्रह्मदेवाने त्याला ' निकुंभिलेत जाऊन हवन करण्यापूर्वी जो शत्रू तुज शस्त्र धारण करण्याऱ्याशी युद्ध करील त्याच्या हातून तुझा वध होईल ' असा सशर्त वर दिला (युद्धकाण्ड/८५). याच वराचा आणखी एक उल्लेख आहे. इंद्राची मुक्तता करण्यासाठी ब्रह्मदेवाने मेघनादाला वर मागण्यास सांगितले असता त्याने अमरत्व मागितले. परंतु मर्त्य लोकात संपूर्ण अमरत्व मिळू शकत नाही असे ब्रह्मदेवाने स्पष्ट केले असता, मेघनादाने कोणत्या परिस्थितीत मृत्यू यावा व तशी परिस्थितो नसेल तेव्हा वध होऊ नये, असा सशर्त वर मागितला व ब्रह्मदेवाने तो दिला. तो म्हणतो, ' संग्रामात जाते वेळी अग्नीचा अश्वयुक्त रथ माझ्याकरिता तयार असावा आणि त्या रथावर मी असताना अमर असावे (उत्तरकाण्ड/३०)'. रुद्राने संतुष्ट होऊन मधू दैत्याला एक शूल दिला व तो हाती असताना शत्रूला दग्ध करण्याचे सामर्थ्य प्राप्त होईल. असा वर दिला. तो सशर्त होता. रुद्र म्हणाला, ' हे महासुरा, जोपर्यंत तू देव ब्राह्मणांशी विरोध धरणार नाहीस तोपर्यंतच हा शूल तुझ्यापाशी राहील आणि तू त्याच्याशी विरोध धरल्यास नाहीसा होईल.' पुढे रुद्राने मधू दैत्याच्या विनंतीनुसार त्याच्या पश्चात तो त्याच्या एका पुत्राकडे राहील असे आश्वासन दिले. त्यानुसार लवणाला शूलाची प्राप्ती झाली. परंतु तो त्याचा उपयोग ऋषींच्या विरुद्ध करू लागला. ऋषींच्या विनंतीवरून रामाने शत्रुघ्नाकरवी लवणाचा वध करविला (उत्तरकाण्ड/७७).

## सानुग्रह वर

अनुग्रह हा वराचाच एक प्रकार आहे. अनुग्रहाने युक्त अशा वराला सानुग्रह वर असे नाव देता येईल. अनुग्रह आणि वर या दोहींसाठी साधनेची आवश्यकता, दुसऱ्याच्या कल्याणाची इच्छा असावी लागते. परंतु दोहोंत सूक्ष्म भेद आहे. वर ही केवळ वाक्‌शक्ती असल्याने सदिच्छा, व्यक्त करण्याचा जो एकमेव मार्ग म्हणजे शब्दोच्चार, त्यामुळे त्यात अमूर्तता असते. अनुग्रहात शब्दोच्चाराइतकेच महत्त्व दिल्या–घेतल्या जाणाऱ्या वस्तूला असल्याने अनुग्रह समूर्त असतो. सदिच्छादर्शक

वस्तू प्रत्यक्षपणे दिली-घेतली जाते. वराचे परिणाम नजिकच्या अथवा दूरच्या भविष्यकाळातील असू शकतात तर अनुग्रहातील वस्तू तात्काळ उच्चाराबरोबर दिल्या जातात. अनुग्रह आणि वर यातील भेद थोडक्यात सांगावयाचा तर '**दृष्टदानं अनुग्रहः। अदृष्टदानं वरः।**' अनुग्रह म्हणजे कृपाप्रसाद. **अभीष्ट–सम्पादनेच्छा-रूपः प्रसादः।** मनोवांच्छित वस्तूंची प्राप्ती भगवंताच्या कृपेने अथवा प्रसादाने होणे. गीतेत श्रीकृष्णाने अर्जुनाला अनुग्रहाचे महत्त्व विशद केले आहे. **मत्प्रसादादवाप्नोति शाश्वतं पदमव्ययम्।** भगवत्परायण कर्मयोगी माझ्या कृपाप्रसादाने शाश्वत पदाची प्राप्ती करून घेतो. ४५

वाल्मीकी रामायणात सानुग्रह वराची उदाहरणे बरीच आढळतात. अनसूयेने सीतेला वर मागण्यास सांगितला असता तिने विनयपूर्वक नकार दिला. त्यानंतर अनसूयेने तिला दिव्यमाला, वस्त्र, भूषण, उटी आणि मूल्यवान अनुलेप दिला. ह्या वस्तू तिला अनुग्रह म्हणून प्राप्त झाल्या आहेत. येथे अनुग्रह आणि वर यांतील भेद स्पष्ट झाला आहे. अशोकवनातील सीतेला ब्रह्मदेवाच्या सांगण्यावरून इंद्राने दिलेले हविष्यान्न, निशाकर मुनीने संपातीला करून दिलेली पंखांची पुनर्प्राप्ती. मेघनादाला मिळालेला दिव्यरथ, धनुष्यबाण, शस्त्रे आणि तामसी माया, रावणाशी लढणाऱ्या रामाला इंद्राने दिलेला सारथ्यासह रथ, प्रचंड धनुष्य, देदीप्यमान कवच, तेजस्वी बाण व निर्मल शक्ती, ब्रह्मदेवाने कुबेराला दिलेले लोकपालपद व निधीशत्व, शंकराने रावणाला दिलेले चंद्रहास नावाचे खड्ग, मेघनादाला दिलेला अंतरिक्षातून संचार करणारा इच्छागमनी रथ, बाणांनी भरलेले अक्षय्य भाते, एक प्रचंड अस्त्र व रुद्राकडून मधू दैत्याला (पर्यायाने पुढे लवणाला) प्राप्त झालेला शूल – ही सारी सानुग्रह वरांची उदाहरणे होत. अनुग्रहात वर असतोच, परंतु तो मूर्त स्वरूपात असतो. वरात अनुग्रह असतोच असे नाही. जेव्हा तो असतो तेव्हा तो वर सानुग्रह होतो.

## आशीर्वाद, सदिच्छा

वर, आशीर्वाद, सदिच्छा यांचा उगम सद्भावना, संतुष्टता यांतून होतो. ज्याला वर किंवा आशीर्वाद द्यावयाचा अथवा ज्याच्याबद्दल सदिच्छा व्यक्त करावयाची त्याच्या विषयी प्रीती, अनुकंपा, आदर, सहानुभूती असणे आवश्यक असते. केवळ यामुळे सदिच्छेची अभिव्यक्ती शब्दोच्चाराने होऊ शकते. सद्भावना हा समानधर्म असला तरी वर, आशीर्वाद व सदिच्छा यांची व्याप्ती, स्वरूप व परिणाम भिन्न आहेत.

आशीर्वाद हा शब्द आशीः + वाद या दोन संस्कृत शब्दांनी सिद्ध झाला आहे.

---

४५. भारतीय संस्कृति - कोश खंड, १, पृ. १६० (द्वि. आ.)

याची व्याख्या 'इष्टार्थाविष्करणम्' —इष्ट असलेल्या अर्थाचे आविष्करण, अशी केली आहे.

> 'वात्सल्याद्यत्र मान्येन कनिष्ठस्याभिधीयते ।
> इष्टावधारकं वाक्यमाशी: सा परिकीर्तिता ।'

—मान्य पुरुषाने कनिष्ठाविषयी वात्सल्य धरून त्याच्या इष्ट सिद्धीला 'पोषक असे वाक्य उच्चारणे,' याला आशीर्वाद म्हणतात. अशी व्याख्या शब्दकल्पद्रुमात दिली आहे.[४६] आशीर्वादाचा वैदिकेतर मंत्र—

> आशीर्वादा: सफला: सन्तु पूर्णा: सन्तु मनोरथा: ।
> शत्रूणां नाशनं चास्तु मैत्राणामुदयस्तव ।।

असा आहे. ऋग्वेदातील पुढील मंत्र सर्वपरिचित आहे.

> शतं जीव शरदो वर्धमान: शतं हेमन्तान्शतम् वसन्तान् ।
> शतमिन्द्राग्नी सविता बृहस्पति: शतायुषा हविषेमं पुनर्दु: ।।
> आहार्ष त्वाविदं त्वा पुनरागा: पुनर्नव ।
> सर्वाङ्ग सर्वं ते चक्षु सर्वमायुश्च तेऽविदम् ।।

"तू शंभर शरद ऋतू, शंभर हेमन्त ऋतू आणि शंभर वसंतऋतूपर्यंत जीवमान रहा. तू उत्तरोत्तर उत्कर्ष पाव. कारण इन्द्र, अग्नी आणि बृहस्पती त्यांनी ज्याच्या योगाने मानवाला शंभर वर्षेपर्यंत आयुष्य लाभते, अशा हविर्भागाने प्रसन्न होऊन तुला शंभर वर्षांचे पूर्ण आयुष्य दिले आहे. मी तुला (आरोग्यमय स्थितीत) आणले आहे. तुझी सर्व परिस्थिती जाणली आहे. पुन: नवीन देह धारण करणाऱ्या पुरुषा, तूही पुन: आता (उत्तम स्थितीत) आला आहेस. हे पूर्णारोग्ययुक्ता तुझी चक्षुरादिक सर्व इंद्रिये किंवा तुझे पुढील सर्व आयुष्यसुद्धा मी पूर्ण जाणलेले आहे."

वर, आशीर्वाद देण्यासाठी वय, स्थान, अधिकार, ज्ञान इत्यादींच्या योगे प्राप्त झालेली ज्येष्ठता, श्रेष्ठता आवश्यक असते. सदिच्छेच्या बाबतीत अशी कोणतीही अपेक्षा नसते. कोणीही कोणाविषयीची सदिच्छा अनिर्बंधपणे व्यक्त करू शकतो. कनिष्ठ वरिष्ठाला, ज्येष्ठाला, श्रेष्ठाला वर/आशीर्वाद देऊ शकत नाही. 'वर' म्हणून उच्चारलेल्या शब्दांचा परिणाम निश्चित असतो, तो अटळ असतो. 'आशीर्वाद' परिणामकारक होईल किंवा होणारही नाही. परिणामकारक झालाच तरी तो केवळ योगायोगाने, काकतालीय न्यायाने. निश्चित परिणामाची खात्री आशीर्वाद देणाऱ्याला आणि तो प्राप्त होणाऱ्यालाही नसते. वर आणि आशीर्वादातील हा भेद कालिदासाला अभिप्रेत होता. काश्यपाला नमस्कार करण्यास आलेल्या शकुंतलेला तो म्हणतो—

---

४६. भारतीय संस्कृति—कोश खंड १, पृ. ४९५—४९६ (द्वि. आ.)

**ययातेरिव शर्मिष्ठा भर्तुर्बहुमता भव।**
**सुतं त्वमपि सम्राज सेव पूरुमवाप्नुहि ॥**

'ययातीला जशी शर्मिष्ठा तशी तूही आपल्या पतीला प्रिय, आदरणीय हो, आणि पुरूप्रमाणे सम्राटपद भूषविणारा पुत्र तुला होवो.' वास्तविक हे शब्द आशीर्वादात्मक आहेत, परंतु ते काश्यपाने उच्चारले असल्याने वराप्रमाणे परिणामकारक होणारच, असे गौतमीला वाटत होते. म्हणून ती म्हणते '**भगवन् वर: खल्वेष:। नाशी:।** – भगवन्, हा तर वरच आहे, आशीर्वाद नाही. ४७ 'आशीर्वाद आणि वरदान या दोहोंमध्ये थोडा फरक आहे. ब्राह्मण किंवा पुरोहित आपल्या यजमानाला, वडीलधारी माणसे आपल्या पुत्रपौत्रादी नातेवाइकांना आणि गुरू किंवा सत्पुरुष आपल्या सच्छिष्यांना इष्टार्थाच्या प्राप्तीबद्दल वचन बोलतात त्याला आशीर्वाद म्हणतात व ईश्वर, देवता किंवा अवतार आपल्या भक्तांना इष्ट-सिद्धीविषयी जे वचन बोलतात, त्याला वरदान म्हणतात.' ४८ – ह्या उताऱ्यातील उत्तरार्ध अंशत: खरा आहे. वरदानाचा अधिकार प्राप्त झालेल्या ऋषींचा, मुनींचा यात उल्लेख नसल्याने अव्याप्त आहे. रामायणातील अत्यंत महत्त्वाचा व ज्यामुळे सारे रामायण घडले, असा दशरथाने कैकेयीला दिलेला वर ह्या विवेचनात बसू शकत नाही. ह्या वराबाबत पुढे सविस्तर चर्चा केलेली आहे.

वर देण्यासाठी दैवी गुण, पुण्यसंचय, तपस्या आवश्यक असते; तर आशीर्वादासाठी केवळ वयाची ज्येष्ठता पुरेशी ठरते. अन्य साधनेची आवश्यकता नसते. नित्याच्या व्यवहारात जे आशीर्वाद दिले जातात, त्यांत सदिच्छा असली, तरी ते केवळ औपचारिक असतात आणि कालौघात उच्चारलेले शब्दही अर्थशून्य ठरले आहेत. कनिष्ठही वरिष्ठाविषयी सदिच्छा प्रकट करू शकतो. शिष्य आपल्या गुरूचे भले चिंतितो. मंगल प्रसंगी, षष्ठ्यब्दिपूर्तीसारख्या समारंभाचे वेळी कनिष्ठही वरिष्ठांविषयीच्या सदिच्छा व्यक्त करतात.

वाल्मीकी रामायणातील काही आशीर्वाद एका विभागात दिलेले आहेत. ४९

## नवस

नवस हा प्रकार याचित वराला जवळचा आहे. इष्ट कामनेच्या पूर्ततेसाठी देवदेवतेला आवाहन, याचना दोहोंत असते. कृपा-प्रसाद लाभावा यास्तव इष्ट देवतेला एखादी वस्तू अर्पण करण्याची, एखादे व्रत करण्याची, विशिष्ट प्रकारच्या पूजा-अर्चा करण्याची प्रतिज्ञा नवसात असते व ती सशर्त असते. कामनापूर्ती झाली.

---

४७. शाकुंतल नाटक, अंक ४/७
४८. भारतीय संस्कृति–कोश, खंड १, पृ. ४९६ (द्वि. आ.)
४९. आशीर्वाद, नवस.

तरच प्रतिज्ञेनुसार वागण्याचे, देण्याचे बंधन असते. न झाल्यास नवस बोलणाऱ्या व्यक्तीने प्रतिज्ञेनुसार वागण्याची आवश्यकता नाही. मात्र इच्छापूर्ती होऊनही प्रतिज्ञेप्रमाणे न वागल्यास इष्ट देवतांचा कोप होऊन काहीतरी वाईट घडते, अरिष्ट कोसळते, असे समजले जाते. वर-प्राप्तीसाठी तप, यश इत्यादी साधना करावी लागते, त्या मानाने नवसाचे स्वरूप सौम्य असते. नवस हा एक शुद्ध देव-घेवीचा प्रकार आहे, त्याची पातळी सर्वस्वी व्यावहारिक आहे. कामनापूर्ती झाल्यास 'देव नवसाला पावला.' असे म्हटले जाते. नवस हा सशर्त प्रकार आहे, याचित सशर्त वर आणि नवस यांत आणखी एक फरक आहे. वर-प्राप्तीसाठी याचकाला आगाऊ प्रयत्न करावे लागतात, तर नवसामध्ये ते इच्छापूर्तीनंतर करावयाचे अस-तात. इच्छापूर्ती न झाल्यास ते करण्याचा प्रश्नच उरत नाही. सत्यनारायण करणे, देवीची ओटी भरणे, अगर अन्य प्रकारे पूजा करणे, तुलाभार करणे, उपवास करणे, व्रते पाळणे, वस्तू देणे इत्यादी विविध प्रकारचे नवस असतात. ' नवस ' हा प्रकार पुरुषांपेक्षा स्त्रिया अधिक प्रमाणात करतात.

वाल्मीकी रामायणात नवसाची दोन उदाहरणे आढळतात. हे दोन्ही नवस सीतेनेच केलेले आहेत. दंडकारण्यात जाताना गंगा आणि यमुना पार करताना सीता ह्या दोन्ही पवित्र नद्यांना नवस बोलली आहे. दोन्हीचा आशय एकच आहे. प्रवास आणि अरण्यातील वास्तव्य सुखाचे व्हावे आणि राम अयोध्येला सुखरूप परत यावा. गंगा ही यमुनेपेक्षा मोठी व अधिक पवित्र म्हणूनच की काय दोन्ही नव-सांतील अर्पण करण्याच्या वस्तू सारख्या नाहीत. गंगेला तुष्ट करण्यासाठी लक्ष गोप्रदाने, वस्त्रे, ब्राह्मणांना अन्नदान आणि अयोध्येला परतल्यावर सहस्र घट मद्य आणि मांसयुक्त ओदन यांचा बली देण्याची प्रतिज्ञा आहे. तर यमुनेला बोललेल्या नवसात केवळ हजार गाई आणि शंभर मद्यघटांचाच उल्लेख आहे. तसे पाहिले तर गंगा पार करताना गुहाची मदत झाल्याने नावेतील प्रवास सुखरूप होणार होता. परंतु यमुना पार करताना नाव नसल्याने अडचण निर्माण झाली होती. राम-लक्ष्मणांनी काष्ठे एकत्र बांधून एक पेटा तयार केला होता. वास्तविक पाहता त्यातून तरून जाणे कठीण असल्याने यमुनेला संतुष्ट करणे अगत्याचे होते. गंगेहून सुद्धा अधिक वस्तू देण्याचा संकल्प करावयास हवा होता.

## आकाशवाणी, पुष्पवृष्टी

आकाशवाणी, पुष्पवृष्टी हे प्रकार अयाचित वराला अत्यंत जवळचे आहेत. दोहोंतही सद्भावना, सदिच्छा असते. आकाशवाणीत वाणीला महत्त्व असल्याने शब्दोच्चाराने अभिव्यक्ती होते, तर पुष्पवृष्टीत ती फुलांनी व्यक्त केली जाते. आकाशवाणी, पुष्पवृष्टी स्वर्गस्थ देवदेवतांकडूनच केली जाते. वर आणि आकाश-वाणीत एक सूक्ष्म भेद आहे. वर देण्याच्या प्रक्रियेत वरदाता दृश्य असतो, तर

आकाशवाणीत तो अदृश्य असतो. एखाद्या व्यक्तीच्या सद्वर्तनाने, समाजोपयोगी कार्याने संतुष्ट होऊन आकाशवाणी उच्चारली जाते. ज्या गोष्टी प्रत्यक्ष भेटून सांगता येत नाहीत, त्या आकाशवाणीने साधल्या जातात. आकाशवाणीने केवळ वर/शापच दिले जात नसून भविष्यकालीन घटनांचे संसूचनही केले जाते. सावधगिरीचा उपाय सुचविला जातो, संकटाची कल्पना दिली जाते. कथासूत्रांतील धागे-दोरे जुळवण्याचे कार्य केले जात असल्याने हा एक लेखन-चातुर्याचा (Literary device) प्रकार आहे. वाल्मीकी रामायणात आकाशवाणीची उदाहरणे फार थोडी आहेत. एका गृध्राने कोण्या एका उलूकाच्या घराचा अपहार केल्याचे सिद्ध होताच रामाने त्याला दंड करण्याचे ठरविले, तेव्हा आकाशवाणी झाली (पहा : शाप क्र. ५६, पृ. ७९–८०). सीतेने भूदेवीची प्रार्थना करून तिला आपल्या पोटात घेण्याची विनंती केली असता, धरणी दुभंगून एक सिंहासन वर आले. त्यावर भूदेवी बसली होती. भूदेवीने सीतेला उचलून घेऊन सिंहासनावर बसवले, त्या वेळी स्वर्गस्थ देवांनी पुष्पवृष्टी केली आणि ते अंतरिक्षातून–

'साधुकारश्च सुमहान्देवानां सहसोत्थितः।
साधुसाध्विति वै सीते यस्यास्ते शीलमीदृशम्॥ २१
एवं बहुविधा वाचो ह्यन्तरिक्षगताः सुराः।
व्याजह्रुर्हृष्टमनसो दृष्ट्वा सीताप्रवेशनम्॥ २२ (उत्तर-९७)

"देवांमध्ये शाबास, शाबास असा फारच मोठा शब्द एकाएकी निघाला, आणि 'हे सीते, ज्या तुझे आचरण अशा प्रकारचे आहे त्या तुझी धन्य असो', असे नाना प्रकारचे शब्द त्यांनी उच्चारले."

पुष्पवृष्टी हे आकाशवाणीचे अविभाज्य अंग नाही. सद्भावना व्यक्त करण्याचाच पुष्पवृष्टी हा प्रकार असून सद्भावना वाणीऐवजी फुलांनी व्यक्त केली जाते. क्वचित हेच कार्य मंगल वाद्यांचे ध्वनी, नृत्य, गायन इ. प्रकारेही केले जाते. रामजन्म (बालकाण्ड/१८); राम–लक्ष्मणांचे विवाह (बालकाण्ड/७५); वेदवतीचा अग्निप्रवेश (उत्तरकाण्ड/१७); शंबुकाचा रामाने केलेला वध (उत्तरकाण्ड/७६); आणि रामाच्या महाप्रस्थानाचा प्रसंग – या वेळी पुष्पवृष्टी झाल्याचे उल्लेख आहेत. रावणवधानंतरही (युद्धकाण्ड/१०८) पुष्पवृष्टी झाली होती.

## रायायण : एक मानवकथा

वाल्मीकीने रचलेले रामायण ही पूर्णतः मानवांची कथा आहे, देवांची नाही. विष्णू हा देव असला तरी भृगूच्या शापाचा परिणाम म्हणून असो किंवा 'परित्राणाय साधूनां विनाशाय च दुष्कृताम्' हे आपले ब्रीद पाळण्यासाठी असो, मानवावतार स्वीकारल्यानंतर तो सर्वस्वी मानवाप्रमाणेच वागला, वावरला. पृथ्वीवर उतरताना आपल्या दैवी गुणांचे गाठोडे तो स्वर्गात ठेऊनच आला. एकदा मर्त्य लोकातील

मानवाची भूमिका वठविण्याचे पत्करल्यानंतर तो त्या भूमिकेशी अत्यंत प्रामाणिक राहिला, भूमिकेत रंगून गेला. पूर्वावतारी आपण देव होतो, हेही तो विसरला. तो मानव असूनही सर्वसामान्य माणसांहून वेगळा भासतो, ह्याचे कारण त्याचा मानवी जीवनाकडे पाहण्याचा दृष्टिकोण. मानवी जीवनातील श्रेष्ठ मूल्यांचे जतन करण्यासाठी त्याने उभे आयुष्य वेचले. आपल्या वागण्याने, बोलण्याने आदर्श मानवाचे रेखीव चित्र त्याने निर्माण केले. तो मानवांत श्रेष्ठ ठरला, महामानव झाला, परंतु स्वताला त्याने अतिमानव होऊ दिले नाही. रामायणात चमत्कारांना वाव नाही. राक्षसांनी रूपे बदलणे, हनुमानाने पर्वत उचलून आणणे, यज्ञकुंडातून यज्ञपुरुषाने किंवा अग्नीतून सीतेने सुखरूप बाहेर येणे, हे वास्तविक चमत्कार नव्हेत. त्यात दैवी गुण नाहीत. मानवी शक्तीला न झेपणाऱ्या गोष्टी मायावी शक्तीने होऊ शकतात आणि राक्षसांच्या ठायी ही शक्ती उपजत असते, कमावलेली असते, हे एकदा मान्य केले म्हणजे रूपे बदलणे हा चमत्कार उरत नाही. हनुमानाने पर्वत उचलून आणला, याचा अर्थ त्या काळी ज्ञात असलेल्या जास्तीत जास्त वनस्पती आणल्या एवढाच आहे. सीतेचे अग्निदिव्य वाच्यार्थाने घ्यावयाचे नसून अत्यंत बिकट परिस्थितीतून मार्ग काढीत असतानाही तिने आपले चारित्र्य शुद्ध राखले, तावून-सुलाखून ती सुखरूप बाहेर पडली, हे लक्षणेने जाणायला हवे.

रामायण हे आदी महाकाव्य आहे. महाकाव्य हे नेहमीच मानवी असते. राईट ऑनरेबल श्री. व्ही. एस्. श्रीनिवास शास्त्री म्हणतात 'The fundamental postulate is that an epic is a great work of art which is intended expressly, for the edification of man...The epic is to be read with a view to benifit by its teaching, to draw at every turn lessons of supreme value for the conduct and regulation of ourselves.[५०] हे उद्गार इतके बोलके आहेत की त्यावर काही भाष्य करण्याची आवश्यकता नाही. रामायणातील व्यक्तीचे स्वभाव, गुण-दोष, वर्तन, कृती, बोलणे-चालणे सारे मानवी आहे. मानवी स्वभावाच्या विविध छटांचे वाल्मीकीने घडवलेले दर्शन विलोभनीय आहे. सीतेने रामाबरोबर वनात जाण्याचे ठरविण्यापूर्वी रामाने त्याच्या अनुपस्थितीत अयोध्येत असताना तिने कसे वागावे यासंबंधी तिला काही सूचना दिल्या आहेत. 'वैभवसंपन्न पुरुषांना दुसऱ्याची स्तुती सहन होत नाही, तस्मात्, भरतापुढे तू माझ्या गुणांची प्रशंसा करीत जाऊ नकोस.' हा इशारा वरवर पाहता व्यावहारिक भासला तरी मनुष्य-स्वभावाचे किती सूक्ष्म निरीक्षण वाल्मीकीने केले होते, ह्याची खात्री पटविते. दशरथाची आज्ञा कौसल्येला सांगताना रामाने आपले दुःख दाबून ठेवले असले तरी नंतर लक्ष्मण आणि सीता ह्यांच्या पुढे त्याने

५० Leclures on Ramayan.

त्याला मोकळी वाट करून दिली आहे. लक्ष्मण आणि सुमंताने त्याच्या गैरहजरीत अयोध्येतच रहाणे कसे इष्ट आहे हे पटवून देताना मानवी मनातील खळबळ वाल्मीकीने फारच सुंदर टिपली आहे. विराधाने रामाच्या देखत सीतेला आपल्या मांडीवर बसवून जे उद्‌गार काढले ते त्याचे काळीज चिरून गेले. त्या प्रसंगी त्याला झालेले अतीव दुःख, सीतेसाठी विलाप, तिच्या शोधासाठी पराकाष्ठा, तिची प्राप्ती झाल्यानंतर तिला शुद्ध करून घेण्याचा निर्धार, तिचा त्याग, सुग्रीवाला कर्तव्य–पूर्तीतील हेळसांडीबद्दल तंबी, शूर्पणखेची चेष्टा, प्रसंगी खोटे बोलण्याचा सुमंत्राला केलेला उपदेश, लक्ष्मणाबद्दलचे अतुलनीय प्रेम, लक्ष्मणाची आत्यंतिक निष्ठा, सीतेने लक्ष्मणावर करू नये ते केलेले आरोप, हनुमानाची अव्यभिचारी भक्ती, रावणाचे और्ध्वदेहिक यथासांग करण्यासाठी बिभीषणाला केलेली सूचना–असे मानवी स्वभावाचे विविध दर्शन पानापानातून विखुरले आहे. स्त्रीच्या ठायी असणारी उज्ज्वल पतिनिष्ठा, अतुल त्याग, वात्सल्य, प्रेम, भक्ती, राग–लोभ, कपट, ईर्ष्या, असूया हे मानवाचे स्वभावधर्म ठायी ठायी प्रतिबिंबित झालेले दिसतात. राम, लक्ष्मण, भरत, सीता, हनुमान ही उच्च ध्येयांनी झपाटलेली कर्तव्यकठोर माणसे आहेत. त्यांची जीवननिष्ठा श्रेष्ठ आहे. सर्वसामान्यांहून ती वेगळी भासतात, ह्याचे कारण त्यांचे आदर्श. आपल्या मोजपट्ट्यांनी त्यांचे मोजमाप करता येत नसले, तरी ते सर्वस्वी मानवी आहेत, श्रेष्ठ दर्जाचे मानव आहेत, महामानव आहेत–परंतु अतिमानव, दैवी गुणांनी युक्त नाहीत.

रामायण हा ग्रंथ मानवाने मानवासाठी लिहिलेला शंभर टक्के मानवी आहे. मानवी जीवन कसे आहे, यापेक्षाही ते कसे असावे, हे सांगणारा रामायण हा एक यशस्वी प्रयत्न आहे. रामायणाच्या कथा–रचनेत आशीर्वाद, शपथ, शकुन, शाप, वर भरपूर प्रमाणात आहेत. आपल्या दिव्य प्रतिभेने आणि भव्य कल्पना विलासाने वाल्मीकीने नारदाच्या कथेत सौंदर्य ओतले आहे, तिला नवचैतन्य प्राप्त करून देऊन अजरामर केले आहे. हजारो वर्षे लोटली तरी कथेचे आकर्षण यत्किंचितही कमी झालेले नाही. शाप/वर इतक्या खुबीने योजिले आहेत की ते कथेचे अविभाज्य अंग बनले आहेत. त्यांना स्वतंत्र अस्तित्व नसले तरीही कथेतून ते वेगळे करता येत नाहीत, इतके ते कथेशी एकजीव झाले आहेत, एकरूप झाले आहेत. कथेतून त्यांना वगळणे केवळ अशक्य आहे. कथेचा आणि शाप / वर यांचा संबंध लक्षात घेता रामायण ही एक शापकथा / वरकथा आहे, असे म्हटल्यास अतिशयोक्ती होणार नाही.

## रामायण : शापकथा / वरकथा

रामायणाचा प्रारंभ, अखेर, कथेला गती देणाऱ्या मुख्य घटना, कथेची गुंफण यांना शाप अथवा वर किंवा दोघांचाही भक्कम आधार आहे. व्यक्तीच्या स्वभा-

वावरही त्याचे ठसे उमटले आहेत. वाल्मीकीने निषादाला दिलेल्या शापातूनच रामकथा उगम पावली आणि ब्रह्मदेवाच्या वरामुळे ग्रंथरचना झाली, लेखनास प्रोत्साहन मिळाले. 'जोपर्यंत पर्वत व नद्या भूतलावर राहतील तोपर्यंत रामायणकथा लोकांमध्ये प्रचारात राहील', असे ब्रह्मदेवाने ग्रंथरचनेपूर्वीच वर्तविलेले भविष्य किती अचूक आणि यथार्थ होते, हे काळाने सिद्ध केले आहे. प्रारंभाप्रमाणेच रामायणाचा शेवटही एका शापानेच झाला आहे. परंतु प्रत्यक्षात तो शाप दिला गेलेला नाही. अवतारकार्याची कालमर्यादा संपत आल्याचा संदेश देण्यासाठी प्रत्यक्ष काल ब्रह्मदेवाच्या सांगण्यावरून रामाकडे आला होता. त्या दोघांचे एकांतात बोलणे चालले असता तेथे कोणालाही प्रवेश नव्हता. कोणी प्रवेश करू नये, यास्तव लक्ष्मणाची योजना केली होती आणि या आज्ञेचा भंग करणाऱ्याला देहांताची शिक्षा निश्चित केली होती. अशा वेळी अचानक दुर्वास ऋषी तेथे आला आणि रामाची भेट कालापव्यय होऊ न देता घडवून आणण्यास त्याने लक्ष्मणाला सांगितले. लक्ष्मणाने वस्तुस्थिती समजावून सांगण्याचा प्रयत्न केला असता दुर्वास त्याला म्हणाला— 'ह्या क्षणी मी आल्याचे तू रामाला निवेदन कर. नाही तर तुला, अयोध्यानगरीला, या देशाला आणि रामालाही मी शाप देईन. इतकेच नव्हे तर भरताला व तुमच्या संततीलाही शाप देईन.' लक्ष्मणापुढे मोठा पेच उत्पन्न झाला. दुर्वासाची रामाशी भेट घडवून आणली तर आज्ञाभंग आणि वध, न केल्यास रघुकुलाला घोर शाप. एका व्यक्तीचा बळी द्यावा लागला तरी चालेल, परंतु रघुकुलाचा विनाश टाळण्यासाठी लक्ष्मणाने आज्ञाभंग करून रामाला ऋषीचा निरोप कळवला, भेट घडवून आणली आणि आज्ञाभंगाची शिक्षा स्वेच्छेने पत्करून स्वताला सरयूत झोकून दिले. लक्ष्मणाच्या वियोगाचा रामाला विलक्षण धक्का बसला व त्याच्या पाठोपाठ त्याने महाप्रस्थान ठेवले. दुर्वासाने ह्या प्रत्यक्षात न दिलेला शाप इतका प्रचंड आहे की प्रत्यक्षात दिलेल्या कोणत्याही शापापेक्षा त्याचे परिणाम अत्यंत दारुण आणि करुण झाले आहेत.

राम, लक्ष्मण, सीता ह्या रामायणातील प्रमुख व्यक्ती. त्यांनी कोणालाही शाप दिले नाहीत. रामाने प्रस्रवण व नदीला शाप देण्याची सशर्त धमकी दिली होती व त्यांनी शर्तीचे पालन केल्याने शाप देण्याची वेळच आली नाही. त्यांनाही अन्य कोणी शाप दिलेले नाहीत. लक्ष्मणाला संपूर्ण रामायणात एकही वर मिळाल्याचा उल्लेख नाही. सीतेला व रामाला काही वर मिळाले असले, तरी त्यांनी त्यांचा स्वीकार केलेला नाही. जे अपवादात्मक वर स्वीकारले, तेही व्यक्तिगत लाभासाठी नसून केवळ समाजकल्याणार्थच.

## दशरथाचे कैकेयीला वरदान

दशरथाने कैकेयीला दिलेल्या दोन वरांना रामायणात अनन्यसाधारण

महत्त्व आहे. ह्या दोन वरांमुळेच सारे रामायण घडले आहे. हे दोन वर जर कैकेयीला प्राप्त झाले नसते तर आज आहे या स्थितीत रामायण उपलब्ध होऊ शकले नसते. सारी कथा ढवळून काढण्याचे, तिला कलाटणी देण्याचे प्रचंड सामर्थ्य केवळ या दोन वरांत आहे. कैकेयीच्या दृष्टीने हे वर ठरले असले तरी रामायणान्तर्गत इतर व्यक्तींच्या दृष्टीने ते शापाहून भयंकर आहेत. रावणाला ब्रह्मदेवाने दिलेला मर्यादित अमरत्वाचा अमर्याद वर हा कैकेयीच्या वराला पोषक आणि उपकारक आहे.

रावणवध हे मानवावताराचे, रामावताराचे उद्दिष्ट होय आणि ते साधण्यासाठी राम आणि रावण यांची समोरासमोर गाठ पडणे आवश्यक होते. अयोध्येत राहून हे घडू शकले नसते व रामाला अयोध्येबाहेर घालवायला कोणतेही सबळ कारण नव्हते. तो दशरथाचा ज्येष्ठ पुत्र होता. त्यामुळे त्याचा राज्यावरील, यौवराज्यपदावरील हक्क जन्मसिद्ध होता. खेरीज त्याच्या वर्तनाने त्याने सर्वांचे, कैकेयीचे सुद्धा प्रेम संपादन केले होते. त्यामुळे त्याला दूर सारणे अशक्य होते. रामाला अयोध्येबाहेर दीर्घकाल ठेवण्याची कथेची गरज लक्षात घेऊन मोठ्या कौशल्याने कैकेयीच्या वराची योजना अत्यंत चपखलपणे केलेली दिसते. हा वर आयत्या वेळी सुचला आहे, उपरा आला आहे, असे वाटू नये, अशी काळजी घेतली आहे. कैकेयीशी विवाह करण्यापूर्वीच तिच्या वडिलांना तिच्या पोटी येणारा पुत्र राज्यपदी असेल, असे दशरथाने प्रतिज्ञापूर्वक सांगायला लावून ह्या वरांची मुळे खोलवर रुजवली गेली आहेत. कैकेयीला वर देण्यास कारण हवे, म्हणून तिला युद्धातील घोर प्रसंगी दशरथाचे प्राण संकटात असताना साहाय्य करावयास लावले आहे. प्राण वाचविणाऱ्या कैकेयीला दशरथाने वर देऊ करणे यात अस्वाभाविक असे काही नाही. तिनेही ते तात्काळ न स्वीकारता त्याच्याजवळ ठेव म्हणून दिले आणि 'जरूर वाटेल तेव्हा मागेन' असे सांगितले. पुढे या वरांचा अशा रीतीनें उपयोग करता येईल, याची तिलाही त्या वेळी कल्पना नसावी. रामाला यौवराज्याभिषेक होणार म्हणून ती अतिशय हरखली होती. योजलेल्या बेतांप्रमाणे रामाला अभिषेक होण्यास कोणतीही सबळ अडचण नव्हती, कोणीही अडथळा आणला नसता. अशा वेळी कैकेयीचा मत्सर जागृत करणे, तिला दशरथाने पूर्वी देऊ केलेल्या वरांची आठवण करून देणे आणि त्यायोगे कथेला अनपेक्षित परंतु स्वाभाविक वाटेल अशा रीतीने वळण देणे, यासाठी ह्या वरांची योजना केलेली दिसते. मंथरा—हे केवळ एक साधन असले तरी कैकेयीच्या मनात परिवर्तन घडवून आणण्याचे कार्य तितकेसे सोपे नव्हते, कारण तिचे रामावर भरताइतकेच प्रेम होते. हे महत्त्वपूर्ण कार्य तिने केले आहे. वरांची योजनाच अशी केली आहे की त्यास कोठेच प्रतिबंध येऊ नये. कैकेयीला वरांचा उपयोग निश्चित होईल असे जे वाटले त्याचे कारण तिला असलेली मनुष्य-स्वभावाची योग्य पारख, दशरथाकडून [illegible] मागण्यापूर्वी ती त्याला

अत्यंत चातुर्याने शब्दांत बांधून घेते, देवांना साक्षी ठेवते हे खरे, परंतु तिची सारी भिस्त रामाच्या स्वभावावर होती. दशरथ एक वेळ दिलेल्या शब्दांना जागणार नाही, परंतु आज्ञा-पालनात रामाच्या हातून यत्किंचितही कसूर होणार नाही, याची तिला पूर्ण खात्री होती. तिचा सारा आधार राम आणि त्याचा स्वभाव होता. याच भांडवलावर तिने असे वर मागण्याचे धाष्टर्य केले आहे. पित्राज्ञेच्या पालनासाठी राम अग्नीतही उडी घेईल, तीक्ष्ण विष प्राशन करील किंवा स्वताला सागरात लोटून देईल, परंतु आज्ञाभंग करणार नाही, हा कैकेयीचा विश्वासच तिच्या यशाचे कारण आहे. रामाचा राज्यावरील स्वयंभू, स्वयंसिद्ध हक्क अन्य कोणत्याही कारणांनी डावलण्याचा प्रयत्न स्वाभाविक, अकृत्रिम झाला नसता, म्हणूनच वरांची योजना चातुर्यपूर्ण वाटते. कैकेयीने आपला हेका सोडावा, यास्तव दशरथाने सामदामादी अनेक उपायांचा अवलंब केला, शरणागती पत्करली, पायावर लोटांगण घातले, धमकी दिली, संबंध तोडून टाकण्याइतके कटू बोलला; कौसल्या, लक्ष्मण, सुमंत, वसिष्ठ या सर्वांचे प्रयत्न अयशस्वी झाले. परंतु कैकेयीने आपला हेका यत्किंचितही सोडला नाही, उलट वरांचे पालन न झाल्यास जीव देण्याची तिनेही धमकी दिली. कोणत्याही दाहक भाषणाचा तिच्यावर परिणाम झाला नाही. तिच्या इच्छेच्या आड येऊ शकेल, अशी एकमेव व्यक्ती अथवा शक्ती म्हणजे भरत. त्यानेच यौवराज्यपदाचा त्याग केला असता तर कैकेयीचे सारे मनोरथ ढासळले असते. त्याची अडचण नको म्हणून वाल्मीकीने मोठ्या चातुर्याने त्याची आजोळी पाठवणी करून कैकेयीला मार्ग निर्विघ्न, मोकळा करून दिला. रामायणातील पुढील सर्व घटनांचे मूळ कैकेयीच्या ह्या वरांत आहे. रामायणकथेचा खरा प्रारंभ 'भरताला यौवराज्य–प्राप्ती आणि रामाला चौदा वर्षे वनवास' ह्या कैकेयीच्या वरप्राप्तीतूनच झाला आहे.

दशरथाने कैकेयीला संतुष्ट होऊन जे दोन वर देऊ केले ते 'वर' नसून केवळ 'वचन' होते, असा युक्तिवाद करणे शक्य असले, तरी योग्य नाही; कारण त्याला आधार नाही. ह्या वरांचा पुनरुल्लेख रामायणात १५।२० वेळा आला आहे. परंतु वाल्मीकीने सर्वत्र 'वर' हाच शब्द योजिला आहे, 'वचन' नाही. काही ठिकाणी 'वर' शब्द स्पष्टपणे नसला तरी अभिप्रेत आहे. या वरांचा पहिला उल्लेख **'पूर्वं दत्तवरा देवी'** ह्या शब्दांत बालकांडाच्या पहिल्याच सर्गात नारदाने सांगितलेल्या संक्षिप्त रामकथेत आला आहे. **'दत्तौ ते द्वौ वरौ'** असे म्हणून मंथरा कैकेयीला या वरांची आठवण करून देते. 'वर' आणि 'वचन' हे शब्द समानार्थी नाहीत. वराचे परिणाम अटळ आणि अपरिवर्तनीय असतात. वचनभंग निषिद्ध मानला जातो, परंतु त्यात बदल करणे अशक्य नसते. समजूत पटवून देऊन, विनंती करून मतपरिवर्तनाने वचनाच्या शब्दांत बदल घडवून आणणे शक्य असते. दशरथ राजा सत्यसंध असल्याने त्याने कैकेयीला वराऐवजी वचन दिले असते तरी ते

पाळण्याचे नैतिक बंधन त्याच्यावर होतेच. वर दिले असूनही तिची मनधरणी त्याने केलीच आहे. परंतु कैकेयीचा निर्धार आणि वराच्या परिणामांची अपरिवर्तनशीलता यामुळे त्याचे प्रयत्न निष्फळ ठरले. सारे रामायण घडवून आणण्याचे सामर्थ्य केवळ या दोन वरांत साठवले आहे.

दशरथाच्या विषयलंपटतेचे अनेक उल्लेख रामायणात असले तरी कैकेयीच्या सौंदर्याच्या आहारी जाऊन त्याने तिला वर दिले, असे म्हणता येणार नाही. कैकेयीच्या रूपाची त्याच्या मनावर विलक्षण मोहिनी असली, तरी तिचा ह्या वरांशी संबंध जोडण्यास आधार नाही. उलट त्याने तिची केलेली निर्भर्त्सना, मृत्युसमयी तिला अंगाला स्पर्शही करू न देणे, तिच्याशी असलेले धर्माचे नाते झुगारून देणे, रामाशी खोटे बोलल्याबद्दल तिचा तीव्र शब्दांत निषेध करणे, इत्यादी लक्षात घेता तिच्या सौंदर्याच्या पगडचाने त्याने वर दिले, असे म्हणता येत नाही. तो तिला शब्द देऊन बसला. अशा प्रकारचे विचित्र वर कैकेयी मागेल, असे त्याच्या मनाला कधीच वाटले नाही आणि म्हणूनच दिलेल्या शब्दांत तो अडकला. त्याने तशी स्पष्ट कबुली दिली आहे. **धर्मबन्धेन बद्धोऽस्मि नष्टा च ममचेतना।**–२४ 'धर्म संबंधाने मी बद्ध झालो आहे. मला आता काही सुचत नाही.' [५०] रामाला वनवासात धाडण्याचे खरे कारण सांगितले, तर लोक मलाच खोटे ठरवतील, अशी त्याला टोचणी लागली होती.

रावणाला केवळ दोन वर मिळाले असून ब्रह्मदेवाने दिलेला मर्यादित अमरत्वाचा वर कैकेयीच्या वराला आणि कथेच्या रचनेला पोषक आहे. रावणाची आक्रमकता, उर्मटपणा, सत्ता-पिपासा, कामांधता, अमर्याद वर्तन ह्या सर्वांची बीजें ह्या वरात रोवली आहेत. त्याच्या पापाचे घडे भरण्यास अशा प्रकारच्या वरांची आवश्यकता होती. केवळ भार्येची इच्छा पूर्ण करण्यासाठी रामाने सीतेला त्याच्या बरोबर वनात येण्यास अनुज्ञा दिलेली नाही. कथेच्या दृष्टीने तिने वनात जाणे अनुकूल होते. स्त्रीचा अपहार हे युद्धाचे एक प्रभावी कारण असल्याने सीतेचा वनवास उपकारक ठरतो. वाल्मीकीचे कथानक-चातुर्य असे प्रत्ययास येते. रावणाला शंकराचाही एक वर मिळाला होता व त्यायोगे त्याच्या सामर्थ्यात भर पडली इतकेच. मेघनादाचा वध करण्यास लक्ष्मणाला अनुकूल व्हावे, असाच वर त्याला दिला आहे. एकच परिणाम घडवणारा वर आणि शाप व तोही एकाच व्यक्तीकडून 'ब्रह्मदेवाकडून मिळवणारी कुंभकर्ण ही एकमेव व्यक्ती. दोहोंचा उपयोग त्याला संपूर्ण निःशक्त करण्यासाठी केला आहे. राक्षसकुटुंबातील ज्यांना ज्यांना वर प्राप्त झाले आहेत, त्यांतच त्यांच्या विनाशाचे बीज सामावले आहे.

---

५०. अयोध्याकाण्ड / १४

## हनुमानाला मिळालेले वर

हनुमान हा जन्मतःच अतिशय बलशाली होता. अन्यथा सूर्याला धरण्याचे धाडस त्याने कसे केले असते ? परंतु हे सामर्थ्य त्याच्या हातून व्हावयाच्या कार्यसिद्धीस पुरेसे न वाटल्याने ब्रह्मदेवाने अष्ट देवतांच्या वरांनी त्याला अधिक बलवान करण्याचा प्रयत्न केलेला दिसतो. एका वेळी आठ वेगवेगळे वर मिळणारी हनुमान ही एकमेव व्यक्ती रामायणात आहे. रामाच्या दिग्विजयात हनुमानाचा फार मोठा वाटा आहे. सीतेच्या शोधाच्या निमित्ताने लंकेची पाहणी करणे हा त्याच्या समुद्रोल्लंघनाचा मुख्य उद्देश. त्यासाठी आवश्यक ती अनुकूलता प्राप्त व्हावी, म्हणून ह्या वरांची योजना केली आहे. एकदम एवढे वर द्यावयास सबळ कारण हवे म्हणून इंद्र-हनुमान-युद्ध, वायूचा निरोध, त्याला संतुष्ट करण्याचे देवांचे प्रयत्न इत्यादी पार्श्वभूमी निर्माण करण्याचे वाल्मीकीचे वाङ्मयीन कौशल्य अप्रतिम आहे. हनुमानाला वर देताना ब्रह्मदेवाने दिलेले स्पष्टीकरण महत्त्वाचे आहे. तो देवांना सांगतो –

> जानतामपि वः सर्वं वक्ष्यामि श्रूयतां हितम् ॥ –८
> अनेन शिशुना कार्यं कर्तव्यं भविष्यति ।
> तद्ददध्वं वरान्सर्वे मारुतस्यास्य तुष्टये ॥ ९

'तुम्ही सर्व जाणत आहा. तथापि तुम्हाला हिताची गोष्ट सांगतो, ती ऐका. ह्या बालकाच्या हातून तुम्हाला आपले कार्य करून घ्यावयाचे आहे. ह्यास्तव, हा वायू संतुष्ट होण्याकरिता तुम्ही सर्व वर द्या.[५१]' हनुमानाला वर देण्याचा कार्यक्रम किती पद्धतशीर आणि पूर्वनियोजित आहे याची कल्पना वरील उद्गारावरून येते. हनुमानाचा लंकेचा प्रवास सुकर आणि सुखकर करण्यासाठी त्याच्या जीविताला यत्किंचितही धक्का पोहोचणार नाही, अशी काळजी हे वर देताना घेतली गेली आहे. वज्र, वरुणपाश, यमदंड, कुबेराची गदा, शंकराची आयुधे आणि ब्रह्मदंड यांपासून त्याला संपूर्ण अवध्यत्व देण्यात आले. खेरीज दूतकार्यास उपयुक्त असे वक्तृत्व, अकुंठितपणे प्रवास करण्याची शक्ती, अजिंक्यत्व ह्याचीही जोड दिली गेली. हनुमानाला एकूण अकरा वर मिळाले असून त्यातील तीन ब्रह्मदेवाने दिले आहेत. लंकेत त्याला अस्त्रांनी बांधण्याचा जो प्रयत्न झाला त्यातून त्याची सुटका ब्रह्मदेवाच्या वरामुळेच होऊ शकली.[५२] इंद्राच्या दोन वरांपैकी एकामुळे तो इच्छामरणी झाला, तर विश्वाकर्म्याच्या वराने त्याला चिरंजीवित्वाचा लाभ झाला. यम, कुबेर, विश्वकर्मा, शंकर, वरुण, अग्नी, सूर्य, ब्रह्मदेव आणि इंद्र यांच्या वरांमुळे लंकेचा

---

५१. उत्तरकाण्ड / ३६

५२. सुन्दरकाण्ड / ४८

प्रवास आणि त्याचे तेथील वास्तव्य निर्धास्त झाले. युद्धाचे वेळी लंकेत कशी व्यवस्था करावयाची, कोणता पवित्रा घ्यावयाचा, हे ठरविण्यास रामाला ही सर्व माहिती मिळणे आवश्यक होते आणि म्हणूनच हनुमान लंकेला जाऊन कार्य यशस्वी करून सुखरूप परत यावा, यासाठी आवश्यक ती सर्व जय्यत पूर्वतयारी या वरांनी केली. हनुमानाला एकच शाप मिळाला असून कथारचनेच्या दृष्टीने त्याला फारसे महत्त्व नाही.

## ब्रह्मदेवाने दिलेले शाप / वर

राम-लक्ष्मणांच्या जन्माभोवती शाप/वरांचे वलय आहे. भृगूच्या शापाचा परिणाम म्हणून विष्णूला मानवावतार घ्यावा लागला. देवांना त्रस्त करणाऱ्या आणि त्यांना अवध्य असणाऱ्या रावणाचे पारिपत्य करण्यासाठी त्यांनी विनंती केली असता रावणाचा पुत्र, पौत्र, अमात्यांसह वध करून अकरा हजार वर्षे मनुष्य-लोकात वास्तव्य करून पृथ्वीचे पालन करण्याची जबाबदारी त्याने स्वीकारली व देवांना धीर दिला. हे केवळ आश्वासन नव्हते. **एवं दत्वा वरं देवो देवानां विष्णुरात्मवान् ।। ३०** तो वर म्हणून दिला होता. [५३] दशरथाचा पुत्रकामेष्टी यज्ञ व त्यामुळे त्याला प्राप्त झालेले पायसदान ह्याचाही त्यांच्या जन्माशी संबंध आहेच. पायस-प्राप्ती हा वर नसून यज्ञाचे फल आहे.

ब्रह्मदेव हा अखिल सृष्टीचा जनक, विधाता, सर्वश्रेष्ठ व सर्वाधिकारी असल्याने त्याला इतर कोणीही शाप देऊ शकत नाही आणि वराची त्याला आवश्यकता नाही. त्याने इतरांना जे शाप/वर दिले त्यांचाच विचार करायला हवा. शाप देण्याकडे एकूणच देवांचा कल नसल्याने ब्रह्मदेवाने नाइलाज झाला, तेव्हाच शाप दिले आहेत. ते फक्त दोनच असून रावण व कुंभकर्ण यांना ते मिळाले आहेत. रावणाच्या अनिर्बंध कामवासनेला पायबंद घालण्यासाठी ब्रह्मदेवाने त्याला कायम लक्षात राहील असा जो शाप दिला आहे, त्याचे कथेच्या दृष्टीने फार महत्त्व आहे व त्याची सविस्तर चर्चा पुढे केली आहे. हा शाप कथेचे एक अविभाज्य अंग आहे. कुंभकर्ण हा विलक्षण सामर्थ्याचा आणि अचाट कृत्ये करणारा असल्याने निद्रेचा शाप देऊन त्याची सारी शक्ती खच्ची केली आहे. हे करणे आवश्यक होते. कारण कुंभकर्णाला बलहीन करणे, म्हणजे पर्यायाने रावणाचेच सामर्थ्य कमी करणे होते. रावणाला दिलेला शाप सशर्त असल्याने त्याला आपले वर्तन सुधारण्याची संधी दिली आहे. रावण आणि कुंभकर्ण यांना जबर शिक्षा करणे सहज शक्य असतानाही त्यांना दिलेले शाप सौम्यच आहेत.

शाप देताना ब्रह्मदेव जी काळजी घेतो ती वर देताना मात्र घेत नाही.

---

५३. बालकाण्ड / १५

परिणामांचा विचार न करता तो एकदम वर देऊन मोकळा होतो आणि मागाहून विवंचना करू लागतो. एकटा ब्रह्मदेवच नव्हे तर इतर देवही वर देण्याचे कामी केवळ उदार नसून उधळे आहेत, असे दिसते. ब्रह्मदेवाने दिलेल्या वरांचा विचार करता त्याची बेफिकीरी स्पष्टपणे लक्षात येते. ब्रह्मदेव जेव्हा कुंभकर्णाला वर देण्यास उद्युक्त झाला, तेव्हा देवांनी त्याला वर देण्यापासून परावृत्त केले होते. त्याला जर रावणाप्रमाणे वर मिळाला असता तर सर्वांचा विनाश निश्चित झाला असता. रामायणातील ८४ वरांपैकी देवांनी दिलेले वर ६० असून एकट्या ब्रह्मदेवाने त्यांपैकी २० दिले आहेत. ब्रह्मदेवाच्या वरांचा जास्तीत जास्त फायदा राक्षसांनी घेतला आहे. त्याच्या वरांचा फायदा राक्षसांशिवाय देव, मानव, तिर्यक् यांनाही झाला आहे.

ब्रह्मदेवाने मेघनादाला दिलेल्या वराचा[५४] उल्लेख अन्यत्र आला असला तरी त्याचा अधिक विचार करावयास हवा. मेघनादाला मिळालेल्या वराचे स्वरूप सर्वस्वी वेगळे आहे. 'वध' हा काही वराचा विषय नाही. याचित वराचा तर नाहीच नाही. परंतु हा वर सशर्त असला तरी याचित आहे. 'वधा'चे वरदान सहसा कोणी मागत नाही व कोणी देतही नाही. या वरयाचनेची पार्श्वभूमी लक्षात घ्यावयास हवी. मेघनादाने इंद्राला जिंकून लंकेला नेले होते. इंद्र हा देवांचा राजा असल्याने जेव्हा तोच राक्षसांच्या ताब्यात आला, तेव्हा देवांची—ब्रह्मदेवाची प्रतिष्ठाच धोक्यात आली. कोणत्याही उपायाने इंद्राची सुटका करून घेणे आवश्यक होते. आजच्या भाषेत बोलावयाचे तर खंडणी, लाच देऊन त्याची मुक्तता करण्याचे प्रयत्न करणे भाग होते. ब्रह्मदेवाने पुढाकार घेतला आणि त्याने मेघनादाला सरळ प्रश्न केला.

**तन्मुच्यतां महाबाहो महेन्द्रः पाकशासनः ।**
**किं चास्य मोक्षणार्थाय प्रयच्छन्तु दिवौकसः ॥ ७**

ह्या महेंद्राला तू सोडून दे. ह्याच्या सुटकेकरता देवांनी तुला काय द्यावे?'[५५] येथे सरळ देव-घेवीचा व्यवहार आहे. इंद्राच्या मुक्ततेसाठी अमरत्वाची मागणी करण्यात आली. संपूर्ण अमरत्व मर्त्य लोकातील कोणालाच मिळत नसल्याने अमरत्वाला मर्यादा घालण्यात आल्या. तेव्हा इंद्रजिताने कोणत्या परिस्थितीत वध व्हावा वा होऊ नये याचे स्पष्टीकरण केले आणि नंतर ब्रह्मदेवाने वर दिला तो असा (युद्धकाण्ड / ८५)

**'निकुम्भिलामसम्प्राप्तमकृताग्निं च यो रिपुः ।**
**त्वामाततायिनं हन्यविन्द्रशत्रो स ते वधः ॥ १४**
**वरो दत्तो महाबाहो सर्वलोकेश्वरेण वै । – १५**

---

५४. युद्धकाण्ड / ८५ व उत्तरकाण्ड / ३०

५५. पहाः वर क्र. ६५

'इंद्रजिता, निकुंभिलेत जाऊन तू हवन करण्यापूर्वी जो शत्रू शस्त्र धारण करणाऱ्या तुझ्याशी युद्ध करील, त्याच्या हातून तुझा वध होईल.' ह्याचा अर्थ इतकाच की एवढी एक बाब सोडल्यास अवध्यत्व. वर सशर्त असल्याने मेघनादाकडून शर्तीचे पालन होण्यापूर्वीच त्याचा वध करण्याची निकड बिभीषणाने रामाकडे लावली.

वरांचा उच्चार करताना ब्रह्मदेव निष्काळजी असला तरी उच्चारलेले शब्द कधीही खोटें ठरू नयेत, यास्तव तो अत्यंत जागरूक आहे. आपण दिलेल्या वराची सत्यता धोक्यात येईल, असे वाटताच तो मध्यस्थी करतो, तडजोड घडवून आणतो व त्यासाठी जरूर पडल्यास आपल्या खास अधिकारांचा उपयोगही करतो. निवात-कवच आणि रावण यांच्या युद्धात समेट घडवून आणला, तर रावण आणि यमाच्या युद्धात यमाला माघार घ्यावयास लावले.[५६]

श्रवणाच्या शापाची दशरथाला आणि ब्रह्मदेवाच्या व नलकूबराच्या शापांची रावणाला सतत भीती वाटत होती. रामाचे मोठेपण स्पष्ट करण्यास अहल्या, कबंध, विराध ह्यांना मिळालेल्या शापाचे साहाय्य झाले आहे. लंकानगरीच्या शापातून रावण-वधाचा समय जवळ आल्याची सूचना दिली गेली आहे.

## सीतेचे पातिव्रत्य

सीतेचे पातिव्रत्य, तिचे पावित्र्य हा रामायणाचा मानबिंदू असून रामकथेच्या दृष्टीनेही या विषयाचे महत्त्व अनन्यसाधारण आहे. पातिव्रत्य हीच एक महान तपस्या असून तिच्यामुळें पतिव्रतेच्या शब्दांना विलक्षण सामर्थ्य प्राप्त होते, ती शाप आणि वर देऊ शकते, असे मानले जाते. सीतेच्या पातिव्रत्याच्या सामर्थ्याचा विचार करण्यापूर्वी एकूणच पतिव्रता, पातिव्रत्य, स्त्रीचे पावित्र्य, शील या बाबतीतील प्राचीन काळातील सामाजिक कल्पना, बंधने लक्षात घेणे अगत्याचे आहे. 'मन, वचन आणि देह यांनी पतीशी अव्यभिचारी निष्ठेने वागणारी पत्नी म्हणजे पतिव्रता' अशी मनूने व्याख्या केली आहे.

पृथिव्यां यानि तीर्थानि सतीपादेषु तान्यपि ।
तेजश्च सर्वदेवानां मुनीनां च सतीषु वै ।।

पृथ्वीच्या ठायी जी तीर्थे आहेत ती सगळी सतीच्या चरणांचे ठिकाणी आहेत, त्याचप्रमाणे सर्व देवांचे आणि मुनींचे तेजही सतीच्या ठिकाणी आहे, अशा शब्दांत पतिव्रतेचा गौरव ब्रह्मवैवर्त पुराणात केला आहे.[५७] अनसूयेच्या पातिव्रत्याची परीक्षा घेण्याच्या उद्देशाने ब्रह्मा, विष्णू, महेश यांनी तिला नग्न होऊन भिक्षा

---

५६. पहा वर क्र. ६२ आणि उत्तरकाण्ड / २२
५७. भारतीय संस्कृति-कोश, खंड ५/पृ ३५९-६० व ३६८-३७५ आधारे.

वाढण्यास सांगितले असता, तिने त्यांचे रूपांतर अर्भकांत करून त्यांची इच्छा पुरविली. उत्तंक दर्शन घेण्याच्या उद्देशाने आला असता पौष्याची राणी अदृश्य झाली. पतीविषयी मनात कोणताही विकल्प उत्पन्न होऊ नये, यास्तव नियोजित पती धृतराष्ट्र अंध आहे, हे कळताच गांधारीने आपल्या डोळ्यांवर कायमची पट्टी बांधून घेतली.

पतिव्रता स्त्रीने परपुरुषाच्या दृष्टीसही पडू नये, ही कल्पना उत्तरकालीन असावी; कारण ऋग्वेदात '**सुमंगलरियं वधुरिमां समेत पश्यत।**' असा उल्लेख आढळतो. रामाबरोबर वनवासाला निघालेल्या सीतेचे वर्णन वाल्मीकीने,

**'या न शक्या पुरा द्रष्टुं भूतैराकाशगैरपि।**
**तामद्य सीतां पश्यन्ति राजमार्गगता जनाः॥**

पूर्वी जी सीता आकाशात संचार करणाऱ्यांच्याही दृष्टीस पडणे शक्य नव्हते, त्या सीतेला भररस्त्यातील लोक पहात आहेत – असे केले आहे. [५८] महाभारतातही कौरव स्त्रियांबाबत अशाच प्रकारचे उद्गार काढलेले आढळतात.

**'या नापश्यश्चन्द्रमा नैव सूर्यो रामाः कश्चित्ताः तस्मिन्नरेन्द्रे।**
**महावनं गच्छति कौरवेन्द्रे शोकेनार्ता राजमार्गं प्रपेदुः।'**

पूर्वी ज्या स्त्रिया चंद्राने किंवा सूर्यानेही पाहिल्या नाहीत त्या आज कौरवश्रेष्ठ वनात जावयाला निघाला असता शोकार्त होऊन राजमार्गावरून जात आहेत, [५९] असे आश्रमपर्वात दिले आहे. परंतु यावरून रामायण-महाभारतकालीन स्त्रिया परपुरुषाच्या दृष्टीसही पडत नसत, असा निष्कर्ष काढता येणार नाही. कारण वरील वर्णने केवळ राजस्त्रियांबाबतची आहेत. राजघराण्यातील स्त्रियांचे दर्शन सामान्यांना नेहमीच दुर्लभ असते. असे असूनही प्राचीन वाङ्मयात पतिव्रता स्त्रियांना '**असूर्यपश्या**' असे विशेषण लावलेले आढळते.

पतीच्या आज्ञेवाचून घराबाहेर पडणे ; अवगुंठन न घेता बाहेर जाणे ; जलद चालणे ; व्यापारी, संन्यासी, वृद्ध आणि वैद्य यांच्या व्यतिरिक्त अन्य पुरुषांशी बोलणे ; मांड्या, पोटऱ्या व स्तन उघडे ठेवणे, जोराने हसणे ; धूर्त, चेटकिणी आणि दुःशील स्त्रियांशी संबंध ठेवणे इत्यादी गोष्टी गृहिणीला वर्ज्य होत, असे याज्ञवल्क्य स्मृती सांगते. परपुरुषासंबंधीचा विचार, त्याचे दर्शन, स्पर्श तत्कालीन पातिव्रत्याच्या कल्पनेला मान्य नव्हता. हनुमानाने लंकेत सीतेची भेट घेतली आणि स्वसामर्थ्याने समुद्र ओलांडून तिला रामाकडे सुखरूपपणे घेऊन जाण्याचे आश्वासन दिले. तरीही तिने त्याच्या बरोबर जाण्यास नकार दिला. न जाण्याची जी कारणे तिने सांगितली त्यांतील एक कारण–

---

५८. अयोध्याकाण्ड / ३३–८
५९. महाभारत / आश्रमपर्व.

भर्तुर्भक्तिं पुरस्कृत्य रामादन्यस्य वानर।
नाहं स्प्रष्टुं स्वतो गात्रमिच्छेयं वानरोत्तम॥
यदहं गात्रसंस्पर्शं रावणस्य गता बलात्।
अनीशा किं करिष्यामि विनाथा विवशा सती॥

भर्त्याचे ठिकाणी अतिशयच भक्ती असल्यामुळे त्या रामाबाचून कोणाच्याही शरीराला आपण होऊन स्पर्श करण्याची माझी इच्छा नाही. रावणाच्या शरीराचा स्पर्श मला झाला आहे, परंतु तो माझ्या इच्छेविरुद्ध. मी अनाथ, स्वता असमर्थ आणि पराधीन असल्यामुळे काय करणार?[६०] अनिच्छेने का होईना सीतेला रावणाखेरीज विराधाचा आणि कावळ्याच्या रूपाने आलेल्या इंद्रपुत्राचाही स्पर्श झाला असल्याचे स्पष्ट उल्लेख वाल्मीकी रामायणातच आहेत. ह्यावरून एवढेच अनुमान निघते की पतिव्रतेला परपुरुषाचा स्पर्श निषिद्ध होता.

## स्त्रियांचे शाप / वर

सीतेच्या पातिव्रत्याचा विचार करताना रामायणातील स्त्रियांनी दिलेले शाप आणि वर यांचा विचार करणे अगत्याचे आहे. वाल्मीकी रामायणात स्त्रियांनी दिलेले शाप सात असून वर पाच आहेत. अहल्या, मंदोदरी आणि सीता ह्या पंचपतिव्रतांतील स्त्रियांनी कोणालाही शाप/वर दिलेले नाहीत. त्यामुळे पातिव्रत्याच्या सामर्थ्याने शाप/वर देण्याची शक्ती स्त्रियांना प्राप्त होत असे किंवा नाही, हे निश्चितपणे सांगणे कठीण आहे. कुशकन्या आणि वेदवती (वेदवतीने शाप न देता रावणवधाची प्रतिज्ञा केली असली तरी ती शापतुल्यच आहे) अविवाहित असल्याने त्यांना हे सामर्थ्य पातिव्रत्यामुळे प्राप्त झालेले नाही, हे स्पष्टच आहे. खेरीज त्यांनी शाप प्रत्यक्षात दिलेले नसून त्यांचे ठायी तेवढे सामर्थ्य होते, यांचे केवळ उल्लेख आहेत. रामाला यौवराज्याभिषेक होणार ही सुवार्ता मंथरेने प्रथम सांगितल्यामुळे अत्यंत संतुष्ट झालेल्या कैकेयीने तिला वर देऊ केल्याचा उल्लेख आहे. मंथरेने त्या वराचा स्वीकार केलेला नाही, ही गोष्ट वेगळी. परंतु कैकेयीचे एकूण वर्तन लक्षात घेता तिला पतिव्रता मानणे कठीण आहे. उमेने (पार्वती) देव, पृथ्वी आणि कुबेर यांना शाप आणि राक्षसी व इल राजाला (अर्धा) वर दिले आहेत. उमा ही एक निष्ठावंत पतिव्रता खरीच, शिवाय तिने उग्र तपश्चर्याही केली होती, तिचा जन्मही देवयोनीतील आहे, हे लक्षात घेता तिने दिलेले शाप/वर केवळ पातिव्रत्याच्या सामर्थ्यानेच दिले होते, असे निखालसपणे म्हणता येत नाही. केवळ पातिव्रत्यामुळे तिने शाप/वर दिले, असे सिद्ध करणारा एकही उल्लेख वाल्मीकी रामायणात नाही. हेमाने आपली सखी स्वयंप्रभा हिला एक वर दिल्याचा

---

६०. सुन्दरकाण्ड

उल्लेख[६१] आढळतो. तिने तपश्चर्या केली होती किंवा नाही हे स्पष्ट नाही, परंतु ती अप्सरा असल्याने तिला ही शक्ती उच्च योनीतील जन्मामुळे प्राप्त झाली असावी.

अनसूया ही एक महान पतिव्रता. सीतेची भेट होताच ती तिला पातिव्रत्याचा महिमा पुढील शब्दांत सांगते— ' अनुकूल असो, प्रतिकूल असो, ज्या स्त्रियांना भर्ता प्रिय आहे, त्यांना महाफलदायक लोक प्राप्त होतात. पती दुःशील असो, स्वेच्छाचारी असो वा निर्धन असो, सुस्वभावी स्त्रियांचे तोच मुख्य दैवत होय.......... ......भर्त्यापेक्षा इष्ट बांधव मला दुसरे कोणी आढळत नाहीत. ज्याप्रमाणे अक्षय्य तपाचे अनुष्ठान इहलोकी वा परलोकी इष्टप्राप्तीचे साधन होते, त्याप्रमाणे भर्ताच सेवेला योग्य होय... जगातील बऱ्यावाईट गोष्टींचा विचार करणाऱ्या गुणसंपन्न स्त्रिया पुण्यवान लोकांप्रमाणे स्वर्गामध्ये संचार करतात,' परंतु इतके सांगूनही अनसूया सीतेला म्हणते—

नियमैर्विविधैराप्तं तपो हि महदस्ति मे ।
तत्संश्रित्यबलं सीते छन्दये त्वां शुचिव्रते ।।

नाना प्रकारच्या नियमांनी मी मोठे तप संपादन करून ठेवले आहे. त्या तपोबलाचा आश्रय करून तू माझ्यापाशी वर मागावास अशी माझी इच्छा आहे[६२] अनसूयेने सीतेला जो वर देऊ केला, ते सामर्थ्य तपाचे आहे, पातिव्रत्याचे नाही; अन्यथा तपाचा स्वतंत्र उल्लेख करण्याची आवश्यकता नव्हती. सीतेने वराचा स्वीकार केला नाही, ही गोष्ट वेगळी. या सर्व उदाहरणांवरून असे दिसते की केवळ पातिव्रत्यामुळे कोणाही पतिव्रतेला शाप/वर देण्याची शक्ती प्राप्त झालेली नाही. ज्या स्त्रियांनी शाप/वर दिले आहेत, त्यांचा जन्म उच्च योनीतील आहे किंवा त्यांच्या पाठीशी पातिव्रत्याहून वेगळी अशी तपश्चर्या आहे.

## अन्य पतिव्रता

पंच पतिव्रतांतील तीन - अहल्या, मंदोदरी आणि सीता ह्या पतिव्रता रामायणातील आहेत. त्यांच्या पातिव्रत्याच्या सामर्थ्याचा विचार करताना अहल्येला वगळणे भाग आहे. वाल्मीकी रामायणात अहल्येची कथा दोनदा आली असून त्यांच्या तपशीलात बरीच तफावत आहे. उत्तरकांड हे प्रक्षिप्त असल्याबाबत प्रवाद असला, तरी बालकाण्ड निखालसपणे वाल्मीकीचेच आहे. त्यामुळे या कांडातील अहल्येची कथा अधिकृत व प्रमाण मानावयास हवी. ह्या कांडातील कथेप्रमाणे इंद्राने अहल्येवर बलात्कार केलेला नाही. गौतमाच्या वेषात आश्रमात आलेली व्यक्ती गौतम नसून इंद्र आहे, हे अहल्येला ठाऊक होते. इतकेच नव्हे तर तिला त्याच्या-

---

६१. किष्किन्धाकाण्ड

६१. अयोध्याकाण्ड/११८

बद्दल कुतूहल होते. ती त्याच्याबरोबर समागमाला स्वेच्छेने उद्युक्त झाली होती, असे मानण्यास भक्कम पुरावा आहे. समागमानंतर ती इंद्राला म्हणते **'कृतार्थास्मि सुरश्रेष्ठ।'** सुरश्रेष्ठ, मी कृतार्थ झाले आहे. **'सुश्रोणि परितुष्टोऽस्मि।'** सुंदरी मी संतुष्ट झालो आहे, अशी इंद्रानेही कबुली दिली आहे. अहल्येची समागमास संमती असल्याने तिचे हे वर्तन व्यभिचारात्मक ठरते. तिचा अपराधही घोर व अक्षम्य असता गौतमाने तिला अयाचित उःशाप शापाबरोबर द्यावा, याचे आश्चर्य वाटते. तिचा अधिक विचार करण्याचे कारण नाही. मंदोदरी ही एक अत्यंत दुर्दैवी पतिव्रता आहे. तिला रामायणात फारच गौण स्थान आहे. तिची व्यक्तिरेखा पुसट व अपुरी आहे. रावणवधानंतरच्या विलापातूनच तिची वैशिष्टये कळू शकतात. ती रावणाची पत्नी असल्याने आपल्या पातिव्रत्याच्या शक्तीने त्याचे अधःपतन थांबवणे, केवळ तिलाच शक्य झाले असते. तिने तसा प्रयत्न केला असला, तरी तो सफल झालेला नाही. सावित्रीने आपल्या पातिव्रत्याच्या सामर्थ्याने पतीचे प्राण वाचवले, परंतु मंदोदरी अयशस्वी झाली. सावित्रीने सुद्धा पातिव्रत्याच्या योगे पतीची यमाच्या दाढेतून सुटका केली की आपल्या बुद्धिचातुर्याने यमावर मात केली; याबाबत मतभेद होऊ शकेल.

आदर्श पुत्र, पती, भ्राता, शास्ता, आज्ञाधारक, सत्यनिष्ठ, एकवचनी, एकबाणी, एकपत्नी आणि शुद्ध चारित्र्य, ही जशी रामाची अतुलनीय वैशिष्टये, तशीच सीताही सत्यवती, धैर्याने संकटाला सामोरी जाणारी, अतुल त्यागी, निस्पृह आणि निष्ठावंत पतिव्रता. तिचे निष्कलंक चारित्र्य आणि रामविषयीची अव्यभिचारी प्रीती हा रामकथेचा कणा आहे, वाल्मीकीने आपली अनेक वर्षांची तपश्चर्या पणाला लावून तिच्या शुद्धतेची ग्वाही दिली आहे. रावणाने तिला पळवून नेलेल्या क्षणापासून त्याच्या वधापर्यंत कोणत्याही क्षणी ती भ्रष्ट होऊ शकली असती, इतकी परिस्थिती तिला सर्वस्वी प्रतिकूल होती, तर त्याला अनुकूल होती. प्राप्त परिस्थितीत सीतेला शील-संरक्षण करणे जेवढे कठीण होते, तेवढेच ते अबाधित राखणे ही रामकथेची अत्यंत महत्त्वाची गरज होती. सीतेच्या शीलाला यत्किंचित धक्का लागला तर रामकथेचे नैतिक अधिष्ठानच कोसळून पडेल, ही वाल्मीकीची चिंता होती. काव्यात्म न्यायाचा (Poetic justice) विचार करता सीता शीलभ्रष्ट होणे योग्य नव्हते. भ्रष्ट झालेल्या सीतेला सोडवून आणण्यात रामालाही स्वारस्य उरले नसते. अपराध्याला देहदंडाची शिक्षा देऊन त्याने तिची सुटका केली असती, तरी कथा निर्जीव झाली असती. सीता शुद्ध आहे, अशी रामाची खात्री असूनही लोकापवादासाठी रामाने तिला अग्निदिव्य करावयास लावले आहेच. सीता ही सर्वस्वी निराधार, एकाकी, एकटी आणि बंदिस्त तर रावणाच्या हाती

---

६३. पहा शाप क्र. १२, १३.

अफाट सत्ता, अचाट पराक्रम, अनावर कामांधता व कामना–पूर्तीसाठी वाटेल ते अनन्वित कृत्य करण्याची तयारी–यातून मार्ग काढून वाल्मीकीला सीतेच्या शीलाचे संरक्षण करावयाचे होते.

## रावणाचे शाप

सीतेवर बलात्कार करण्यासाठी तिला लंकेला नेण्याची रावणाला आवश्यकता नव्हती. भर रस्त्यात उघडचावर स्त्रियांवर बलात्कार करण्याइतका तो निर्लज्ज होता. रावणाने स्वताच अमात्य महापार्श्वाजवळ कबुली दिली आहे.

**पितामहस्य भवनं गच्छन्तीं पुञ्जिकस्थलाम् ।**
**सा प्रसह्य मया भुक्ता कृता विवसना ततः ।।**

आकाशात असलेली अग्निज्वालाच की काय अशी पुंजिकस्थला नामक अप्सरा माझ्या भीतीने दबकत दबकत ब्रह्मदेवाच्या स्थानाप्रत जात असलेली मी पाहिली, बलात्काराने तिचा उपभोग घेतला आणि तिला वस्त्ररहित करून सोडून दिले[६४]. रंभेवरही त्याने भर रस्त्यात बलात्कार केला आहे.

**एवमुक्त्वा स तां रक्षो निवेश्य च शिलातले ।।**
**कामभोगाभिसंरक्तो मैथुनायोपचक्रमे ।–**

तेव्हा रावणाने तिला त्या शिलेवर बसवले आणि विषयोपभोगाकरिता उत्सुक झालेला तो रावण तिचा उपभोग घेऊ लागला[६५]. रावणाला सीतेवर बलात्कार करणे कोठेही शक्य असताना, त्याचेवर कोणतेही बंधन नसताना त्याने तिला लंकेत नेले, याचे कारण त्याला सीता भार्या म्हणून हवी होती, तिचा त्याला निरंतर उपभोग हवा होता. आपले वैभव दाखवून तिला आकर्षित करण्याची इच्छा होती आणि म्हणूनच अन्य स्त्रियांप्रमाणे त्याने सीतेवर बलात्कार केला नाही. रावणवधाला अनुकूल परिस्थिती प्राप्त होण्यासाठी सीतेचे लंकेतील वास्तव्य उपकारकच होते. रावणाने सीतेला लंकेला नेल्याने राम-रावण-युद्धाला सबळ कारण लाभले.

सीतेने पती म्हणून आपला स्वीकार करावा, यास्तव रावणाने केलेले अनुनयादी सारे प्रयत्न विफल झाले, इतकेच नव्हे तर तिने त्याची दाहक शब्दांत निर्भर्त्सना केली. रावणाने सीतेला क्रूर राक्षसींच्या जागत्या पहाऱ्यात बंदिस्त केले. तिच्या नखाचेही दर्शन कोणालाही घडू नये अशी व्यवस्था केली, तरीही त्याला पत्ता लागू न देता हनुमान आणि इंद्र यांनी तिची भेट घेऊन तिचे नैतिक धैर्य टिकवावयास साहाय्य केले. एवढचा कडेकोट बंदोबस्तात असताना सीता शीलभ्रष्ट झाली नसती तरच आश्चर्य. तिच्या तुटपुंज्या प्रतिकाराला रावणाने भीक घातली नसती,

---

६४. युद्धकाण्ड /१३;
६५. पहा– शाप क्र. ४६;

अशी परिस्थिती असताना सीतेपुढे केवळ दोनच पर्याय होते. आत्महत्या करणे किंवा रावणाच्या इच्छेला शरण जाणे.

## आत्महत्येचे प्रयत्न

रावण आपणाला ठार करील, अशी भीती सीतेला वाटत होती. त्याच्या हातून मृत्यू येण्यापेक्षा आत्महत्या करणे तिला अधिक श्रेयस्कर वाटत होते. जिवाला वैतागून आत्महत्येचे प्रयत्न तिने दोन वेळा केलेत.

**शोकाभितप्ता बहुधा विचिन्त्य सीताथ वेणीग्रथनं गृहीत्वा ।**
**उद्बद्धय वेण्युद्ग्रथनेन शीघ्रमहं गमिष्यामि यमस्य मूलम् ।।**

अशा प्रकारे शोकाने तप्त झालेल्या सीतेने नाना प्रकारे विचार केल्यानंतर आगवळ (वेणीग्रथन) हाती घेतला. आणि 'या आगवळाने मी सत्वर यमाचे समीप जाईन,' असे म्हणत वृक्षाची शाखा हाती धरून तिने आपला बेत तडीस नेण्याचा विचार केला होता. [६६] परंतु सीतेच्या व रामकथेच्याही सुदैवाने त्याच वेळी तिला काही शुभ शकुन घडले, त्यामुळे तिचे मनोधैर्य वाढले आणि तिने आपला बेत पुढे ढकलला. रामकथेच्या दृष्टीनेही रामाने रावणाचा वध करेपर्यंत सीता आणि रावण दोघेही जिवंत राहणे आणि सीता शीलभ्रष्ट न होणे आवश्यक असल्याने तिच्या जिवाला धोका उत्पन्न होणे कथेला मानवण्यासारखे नव्हते. शकुनांचा स्वाभाविक आणि यथोचित उपयोग करून वाल्मीकीने तिचा आत्महत्येचा एक प्रयत्न विफल केला. दुसऱ्या एका प्रसंगी सीता बंदिस्त असता तिने अन्नत्याग आरंभिला, तेव्हा ब्रह्मदेवाला चिंता उत्पन्न झाली. त्याने इंद्राला हविष्यान्न देऊन त्याची लंकेला रवानगी केली. काहीही न खातापिता अनंतकाळपर्यंत जिवंत ठेवण्याची किमया हविष्यान्नाचे ठायी असल्याने व त्याचा सीतेने स्वीकार केल्याने तिचा हाही प्रयत्न असफल झाला.

## पातिव्रत्याचे तथाकथित सामर्थ्य

तेव्हा रावणाच्या इच्छेपुढे मान तुकवण्याखेरीज अन्य काहीही करणे सीतेच्या हाती उरले नाही. रावणवध होईपर्यंत त्याच्या बंदिवासात असलेली सीता शीलभ्रष्ट न होता जिवंत कशी ठेवावयाची, ही वाल्मीकीपुढे विकट समस्या होती. भारतीय जीवनाच्या चौकटीत पातिव्रत्याला विलक्षण महत्त्व असल्याने आणि पतिव्रतेचे ठायी पातिव्रत्याच्या पालनाने असाध्य ते साध्य करण्याची अद्भुत शक्ती प्राप्त होत असते, अशी श्रद्धा असल्याने प्रतिकूल परिस्थितीतही पातिव्रत्याच्या सामर्थ्याने सीता शीलभ्रष्ट न होता लंकेत सहज राहू शकली असती, असे मानण्याची जी

---

६६. सुन्दरकाण्ड / २८

प्रवृत्ती आहे ती जितकी भाबडी तितकीच भ्रामक आहे, निराधार आहे. सीता (उत्तरकाण्डातील) अहल्या आणि द्रौपदी ह्या पंच पतिव्रतांतील तीन पतिव्रतांना शीलभ्रष्ट होण्याच्या संकटाला सामोरे जावे लागले आहे. त्यांपैकी एकीला म्हणजे अहल्येला संकटास बळी पडावे लागले असून सीता व द्रौपदी या दोघी संकटांवर मात करण्यात यशस्वी झाल्या, परंतु त्यांना मिळालेले हे यश हा त्यांच्या पातिव्रत्याचा प्रभाव आहे का अन्य कारणांनी त्यांची या संकटातून सुटका झाली आहे, हे नीट तपासून पहावयास हवे. गौतमाच्या वेषात आश्रमात आलेली व्यक्ती इंद्र आहे, परपुरुष आहे, हे अहल्येला माहीत नव्हते.

**'अज्ञानाद्धर्षिता विप्र त्वद्रूपेण दिवौकसा।** (उत्तरकाण्ड ३०/४०)

असे जे ती म्हणते ते खरे आहे असे मानले, तरी इंद्राचा प्रत्यक्ष स्पर्श झाल्यावरही तिला तो परपुरुष आहे हे कळू शकले नाही, असे कसे मानता येईल? तिच्या ठायी असलेले पातिव्रत्याचे तेज इंद्राला तिच्या शरीराला स्पर्श करण्यापासून दूर ठेवण्याइतके समर्थ नव्हते. हे तथाकथित तेज, सामर्थ्य जर खरोखरीच प्रभावी असते तर तिचा स्पर्श होताच इंद्राचे शरीर होरपळून जायला हवे होते. परंतु त्याला तिच्या पातिव्रत्यामुळे यत्किंचितही शिक्षा झालेली नाही. नंतरसुद्धा जी शिक्षा झाली आहे, ती एका तपस्व्याच्या–गौतमाच्या–तेजाने झाली आहे, पातिव्रत्याने नव्हे. हे जर खरे मानावयाचे नसेल तर उत्तरकांडातील अहल्येची कथा खोटी ठरते. बालकांडातील कथाच खरी मानली तर तिला इंद्र आला असल्याचे ठाऊक असल्याने ती व्यभिचारी ठरते. भीम जर अगोदर ठरविल्याप्रमाणे नृत्यशाळेत येऊन बसला नसता तर द्रौपदी कोणत्याही क्षणी कीचकाकडून भ्रष्ट झाली असती किंवा तिला मृत्यूला कवटाळावे लागले असते. द्रौपदीचे शील-संरक्षण झाले आहे, ते केवळ भीमाच्या बुद्धिचातुर्याने आणि अतुल पराक्रमाने, द्रौपदीच्या पातिव्रत्यामुळे नव्हे. अहल्या आणि द्रौपदी यांचे ठायी पातिव्रत्याचे काही तेज होते असे मानले तरी केवळ त्या सामर्थ्यावर स्वताचे शील-संरक्षण करण्याइतपत ते पुरेसे नव्हते, हे स्पष्ट आहे.

केवळ पातिव्रत्य स्त्रीच्या शीलाचे संरक्षण करण्यास पुरेसे पडू शकणार नाही, याची सीतेला मात्र कल्पना असावी, आणि शीलभ्रष्ट होण्यापेक्षा आत्महत्या करणे तिला अधिक योग्य वाटले असावे. तिचे आत्महत्येचे दोन्ही प्रयत्न अयशस्वी झाले, ही गोष्ट वेगळी. सीतेच्या ठायी पातिव्रत्याचे असामान्य तेज होते, असा मंदोदरीचा अभिप्राय आहे. रावणवधानंतरच्या विलापात ती म्हणते –

**अप्राप्यं तं चैव कामं मैथिलीसंगमे कृतम्।**
**पतिव्रतायास्तपसा नूनं दग्धोऽसि मे प्रभो।।**
**तदैव यन्न दग्धस्त्वं धर्षयंस्तनुमध्यमाम्।**
**देवा बिभ्यति ते सर्वे सेन्द्राः साग्निपुरोगमाः।।**

प्रभो, मिथिला-राजकन्येच्या समागमासंबंधाने जी इच्छा तू धारण केली होतीस, तीही परिपूर्ण न होता त्या पतिव्रतेच्याच तपश्चर्येच्या योगाने तू दग्ध झाला आहेस. ज्या वेळी तू त्या सुंदरीवर हात टाकण्यास उद्युक्त झालास त्या वेळीच तुझे भस्म होऊन जायचे. परंतु इंद्रासहवर्तमान अग्निप्रभृती सर्व देव ज्या मोठेपणामुळे तुला भीत होते, त्या मोठेपणाचे हे फल होय.[६७] एका पतिव्रतेने दुसऱ्या तुल्यबल अशा पतिव्रतेविषयी काढलेले हे प्रशंसेचे उद्‌गार कितीही आकर्षक वाटले, तरी त्यातील तथ्यांश पडताळून पाहावयास हवा. मंदोदरी म्हणते त्याप्रमाणे पतिव्रतेपाशी थोड्या फार प्रमाणात असे तेज, सामर्थ्य असते असे मानले, तर तिला स्वताला रावणाचा अधःपात अल्पांशाने तरी का टाळता आला नाही ? तिचे पातिव्रत्यही वादातीत आहे. तिच्या पातिव्रत्याविषयी शंका घ्यावी, असा एकही उल्लेख वाल्मीकी रामायणात नाही. सीतेचा स्पर्श होताच रावण दग्ध झाला नाही, ह्याचे कारण त्याचा मोठेपणा हे जर घटकाभर खरे मानले, तर विराधाने राम-लक्ष्मणाच्या देखत सीतेला ओढून आपल्या मांडीवर बसवले, त्या वेळी विराध दग्ध का झाला नाही ? त्याच्या ठायी कोणता मोठेपणा होता ? विराध एवढेच करून थांबला नाही

**कथं तापसयोर्वां च वासः प्रमदया सह ॥**
**अधर्मचारिणौ पापौ कौ युवां मुनिदूषकौ ।**
**इयं नारी वरारोहा मम भार्या भविष्यति ॥**

' तरुण स्त्री सहवर्तमान तुम्ही तपस्वी अरण्यामध्ये कसे रे वास्तव्य करता ? ह्या मुनिवेषाला विरुद्ध अशी आयुधे धारण करून एकाच स्त्रीचे ठिकाणी रत असलेले असे अधर्मनिष्ठ, पापी आणि मुनीच्या नावाला बट्टा लावणारे तुम्ही कोण ? वरण्यात योग्य असलेली ही स्त्री माझी भार्या होईल.' (अरण्यकाण्ड/२-११,१३) हे पतिव्रतेच्या कानांची अमर्यादा करणारे उद्‌गार ऐकू येताच सीतेच्या पातिव्रत्याचे तेज प्रकट का झाले नाही ? काक पक्षाच्या रूपाने आलेला इंद्रपुत्र सीतेच्या स्तनांशी लगट करत असतानाही सीतेचे पातिव्रत्याचे तेज प्रकट झालेले नाही, हे आश्चर्य वाटते. इंद्रपुत्राच्या शृंगारिक चाळ्यांचे सविस्तर वर्णन सीतेने स्वताच हनुमानाला सांगितले असल्याने ते अविश्वसनीय कसे म्हणता येईल ![६८] विराधासारख्या राक्षसाला शिक्षा करणे तर राहूच द्या, पण साध्या कावळ्याला हाकून लावणे सीतेला जमले नाही. तथाकथित पातिव्रत्याच्या तेजाचा प्रत्यय एकदाही न आल्याने मंदोदरीच्या उद्‌गाराची दखल विशेष गंभीरपणे घेण्याची आवश्यकता वाटत नाही.

---

६७. युद्धकाण्ड / १११
६८. सुन्दरकाण्ड / ३८

सीतेनेही आपल्या पातिव्रत्याच्या सामर्थ्याविषयी जे उद्गार काढले आहेत त्यांचेही खरेखोटेपण अजमावयास हवे.

असन्देशात्तु रामस्य तपश्चानुपालनात् ।
न त्वां कुर्मि दशग्रीव भस्म भस्मार्हतेजसा ।।

'रामाची आज्ञा नसल्यामुळे आणि तपाचे परिपालन कर्तव्य असल्यामुळे भस्म करण्यास समर्थ अशा पातिव्रत्य-तेजाच्या योगाने मी तुझे भस्म करून टाकत नाही'[६९] हा मराठी अनुवाद कै. काशिनाथशास्त्री लेले यांनी केला आहे. त्यातील 'पातिव्रत्य' शब्द बरोबर नाही. वाल्मीकीने पातिव्रत्याचा उल्लेख केलेला नाही; उलट तपश्चर्येचा मात्र स्पष्ट उल्लेख आहे. गीता प्रेस, गोरखपूर (हिंदी) आणि डॉ॰ श्रीनिवास अय्यंगार यांच्या (कन्नड) अनुवादांत 'पातिव्रत्या'चा उल्लेख नाही. सीतेची रावणाला भस्म करून टाकण्याची भाषा कितीही ओजस्वी असली तरी तशी कृती कोठेही प्रत्ययास येत नाही. शिवाय जर तिच्या ठायी काही सामर्थ्य असलेच, तर ते तपश्चर्येमुळे प्राप्त झाले असल्याची तिने स्वताच कबुली दिली आहे.

## रावणाचे बलात्कार

स्त्रियांवर बलात्कार करण्यात रावण केवळ पटाईतच नव्हता, तर सराईतही होता. लंकेतील आणि अन्य स्त्रियांचा त्याने मन मानेल तसा उपभोग घेतला. स्त्रियांना भ्रष्ट करणे, इच्छेनुरूप त्यांचा उपभोग घेणे यात काही गैर आहे, असे रावणाला कधी वाटलेच नाही. सीतेची मनधरणी करताना तो तिला म्हणतो–

स्वधर्मो रक्षसां भीरु सर्वदैव न संशयः ।
गमनं वा परस्त्रीणां हरणं सम्प्रमथ्य वा ।।

'अग भित्रे, बलात्काराने परस्त्रिया हरण करणे आणि त्यांचा उपभोग घेणे, हा राक्षसांचा सर्वदा स्वधर्मच आहे.'[७०] असे धर्मकृत्य करणाऱ्या रावणाच्या कामांधतेचाच स्त्रियांना त्याच्या क्रौर्यापेक्षा अधिक त्रास होत होता. स्त्रियांवर बलात्कार करताना त्याने त्यांच्या पतींची, आप्तेष्टांची पर्वा बाळगली नाही. त्यांना विधवा करून, त्यांच्या आप्तेष्टांना ठार मारून त्यांना त्याने सर्वस्वी निराधार करून सोडले. रावणाने भ्रष्ट केलेल्या अनेक साध्वी स्त्रिया ह्या श्रेष्ठ पतिव्रता होत्या. त्यांच्याबद्दलचेही मंदोदरीचे उद्गार बोलके आहेत–

यास्त्वया विधवा राजन्कृता नैकाः कुलस्त्रियः ।।
पतिव्रताधर्मरता गुरुशुश्रूषणे रताः ।
ताभिः शोकाभितप्ताभिः शप्तः परवशं गतः ।।

---

६९. सुन्दरकाण्ड / २२
७०. सुन्दरकाण्ड / २०

'राजश्रेष्ठा, ज्या अनेक कुलस्त्रिया तू विधवा करून सोडल्यास, त्या पतिव्रता धर्माविषयी तत्पर व गुरुसेवेविषयी उद्युक्त होत्या; आणि त्याच शोकसंतप्त झालेल्या स्त्रियांनी तुला शाप दिल्यामुळे तू शत्रूच्या तावडीत सापडलास.[७१] ह्या साध्वी स्त्रियांनी रावणाला शाप दिल्यावर स्वर्गातील दुंदुभी वाजू लागल्या आणि पुष्पवृष्टी झाली असेही वर्णन आहे.[७२] ह्या स्त्रियांच्या श्रेष्ठत्वाला अधिक प्रशस्तीची जरूरी नाही. परंतु इतके असूनही त्यांना आपल्या शीलाचे रक्षण करता आलेले नाही, ही वस्तुस्थिती आहे. ह्यावरून एवढाच निष्कर्ष निघतो की पातिव्रत्य, सद्वर्तन यांमुळे काही सामर्थ्य, तेज प्राप्त होत असले, तरी ते फार मर्यादित स्वरूपाचे असते. केवळ तेवढ्याच सामर्थ्याने स्त्रियांना आपले शीलसंरक्षण करणे, वरील उदाहरणांवरून तरी जमलेले दिसत नाही. पातिव्रत्य हे कितीही उच्च कोटीतील असले, तरी त्यामुळे स्वताचे शील सुरक्षित ठेवणे साध्य होते, असे नाही. ते तुटपुंजे ठरते.

## शाप/वर : योजनाचातुर्य

सीतेची सर्वस्वी निराधार व असह्य परिस्थिती लक्षात घेऊन वाल्मीकीने अत्यंत चातुर्याने रावणाच्या शापांची योजना करून सीतेचे शीलसंरक्षण साधले आहे. सीतेची शीलभ्रष्टता टाळण्याचा, शाप हा एक सहज, पटण्याजोगा व अत्यंत प्रभावी उपाय आहे, हे वाल्मीकीने हेरले. रावणाला मिळालेले शाप हे वाल्मीकीचे पूर्वनियोजन आहे. वाल्मीकी रामायणात रावणाला एकूण जे सात शाप दिलेले आढळतात, त्यातील चार परस्त्रीची अभिलाषा, बलात्कार यांच्याशी संबंधित आहेत. उपरिनिर्दिष्ट अनेक पतिव्रतांच्या शापांखेरीज ब्रह्मदेव व नलकूबर यांनी दिलेले दोन जबरदस्त शाप आणि वेदवतीची प्रतिज्ञा यांयोगे वाल्मीकीने रावणाच्या साऱ्या नाड्याच आवळून टाकल्या आहेत. त्यामुळेच सीता त्याच्या अगदी जवळ असूनही त्याच्यापासून फार दूर आहे, अप्राप्य आहे. केवळ तपक्षय होऊ नये, एवढ्याच कारणास्तव वेदवतीने रावणाला शाप देण्याचे टाळले असले, तरी तिने जी प्रतिज्ञा उच्चारली आहे, ती शापाहूनही अधिक दाहक आहे. वेदवती ही एक महान तपस्विनी तर होतीच, शिवाय तिने ही प्रतिज्ञा अग्निप्रवेश करताना — मृत्यूला कवटाळताना केलेली असल्याने तिची परिणामकारकता वाढली आहे. पुंजिकस्थलेवरील बलात्काराकरिता ब्रह्मदेवाने आणि रंभेवरील बलात्कारासाठी नलकूबराने रावणाला जे शाप दिले आहेत, त्याचे स्वरूप व परिणाम एकच आहेत,

---

७१. युद्धकाण्ड / १११
७२. उत्तरकाण्ड / २४
७३. शाप क्र. ३५, ४६ व ४३, पृ. ४७, ६४ व ५९,

फरक आहे तो केवळ तपशिलाचा. दोन्हीही शाप सशर्त आहेत. ह्या सर्व शापांत रावणाने जास्त धसका घेतला आहे तो ब्रह्मदेवाच्या शापाचा. त्याने आपली भीती महापार्श्व अमात्याजवळ स्पष्ट शब्दांत बोलून दाखविली आहे.

महापार्श्वाने रावणाला सीतेचा कुक्कुट रीतीने बलात्कार करून उपभोग घेण्यास सांगितले. होणाऱ्या परिणामाची पर्वा बाळगण्याचे त्याला काही कारण नाही, परिणामांना यशस्वी तोंड देण्याचे सामर्थ्य त्याच्याजवळ आहे, अशी त्याची प्रशंसाही केली. तेव्हा रावणाने त्याला विश्वासात घेऊन पुंजिकस्थलेवर केलेला बलात्कार व त्यासाठी ब्रह्मदेवाने दिलेला शाप, ही गुप्त गोष्ट सांगितली. [७४]

इत्यहं तस्य शापस्य भीतः प्रसभमेव ताम् ।
नारोहये बलात्सीतां वैदेहीं शयने शुभे ॥

'ह्याप्रमाणे ब्रह्मदेवाच्या शापाला मी अतिशय भिऊन गेलो असल्यामुळे त्या विदेह-कन्या सीतेचा शुभ शय्येवर उपभोग घेण्यास समर्थ नाही', अशी कबुली रावणानेच दिली आहे, त्यामुळे अन्य पुरावे गोळा करण्याची आवश्यकता उरत नाही. लंकेत राहूनही सीता शीलभ्रष्ट झाली नाही, याचे श्रेय तिच्या पातिव्रत्याच्या सामर्थ्याला देता येणार नाही. केवळ रावणाला मिळालेल्या शापांमुळे तिच्या शीलाचे संरक्षण झाले आहे.

## उपसंहार

ऐहिक सुखसंवर्धन आणि दुःखपरिहार यासाठी सतत प्रयत्नशील असणे ही एक बलवत्तर स्वाभाविक मानवी प्रवृत्ती आहे. आपले ईप्सित साध्य करून घेण्या-साठी मानव आपल्या साऱ्या शक्ती पणाला लावतो, परंतु जेव्हा त्यायोगे उद्दिष्ट साध्य होत नाही, अपेक्षित यश मिळत नाही, प्रयत्न विफल होतात, तेव्हा तो मानवेतर, अतिमानवी, महामानवी शक्तींकडे वळतो. विज्ञानाने आज अनेक असाध्य गोष्टी केवळ साध्यच करून दिल्या नसून त्या सहज, सुलभ प्राप्त करून दिल्या आहेत. मानवाचे ऐहिक जीवन अनेक अंगांनी आज सुखसमृद्ध केले आहे, तरीही मानवेतर शक्तीवरील मानवाची श्रद्धा संपूर्णपणे नष्ट झालेली नाही. मूठभर सुशिक्षित, सुसंस्कृत व बुद्धिनिष्ठांचा वर्ग सोडल्यास बहुसंख्य समाजाचा ह्या सामर्थ्यावर आजही विश्वास आहे. ऐहिक कामनापूर्तीसाठी सत्यनारायणाची पूजा केली जाते, नवस बोलले जातात, फेडले जातात, व्रत-वैकल्ये पाळली जातात, देवाला कौल लावला जातो. मठ-मंदिरातून होणारी भक्तांची गर्दी प्रामुख्याने ऐहिक कारणासाठीच होते, आत्मोन्नतीसाठी ह्या मार्गाकडे वळणाऱ्यांची संख्या हाताच्या बोटावर मोजण्या-इतकीही सापडणार नाही.

---

७४, युद्धकाण्ड / १३

व्यास, वाल्मीकीसारख्या श्रेष्ठ ऋषींनी आपल्या ग्रंथांतून शाप/वर यांची जी रेलचेल केली आहे, त्याचे कारण ही शाप/वरांची संकल्पना वर उल्लेखिलेल्या मानवी प्रवृत्तीशी निगडित आहे. ह्या ऋषींचे चातुर्य हे की त्यांनी शाप/वर हे कथेचे एक अविभाज्य असे अंग केले. त्यामुळे ते मुद्दाम घुसडलेले, कृत्रिम, उपरे वाटत नाहीत. काही शाप/वर असे आहेत की ते कथेपासून वेगळे करताच येत नाहीत. त्यांनी अत्यंत चपखलपणे त्यांची योजना केली आहे. श्री. म. रं. शिरवाडकर महाभारताच्या संदर्भात लिहितात– ' वर आणि शाप हा लेखकांचा कल्पना-विलास आहे, एक प्रकारचा अलंकार आहे. त्यांचा उगम कर्मवादाच्या सिद्धांतात आहे.'[७५] ह्या विधानाचा थोडचा विस्ताराने विचार करायला हवा. कल्पना-विलास किंवा अलंकार यांयोगे सौंदर्याची खुलावट होत असली, त्यांच्या अभावी सौंदर्यहानी होत असली, तरी ते अविभाज्य अंग होऊ शकत नाही. ते नेहमीच उपरे असतात, घालता–काढता येतात, म्हणून कृत्रिम आणि बाह्य असतात. अंतरंगाशी एकरूप, एकजीव होऊ शकत नाहीत. शाप/वर असे आहेत काय ? रामायणातील दशरथाने कैकेयीला दिलेले वर काढून टाकता येतील काय ? काढून टाकण्याचा प्रयत्न केल्यास काय उरेल ? ब्रह्मदेवाने रावणाला दिलेला वर आणि शाप हे अलंकार आहेत काय ? ह्यांच्या अभावी कथा उभी राहू शकेल काय? रावणाला ब्रह्मदेवाच्या शापाची केवढी भीती वाटत होती ते पाहिलेच आहे. हा शाप (जोडीला नलकूबराचाही शाप आणि वेदवतीची प्रतिज्ञा) नसता तर सीतेचे शील किती काळ सुरक्षित राहू शकले असते ? शाप/वर हे रामकथेत जर नसते, तर आपल्यापुढे जे रामायण आहे, ते तशा स्वरूपात साकार झालेच नसते. शाप/वर यांचा उगम केवळ कर्मवादाच्या सिद्धांतातून झाला नसून तो वर उल्लेखिलेल्या समाजाच्या प्रवृत्तीतून, मानवी स्वभावातून झाला आहे. मानवेतर शक्तीवरील मानवाची श्रद्धा नसती तर शाप/वर ही संकल्पना विश्वसनीय वाटली नसती. कर्मवादाचा सिद्धांत सर्वस्वी अव्हेरता येत नाही, परंतु त्याचे पोषण मानवाच्या विशिष्ट वृत्तीनेच झाले आहे.

शाप/वर यांची यथोचित, सुयोग्य आणि अकृत्रिम योजना करून वाल्मीकीने रामकथेला वेगळे परिमाण निर्माण करून दिले. नारदाला रामकथा वाल्मीकी पूर्वीही ज्ञात होती. त्यानेच ती वाल्मीकीला सांगितली. असे असता ती फारशी कुणाच्या ऐकण्यात नाही. नारदाच्या कथेत वरांचे तीन उल्लेख आले आहेत.[७६] यावरून शाप/वर ही संकल्पना रामायणपूर्व आहे हे स्पष्टच होते. वाल्मीकीने या संकल्पनेचा आपल्या प्रतिभेने सुयोग्य उपयोग करून रामकथेला सौष्ठव प्राप्त करून

---

७५. हस्तिनापूर.

७६. बालकाण्ड १/२२, ७६ व ८६

दिले. वाल्मीकीचे रामायण गेली कित्येक शतके भक्तांना, रसिकांना आकर्षित करीत आले आहे. जनमानसात ते खोलवर रुजले आहे. नारदाच्या कथेत वाल्मीकीने आपल्या प्रज्ञेने नवचैतन्य निर्माण केले आणि रामकथा चिरंजीवी केली.

रामायणाच्या सौंदर्याच्या अनेकविध पैलूंपैकी शाप/वर हाही एक विलोभनीय पैलू आहे आणि तो ठळकपणे निदर्शनास आणणे एवढाच ' **शापादपि वरादपि ।** '– चा हेतू आहे.

विजापूर

१ जानेवारी १९८७ **श्री. र. भिडे**

## १. वाल्मीकी < निषाद

बालकाण्ड/२

एकदा वाल्मीकी ऋषी आपल्या भरद्वाज नावाच्या शिष्यासह तमसा नदीकाठच्या वनात स्नानसंध्येस योग्य अशी जागा शोधत असता आधिव्याधिविरहित आणि विषयोपभोगासक्त असलेले क्रौंच पक्ष्यांचे एक जोडपे त्याला दिसले. तो त्याचे अवलोकन करीत असताही, त्याची पर्वा न करता, पापबुद्धी आणि म्हणूनच अकारण वैर करणाऱ्या एका निषादाने त्या जोडप्यापैकी नराचा वेध घेतला. बाण मर्मी लागल्याने तो तात्काळ जमिनीवर पडला. त्याचे सर्वांग रक्ताने माखले होते. प्राणांतिक वेदनांनी तडफडत असलेल्या आपल्या प्रियकराला पाहून त्याची सखी करुण स्वराने विलाप करू लागली. मस्तकी आरक्त वर्णाचा तुरा, संभोगासक्त, आणि अहोरात्र सन्निध असणारा आपला प्रियकर तशा अवस्थेत पाहून ती अत्यंत व्याकुळ झाली. त्याचा वियोग तिला सहन होईना. हे दृश्य पाहून वाल्मीकीला विलक्षण करुणा आली आणि रोदन करणाऱ्या त्या पक्षिणीला पाहून, काममोहित झालेल्या पक्ष्याचा वध करणे अधर्म आहे, हे जाणताच त्याच्या मुखातून पुढील उद्गार बाहेर पडले—

**मा निषाद प्रतिष्ठां त्वमगमः शाश्वतीः समाः ।**
**यत्क्रौञ्चमिथुनादेकमवधीः काममोहितम् ।। १५ ***

'हे निषादा, ज्या अर्थी क्रौंच पक्ष्यांच्या जोडप्यापैकी काममोहित झालेल्या एका पक्ष्याचा तू वध केला आहेस, त्या अर्थी तुझे पाय फारशी वर्षे भुईला लागणार नाहीत.'

---

* ह्या श्लोकाच्या विविध अनुवादांत बरीच भिन्नता दिसून येते.

१. पं. श्री. दा. सातवळेकर यांचा अनुवाद कै. काशिनाथशास्त्री लेले ह्यांच्या अनुवादाप्रमाणे असून त्यात एका अक्षराचाही फरक नाही.

(तळटीप पान ४ वर चालू)

हे पद्य उच्चारल्यानंतर मात्र वाल्मीकी चिताग्रस्त झाला. तपश्चर्येचा विघात करणारी शापवाणी आपल्या मुखातून बाहेर पडावी, याचे त्यास मनस्वी दुःख झाले. ‘ चरणबद्ध, अक्षरांनी सम म्हणजे छंद-शास्त्रोक्त, अक्षररचनादोषरहित आणि वीणा लावून वाद्यांसह गाण्यास योग्य असा जो श्लोक, मी शोकाकुल झाल्याने माझ्या तोंडातून सहज बाहेर पडला, तो अकीर्तिरूप न होता कीर्तिरूपच होवो ’, असे त्याने आपल्या शिष्याला सांगितले आणि त्याने अनुमतिदर्शक मान डोलावताच ऋषी संतुष्ट झाला, तत्रापि त्याच्या मनात तो श्लोक घोळतच राहिला. त्याच्या मनाची अस्वस्थता कमी झालेली नसता, साक्षात् ब्रह्मदेव वाल्मीकीच्या भेटीसाठी आला आणि म्हणाला– ‘ हा तू ग्रथित केलेला श्लोक यशोरूपच होईल, याविषयी संशय घेण्याचे प्रयोजन नाही. कारण

---

(तळटीप पान ३ वरून चालू)

२. वाल्मीकी रामायणाच्या डॉ. श्रीनिवास अय्यंगार ह्यांनी केलेल्या कन्नड अनुवादातील ह्या श्लोकाचा अर्थ कै. काशिनाथ शास्त्री लेले ह्यांच्या अर्थाशी जुळता–मिळता आहे.

३. ‘ हे निषादा, ज्या अर्थी क्रौंच जोडप्यातील काममोहित झालेल्या एकाला तू मारून टाकलेस, त्या अर्थी तुला यापुढे कधीही प्रतिष्ठा लाभणार नाही.’

—वाल्मीकी रामायण, समग्र मराठी अनुवाद, खंड १, पृ. ५
श्रीराम कोश मंडळ, पुणे

४. ‘ निषादा, तुला कधीही शांती मिळणार नाही; कारण तू क्रौंचाच्या या जोडप्यापैकी जो कामभावनेने मोहित झालेला होता अशा नराची काहीही अपराध नसताना हत्त्या केली आहेस.’

—डॉ. प्र. न. जोशी, सार्थ वाल्मीकी रामायण, खंड १

गीता प्रेस, गोरखपूरचा हिंदी अनुवादही अशाच अर्थाचा आहे.

५. No fame be thine for endless time,
Because, base outcast, of thy crime,
Whose cruel hand was fain to slay
One of this gentle pair at play !

—Ralph T. H. Griffith. Ramayan of Valmiki, Page 7

हे ब्रह्मन्, माझ्या इच्छेनेच तुझ्या ठिकाणी ही सरस्वती प्रवृत्त झाली आहे. म्हणून हे ऋषिश्रेष्ठा, तू रामाचे संपूर्ण चरित्र वर्णन कर. कारण जगतामध्ये तोच मनोहर असून विचारी, धर्मात्मा व भगवान असा तोच आहे. ह्यास्तव नारदापासून श्रवण केल्याप्रमाणे तू त्या बुद्धिप्रेरक रामाचे वृत्त कथन कर. लक्ष्मणासहवर्तमान तो विचारी राम, सर्व राक्षस आणि विदेहदेशाधिपतीची कन्या सीता ह्यांचे प्रसिद्ध अथवा अप्रसिद्ध असे जे काही चरित्र होईल, ते इतरांना जरी विदित नसले तरी तुला विदित होईल. ह्यासंबंधी तुझी वाणी यत्किंचितही असत्य होणार नाही. तस्मात् मनोहर व पुण्यदायक अशी श्लोकबद्ध रामकथा तू वर्णन कर. जोपर्यंत पर्वत व नद्या भूतलावर राहतील, तोपर्यंत रामायण कथा लोकामध्ये प्रचारात राहील आणि जोपर्यंत तू ग्रथित केलेली रामकथा लोकामध्ये राहील, तोपर्यंत (क्रोध केल्यामुळे) अधोभागी राहण्यासच योग्य असलेलाही तू सर्वांचे ऊर्ध्वभागी असलेल्या माझ्या लोकामध्ये वास्तव्य करशील.'

वाल्मीकीच्या मुखातून बाहेर पडलेला हा शापोद्गार रामायणासारख्या महाकाव्याच्या निर्मितीस कारणीभूत असल्याने, ह्या शापाचे महत्त्व अनन्यसाधारण आहे.

## २, ३. विश्वामित्र < मारीच, सुबाहू बालकाण्ड/१९

एकदा दशरथ राजा आपल्या मुलांच्या विवाहाविषयी मंत्रिमंडळाशी विचारविनिमय करीत असता विश्वामित्र त्याची भेट घेण्यासाठी आला. राजाने शास्त्रविहित असे त्याचे पूजन करून यथोचित स्वागत केले. ऋषीनेही राजाचे क्षेमकुशल व अभ्युदय याविषयी विचारपूस केली. वसिष्ठ व अन्य ऋषींची भेट घेतली. विश्वामित्राच्या आगमनाने दशरथास अतिशय आनंद झाला. त्याने विनयपूर्वक हात जोडून त्याच्या आगमनाचा उद्देश विचारला आणि त्याचे कोणतेही कार्य कितीही अवघड असले, तरी ते पूर्ण करण्याचे आश्वासन दिले. संतुष्ट होऊन विश्वामित्र म्हणाला, ' राजेन्द्रा, माझ्या मनातून जे काही सांगावयाचे आहे, ते सिद्धीस नेण्याविषयी तू मनाचा निश्चय कर व आपले वचन

खरे कर. मी यज्ञाकरिता दीक्षा घेतली असता यथेष्ट रूप धारण करणारे मारीच व सुबाहू नावाचे दोन राक्षस माझ्या यज्ञात विघ्ने निर्माण करून तो सिद्धीस जाऊ देत नाहीत. मी अनेक वेळा दीक्षाव्रत संपविण्याच्या बेतात आणले असता हे दोन राक्षस वेदीत रक्त-मासाचा सडा टाकीत असतात. ती यज्ञदीक्षा व तो यज्ञ अशा रीतीने नाश पावत असल्याने शांत होऊन मी तो प्रदेश सोडून जातो.

**न च मे क्रोधमुत्स्रष्टुं बुद्धिर्भवति पार्थिव ।। –७**
**तथाभूता हि सा चर्या न शापस्तत्र मुच्यते । –८**

'राजा, ते यज्ञकर्म करणाऱ्या पुरुषाने शाप देण्यास उद्युक्त होणे योग्य नसल्यामुळे शाप देऊन त्या राक्षसांचा नाश करण्याला माझे मन धजत नाही.' इतके बोलून 'त्या राक्षसांचे निर्दालन करण्यासाठी तू तुझ्या ज्येष्ठ पुत्राला–रामाला–माझ्या स्वाधीन कर. केवळ तोच त्या राक्षसांचा नाश करण्यास समर्थ आहे. मी त्याचे रक्षण करून नाना प्रकारे कल्याण करीन.' दशरथाने शब्द दिला असला तरी विश्वामित्राची विनंती मान्य करणे त्याला फार अवघड झाले. तो निरनिराळी कारणे सांगून टाळाटाळ करू लागला. तेव्हा विश्वामित्राला त्याचा विलक्षण राग आला. त्या वेळी वसिष्ठाने राजाची समजूत घालून रामाला विश्वामित्राबरोबर धाडण्यास सांगितले.

विश्वामित्राजवळ शाप देऊन राक्षसांचा नाश करण्याचे सामर्थ्य असूनही तो व्रतस्थ असल्याने त्याने तो दिला नाही. शाप दिला नसल्याने त्याचे स्वरूप स्पष्ट नाही.

## ४. अगस्त्य < मारीच बालकाण्ड/२५

विश्वामित्र रामाला ताटकेचा वृत्तान्त कथन करीत आहे.

पहा : शाप – अगस्त्य<ताटका पृ. ७ व ८

अगस्त्याने सुंदाला ठार केल्यावर मारीच त्याच्या अंगावर धावून गेला.

... यक्षी पुत्रं व्यजायत ।

मारीचं नाम दुर्धर्षं यः शापाद्राक्षसो ऽभवत् ।। ९

'यक्षिणीला अजिंक्य असा मारीच नामक एक पुत्र झाला. तो पुढे शापामुळे राक्षस बनला.'

## ५. अगस्त्य < सुंद — बालकाण्ड/२५

विश्वामित्र रामाला ताटकेचा वृत्तान्त कथन करीत असता या शापाचा उल्लेख आला आहे.

पहा : शाप – अगस्त्य < ताटका पृ. ७ व ८

सुंदाने काही अपराध केल्याने अगस्त्याने त्याला शाप दिला.

सुंदे तु निहते राम अगस्त्यमृषिसत्तमम् ।- १०

अगस्त्याने शाप दिल्याने सुंदाचा वध झाला.

सुंदाने नेमका कोणता अपराध केला होता व त्याला अगस्त्याने काय शाप दिला, हे स्पष्ट नाही.

## ६. अगस्त्य < ताटका — बालकाण्ड/२५

ताटकावनात प्रवेश करताना रामाला विश्वामित्र ऋषी ताटका-वृत्तान्त कथन करीत आहे.

सुकेतू नावाचा एक मोठा यक्ष होता. बलशाली असूनही त्यास अपत्य नव्हते. तेव्हा त्या सदाचारी यक्षाने मोठी तपश्चर्या केली. ब्रह्मदेव अतिशय संतुष्ट झाला. त्याने त्यास पुत्र न देता ताटका नावाचे एक कन्यारत्न दिले. ताटका अत्यंत रूपवती होती. यौवनदशा प्राप्त झाल्यानंतर जंभ-पुत्र सुंदाशी तिचा विवाह झाला. अगस्त्य ऋषीच्या शापामुळे सुंदाचा वध झाल्यावर ताटका क्रुद्ध झाली. आपल्या पुत्रासह

ती त्या ऋषीला भक्षण करण्याच्या हेतूने त्याच्यावर चाल करून गेली. तेव्हा अगस्त्याने तिच्या मुलाला 'राक्षस हो' असा शाप देऊन ताटकेलाही पुढीलप्रमाणे शाप दिला –

**पुरुषादी महायक्षी विकृता विकृतानना ।**
**इदं रूपं विहायाशु दारूणं रूपमस्तु ते ।। १३**

'हे तुझे रूप नाहीसे होऊन तुला सत्वर घोर रूप प्राप्त होईल, आणि तू महायक्षिणी शरीराने व चेहऱ्याने अक्राळ - विक्राळ होऊन माणसांना खाणारी राक्षसी होशील.'

शापामुळे क्रुद्ध झालेली राक्षसी क्रोधाधीन होऊन अगस्त्य मुनीचा संचार असलेला पवित्र देश उध्वस्त करू लागली.

## ७. १ < ताटकावन

**बालकाण्ड/२६**

विश्वामित्र रामाला ताटकेचा वृत्तान्त कथन करीत आहे.

अगस्त्याने शाप दिल्यानंतर ताटका त्याचा संचार असलेला पवित्र देश उध्वस्त करू लागली. तेव्हा त्या अत्यंत भयंकर दुराचरणी, बलाढ्य, इच्छेनुरूप पाहिजे ते रूप धारण करण्याचे सामर्थ्य असलेल्या यक्षिणीचा वध करण्याची विश्वामित्राने रामाला आज्ञा केली – 'शापग्रस्त झालेल्या या ताटकेचा वध करण्यास त्रैलोक्यात तुझ्यावाचून दुसऱ्या कोणत्याही पुरुषाचे सामर्थ्य नाही. स्त्रीवध करावा लागत आहे, म्हणून तू मनामध्ये दया आणू नको, कारण चारही वर्णांचे हित करण्याकरिता जे काही करणे अवश्य असेल, ते बरे असो, वाईट असो, पातकावह असो किंवा सदोष असो, ते राजपुत्राने केलेच पाहिजे. कारण राज्यकारभार ज्यांच्यावर सोपविलेला आहे, त्यांचा हा सनातन धर्मच आहे. म्हणून ह्या अधर्मनिष्ठ ताटकेचा वध कर.' अधर्माने वागणाऱ्या स्त्रीचा वध करणे वैध आहे, हे पटवून देण्यासाठी इंद्राने विरोचन दैत्याची कन्या मंथरा आणि विष्णूने भृगुपत्नी व शुक्रमाता यांचे वध

केल्याची उदाहरणे दिली. विश्वामित्राची आज्ञा पित्राज्ञा मानून राम ताटकेचा समाचार घेण्यास सिद्ध झाला. मायाबलाने ती अजिंक्य झाली होती. ती रामाच्या अंगावर धावून आली असता, स्त्रीवध योग्य नव्हे, असे मानून रामाने तिचे नाक-कान कापून तिला हतबल करण्याचे योजिले. परंतु ती जेव्हा पाषाण-वृष्टी करू लागली, तेव्हा रामाने तिचे हात बाणांनी छेदले आणि लक्ष्मणाने तिचे नाक-कान कापले. त्यामुळे तिला रूप बदलणे अशक्य झाले. शेवटी रामाने तिच्या वक्षस्थलावर बाण मारून तिला गतप्राण केले. ताटकेच्या वधाने इंद्रादी देवगण व विश्वामित्र संतोष पावले.

**उवास रजनीं तत्र ताटकाया वने सुखम् ।**
**मुक्तशापं वनं तच्च तस्मिन्नेव तदाहनि ।**
**रमणीयं विबभ्राज यथा चैत्ररथं वनम् ।। ३५**

'ती रात्र ताटकेच्या वनामध्ये त्याने सुखाने घालविली. तेव्हा शापमुक्त झालेले ते वन इंद्राच्या चैत्ररथ वनाप्रमाणे रमणीय होऊन त्याच दिवशी शोभू लागले.'

शापग्रस्त ताटकेच्या वास्तव्यामुळे ताटकावनही शापयुक्त झाले असावे, म्हणून ताटकेच्या वधाने ते शापमुक्त झाले, असे म्हटले आहे. ताटकावनाला कोणी व काय शाप दिला होता, याचा स्पष्ट उल्लेख नाही.

## ८. कुशकन्या < वायू बालकाण्ड/३२

मिथिला नगरीकडे जात असता वाटेत लागणाऱ्या प्रदेशांची माहिती जाणून घेण्याची इच्छा रामाने प्रकट केली. तेव्हा विश्वामित्र त्याला कुशकन्यांबद्दल सांगत आहे.

कुशनाभाला अत्यंत सुंदर अशा शंभर कन्या होत्या. एकदा त्या उत्कृष्ट अलंकार लेवून एका उपवनात नृत्य-गायनात दंग

झाल्या असता वायूच्या दृष्टीस पडल्या. त्यांचे अनुपम लावण्य व यौवन पाहून वायू काममोहित झाला. तो त्यांना म्हणाला – ' माझे तुमच्यावर मन बसले आहे. तुम्ही सर्वजणी माझ्या भार्या व्हा. मानवाचे यौवन हे अगदी चंचल असते. प्रतिक्षणी ते क्षीण होत जाते. तेव्हा माझ्याशी विवाहबद्ध होऊन तुम्ही चिरतारुण्य व अमरत्व प्राप्त करून घ्या. ' वायूच्या उद्धत बोलण्याचा त्यांना विलक्षण राग आला. त्या त्याला उपहासपूर्वक म्हणाल्या –

अन्तश्चरसि भूतानां सर्वेषां सुरसत्तम ।
प्रभावज्ञाश्च ते सर्वाः किमर्थमवमन्यसे ।। १९

कुशनाभसुता देव समस्ताः सुरसत्तम ।
स्थानाच्च्यावयितुं देवं रक्षामस्तु तपो वयम् ।। २०

मा भूत्स कालो दुर्मेधः पितरं सत्यवादिनम् ।
अवमन्य स्वधर्मेण स्वयं वरमुपास्महे ।। २१

पिता हि प्रभुरस्माकं दैवतं परमं च सः ।
यस्य नो दास्यति पिता स नो भर्ता भविष्यति ।। २२

' हे सुरश्रेष्ठा, तू प्राणिमात्रामध्ये संचार करणारा आहेस आणि आम्ही सर्वही तुझा प्रभाव जाणणाऱ्या आहो. तस्मात् तू आमची उगीच अवहेलना कशाकरिता करीत आहेस ? हे देवा, आम्ही कुशनाभाच्या कन्या आहो आणि हे सुरश्रेष्ठा, आमचा उपमर्द करण्यास प्रवृत्त झालेल्या तुझ्यासारख्या देवालाही देवत्वापासून च्युत करण्यास आम्ही समर्थ आहो. परंतु आम्ही तपाचे रक्षण करीत आहो आणि शाप दिला असता तपाचा क्षय होईल, म्हणून आम्ही ती गोष्ट मनात आणीत नाही. हे दुर्बुद्धे, सत्यवादी पित्याचा अवमान करून विषयवासना उत्कट झाल्यामुळे स्वेच्छेने पती वरण्यास आम्ही प्रवृत्त व्हावे, असा प्रसंग आमच्यावर कधीही न येवो. पिता हा आमचा प्रभू असून आमचे परम दैवतही तोच आहे. ह्यास्तव ज्या पुरुषाला आमचा पिता आम्हाला देईल, तोच आमचा भर्ता होईल. '

कुशकन्यांच्या या उद्गारांनी वायू अतिशय संतप्त झाला. त्या कन्यांच्या गात्रांत प्रविष्ट होऊन त्याने त्यांचा अंगभंग केला. त्यांचे सौंदर्य नष्ट होऊन त्या कुबडचा झाल्या.

प्रत्यक्षात शाप दिला नसल्याने त्याचे स्वरूप कळू शकत नाही.

## ९. उमा < देव बालकाण्ड /३६

हिमालयसुता उमा हिचे देवलोक व मनुष्यलोक यासंबंधीचे सविस्तर चरित्र जाणून घेण्याची इच्छा रामाने व्यक्त केली असता विश्वामित्र कथन करीत आहे –

उमा व शंकर यांची प्रदीर्घ रतिक्रीडा चालली असता शंभर दिव्य वर्षे लोटली, परंतु उमेला पुत्र प्राप्त झाला नाही. तेव्हा ब्रह्मदेवादी सर्व देवांना, त्यांच्या संयोगापासून उत्पन्न होणारे अपत्य कोण सहन करील, अशी चिंता उत्पन्न झाली. ते सर्वजण शंकराकडे जाऊन प्रार्थनापूर्वक म्हणाले – 'महादेवा, आपण ह्या जगताचे हित करण्याविषयी तत्पर आहा. आमच्यावर कृपा करा. आपले तेज ब्रह्मतेज-युक्त आहे, ते सहन करण्यास लोक समर्थ नाहीत. तेव्हा आपण आपले तेज तेजाच्याच योगाने धारण करा आणि सर्व लोकांचे रक्षण करा. हे जग जन–शून्य करू नका.' शंकराने देवांच्या विनंतीस अनुमती देऊन म्हटले, –'मी तेजाच्या योगाने उमेसहवर्तमान तेज धारण करीन, परंतु स्वस्थानापासून जे हे माझे अनुपम तेज (वीर्य) क्षुभित झाले आहे, ते कोणीतरी धारण करणे आवश्यक आहे.' क्षुभित झालेले तेज धारण करण्यास पृथ्वी तयार झाली. शंकराने आपले तेज सोडले. त्या योगाने पर्वत व वने यांसह पृथ्वी व्याप्त झाली. तेव्हा देवांनी अग्नीला तेजात प्रविष्ट होण्यास सांगितले. अग्नीने व्याप्त झालेले ते तेज श्वेतपर्वतरूप बनले आणि ते ज्या प्रदेशात प्रविष्ट झाले तो प्रदेश तेजस्वी शरांचे दिव्य वन झाला, व तेथे महातेजस्वी अग्नि-संभव कार्तिकेय जन्मास आला.

सर्व देवांनी संतुष्ट होऊन उमा - शंकराची प्रशंसा केली. परंतु रति-क्रीडेत देवांनी व्यत्यय आणल्यामुळे उमा अतिशय संतप्त झाली.

> समन्युरशपत्सर्वान्क्रोधसंरक्तलोचना ।
> यस्मान्निवारिता चाहं संगता पुत्रकाम्यया ।। २१
>
> अपत्यं स्वेषु दारेषु नोत्पादयितुमर्हथ ।
> अद्यप्रभृति युष्माकमप्रजाः सन्तु पत्नयः ।। २२

'पुत्रप्राप्तीच्या इच्छेने मी पतीशी संगत झाले असता, ज्या अर्थी तुम्ही मला समागमापासून निवृत्त केले, त्या अर्थी तुम्हाला आपल्या स्त्रियांचे ठिकाणी अपत्योत्पत्ती होणार नाही. आजपासून तुमच्या स्त्रिया संतानरहित होतील.'

उमेच्या शापामुळे सर्व देव दुःखित झाले.

## १०. उमा < पृथ्वी बालकाण्ड/३६

विश्वामित्र रामाला उमेविषयी कथन करीत आहे.

पहा : शाप उमा < देव पृ. ११ व १२.

देवांच्या विनंतीवरून शंकराने सोडलेले तेज (वीर्य) पृथ्वीने धारण केले. त्यामुळे उमा व शंकराच्या रतिक्रीडेत व्यत्यय आल्याने

> एवमुक्त्वा सुरान्सर्वाञ्शशाप पृथिवीमपि ।
> अवने नैकरूपा त्वं बहुभार्या भविष्यसि ।। २३
>
> न च पुत्रकृतां प्रीतिं मत्क्रोधकलुषीकृता ।
> प्राप्स्यसि त्वं सुदुर्मेधो मम पुत्रमनिच्छती ।। २४

ह्याप्रमाणे सर्व देवांना शाप देऊन तिने पृथ्वीलाही असा शाप दिला की – 'हे पृथ्वी, तुझे एकच स्वरूप कायम राहणार नाही. तू पुष्कळांची भार्या होशील. हे दुर्मती पृथ्वी, ज्या अर्थी मला पुत्र नसावा,

अशी तू इच्छा केलीस त्या अर्थी माझ्या क्रोधाने कलुषित झालेल्या तुला पुत्रसुख प्राप्त होणार नाही.'

११. १८१ बालकाण्ड/४३

विश्वामित्र रामाला गंगावतरणाची कथा सांगत आहे–

शिव-मस्तकावर पडलेल्या गंगेला त्याच्या जटा-मंडलातून बाहेर येण्यास मार्गच सापडेना. अनेक संवत्सर ती तेथेच अडकून पडली. तपाच्या योगाने तिने शंकराला संतुष्ट केले असता त्याने तिला बिंदू सरोवरात सोडले. ते शिव-मस्तकी पडलेले गंगाजल निर्मल व निष्काम असल्यामुळे भूतलावर शोभू लागले. तेथे वास्तव्य करणाऱ्या ऋषिगणांनी व गंधर्वांनी शिव-मस्तकावरून पडलेले उदक पवित्र मानून त्यामध्ये स्नान केले.

**शापात्प्रपतिता ये च गगनाद्वसुधातलम् ।। –२७**
**कृत्वा तत्राभिषेकं ते बभूवुर्गतकल्मषाः । –२८**

'शापामुळे जे स्वर्गापासून भ्रष्ट होऊन भूतलावर पडले होते, ते त्या गंगाजलात स्नान करून निष्पाप झाले.'

पापक्षालन झालेले लोक त्या जलाच्या योगाने पुण्यवान झाले व पुनरपि स्वर्गारोहण करून आपापल्या स्थानाप्रत गेले.

शापाचा केवळ उल्लेख आहे. स्वर्गातून कोण भ्रष्ट झाले होते व का भ्रष्ट झाले होते ? त्यांना शाप प्राप्त होण्याचे कारण काय ?– हे स्पष्ट नाही.

## १२. गौतम < इंद्र बालकाण्ड/४८

विश्वामित्र ऋषीच्या यज्ञरक्षणासाठी त्याच्याबरोबर वाटचाल करीत असता रामलक्ष्मण मिथिला नगरीजवळ आले. तेथे एक जुनाट, निर्जन परंतु रम्य असा आश्रम त्यांना दिसला. तेव्हा त्या आश्रमाविषयी अधिक माहिती जाणून घेण्याच्या हेतूने रामाने 'हा आश्रम पूर्वी कोणाचा होता आणि सांप्रत तो मुनिरहित, विजन अवस्थेत का आहे', अशी पृच्छा केली असता, विश्वामित्र कथन करीत आहे.

हन्त ते कथयिष्यामि शृणु तत्त्वेन राघव ।
यस्यैतदाश्रमपदं शप्तं कोपान्महात्मनः ।। १४

'रामा, कोणत्या महात्म्याच्या कोपामुळे या आश्रमाला शाप झाला आहे, ते मी तुला सांगतो. तू श्रवण कर', अशी प्रस्तावना करून विश्वामित्र म्हणाला –

स्वर्गातील आश्रमांप्रमाणे असलेला हा आश्रम गौतम मुनीचा आहे. अहल्येसह गौतमाने येथे अनेक संवत्सर तपश्चर्या केली. एकदा गौतम मुनी आश्रमात नाहीत, अशी संधी साधून गौतम-वेष-धारी इंद्र तेथे आला आणि अहल्येला म्हणाला –

ऋतुकालं प्रतीक्षन्ते नार्थिनः सुसमाहिते ।
संगमं त्वहमिच्छामि त्वया सह सुमध्यमे ।। १८

मुनिवेषं सहस्राक्षं विज्ञाय रघुनन्दन ।
मतिं चकार दुर्मेधा देवराज-कुतूहलात् ।। १९

अथाब्रवीत्सुरश्रेष्ठं कृतार्थेनान्तरात्मना ।
कृतार्थास्मि सुरश्रेष्ठ गच्छ शीघ्रमितः प्रभो ।। २०

आत्मानं मां च देवेश सर्वथा रक्ष गौतमात् ।
इन्द्रस्तु प्रहसन्वाक्यमहल्यामिदमब्रवीत् ।। २१

सुश्रोणि परितुष्टो ऽस्मि गमिष्यामि यथागतम् ।। २२

'हे अत्यंत सुंदरी, हे कृशोदरी, रतिसुखाची इच्छा करणारे लोक ऋतुकालाची पर्वा बाळगत नसतात. तुझ्याशी समागम करावा, अशी माझी इच्छा आहे.' हा गौतम मुनीचा वेष धारण करणारा इंद्र आहे, असे अहल्या समजली; परंतु देवराज इंद्र माझी अभिलाषा धरीत आहे, ह्याचे कौतुक वाटून त्या दुर्मतीने त्याच्याशी रममाण होण्याचे मनात आणले. समागम झाल्यानंतर प्रसन्न मनाने ती त्या सुरश्रेष्ठ इंद्राला म्हणाली– 'हे प्रभू सुरश्रेष्ठा, मी कृतकृत्य झाले. आता आपण येथून सत्वर जा आणि गौतम मुनीपासून आपल्या स्वताचे व माझे सर्व प्रकारे रक्षण करा.' ह्यावर हसत हसत इंद्र अहल्येला म्हणाला – 'हे सुंदरी, मी संतुष्ट झालो आहे. आता मी आपल्या मार्गाने परत जातो.'

गौतम मुनीची मनात धास्ती बाळगत तो लगबगीने पर्णकुटीबाहेर पडत असता महामुनी गौतम आश्रमात प्रविष्ट झाला. देव-दैत्यांनाही दुर्धर्ष, तपःसामर्थ्याने युक्त आणि अग्नीप्रमाणे तेजस्वी अशा गौतमाला पाहून इंद्राचा भीतीने थरकाप झाला. त्याचे मुख निस्तेज झाले. सारा प्रकार त्याच्या लक्षात आला आणि अत्यंत संतप्त होऊन तो म्हणाला–

**मम रूपं समास्थाय कृतवानसि दुर्मते ।**
**अकर्तव्यमिदं यस्माद्विफलस्त्वं भविष्यसि ।। २७**

'हे दुर्बुद्धे, माझा वेष धारण करून ज्या अर्थी तू हे निंद्य कृत्य केले आहेस, त्या अर्थी तू वृषणरहित होशील.'

क्रोधाने जळफळणाऱ्या महात्म्या गौतमाने शापवाणी उच्चारताच इंद्राचे दोन्ही वृषण भूमीवर गळून पडले.

नंतर वृषणहीन इंद्र भयभीत मुद्रेने सिद्ध, गंधर्व, चारण आणि अग्निप्रभृती देवांना म्हणाला– 'महात्म्या गौतमाच्या तपात विघ्न यावे, ह्यास्तव त्याला क्रोध आणून मी हे देवकार्य केले आहे. नाही तर उग्र तपश्चर्येच्या योगाने त्याने सर्व देव स्थानभ्रष्ट करून टाकले असते. क्रोधामुळे त्याने मला निष्फल करून टाकून अहल्येचाही शापपूर्वक त्याग केला आहे. अशा रीतीने त्याला मोठा शाप द्यावयाला लावून मी त्याचे तप

हरण केले आहे. तस्मात् ऋषिसमुदाय व चारण ह्यांसह मज देवकार्य करणाऱ्याला तुम्ही वृषणयुक्त करा.' (बालकाण्ड/४९)

इंद्राचे भाषण ऐकून अग्निप्रभृती मरुद्गणांसहवर्तमान देव पितृदेवाकडे जाऊन म्हणाले, 'हा मेष वृषणयुक्त आहे आणि गौतमाने इंद्राला वृषणरहित केले आहे. तरी मेषाचे वृषण तुम्ही इंद्राला सत्वर द्या. तुमचे हविर्द्रव्य म्हणून कल्पिलेल्या वृषणरहित मेषाच्या योगाने तुम्हाला पराकाष्ठेचा आनंद होईल. तुमच्या संतोषाकरिता जे मानव तुम्हाला वृषणरहित मेष अर्पण करतील, त्यांनाही तुम्ही मोठे अक्षय फल द्या.'

अग्नीचे भाषण ऐकून पितृदेव एकत्र आले व त्यांनी मेषाचे वृषण उपटून इंद्राला लावले. गौतमाच्या प्रभावाने व तपाने तेव्हापासून इंद्र 'मेष-वृषण' बनला. (बालकाण्ड/४९)

### उत्तरकाण्ड/३०

ब्रह्मदेवाने इंद्राला वैष्णवयाग करण्याविषयी जी प्रेरणा दिली, तिच्याविषयी अगस्त्य ऋषी रामाला कथन करीत असता गौतमाने इंद्राला दिलेल्या शापाचा उल्लेख आला आहे. ब्रह्मदेवाने निर्माण केलेली रूपगुणसंपन्न अहल्या, गौतमाचे जितेंद्रियत्व आणि उग्र तपश्चर्या पाहून प्रथम ठेव म्हणून व पुढे भार्या म्हणून गौतमाला दिली. हे पाहून इंद्रादी देव निराश झाले. इंद्र तर मनातून अहल्येला स्वताची पत्नीच समजत होता. विषयवासनेने त्याचे अंतःकरण ग्रस्त झाल्याने एकदा गौतम आश्रमात नाही, असे पाहून कामांध व क्रुद्ध होऊन इंद्राने अहल्येवर बलात्कार केला. गौतमाला हे कळताच त्याने इंद्राला शाप दिला.

यस्मान्मे धर्षिता पत्नी त्वया वासव निर्भयात् ।
तस्मात्त्वं समरे शक्र शत्रुहस्तं गमिष्यसि ।। ३२
अयं तु भावो दुर्बुद्धे यस्त्वयेह प्रवर्तितः ।
मानुषेष्वपि लोकेषु भविष्यति न संशयः ।। ३३
तत्राधं तस्य यः कर्ता त्वय्यर्धं निपतिष्यति ।
न च ते स्थावरं स्थानं भविष्यति न संशयः ।। ३४
यश्च यश्च सुरेन्द्रः स्याद्ध्रुवः स न भविष्यति ।
एष शापो मया मुक्त इत्यसौ त्वां तदाब्रवीत् ।। ३५

'इंद्रा, ज्या अर्थी तू निःशंकपणे माझ्या पत्नीचा उपभोग घेत-लास, त्या अर्थी समरांगणामध्ये तू शत्रूच्या हस्तगत होशील. परंतु हे दुर्बुद्धे, हे जे पापकर्म तू ह्या जगामध्ये प्रवृत्त केलेस ते मनुष्य-लोका-मध्येही सुरू होईल. त्या मनुष्य-लोकामध्ये ते जारकर्म जो करील, त्याला त्या कर्माचे अर्धे पातक लागेल. त्या कर्माचा प्रवर्तक तू असल्यामुळे अर्धे पातक तुला लागेल; आणि तुला अक्षय्य स्थान निःसंशय प्राप्त होणार नाही. जो जो देवराज होईल, तो स्थिर होणार नाही '– हा शाप मी दिला आहे.

दोन्ही ठिकाणी दिलेले शाप भिन्न आहेत. इंद्राला मेषवृषण प्राप्त झाले आहेत, ते त्याने पितृदेवांना केलेल्या विनंतीचे फल आहे, उःशाप नाही. त्याने गौतमाजवळ उःशाप मागितला नाही व गौतमाने तो दिला नाही.

## १३. गौतम < अहल्या बालकाण्ड/४८–४९

पहा – गौतम < इंद्र शाप, पृ. १४–१५

इंद्राला शाप दिल्यानंतर गौतमाने आपल्या भार्येला – अहल्ये-लाही शाप दिला.

इह वर्षसहस्राणि बहूनि निवसिष्यसि ।। –२९

वातभक्षा निराहारा तप्यन्ती भस्मशायिनी ।
अदृश्या सर्वभूतानामाश्रमे ऽस्मिन्वसिष्यसि ।। ३०

यदा त्वेतद्वनं घोरं रामो दशरथात्मजः ।
आगमिष्यति दुर्धर्षस्तदा पूता भविष्यसि ।। ३१

तस्यातिथ्येन दुर्वृत्ते लोभमोहविवर्जिता ।
मत्सकाशं मुदा युक्ता स्वं वपुर्धारयिष्यसि ।। ३२

'इतर कसल्याही प्रकारचा आहार न करता केवळ वायुभक्षण करून व राखेत पडून राहून तू हजारो वर्षे ह्या ठिकाणी पीडायुक्त होऊन राहशील. इतकेच नव्हे, परंतु स्वताच्या रूपाने कोणत्याही प्राण्याच्या दृष्टोत्पत्तीस न येता तू ह्या आश्रमात पडून राहशील.

दशरथपुत्र दुर्धर्ष राम, जेव्हा ह्या घोर वनामध्ये येईल, तेव्हा हे दुराचारिणी, लोभमोह-रहित बनलेली अशी तू त्याच्या आदरातिथ्याने शुद्ध होशील आणि शुद्ध झाल्यावर स्वताचे रूप धारण करून आनंदाने माझ्या समीप राहशील.'

विश्वामित्राच्या आज्ञेनुसार रामाने तपामुळे जिची प्रभा चोहोकडे फाकली आहे, अशा त्या महाभाग्यवती अहल्येला अवलोकन केले. राम-दर्शन होईपर्यंत ती गौतमाच्या शापामुळे कोणाच्याही दृष्टीस पडणे अशक्य होते; परंतु शापमुक्त झाल्यावर ती सर्वांना दिसू शकली. ती अत्यंत तेजस्वी दिसत होती. राम-लक्ष्मणांनी आनंदाने तिचे पाय धरले व तिनेही त्यांना अभिवंदन केले. अर्घ्यपाद्यपूर्वक यथाविधी कर्माने तिने त्यांचे आतिथ्य केले व राम-लक्ष्मणांनीही त्याचा स्वीकार केला. महा-तेजस्वी गौतम मुनी अहल्येसह सुखी झाला. गौतमाच्या पूजेचा स्वीकार करून रामाने मिथिला नगरीकडे प्रयाण केले.

### उत्तरकाण्ड/३०

इंद्राला शाप दिल्यानंतर गौतमाने आपल्या भार्येची–अहल्येची–निर्भर्त्सना केली.

दुर्विनीते विनिध्वंस ममाश्रमसमीपतः ।। –३६

रूपयौवनसंपन्ना यस्मात्त्वमनवस्थिता ।
तस्माद्रूपवती लोके न त्वमेका भविष्यसि ।। ३७

रूपं च ते प्रजाः सर्वा गमिष्यन्ति न संशयः ।– ३८

'हे दुराचारिणी, माझ्या आश्रमाजवळच तुझा विध्वंस होवो. ज्या अर्थी रूप व यौवन ह्यांनी संपन्न असलेली तू स्थिर राहिली नाहीस

त्या अर्थी जगतामध्ये तू एकटीच रूपवती राहणार नाहीस. ज्या अर्थी एके ठिकाणीच सौंदर्य असल्यामुळे हा अनर्थ उपस्थित झाला आहे, त्या अर्थी सर्व प्रजाजन तुझें रूप वाटून घेतील, ह्यात संशय नाही.'

गौतम मुनीची कृपा व्हावी म्हणून ती म्हणाली,

अज्ञानाद्धर्षिता विप्र त्वद्रूपेण दिवौकसा ।
न कामकाराद्विप्रर्षे प्रसादं कर्तुमर्हसि ।। ४०

'हे विप्र, देवाने आपले रूप धारण केलेले मला न समजल्यामुळे त्याने माझा उपभोग घेतला आहे, माझ्या इच्छेने त्याला माझा उपभोग घडलेला नाही. ह्यास्तव हे ब्रह्मर्षे, आपण मजवर कृपा करावी.'

अहल्येची प्रार्थना ऐकून गौतम तिला म्हणाला –

उत्पत्स्यति महातेजा इक्ष्वाकूणां महारथः ।।-४१

रामो नाम श्रुतो लोके वनं चाप्युपयास्यति ।
ब्राह्मणार्थे महाबाहुर्विष्णुर्मानुषविग्रहः ।। ४२

तं द्रक्ष्यसि यदा भद्रे ततः पूता भविष्यसि ।
स हि पावयितुं शक्तस्त्वया यद्दुष्कृतं कृतम् ।। ४३

तस्यातिथ्यं च कृत्वा वै मत्समीपं गमिष्यसि ।
वत्स्यसि त्वं मयासार्धं तदा हि वरवर्णिनि ।। ४४

'इक्ष्वाकूंमध्ये महारथी व महातेजस्वी असा एक पुरुष उत्पन्न होईल; राम म्हणून तो जगतात प्रसिद्ध होईल; आणि मनुष्यरूप धारण केलेला तो महापराक्रमी विष्णू ब्राह्मणांकरिता या वनामध्येही येईल. हे कल्याणी, त्याचे दर्शन जेव्हा तुला होईल, तेव्हा तू पवित्र होशील. कारण, तू जे दुष्कर्म केले आहेस, त्याबद्दल शुद्धी करण्याचे सामर्थ्य त्याला आहे. त्याचे आदरातिथ्य केल्यानंतर तू माझ्या समीप येशील; आणि हे वरवर्णिनी, तेव्हा तू माझ्यासहवर्तमान वास्तव्य करशील.'

दोन स्थळी आलेल्या या शापांत बराच फरक आहे. बालकांडातील शापाच्या उत्तरभागात उःशाप अंतर्भूत आहे. अहल्येनें

उःशाप मागितला नसताही तो गौतमाने आपणहून दिला असल्याने अयाचित आहे. उत्तरकांडातील शापात अहल्येने गौतमाची प्रार्थना करून तिच्यावर कृपा करण्याची विनंती केली असता, त्याने उःशाप दिला असल्याने तो याचित उःशाप आहे.

## १४. वसिष्ठपुत्र < त्रिशंकू बालकाण्ड/५८

शतानंद रामाला विश्वामित्राचे पूर्ववृत्त सांगत आहे.

ब्रह्मर्षिपदाच्या प्राप्तीसाठी विश्वामित्राने घोर तपश्चर्या केली. त्यामुळे ब्रह्मदेव संतुष्ट झाला व त्याने त्याचा ' राजर्षी ' म्हणून गौरव केला. ब्रह्मर्षिपद न मिळाल्याने खिन्न झालेल्या विश्वामित्राने पुनश्च तपश्चर्या आरंभिली. त्या वेळी इक्ष्वाकुकुलवर्धक त्रिशंकू नावाचा राजा राज्य करीत होता. तो सत्यवादी व जितेंद्रिय असून त्याला सदेह स्वर्गाला जाण्याची इच्छा होती. त्याने आपला मनोदय कुलोपाध्याय वसिष्ठाला सांगितला असता ' असे होणे शक्य नाही ' असा स्पष्ट अभिप्राय त्याने व्यक्त केला. तेव्हा राजा दक्षिणेकडे तपसाधना करणाऱ्या वसिष्ठपुत्रांकडे गेला. त्याने आपल्या येण्याचा उद्देश आणि वसिष्ठाने दिलेला नकार कथन करून त्याच्या यज्ञाचे पौरोहित्य स्वीकारण्याची त्यांना विनंती केली. गुरूने नकार दिल्याने गुरुपुत्रांना शरण आलो असल्याचेही सांगितले. परंतु गुरुपुत्रांनी त्याची विनंती धुडकावून लावली. ज्या गोष्टीला वसिष्ठाने नकार दिला आहे, असे काही करणे म्हणजे त्याचा साक्षात् अवमान आहे, अशी त्यांची श्रद्धा होती. त्यामुळे त्यांना त्रिशंकूचे बोलणे उपमर्दकारक वाटले. ते त्याच्यावर अतिशय संतापले, तेव्हा तो म्हणाला – ' ज्या अर्थी गुरु आणि गुरुपुत्र माझा त्याग करीत आहेत, त्या अर्थी मी आता दुसऱ्याचा आश्रय घेतो. '

**ऋषिपुत्रास्तु तच्छ्रुत्वा वाक्यं घोराभिसंहितम् ।।–८**

**शेपुः परमसंक्रुद्धाश्चण्डालत्वं गमिष्यसि । – ९**

" राजाचे भाषण श्रवण केल्याबरोबर ते गुरुपुत्र अतिशय क्रुद्ध झाले आणि 'तू चाण्डाल होशील' असा त्यांनी त्याला शापही दिला."

ती रात्र संपल्यावर त्रिशंकू राजा चाण्डाल बनला. त्याचे शरीर व वस्त्र नीलवर्ण झाले. देहाची कांती रुक्ष होऊन मस्तकीचे केस आखूड झाले. भस्मरूप उटी त्याच्या शरीरावर दिसू लागली. अंगावर धारण केलेली भूषणे लोहमय बनली. तो विश्वामित्राकडे गेला आणि सर्व वृत्तान्त कथन केला. तेव्हा त्याची दया येऊन विश्वामित्राने त्याचे रक्षण करण्याचे व त्याची इच्छा पूर्ण करण्याचे आश्वासन दिले.

## १५. विश्वामित्र < वसिष्ठपुत्र, महोदय बालकाण्ड/५९

शतानंद रामाला विश्वामित्राने वसिष्ठ–पुत्रांना दिलेल्या शापाविषयी सांगत आहे.

कुलोपाध्याय वसिष्ठ व त्याच्या शंभर मुलांनी त्रिशंकू राजाच्या यज्ञाला नकार दिल्यानंतर तो विश्वामित्राकडे गेला आणि गुरू व गुरुपुत्रांनी दिलेला नकार, सदेह स्वर्गाला जाण्याची त्याची इच्छा व ती पूर्ण करण्यासाठी कृपा करावी इत्यादी सारे सविस्तर कथन करून त्याने विश्वामित्राला त्याच्या यज्ञाचे अध्वर्युपद स्वीकारण्याविषयी कारुण्यपूर्ण विनंती केली. विश्वामित्राला त्याची दया आली व तो म्हणाला – 'वत्सा, तू अत्यंत धार्मिक आहेस, हे मला माहीत आहे. मी तुझे रक्षण करीन. पुण्यकर्म करणाऱ्या सर्व महर्षींना तुझ्या यज्ञाला आमंत्रित करून तुझी इच्छा मी पूर्ण करीन. गुरुशापामुळे तुला प्राप्त झालेल्या शरीरासह तू स्वर्गाला जाशील.'

विश्वामित्राने आपल्या शिष्यांना यज्ञ सामग्रीची जुळवाजुळव करण्यास सांगून वसिष्ठपुत्रांसह सर्व ऋत्विजांना आमंत्रण धाडले. आणि 'माझा निरोप ऐकून जो कोणी जे काय बोलेल ते निंदात्मक असले तरीही जसेच्या तसे' येऊन सांगण्याची आज्ञा केली. विश्वा-

मित्राच्या आमंत्रणानुसार अनेक ब्रह्मवेत्ते यज्ञासाठी आले. महोदयादी वसिष्ठपुत्र मात्र आले नाहीत. वसिष्ठपुत्रांचे भाषण विश्वामित्राच्या शिष्यांनी त्याला जसेच्या तसे सांगितले – ' ज्याचा आणि विशेषकरून ज्या चांडालाचा याजक क्षत्रिय आहे, त्याच्या यज्ञामध्ये देव व ऋषी हविर्भाग कसा ग्रहण करतील ? अथवा विश्वामित्र जरी पालन करणारा असला तरी चांडालाचे अन्न भक्षण करून महात्मे ब्राह्मण तरी स्वर्गाला कसे जातील ? ' – हे उद्‌गार ऐकून विश्वामित्र क्रोधाने आरक्तवर्ण झाला आणि त्याच्या तोंडून पुढील शब्द बाहेर पडले –

यद्‌दूषयन्त्यदुष्टं मां तप उग्रं समास्थितम् ।। –१७

भस्मीभूता दुरात्मानो भविष्यन्ति न संशयः ।
अद्य ते कालपाशेन नीता वैवस्वतक्षयम् ।। १८

सप्तजातिशतान्येव मृतपाः सम्भवन्तु ते ।
श्वमांसनियताहारा मुष्टिका नाम निर्घृणाः ।। १९

विकृताश्च विरूपाश्च लोकाननुचरन्त्विमान् ।
महोदयश्च दुर्बुद्धिर्मामदूष्यं ह्यदूषयत् ।। २०

दूषितः सर्वलोकेषु निषादत्वं गमिष्यति ।
प्राणातिपातनिरतो निरनुक्रोशतां गतः ।। २१

दीर्घकालं मम क्रोधाद्‌दुर्गतिं वर्तयिष्यति ।–२२

' ज्या अर्थी उग्र तपश्चर्येचे अवलंबन करून असलेल्या मज निर्दोष मुनीला हे दोष लावीत आहेत, त्या अर्थी ह्या दुरात्म्यांचे निःसंशय भस्म होऊन जाईल. आज कालपाशाच्या योगाने ते यमसदनी पोहोचते होतील आणि मृतांवर उपजीविका करून सातशे जन्मपर्यंत ते राहतील. सारांश श्वानमास हाच त्यांचा आहार राहील आणि निर्दय, कुरूप व अक्राळ–विक्राळ असे ते डोंब होऊन ह्या लोकामध्ये संचार करतील. त्याचप्रमाणे मी दूषणास योग्य नसताही ज्या अर्थी दुर्बुद्धी महोदयाने मला दूषण दिले आहे, त्या अर्थी सर्व लोकामध्ये दूषित होऊन तो निषादाचे जन्मास येईल. निर्दय बनल्यामुळे [illegible] प्राण घेण्या-

विषयी तो उद्युक्त राहील. अशा रीतीने माझ्या क्रोधामुळे पुष्कळ काळ लोटेपर्यंत त्याला दुःखद स्थिती प्राप्त होईल.'

## १६. विश्वामित्र < (त्रिशंकूच्या यज्ञासाठी आमंत्रित) ऋषी

बालकाण्ड/६०

विश्वामित्राने त्रिशंकूसाठी केलेल्या यज्ञाविषयी शतानंद रामाला सांगत आहे.

वसिष्ठपुत्रांना शाप दिल्यानंतर त्यांचा नाश झाला, असे समजून त्रिशंकू राजाला सदेह स्वर्गप्राप्ती व्हावी, ह्या उद्देशाने सुरू केलेल्या यज्ञाला त्याच्या आमंत्रणानुसार आलेल्या अन्य ऋषींनाही त्याने प्रारंभ करण्यास सांगितले. तेव्हा त्याचे बोलणे ऐकून सर्व धर्मज्ञ ऋषी एकत्र आले आणि आपापसात बोलू लागले, 'हा कुशिक वंशज मुनी पराकाष्ठेचा कोपी आहे, तेव्हा याने जे सांगितले आहे, ते योग्य रीतीने आपणास तडीस नेले पाहिजे. कारण आपण जर असे केले नाही तर–

अग्निकल्पो हि भगवाञ्शापं दास्यति रोषतः ।।–६

अग्नितुल्य भगवान् विश्वामित्र क्रोधाने आपणाला शाप देईल.'

विश्वामित्राच्या तेजाने त्रिशंकू सदेह स्वर्गाला जाईल. यज्ञाला आरंभ करणे भाग आहे, हे जाणून त्यांनी प्रारंभ केला.

प्रत्यक्षात हा शाप दिलेला नाही. विश्वामित्राच्या आज्ञेचे यथायोग्य पालन न केल्यास तो शाप देईल, ही भीती व्यक्त केली आहे. त्यामुळे शापाचे स्वरूप कळू शकत नाही.

हा शाप सशर्त आहे.

## १७. विश्वामित्र < (त्याचे) पुत्र बालकाण्ड/६२

शतानंद रामाला शुन:शेपाचे वृत्त कथन करीत आहे.

अयोध्यापती महात्मा अंबरीष याने यज्ञाला आरंभ केला असता त्याच्या यज्ञाचा पशू इंद्राने हरण करून नेला. हे राजाच्या पातकामुळे घडले असावे, असा पुरोहिताचा समज झाल्याने त्याने नरपशू आणण्यास सांगितले. राजाने नरपशू मिळवण्यास बरेच प्रयत्न केले, परंतु द्रव्याच्या मोबदल्यात कोणीही आपला पुत्र देण्यास तयार होईना. अनेक प्रदेशांचे आलोडन करीत राजा हजारो गाई बरोबर घेऊन भृगुतुंग पर्वतावर गेला. तेथे ऋचीक ऋषी आपल्या भार्येसह होता. राजाने एक लक्ष गाईंच्या मोबदल्यात यज्ञार्थ त्याला त्याचा मुलगा देण्याची विनंती केली. तेव्हा ज्येष्ठ पुत्र विकण्यास ऋषीने व आवडता असल्याने कनिष्ठ पुत्र देण्यास ऋषिपत्नीने नकार दिला. मधला मुलगा शुन:शेप आपणहून तयार झाला. ऋषीला रत्नांच्या राशी, सुवर्ण, एक लक्ष गाई इत्यादी देऊन अंबरीषाने यज्ञासाठी नरपशू मिळवला. त्याला घेऊन अंबरीष जात असता वाटेत शुन:शेपाचा मामा–विश्वामित्र–तपश्चर्या करीत असलेला दिसला. शुन:शेप मनात दु:खी झाला होता. तो विश्वामित्राला शरण जाऊन म्हणाला– ‘मला आई, बाप, बांधव नाहीत. आपण धर्माने माझे रक्षण करा. अंबरीष राजाही कृतकृत्य व्हावा आणि मीही दीर्घायू होऊन स्वर्गाला जावे, अशी माझी इच्छा आहे. आपण पित्याच्या नात्याने मला संकटापासून वाचवा.’ अंबरीषाचा यज्ञ पूर्ण व्हावा आणि शुन:शेपाचेही रक्षण व्हावे, या हेतूने प्रेरित होऊन विश्वामित्र आपल्या मुलांना म्हणाला– ‘पारलौकिक हिताकरिता शुभेच्छू पितर पुत्र उत्पन्न करतात. हा ऋषिपुत्र बालक माझ्या हातून रक्षणाची इच्छा करीत आहे, तरी तुम्ही जीवदान देऊन याचा मनोरथ शेवटास न्या. तुम्ही सत्कर्म करणारे व धर्मनिष्ठ आहात. तुम्ही पशू बनून अंबरीष राजाचा यज्ञाग्नी तृप्त करा. म्हणजे देवता तृप्त होतील, यज्ञ निर्विघ्नपणे पार पडेल आणि शुन:शेप सनाथ होईल.’ विश्वामित्राचे भाषण ऐकून मधुच्छंदादी त्याचे पुत्र हसत हसत म्हणाले– ‘हे प्रभो, तू आपल्या मुलांना खर्ची घालून दुसऱ्याच्या पुत्राचे कसे रक्षण करीत आहेस ? हे तुझे करणे भोजनात

श्वानाचे मास स्वीकारल्याप्रमाणे अयोग्य दिसत आहे.' आपल्या आज्ञेचे उल्लंघन करणारे आपल्या मुलांचे भाषण ऐकून विश्वामित्र अत्यंत संतप्त झाला आणि म्हणाला–

निःसाध्वसमिदं प्रोक्तं धर्मादपि विगर्हितम् ।
अतिक्रम्य तु मद्वाक्यं दारुणं रोमहर्षणम् ।। १६

श्वमांसभोजिनः सर्वे वासिष्ठा इव जातिषु ।
पूर्णं वर्षसहस्त्रं तु पृथिव्यामनुवत्स्यथ ।। १७

'तुम्ही जे हे माझ्या आज्ञेचे उल्लंघन करून अंगावर काटा आणण्यासारखे भयंकर भाषण केले आहे, ते माझे भय न बाळगता केले आहे, व धर्मदृष्टीनेही हे तुमचे भाषण निंद्य आहे. ह्यास्तव तुम्ही सर्व जण श्वानमास भक्षण करून मुष्टिक जातीमध्ये रहाल, आणि वसिष्ठ-पुत्रांप्रमाणे एक हजार वर्षे पूर्ण होईपर्यंत ह्या पृथ्वीवर वास्तव्य कराल.'

## १८. विश्वामित्र < रंभा — बालकाण्ड/६४

शतानंद रामाला विश्वामित्राचे सामर्थ्य व तपोनिष्ठा किती प्रखर होती, याविषयी सांगत आहे.

ब्रह्मर्षी होण्याच्या तीव्र इच्छेने विश्वामित्राने उग्र तप आरंभिले, तेव्हा इंद्रादी देवांना त्याचा अतिशय ताप होऊ लागला. त्याचा तपोभंग करण्यासाठी इंद्राने रंभा नावाच्या एका अप्सरेची योजना करण्याचे ठरविले. 'आपल्या सौंदर्याने विश्वामित्राला आकर्षित करून त्याला विषयमोहित करणे– पर्यायाने त्याचा तपोभंग करणे, हे एक मोठे अवघड देवकार्य तुला करावयाचे आहे', असे त्याने तिला सांगितले. इंद्राचे बोलणे ऐकून रंभा लज्जित व भयभीत झाली. विश्वामित्राच्या उग्र स्वभावाची तिला कल्पना असल्याने ही अवघड कामगिरी आपणावर सोपवू नये, अशी तिने इंद्राला विनंती केली. परंतु इंद्राने तिला अभय देऊन कोकीळ पक्ष्याच्या रूपाने मदनासह तिच्या सान्निध्यात राहण्याचे आश्वासन दिले व तिला विश्वामित्राचा तपोभंग करण्याची आज्ञा केली.

अनुपम रूप धारण करून रंभेने विश्वामित्राला आपल्या नादी लावण्याचे ठरविले. कोकीळ पक्षाचा मंजुळ आवाज ऐकून विश्वामित्र प्रसन्न झाला. थोड्याच अवधीत त्याला लावण्यमूर्ती रंभेचे दर्शन झाले, तेव्हा त्याचे मन साशंक झाले. आपला तपोभंग करण्यासाठी इंद्रानेच कारस्थान रचले असावे, अशी त्याची खात्री होताच त्याने रंभेला शाप दिला–

यन्मां लोभयसे रम्भे कामक्रोधजयैषिणम् ।
दशवर्षसहस्राणि शैली स्थास्यसि दुर्भगे ॥ १२

ब्राह्मणः सुमहातेजास्तपोबल–समन्वितः ।
उद्धरिष्यति रम्भे त्वां मत्क्रोधकलुषीकृताम् ॥ १३

'हे रंभे, मी काम आणि क्रोध जिंकण्याची इच्छा करीत आहे. असे असता ज्या अर्थी तू मला लुब्ध करीत आहेस, त्या अर्थी हे दुर्भगे, दहा हजार वर्षेपर्यंत तू पाषाण बनून राहशील. माझ्या क्रोधाने ग्रस्त झालेल्या तुझा उद्धार तपःसामर्थ्याने युक्त आणि फारच तेजस्वी असा एक ब्राह्मण करील.'

रंभा तात्काळ पाषाण होऊन पडली. क्रोध आवरता न आल्याबद्दल विश्वामित्राला पश्चात्ताप झाला.

शापाचा उत्तरार्ध पश्चात्तापासारखा आहे. उःशाप हा सामान्यतः याचित असतो. परंतु रंभेने तशी याचना करण्यापूर्वीच हा उःशाप दिल्याने हा उःशाप अयाचित आहे.

## १९. कौसल्या < राम — अयोध्याकाण्ड/२१

कैकेयीने दशरथ राजाकडून मागून घेतलेल्या वरांप्रमाणे रामाने वनवासात जाण्याचा निश्चय केला. आपल्या निश्चयाला मातेची अनुज्ञा मिळवण्यासाठी तो लक्ष्मणासह कौसल्येकडे आला. लक्ष्मणाने व कौसल्येने रामाला त्याच्या निश्चयापासून परावृत्त करण्याचा अनेक प्रकारे प्रयत्न केला, परंतु तो असफल झाला. तेव्हा राम आपल्या

निश्चयापासून ढळत नाही, असे पाहून कौसल्या त्याला निर्वाणीचे म्हणाली –

'हे धर्मनिष्ठा, तू धर्मवेत्ता आहेस; म्हणून आज्ञापरिपालनरूप धर्मच आचरण करण्याची तुझी इच्छा असेल, तर राज्याचा त्याग करून तू येथेच रहा, आणि माझी शुश्रूषा करून मातृशुश्रूषारूप उत्कृष्ट धर्माचे आचरण कर. बाबा रे, मातेची शुश्रूषा करण्याच्या उद्देशाने स्वगृहीच शुद्ध राहून वास्तव्य करणारा काश्यप मोठ्या तपश्चर्येने युक्त होऊन म्हणजे मोठ्या तपश्चर्येने मातृसेवेचे फल प्राप्त होऊन स्वर्गाला गेला. ज्याप्रमाणे राजा तुला पूज्य आहे, त्याप्रमाणे श्रेष्ठपणामुळे मीही तुला पूज्य आहे. तस्मात् मी तुला अनुज्ञा देत नाही. तू येथून वनामध्ये जाऊ नको. तुझा वियोग झाल्यावर सुखांशी आणि जीविताशी तरी मला काय करायचे आहे ? तृणभक्षण करूनही तुझ्यासहवर्तमान राहण्यात माझे कल्याण आहे. इतक्यावरही जर तू शोकाकुल झालेल्या माझा त्याग करून वनात जाशील, तर मी अन्नपाणी सोडून मरणाच्या द्वारी बसेन. तुझा वियोग झाला असता जीव ठेवण्यास मी समर्थ होणार नाही.

ततस्त्वं प्राप्स्यसे पुत्र निरयं लोकविश्रुतम् ।
ब्रह्महत्यामिवाधर्मात्समुद्रः सरितां पतिः ।। २८

'असे झाले असता सिंधुपती समुद्राला मातेला दुःख देणे या अधर्मामुळे जसे ब्रह्महत्येचे पातक प्राप्त झाले, त्याप्रमाणे बाबा रे, लोकविख्यात नरक तुला प्राप्त होईल.'

हा शाप मानायचा का ? प्रत्यक्षात शाप दिलेला नाही. परंतु शापाचे स्वरूप स्पष्ट आहे.

हा सशर्त शाप आहे. शर्तीचे उल्लंघन होऊनही शापाचा अपेक्षित परिणाम मात्र झालेला नाही. त्यामुळे एक तर कौसल्येला शाप देण्याइतका अधिकार प्राप्त झाला नसावा किंवा कोणत्याही परिस्थितीत पुत्रविरह सहन करणे तिला शक्य नसल्याने तिने अत्यंत दाहक शापतुल्य शब्दांत आपली इच्छा व्यक्त केली असावी, असे मानणे भाग आहे.

## २०. दशरथ < कैकेयी, भरत अयोध्याकाण्ड/४२

वनवासाला चाललेल्या रामाच्या रथाने उडविलेल्या धुळीचा शेवटचा कण दिसेपर्यंत दशरथ राजा त्या दिशेकडे अनिमिष नेत्रानें पहात होता. नंतर तो अत्यंत व्याकुळ होऊन खिन्नतेने जमिनीवर पडला. कौसल्येने त्याला उठवून उजवा हात धरून नगरीत आणले. त्या वेळी कैकेयीही त्याच्या डाव्या बाजूला होती.

त्या वेळी क्षुब्ध अंत:करणाने दशरथ कैकेयीला म्हणाला —

कैकेयि मामकाङ्गानि मा स्प्राक्षीः पापनिश्चये ।
न हि त्वां द्रष्टुमिच्छामि न भार्या न च बान्धवी ।। ६

ये च त्वामनुजीवन्ति नाहं तेषां न ते मम ।
केवलार्थपरां हि त्वां त्यक्तधर्मां त्यजाम्यहम् ।। ७

अगृह्णां यश्च ते पाणिमग्निं पर्यणयं च यत् ।
अनुजानामि तत्सर्वमस्मिंल्लोके परत्र च ।। ८

भरतश्चेत्प्रतीतः स्याद्राज्यं प्राप्यैतदव्ययम् ।
यन्मे स दद्यात्पित्रर्थं मा मां तद्दत्तमागमत् ।। ९

'हे कैकेयी, तू माझ्या अवयवांना स्पर्श करू नको. हे पापनिश्चयी, मला तुझे तोंड पाहण्याची इच्छा नाही. तू माझी भार्या नव्हेस, इतकेच नव्हे, परंतु लांबची कोणी नातेवाईक सुद्धा नव्हेस. तुझ्या आश्रयाने जे उपजीविका करणारे असतील, त्यांचा मी कोणी नाही व तेही माझे कोणी नव्हेत. धर्माचा त्याग करून केवल स्वार्थाकडे दृष्टी ठेवणाऱ्या तुझा मी त्याग करतो. मी जे तुझे पाणिग्रहण केले आणि तुझ्याकडून अग्नीला जी मी प्रदक्षिणा घालविली, त्या सर्वांचा इहलोकी व परलोकी आता माझ्याशी काही संबंध उरला नाही. हे अक्षय्य राज्य प्राप्त झाल्याने भरत जर संतुष्ट होईल तर पिता असे समजून तो जे काही श्राद्ध वगैरे करील, ते मला न पोहोचो.'

वाल्मीकीने येथे दशरथाच्या वरील उद्‌गारांना 'शाप' संबोधलेले नाही. परंतु ते शापोद्‌गार आहेत. कारण महादेवाच्या आज्ञेने

विमानातून आलेल्या स्वर्गस्थ दशरथ राजाची व रामलक्ष्मणाची भेट झाली असता, त्या वेळी रामाने त्याला जी विनंती केली आहे, त्यात वरील उद्गारांना उद्देशून ' शाप ' हा शब्द वापरलेला आहे.

युद्धकाण्ड/११९

कुरु प्रसादं धर्मज्ञ कैकेय्या भरतस्य च ।। – २५
सपुत्रां त्वां त्यजामीति यदुक्ता केकयी त्वया ।
स शापः केकयीं घोरः सपुत्रां न स्पृशेत्प्रभो ।। २६

' हे धर्मज्ञ, आपण कैकेयी व भरत यांच्यावर कृपा करा. हे प्रभो, पुत्रासहवर्तमान मी तुझा त्याग करतो, असे जे आपण कैकेयीला म्हणाला आहा, त्या घोर शापाचा पुत्रासहवर्तमान कैकेयीला स्पर्श होऊ नये. '

रामाच्या विनंतीला दशरथाने अनुमती दिली.

हा सशर्त शाप आहे.

## २१. श्रावण < दशरथ अयोध्याकाण्ड/६३

राम वनवासाला जाणार म्हणून शोकार्त झालेला दशरथ कैकेयीला आपल्या पूर्वायुष्यातील एक प्रसंग सांगत आहे.

वृद्ध आणि अंध मातापित्यांसाठी जलाशयातून पाण्याची घागर भरून आणणाऱ्या श्रावणाला मृगयेसाठी वनात गेलेल्या दशरथाचा बाण मर्मी लागला. तो घायाळ झाला. त्याचा विलाप ऐकून दशरथाला आपली चूक कळून आली. तो आवाजाच्या अनुरोधाने शोध घेत असता मरणोन्मुख असलेला श्रावण तळमळत असलेला त्याला दिसला. आपणास पाणी घेऊन येण्यास बराच विलंब झाल्याने आईवडील शोकमग्न झाले असतील, अशी भीती त्याने त्या अवस्थेतही दशरथापाशी व्यक्त करून त्यांना लवकर पाणी नेऊन देण्याची विनंती केली आणि

झालेली हकिगत कळविण्यास सांगितले. वृद्धिंगत होणारा अग्नी ज्याप्रमाणे वन दग्ध करतो, त्याप्रमाणे तो क्रुद्ध होऊन तुला दग्ध न करो, अशी सदिच्छाही श्रावणाने दशरथाला बोलून दाखवली. आपल्या पित्याच्या आश्रमाला नेणारी पाऊलवाट दाखवीत तो म्हणाला –

तं प्रसादय गत्वा त्वं न त्वा संकुपितः शपेत् । –४५

'ज्या रीतीने तो क्रुद्ध होऊन तुला शाप न देईल त्या रीतीने तू त्याला प्रसन्न करून घे.' श्रावणाच्या सांगण्यावरून दशरथाने त्याच्या शरीरात घुसलेला बाण बाहेर काढल्यानंतर थोड्याच वेळात त्याचे प्राणोत्क्रमण झाले.

प्रत्यक्षात शाप दिलेला नाही. मात्र शाप दिला जाण्याची भीती व्यक्त केली आहे. त्यामुळे शापाचे स्वरूप स्पष्ट नाही.

हा सशर्त शाप आहे.

## २२. (श्रावणपिता) श्रवण < दशरथ　　　अयोध्याकाण्ड/६४

राम वनवासाला जाणार म्हणून शोकार्त झालेला दशरथ आपल्या आयुष्यातील एक प्रसंग कैकेयीला सांगत आहे.

श्रावणाला बाण लागल्यानंतर त्याच्याच सांगण्यावरून दशरथ त्याच्या पित्याच्या आश्रमाला गेला. आणि त्याने अत्यंत शोकाकुल होऊन घडलेला सर्व वृत्तान्त जसाच्या तसा सांगितला. एकुलत्या एका पुत्राच्या मरणाची दुःखद वार्ता ऐकून श्रावणाच्या माता-पित्यांना धक्काच बसला. शोकग्रस्त झालेला तो महातेजस्वी तापस श्रवण – श्रावणाचा पिता – दशरथ राजाला म्हणाला– 'राजा, हे अशुभ कर्म जर तू मला स्वता विदित केले नसतेस, तर तुझ्या मस्तकाचे शेकडो किंवा हजारो तुकडे होऊन गेले असते. राजा, विशेषतः वानप्रस्थ धर्माने वागणाऱ्याचा समजून उमजून जर क्षत्रियाने वध केला, तर तो वध करणारा प्रत्यक्ष जरी इंद्र असता, तरी सुद्धा माझ्या कोपाने त्याला स्थानभ्रष्ट केले असते. मग

तुझ्यासारख्या गरिबाची काय कथा ? मातापितर-सेवारूप, तपश्चर्येविषयी तत्पर, वेदवेत्त्या ब्राह्मणासमान असलेल्या त्या तशा प्रकारच्या मुनितुल्य पुरुषावर समजून उमजून शस्त्र सोडणाऱ्याच्या मस्तकाचे सात तुकडे व्हावेत, परंतु हे कृत्य तुझ्या हातून अज्ञानाने घडल्यामुळे तू जिवंत राहिला आहेस. बुद्धिपूर्वक जर ही गोष्ट झाली असती तर सर्व रघुवंशाचे कुलच जागेवर राहिले नसते.' एवढे बोलून त्याने दशरथाला श्रावण जेथे मृत होऊन पडला होता, तेथे घेऊन जाण्यास सांगितले. मुलाच्या मृतदेहाला स्पर्श करून त्याने अत्यंत दारुण शोक केला. त्याचे सारे गुण आठवून तो करुण स्वराने विलाप करत होता. भार्येसह पुत्राला उदक देऊन तो म्हणाला– ' राजा, माझा आजच वध कर. एका बाणाने तू एकच पुत्र असलेल्या मला निपुत्रिक करून टाकले आहेस. तेव्हा मला मरणाची भीती नाही. ज्या अर्थी अज्ञानाने तू माझ्या बालकाचा वध केलास, त्या अर्थी मीही तुला अत्यत दुःखद व भयंकर शाप देतो.

पुत्रव्यसनजं दुःखं यदेतन्मम साम्प्रतम् ।
एवं त्वं पुत्रशोकेन राजन् कालं करिष्यसि ।। ५४

अज्ञानात्तु हतो यस्मात्क्षत्रियेण त्वया मुनिः ।
तस्मात्त्वां नाविशत्याशु ब्रह्महत्या नराधिप ।। ५५

त्वामप्येतादृशो भावः क्षिप्रमेव गमिष्यति ।
जीवितान्तकरो घोरो दातारमिव दक्षिणाम् ।। ५६

एवं शापं मयि न्यस्य विलप्य करुणं बहु ।
चितामारोप्य देहं तन्मिथुनं स्वर्गमभ्ययात् ।। ५७

' सांप्रत ज्याप्रमाणे हे पुत्रमरणजन्य दुःख मला प्राप्त झाले आहे, त्याप्रमाणे तुला पुत्रशोकाने मृत्यू प्राप्त होईल. ज्या अर्थी तू क्षत्रियाने न समजून माझ्या मुनितुल्य पुत्राचा वध केला आहेस, त्या अर्थी हे प्रजाधिपते, तुला एकदम ब्रह्महत्त्येसमान पातक लागणार नाही. परंतु दिलेली दक्षिणा ज्याप्रमाणे दात्याला परलोकाच्या ठिकाणी प्राप्त होते, त्याप्रमाण तुलाही अशाच प्रकारची प्राणनाशक घोर अवस्था एकाएकी प्राप्त होईल.' ह्याप्रमाणे करुण स्वराने अतिशय विलाप केल्यावर

त्या स्त्री-पुरुषांनी दशरथाला शाप दिला, आणि चितेवर देह ठेवून ते स्वर्गाला गेले.

दशरथाने श्रावणाचा वध अजाणता केल्याने शापाचे स्वरूप सौम्य झाले आहे. हा वध जर जाणून बुजून केला असता तर शाप किती घोर झाला असता, याची स्पष्ट कल्पना दिली आहे.

## २३. भरत < कैकेयी अयोध्याकाण्ड/७४

भरत कैकेयीचा धिक्कार करीत आहे.

कैकेयीने दशरथ राजाकडून वर मागून घेऊन रामाला वनवासाला धाडले. पुत्रवियोगाचे दुःख सहन न होऊन दशरथ मरण पावला. हे सर्व वृत्त ऐकून भरत अत्यंत शोकाकुल झाला. या सर्व आपत्तीचे कारण कैकेयी असल्याचे कळल्याने तो अतिशय संतप्त झाला आणि अत्यंत कठोर शब्दांत त्याने तिची निर्भर्त्सना केली. 'तुझ्या या कृत्यामुळे तुझे व दशरथाचे नाते आता पति–पत्नीचे राहिले नाही. त्याच्या मृत्यूला व रामाच्या वनवासाला तूच सर्वस्वी कारण आहेस. मी तुझा मुलगा असल्याने तुझ्या या महापातकाचा संसर्ग मलाही लागल्याशिवाय राहणार नाही. ह्या दोषापासून माझी सुटका होऊ शकत नाही. माता न तू वैरिणी. कुलाचा घात करणारी तू राक्षसी आहेस. धर्मराज अश्वपतीची कन्या म्हणवून घेण्याचा तुला अधिकार नाही.' एकपुत्रा कौसल्येच्या पुत्रवियोगाची तीव्रता कैकेयीला पटवून देताना तो तिला कामधेनूची कथा सांगतो आणि निग्रही शब्दांत तिचा धिक्कार करतो. त्याचे उद्‌गार अत्यंत दाहक आहेत. तो तिला सांगतो– 'तू अग्नीत प्रवेश कर. दण्डकारण्यात चालती हो किंवा गळफास लावून घे आणि मर.'

भ्रूणहत्यामसि प्राप्ता कुलस्यास्य विनाशनात् ।
कैकेयि नरकं गच्छ मा च तातसलोकताम् ।। ४

'ह्या कुलाचा नाश केल्याने तुला ब्रह्महत्येचे पातक लागलेले आहे, तस्मात् हे कैकेयी तू नरकात जा. पित्याला प्राप्त झालेल्या लोकाला जाऊ नको.'

एकपुत्रा च साध्वी च विवत्सेयं त्वया कृता ।
तस्मात्त्वं सततं दुःखं प्रेत्य चेह च लप्स्यसे ॥ २९

'जिला एकच पुत्र आहे अशा साध्वी कौसल्येला तू पुत्ररहित करून टाकले आहेस. तस्मात् इहलोकी आणि मेल्यानंतरही तुला नेहमी दुःखच प्राप्त होत जाईल.'

भरताचे हे उद्गार शापतुल्य वाटले, तरी ते आत्यंतिक संतातापाच्या उद्रेकाचे व्यक्त रूप आहे, शाप नव्हे. खेरीज, भरताला शाप देण्याची शक्ती केव्हा व कशी प्राप्त झाली होती, हा प्रश्न शिल्लक उरतोच.

'भ्रूणहत्या' ऐवजी मराठी अनुवादात 'ब्रह्महत्या' शब्द योजिला आहे.

## २४. वैश्रवण < तुंबरू (विराध) अरण्यकाण्ड/४

विराध रामाला मृत्यूपूर्वी पूर्ववृत्त कथन करीत आहे.

दंडकारण्यात संचार करणाऱ्या राम, लक्ष्मण, सीतेला पाहून पर्वतप्राय शरीर धारण करणारा राक्षस विराध क्रुद्ध झाला. भयंकर गर्जना करीत तो त्यांच्या अंगावर धावून गेला आणि रामाला उन्मत्तपणे म्हणाला – 'ऋषींच्या मासाचे भक्षण करीत या भयंकर वनात मी वास्तव्य करीत असतो. वरण्यास योग्य असलेली ही स्त्री – सीता – माझी भार्या होईल आणि युद्धामध्ये तुम्हा उभयतांचे रुधिर मी प्राशन करीन.' सीतेला त्याने आपल्या मांडीवर बसविले. ते पाहून रामाला विलक्षण दुःख झाले. लक्ष्मणाचा संताप अनावर झाला. ब्रह्मदेवाच्या वरामुळे तो अवध्य, अच्छेद्य व अभेद्य झाला होता. त्यामुळे त्याला ठार

करणे कठीण होते. राम - लक्ष्मणाची विचारपूस करून त्याने सीतेसह त्यांना सोडून दिले. परंतु परस्त्रीला स्पर्श करणाऱ्या त्या दुष्ट राक्षसाला शासन करणे रामाला अगत्य वाटले. राम युद्धसज्ज झाल्याचे पाहून तो उपहासाने बोलू लागला व सीतेच्या देखत राम - लक्ष्मणांना खांद्यावर घेऊन पळू लागला. सीता अत्यंत भयभीत झाली. आक्रोश करू लागली. राम-लक्ष्मणांनी राक्षसाचे दोन्ही हात उखडून टाकले, तरी ते त्याला ठार करू शकले नाहीत. तेव्हा लाथा–बुक्क्यांनी चेचून त्याला खड्ड्यात पुरून टाकण्याचा रामाने विचार केला आणि एखाद्या प्रचंड हत्तीला पुरण्यास योग्य असा खड्डा खणण्यास लक्ष्मणास सांगितले. ते ऐकून विराध राक्षस रामाला नम्रपणे म्हणाला – ' हे पुरुषोत्तमा, मी पूर्वी तुला मोहामुळे ओळखले नाही. बा रामा, तुझ्या योगाने कौसल्या सुपुत्रवती झाली आहे. तुज रामाला, महाभाग्यवती सीतेला व महायशस्वी लक्ष्मणाला मी आता ओळखले.' आणि नंतर त्याने आपले पूर्ववृत्त सांगितले –

अभिशापादहं घोरां प्रविष्टो राक्षसीं तनुम् ।
तुम्बरुर्नाम गन्धर्वः शप्तो वैश्रवणेन हि ।। १६

प्रसाद्यमानश्च मया सोऽब्रवीन्मां महायशाः ।
यदा दाशरथी रामस्त्वां वधिष्यति संयुगे ।। १७

तदा प्रकृतिमापन्नो भवान् स्वर्गं गमिष्यति ।
अनुपस्थीयमानो मां स क्रुद्धो व्याजहार ह ।। १८

इति वैश्रवणो राजा रम्भासक्तमुवाच ह ।
तव प्रसादान्मुक्तो ऽहमभिशापात्सुदारुणात् ।। १९

"ही घोर राक्षसी तनू मला शापामुळे प्राप्त झालेली आहे. मी पूर्वी तुंबरू नामक गन्धर्व असून कुबेराने मला शाप दिला होता. शाप झाल्यानंतर मी शापनिवृत्तीकरिता त्याची प्रार्थना करू लागलो असता, तो महायशस्वी कुबेर म्हणाला– 'दाशरथी राम जेव्हा संग्राममध्ये तुझा वध करील, तेव्हा तुला आपले गंधर्वरूप प्राप्त होऊन तू स्वर्गाला जाशील.' मी रंभेच्या ठिकाणी आसक्त झाल्यामुळे माझ्या [illegible] कुबेर

राजाची सेवा होईनाशी झाल्यामुळे क्रुद्ध होऊन त्याने मला तसा शाप दिला होता; व त्याच्याच सांगण्याप्रमाणे मी आता तुझ्या कृपेने त्या अत्यंत भयंकर शापातून मुक्त झालो आहे."

याचित उ:शाप.

## २७. (दंडकारण्यातील) मुनी < (दंडकारण्यातील) राक्षस

**अरण्यकाण्ड/१०**

दंडकारण्यात वास्तव्य करीत असता रामाने राक्षसांच्या संहारासाठी हाती धनुष्य घेणे सीतेला उचित वाटले नाही. तेव्हा ती आपले मत स्पष्टपणे रामाला सांगते. क्षत्रियांचा कुलधर्म कोणता, हे ती उत्तम रीतीने समजावून सांगते. तेव्हा राम तिला प्रत्युत्तर देत आहे.

राम जन्माने क्षत्रिय असला तरी परिस्थितीने वल्कले धारण करून तो वनात मुनिवृत्तीने रहात होता. तेव्हा शस्त्र हाती घेणे, मग ते स्वरक्षणासाठी असो अथवा मुनिजनांच्या स्वास्थ्यासाठी असो, सीतेला अयोग्य वाटले. 'शस्त्र-संयोग हे पुरुषांच्या मनात विकृती उत्पन्न होण्याचे कारण आहे.' असे सांगून ती आपल्या म्हणण्याच्या पुष्ट्यर्थ इंद्राने मुनींजवळ ठेव म्हणून दिलेल्या शस्त्रांनी ते क्रूरकर्मा कसे झाले, ही कथा सांगते आणि रामाला राक्षस-संहारापासून परावृत्त करण्याचा प्रयत्न करते. तिचे म्हणजे योग्य व हिताचे आहे, हे राम जाणतो व तिला शांतपणे सांगतो – "क्षत्रियाने शस्त्र केव्हा धारण करावयाचे, हे तू जाणतेस. नरमांस–भक्षक राक्षस दंडकारण्यातील मुनींच्या तपात अकारण विघ्ने आणून त्यांचे भक्षण करीत आहेत. आमच्यावर अनुग्रह करा – अशी विनंती ते मुनी मला करीत आहेत. तेव्हा त्यांच्याकडे मी दुर्लक्ष कसे करावे? ब्राह्मणांचे रक्षण करणे, हा क्षत्रियाचा धर्म आहे. रक्षणासाठी त्यांनी माझ्याकडे धाव घ्यावी ही क्षत्रियाची – माझी अपकीर्ती आहे. यथेष्ट रूप धारण करणाऱ्या राक्षसांनी त्यांना अतिशय गांजून सोडले आहे. होमकाल व पर्वकाल आला असता ते त्यांना ग्रासत आहेत. राक्षसांपासून

रक्षण करण्याच्या कामी मीच त्यांचा त्राता आहे, अशी त्यांची भावना आहे. ते म्हणतात –

कामं तपःप्रभावेण शक्ता हन्तुं निशाचरान् ।। –१३

चिरार्जितं न चेच्छामस्तपः खण्डयितुं वयम् ।
बहुविघ्नो तपो नित्यं दुश्चरं चैव राघव ।। १४

तेन शापं न मुञ्चामो भक्ष्यमाणाश्च राक्षसैः । –१५

मनात आणल्यास तपःसामर्थ्यानें आम्ही त्या राक्षसांचा वध करण्यास समर्थ आहो. परंतु पुष्कळ दिवसांपासून संपादन केलेल्या तपाचा व्यय करण्याची आमची इच्छा नाही. कारण राघवा, तपामध्ये नेहमी अनेक विघ्ने येत असतात व ह्यामुळे ते होणे दुर्घट आहे. म्हणून राक्षस आम्हाला भक्षण करीत असतानाही आम्ही शाप देत नाही."

सीतेला समजावून सांगून मुनींचे रक्षण करण्याची रामाने प्रतिज्ञा केली.

प्रत्यक्षात शाप दिलेला नाही, उलट सामर्थ्य असूनही शाप देण्याचे टाळले आहे.

शापाचे स्वरूप कळू शकत नाही.

## २६. (यतिवेषधारी) रावण < सीता अरण्यकाण्ड/४७

सीतेची इच्छा पुरविण्यासाठी सुवर्णमृगाच्या शोधार्थ राम अरण्यात गेला. जाण्यापूर्वी त्याने लक्ष्मणाला सीतेचें रक्षण करण्यास सांगितले व कोणत्याही परिस्थितीत तिला एकटीला सोडून जाऊ नको, असे बजावले. मारीच राक्षसाने रामाच्या आवाजाची नक्कल करून सीतेच्या मनाचा गोंधळ केला. तिने लक्ष्मणाला रामाचा शोध त्वरित करण्यास सांगितले. कोणत्याही संकटाला तोंड देण्याचे सामर्थ्य रामाचे ठायीं असल्याने त्याच्या सुखरूपतेबाबत काळजी करण्याचे कारण नाही,

असे लक्ष्मणाने सीतेला परोपरीने सांगितले. परंतु त्यामुळे तिचे समाधान तर झाले नाहीच, उलट अतिशय रागावून ती लक्ष्मणाला बोलू नये, असे बोलली. इतकेच नव्हे तर त्याच्या चारित्र्याविषयीही तिने संशय प्रकट केला. सीतेच्या बोलण्याने लक्ष्मण अत्यंत दु:खी झाला. रामाच्या आज्ञेचे उल्लंघन करून सीतेला एकटी सोडून जाणे योग्य नव्हते. तरी सीतेच्या आग्रहास्तव तो रामाच्या शोधार्थ निघाला. सीता एकटीच आहे, हे हेरून तिचे अपहरण करण्याचे उद्दिष्टाने आलेल्या रावणाला योग्य संधी मिळाली. ब्राह्मणाचा वेष घेऊन तो आल्याने सीतेला त्याचे खरे स्वरूप उमगले नाही. आसन, पाद्य, फळे इत्यादींनी अभ्यागताचे तिने स्वागत केले. कारण तिला असे वाटले –

**ब्राह्मणश्चातिथिश्चैष अनुक्तो हि शपेत माम्। –२**

'हा ब्राह्मणरूपाने अतिथी प्राप्त झाला आहे. कदाचित् आपण याच्या प्रश्नाचे उत्तर न दिल्यास हा आपणास शाप देईल.'

प्रत्यक्षात शाप दिलेला नाही. शाप दिला जाण्याची भीती व्यक्त केली आहे. त्यामुळे शापाचे स्वरूप कळू शकत नाही.

## २७. राम < प्रस्रवण (पर्वत), नदी अरण्यकाण्ड/६४

सीतेच्या शोधार्थ हिंडत असता वाटेत राम-लक्ष्मणांना अनेक नद्या, वने, पर्वत लागले. त्यांनी 'सीता कोठे आहे?' असा गोदावरी नदीला प्रश्न केला, परंतु तिने काहीच उत्तर दिले नाही. वनातील प्राण्यांना तोच प्रश्न केला असता, ते दक्षिणाभिमुख होऊन आकाशाकडे वारंवार पाहू लागले. त्यावरून सीता आकाशमार्गे दक्षिणेकडे गेली असावी, असा लक्ष्मणाने कयास केला. नंतर ते दक्षिणेकडे जाऊ लागले. राम अत्यंत शोकाकुल झाला होता. वाटेत त्यांना पुष्पवृष्टी झालेली दिसली. रामाने ती फुले ओळखली, कारण त्यानेच ती सीतेला बुचड्यात घालण्यास आणून दिली होती. नंतर ते प्रस्रवण पर्वताजवळ आले, तेव्हा रामाने त्यालाही सीता कोठे आहे, म्हणून विचारले. परंतु पर्वत काहीच

बोलेना, तेव्हा रामाचा राग अनावर झाला. तो पर्वताला म्हणाला – 'हे पर्वता, तुझ्या सर्व शिखरांचा मी विध्वंस केला नाही, तोच तू आपल्या बऱ्या विचाराने ती सुवर्णवर्ण व सौंदर्यसंपन्न सीता कोठे आहे, हे मला दाखव.' तेव्हा पर्वताने सीता ज्या मार्गाने गेली, त्याच्या खुणा सूचित केल्या. परंतु प्रत्यक्ष वाणीने शब्दोच्चार केला नाही. तेव्हा राम पर्वताला म्हणाला –

मम बाणाग्निनिर्दग्धो भस्मीभूतो भविष्यसि ।।–३३

असेव्यः सर्वतश्चैव निस्तृणद्रुमपल्लवः ।–३४

'माझ्या बाणरूप अग्नीने दग्ध झाल्यामुळे आज तुझे भस्म होऊन जाईल आणि सर्व बाजूनी तुझ्यावरील तृण, वृक्ष, पल्लव ही नाहीतशी होऊन तुझा कोणीही आश्रय करणार नाही.'

आणि नंतर तो लक्ष्मणाला म्हणाला –

इमां वा सरितं चाद्य शोषयिष्यामि लक्ष्मण ।।–३४

यदि नाख्यति मे सीतामद्य चन्द्रनिभाननाम् ।–३५

'पूर्ण चंद्रासारख्या आल्हादकारक मुखाने युक्त असलेली सीता कोठे आहे, हे जर ही नदी मला न सांगेल, तर आज मी तिला शुष्क करून टाकतो.'

हा सशर्त शाप आहे.

## २८. स्थूलशिरा < कबंध अरण्यकाण्ड/७१

कबंध रामाला आपले पूर्ववृत्त कथन करीत आहे.

'सूर्य, चंद्र आणि इंद्र यांच्या शरीराप्रमाणे पूर्वी माझे दिव्य रूप होते. माझे ठायी प्रचंड बल आणि पराक्रम होता. परंतु मी भीतिप्रद असे राक्षसरूप धारण करून वनातील ऋषींना भय दाखवीत असे.

एकदा मी स्थूलशिरा ऋषीला संतप्त केले. तो वन्य फळे गोळा करीत असता मी त्याच्यावर चालून गेलो.

तेनाहमुक्तः प्रेक्ष्यैवं घोरशापाभिधायिना ।। – ४

एतदेवं नृशंसं ते रूपमस्तु विगर्हितम् ।
स मया याचितः क्रुद्धः शापस्यान्तो भवेदिति ।। ५

अभिशापकृतस्येति तेनेदं भाषितं वचः ।
यदा छित्त्वा भुजौ रामस्त्वां दहेद्विजने वने ।। ६

तदा त्वं प्राप्स्यसे रूपं स्वमेव विपुलं शुभम् । –७

तेव्हा तो घोर शाप देणारा ऋषी म्हणाला– 'हे ह्याप्रमाणेच तुझे निंद्य व दुष्ट शरीर होवो.' ह्यावर 'मी आपल्यावर चालून आल्यामुळे आपण दिलेल्या शापाचा अंत व्हावा', म्हणून मुनीची प्रार्थना केली असता तो म्हणाला– 'राम जेव्हा निर्जन वनामध्ये हात तोडून तुझे दहन करील, तेव्हा तुला स्वताचे भव्य व शुभ रूप प्राप्त होईल.'

उत्तरार्धात उःशाप असून तो याचित आहे.

## २९. इंद्र < कबंध अरण्यकाण्ड/७१

कबंध रामाला इंद्राने त्याला दिलेल्या शापाचे वृत्त सांगत आहे.

राक्षस-रूप प्राप्त झाल्यानंतर उग्र तपश्चर्या करून मी ब्रह्मदेवाला संतुष्ट केले असता त्याने मला दीर्घायुष्य दिले. त्यामुळे मला गर्व झाला. मला दीर्घायुष्य प्राप्त झाले असल्याने इंद्र माझे काय करू शकणार, असा विचार करून समरांगणामध्ये मी इंद्राच्या अंगावर चालून गेलो. तेव्हा इंद्राने सहस्र धारा असलेले वज्र माझ्या अंगावर सोडले, त्यामुळे माझ्या मांड्या व मस्तक शरीरामध्ये घुसले. परंतु त्याने मला ठार मारले नाही. 'ब्रह्मदेवाचे ते भाषण सत्य होवो', असे तो म्हणाला. मुख व मस्तक भग्न झाल्याने मला आहार करणे व दीर्घकाल जगणे कसे शक्य होईल, असे मला वाटू लागले. मी माझी भीती बोलून दाखविली असता–

– शक्रो मे बाहू योजनमायतौ ।। –१३

तदा चास्यं च मे कुक्षौ तीक्ष्णदंष्ट्रमकल्पयत् ।
सोऽहं भुजाभ्यां दीर्घाभ्यां संक्षिप्यास्मिन्वनेचरान् ।। १४

सिंहद्वीपिमृगव्याघ्रान्भक्षयामि समन्ततः ।
स तु मामब्रवीदिन्द्रो यदा रामः सलक्ष्मणः ।। १५

छेत्स्यते समरे बाहू तदा स्वर्गं गमिष्यसि । –१६

" इंद्राने मला एकेक योजन लांब असे बाहू दिले. तीक्ष्ण दंष्ट्रांनी युक्त असे मुख मला उदरामध्ये निर्माण करून दिले. तेव्हापासून या वनामध्ये कोणत्याही बाजूला संचार करणारे सिंह, चित्ते, मृग आणि व्याघ्र आपल्या दीर्घ हातांनी धरून मी भक्षण करीत आहे. असो. ' लक्ष्मणासहवर्तमान राम जेव्हा समरांगणामध्ये तुझे हात तोडून टाकील, तेव्हा तू स्वर्गामध्ये जाशील.', असे मला इंद्राने सांगितले आहे.

मी रामाची प्रतीक्षा तेव्हापासून करीत आहे. राम कोणता हे मला ठाऊक नाही, हाती येईल त्याला धरण्याचा उपक्रम ठेवला, म्हणजे केव्हा तरी रामाची भेट होईल, असा माझा विश्वास होता. तू राम आहेस, हे कळल्याने आनंद झाला", असे सांगून रामाला आपले और्ध्वदेहिक करण्याची त्याने विनंती केली. 'दहन झाल्यावर माझे पूर्वरूप प्राप्त झाले, म्हणजे मी युक्ती सांगून मित्रत्वाचे सार्थक करीन. तुझ्याखेरीज अन्य कुणाकडूनही मला मृत्यू येणे शक्य नाही. तरी मला मारून मजवर उपकार कर."

इंद्राने शापाने शरीरात विकृती निर्माण केली नसून वज्रप्रहाराने केली आहे. तेव्हा त्याला शाप म्हणणे कठीण. इंद्राचे शापोद्गार स्पष्ट नाहीत. शापमुक्तीबाबत मात्र स्पष्ट उल्लेख आहे.

## ३० . १ < दनू किष्किन्धाकाण्ड/४

राम-लक्ष्मणाची हनुमानाशी भेट झाली असता त्यांच्या सहकार्याने महात्म्या सुग्रीवाला राज्यप्राप्ती होणार, असा हनुमानाला विश्वास वाटू लागला. त्यांच्याशी सख्य करणे त्याला इष्ट वाटलें. अनेक श्वापदें आणि मृगांनी युक्त अशा त्या दुर्गम घोर वनात ते कोणत्या कार्यास्तव आलेत, अशी हनुमानाने पृच्छा केली असता, रामाने लक्ष्मणाला ते कथन करण्यास सांगितले. लक्ष्मणाने ते दोघे दशरथ राजाचे पुत्र असून दशरथ, राम, वनवास इत्यादी वृत्त कथन केले. रामाची भार्या सीता एकटी व एकाकी आहे, असे पाहून कोण्या एका राक्षसाने तिचे अपहरण केले. तो राक्षस कोण होता, हे आम्हाला ज्ञात नाही. आम्ही सीतेच्या शोधार्थ परिभ्रमण करीत करीत सांप्रत येथे आलो आहोत; कारण–

दनुर्नाम दितेः पुत्रः शापाद्राक्षसतां गतः ।
आख्यातस्तेन सुग्रीवः समर्थो वानराधिपः ।। १५

स ज्ञास्यति महावीर्यस्तव भार्यापहारिणम् ।
एवमुक्त्वा दनुः स्वर्गं भ्राजमानो दिवं गतः ।। १६

दनू म्हणून दितीचा एक पुत्र शापामुळे राक्षस बनला होता. त्याने वानरराज सुग्रीव समर्थ आहे म्हणून सांगितले. ‘ तो महावीर्यवान सुग्रीव तुझ्या भार्येचा अपहार करणाऱ्याचा शोध लावील ’, असे सांगून तेजाने झळकत असलेला तो दनू स्वर्गास जाण्याकरिता आकाश मार्गाने निघून गेला.

शाप कोणी दिला ? कोणत्या कारणास्तव दिला ? शाप नेमका काय होता ? इत्यादीबाबत बरीच संदिग्धता आहे. येथे केवळ शापाचा उल्लेख आहे.

पहा : अरण्यकांड ७१

## ३१. मतंग < वाली, वानर किष्किन्धाकाण्ड/११

वालीचे अतुलनीय पौरुष, सामर्थ्य आणि धैर्य याविषयी सुग्रीव रामाला सांगत आहे.

वरप्रदानामुळे उन्मत्त झालेला दुंदुभी नावाचा एक राक्षस होता. त्याला आपल्या सामर्थ्याचा विलक्षण गर्व होता. युद्धात आपला कोणीही पराभव करू शकणार नाही, आपण अजिक्य आहोत, असा तो ताठा मिरवीत असे. त्याने सागराला युद्धार्थ आव्हान दिले असता त्याने आपली असमर्थता प्रकट करून हिमवान पर्वतच केवळ तुझ्याशी युद्ध करू शकेल, असे सांगितले. त्याने हिमवान पर्वतालाही आव्हान दिले. तेव्हा तपस्वी जनांचा आश्रयभूत असलेला मी रणकर्मात प्रवीण नाही, अशी त्याने कबूली देऊन किष्किधा नगरीत वास्तव्य करणारा वाली हा तुला एकमेव तुल्यबल वीर आहे, असे सांगितले. दुंदुभी महिषरूप धारण करून किष्किधा नगरीजवळील वृक्षांची मोडतोड करीत करीत पृथ्वी दणाणून टाकणाऱ्या रौद्र गर्जना करू लागला. त्या ऐकून वाली सामोरा आला. दुंदुभी अत्यंत उन्मत्तपणे व उद्धट रीतीने बोलू लागताच वालीने त्याची शिंगे धरून त्यास फेकून दिले. लत्ता, गुडघे, मुष्टी, वृक्ष इत्यादींनी प्रहार करून त्यास जर्जर केले. त्याच्या नाकातोंडातून रक्तस्राव होऊ लागला. त्याला ठार करून वालीने योजनभर दूर फेकून दिले असता त्याच्या मुखापासून निघालेले रक्त - बिंदू त्या मतंग ऋषीच्या आश्रमात पडले. ते पाहून ऋषी अत्यंत संतप्त झाला. शोधांती एक पर्वतप्राय मृत महिष जवळच पडलेला आढळला. तपःसामर्थ्याने हे कृत्य वानराचेच आहे, हे मुनीने जाणले व वानराला शाप दिला –

इह तेनाप्रवेष्टव्यं प्रविष्टस्य वधो भवेत् ।
वनं मत्संश्रयं येन दूषितं रुधिरस्रवैः ।। ५३

क्षिपता पादपाश्चेमे संभग्नाश्चासुरीं तनुम् ।
समन्तादाश्रमं पूर्णं योजनं मामकं यदि ।। ५४

आगमिष्यति दुर्बुद्धिर्व्यक्तं स न भविष्यति ।
ये चास्य सचिवाः केचित्संश्रिता मामकं वनम् ।। ५५

न च तैरिह वस्तव्यं श्रुत्वा यान्तु यथासुखम् ।
ते ऽ पि वा यदि तिष्ठन्ति शपिष्ये तानपि ध्रुवम् ।। ५६

वने ऽ स्मिन्मामके नित्यं पुत्रवत्परिरक्षिते ।
पत्राङ्कुरविनाशाय फलमूलाभवाय च ।। ५७

दिवसश्चाद्य मर्यादा यं द्रष्टा श्वो ऽ स्मि वानरम् ।
बहुवर्षसहस्राणि स वै शैलो भविष्यति ।। ५८

'ज्याने हे कृत्य केले, त्याने ह्या ठिकाणी प्रवेश करता उपयोगी नाही. माझ्या आश्रमाला असलेले हे वन रुधिरस्रावाच्या योगाने ज्याने दूषित केले, तो येथे प्रविष्ट झाल्यास त्याचा वध होईल. असुराचा देह फेकून देताना ज्याने हे वृक्ष मोडून टाकले, तो ह्या माझ्या आश्रमाच्या आसपास एक संपूर्ण योजनपर्यंत जर येईल, तर तो दुर्बुद्धी निःसंशय जिवंत राहणार नाही. त्याचप्रमाणे त्याचे जे कोणी मंत्री माझ्या वनाचा आश्रय करून राहिले असतील, त्यांनीही येथे वास्तव्य न करता हे माझे भाषण ऐकून इच्छेस येईल तिकडे सुखाने चालते व्हावे. ते जर येथे राहतील तर मी त्यांनाही निःसंशय शाप देईन. पुत्राप्रमाणे नेहमी सर्वस्वी सांभाळलेल्या माझ्या वनामध्ये वानरांचे आगमन पाने, अंकुर, फळे, मुळे यांच्या नाशाकरताच होत असते. ह्यास्तव माझ्या शापाला हा आजचाच दिवस काय तो अवधी आहे. परंतु वालीशी संबंध असलेला असा जो वानर उदयिक येथे माझ्या दृष्टीस पडेल, तो पुष्कळ वर्षेपर्यंत पर्वत होऊन पडेल.'

ही शापवाणी ऐकून वाली भयभीत झाला. त्याने आश्रमात जाऊन मतंग ऋषीची प्रार्थना केली. परंतु त्याने त्याचे म्हणणे ऐकले नाही. तेव्हापासून वाली ऋष्यमूक पर्वतावर प्रवेश करीत नाही.

किष्किन्धाकाण्ड/४६

सुग्रीवाचा वध करण्यासाठी वाली जेव्हा हात धुवून पाठीमागे लागला तेव्हा सुग्रीवाने स्वसंरक्षणार्थ पृथ्वीच्या दाही दिशांना हिंडून आश्रयस्थान शोधले. हिमालय, मेरू, उत्तर समुद्र ओलांडला, परंतु त्याला

कोठेही सुरक्षित जागा मिळाली नाही. तो अत्यंत उद्विग्न झाला असता हनुमानाला मतंग ऋषींनी वालीला दिलेल्या शापाची आठवण झाली व तो सुग्रीवाला म्हणाला –

इदानीं मे स्मृतं राजन्यथा वाली हरीश्वरः ।। –२१

मतङ्गेन तदा शप्तो ह्यास्मिन्नाश्रममण्डले ।
प्रविशेद्यदि वै वाली मूर्धास्य शतधा भवेत् ।। २२

तत्र वासः सुखो ऽस्माकं निरुद्विग्नो भविष्यति ! –२३

"हे राजा आता मला स्मरण झाले – 'ह्या आश्रमात जर वाली प्रवेश करील तर त्याच्या मस्तकाचे शेकडो तुकडे होतील' –असा मतंग ऋषींनी वानरराज वालीला त्या वेळी शाप दिलेला आहे. ह्यास्तव ह्या मतंगाश्रमात आपले वास्तव्य निर्भय व सुखावह होईल."

हनुमानाच्या सांगण्याप्रमाणे सुग्रीव ऋष्यमूक पर्वतावर निर्धास्तपणे जाऊन राहिला.

हा शाप सशर्त आहे. शर्तींचे उल्लंघन झाले, तरच शापाचा परिणाम होऊ शकतो, अन्यथा नाही.

## ३२. कंडू < वन किष्किन्धाकाण्ड/४८

तार आणि अंगद यांसह हनुमानाने विंध्य पर्वतावरील गुहा, वनें धुंडाळत सीतेचा शोध केला. परंतु त्यांना यश मिळाले नाही. अरण्यातील मिळतील ती फळे-मुळे भक्षण करीत ते दक्षिणेकडील एका वनात आले. तेथील वृक्षांना पाने, फुले, फळे नव्हती, तेथे सरोवरे नव्हती. नद्या निर्जल होत्या. महिष, गज, व्याघ्रादी प्राणी, पक्षीही तेथे नव्हते. अशा त्या वनप्रदेशात कंडू नावाचा तपोधन ऋषी रहात असे. त्याचा दहा वर्षांचा मुलगा मृत्यू पावल्याने तो क्रुद्ध झाला होता. तो इतका रागीट होता व त्याच्या तपश्चर्येचे नियम एवढे कडक होते की त्याच्यासमोर जाण्यास कोणीही धजत नसे.

तेन धर्मात्मना शप्तं कृत्स्नं तत्र महद्वनम् ॥– १४
अशरण्यं दुराधर्षं मृगपक्षिविवर्जितम् । –१५

'त्या धर्मात्म्या महर्षींनी हे, प्रचंड वन मृगरहित व पक्षिरहित होऊन कोणालाही आश्रय करण्याला उपयोगी पडणार नाही व ह्यात प्रवेश करणेही अत्यंत कठीण होईल', असा शापही दिला होता.

त्या प्रदेशातही प्रवेश करून हनुमानाने सीतेचा शोध केला; परंतु त्याला तिचा किंवा रावणाचा पत्ता लागला नाही.

वनाच्या नावाचा उल्लेख नाही.

## ३३. ऋषी < पुंजिकस्थला किष्किन्धाकाण्ड/६६

जाम्बवान हनुमानाला त्याच्या जन्माची कथा सांगत आहे,

अंजना (अंजनी) ही केसरी नावाच्या वानराची पत्नी. पूर्वजन्मी ती पुंजिकस्थला या नावाने विख्यात अशी अप्सरा होती.

विख्याता त्रिषु लोकेषु रूपेणाप्रतिमा भुवि ।
अभिशापादभूत्तात कपित्वे कामरूपिणी ॥ ९

ती रूपाने सर्व पृथ्वीत अप्रतिम असून त्रिलोकात विख्यात होती. ऋषीच्या शापामुळे तिला वानरीचा जन्म प्राप्त झाला होता, कारण तिने त्याचा अपमान केला होता.

तरीही तिला स्वेच्छेप्रमाणे रूपे बदलता येत होती. एकदा ती एका पर्वत-शिखरावर असताना वायूने तिचे वस्त्र उडविले, आणि तिचे सुंदर अवयव दिसताच तो काममोहित झाला. त्याने तिला आलिंगन देऊन तिच्या ठायी आपले तेज (वीर्य) स्थापन केले. त्यामुळे ती गोंधळून गेली. पातिव्रत्य भ्रष्ट झाल्याची तिला भीती वाटू लागली. वायूने तिला तिची भीती व्यर्थ असल्याचे पटवून दिले. वायूने मानसिक भोगाच्याच योगाने आपले तेज तिच्या ठायी ठेवले असल्याने तिला महावीर्यवान, महातेजस्वी, महाबलाढ्य व महापराक्रमी, बुद्धिवान पुत्र होईल आणि

तो त्याच्यासारखे उड्डाण करून समुद्र उल्लंघन करू शकेल, असे आश्वासन तिला दिले. तो तिचा पुत्र म्हणजेच हनुमान.

शाप देणाऱ्या ऋषीचे नाव दिलेले नाही. ऋषीने शाप कोणत्या कारणास्तव दिला तेही स्पष्ट नाही. तिच्या विनवणी वरून ऋषीने तिला उःशाप दिला आणि त्यामुळे ती इच्छेनुसार वानरी किंवा मानुषी रूप धारण करू शकत होती (श्रीरामकोशान्तर्गत हनुमान कोश, पृ. २).

## ३४. १८ लंकादेवी सुन्दरकाण्ड/३

लंकादेवी हनुमानाला आपले वृत्त कथन करीत आहे.

हनुमानाने लंकेवर उड्डाण केले असता लंकानगरी अक्राळ विक्राळ स्त्रीरूप धारण करून भयंकर गर्जना करीत त्याच्यापुढे येऊन ठाकली. रावणाच्या सैन्याने रक्षिलेल्या लंकेत तुला प्रवेश मिळणार नाही, असे तिने ठासून सांगितले. तिने हनुमानाला त्याच्या आगमनाचा उद्देश विचारला असता, त्याने खरेखरे सांगण्याचे आश्वासन देऊन प्रथम तिने आपण कोण आहे, ते सांगावे अशा आग्रह धरला. तेव्हा संतप्त होऊन ती म्हणाली – 'मी स्वता अजिक्य असून महात्म्या राक्षसाधिपती रावणाच्या आज्ञेचे परिपालन करणारी आहे. त्याच्याच आज्ञेने मी त्याच्या ह्या नगरीचे रक्षण करीत आहे. माझी अवज्ञा करून ह्या नगरीमध्ये तुझा प्रवेश होणे शक्य नाही. आज तू माझ्या हातून वध पावशील आणि येथे गतप्राण होऊन निद्रा करशील. मी स्वताच लंकानगरी आहे. लंकानगरी अवलोकन करून निमूटपणे परत जाण्याचा आपला मानस हनुमानाने प्रकट करताच तिने भयंकर गर्जना करून हनुमानाला एक चपराक लगावली. तेव्हा 'ही स्त्री आहे' हे मनात आणून त्याने एक तडाखा तिला दिला; त्यासरशी ती निशाचरी विव्हल होऊन जमिनीवर पडली. हनुमानालाही तिची दया आली. स्फुंदत स्फुंदत तिने आपला पराजय कबूल करून हनुमानाला प्रसन्न होऊन 'महाबलाढ्य पुरुषांना शोभणाऱ्या शास्त्र-मर्यादेला अनसरून क्षमा करावी', अशी याचना केली. ती म्हणाली –

'ब्रह्मदेवाने मला वरदान दिले आहे. पराक्रमाने जेव्हा कोणी वानर तुझा पराजय करील, तेव्हा राक्षसांना भय उत्पन्न होईल, असे त्याने सांगितले आहे. तो समय आज तुझ्या भेटीने प्राप्त झाला आहे. सीतेच्या निमित्ताने दुरात्म्या रावणाचा आणि त्याच्याबरोबर सर्व राक्षसांचा विनाशकाल आला आहे', असे सांगून तिने हनुमानाला लंका नगरीत प्रवेश करून इच्छित कार्य करून घेण्यास सांगितले.

प्रविश्य शापोपहतां हरीश्वर ।
पुरीं शुभां राक्षसमुख्यपालिताम् । -५१

'मुख्य मुख्य राक्षसांनी संरक्षण केलेल्या परंतु शापग्रस्त झालेल्या ह्या शुभ नगरीत प्रवेश कर.'

लंका-दहनाच्या वर्णनातही पुढील उल्लेख आढळतो -

हनूमतः क्रोधबलाभिभूता ।
बभूव शापोपहतेव लङ्का ।। सुंदरकांड ५४-४१

'हनुमानाच्या क्रोधाने व बलाने त्रस्त झालेली ती लंका अग्नीच्या ज्वालांनी व्याप्त झाल्यामुळे आणि योद्ध्यांची दाणादाण उडून गेल्यामुळे शापदग्ध झाल्यासारखी दिसू लागली.'

'शापोपहत' असा लंकेचा उल्लेख वाल्मीकी रामायणात आला असला तरी तिला शाप कोणी दिला होता? व का दिला होता? याविषयी माहिती नाही. शापमुक्तीचा समय दिला असला, तरी शाप काय होता, याबाबतही काही माहिती मिळत नाही. त्यामुळे शापाचे स्वरूप कळू शकत नाही.

## ३५. ब्रह्मदेव < रावण युद्धकाण्ड/१३

रावण महापार्श्वाला त्याच्या जीवनात घडलेली एक गुप्त गोष्ट सांगत आहे.

सीतेचे अपहरण करून तिला लंकेत आणल्यावर कडेकोट बंदोबस्तात ठेवण्यात आले होते. सीतेविषयीच्या कामवासनेने तो पीडित

झाला होता. राजसभा बोलावून त्याने आपला मनोदय प्रकट केला असता त्याच्या निष्ठावंत सुहृदांनी त्याच्या इच्छेला मान दिला. रामाचा वध करून सीतेचा चिरकाल उपभोग घेण्याची संधी रावणाला प्राप्त करून देण्याची कुंभकर्णाने प्रतिज्ञा केली. महापार्श्वाने – त्याच्या एका अमात्याने – रावणास सीतेवर बलात्कार करण्यास प्रोत्साहित केले. तेव्हा रावण त्याला म्हणाला– 'पूर्वी आकाशामध्ये असलेली अग्नि-ज्वालाच की काय अशी पुंजिकस्थला नामक अप्सरा माझ्या भीतीने दबकत दबकत ब्रह्मदेवाच्या स्थानाप्रत जात असलेली मी अवलोकन केली. तिला पाहताच तिचा मी बलात्काराने उपभोग घेतला आणि तिला वस्त्ररहित करून सोडून दिले. तेव्हा कमलिनीप्रमाणे लटलट कापत ती ब्रह्मलोकी गेली. ते कृत्य त्या महात्म्या ब्रह्मदेवाला समजून आले, असे मला वाटते, कारण ब्रह्मदेव क्रुद्ध होऊन मला म्हणाला–

अद्यप्रभृति यामन्यां बलान्नारीं गमिष्यसि ।
तदा ते शतधा मूर्धा फलिष्यति न संशयः ।। १४

'आजपासून परस्त्रीचा तू बलात्काराने उपभोग घेशील, तर तत्क्षणीच तुझ्या मस्तकाचे शेकडो तुकडे होऊन जातील, ह्यात संशय नाही.'

ह्याप्रमाणे ब्रह्मदेवाच्या शापाला रावण अतिशय भ्याला असल्याने विदेह राजकन्या सीतेचा शुभ शय्येवर उपभोग घेण्यास तो समर्थ नव्हता.

हा सशर्त शाप आहे.

## ३६. शुक < राम युद्धकाण्ड/२०

रावणवधाच्या कार्यात रामाला साहाय्य करण्यासाठी सुग्रीवाने आपले सैन्य समुद्रतीरावर आणून ठेवले. शार्दूल नावाच्या रावणाच्या हेराने ते पाहून रावणाला संभाव्य आक्रमणाची पूर्वसूचना दिली. रावण क्रुद्ध झाला होता, तरीही सामोपचारासाठी शुक नावाच्या राक्षसाला

सुग्रीवाकडे बोलणी करण्यासाठी त्याने दूत म्हणून धाडले. शुक पक्ष्याचे रूप घेऊन त्याने रावणाचा निरोप स्पष्ट शब्दांत सांगितला. वानरांनी त्याची पिसे उपटून त्रास देण्यास प्रारंभ केला, तेव्हा त्याने आपण दूत या नात्याने आलो असल्याने अशी वागणूक देणे योग्य नसल्याचे सांगितले. ते ऐकून रामाने वानरांना 'त्याला उपद्रव होईल, असे काही करू नये', असे स्पष्टपणे बजावले. तो दूत नसून रावणाचा हेर असावा, असा अंगदाला संशय आला व त्याने तो सुग्रीवाजवळ बोलूनही दाखविला. इतकेच नव्हे तर त्याला लंकेला परत जाऊ न देता बंदिस्त करावे, असे आपले मत स्पष्टपणे सांगितले. सुग्रीवाच्या आज्ञेने वानरांनी उड्डाण करून शुक पक्षीरूप राक्षसाला बांधून टाकले व ते त्याला पीडा देऊ लागले. तेव्हा तो रामाला म्हणाला– माझे पंख हे वानर उपटत असून डोळेही फोडत आहेत. यास्तव–

यां च रात्रिं मरिष्यामि जाये रात्रिं च यामहम् ।
एतस्मिन्नन्तरे काले यन्मया ह्यशुभं कृतम् ।
सर्वं तदुपपद्येथा जह्यां चेद्यदि जीवितम् ।। ३२

'जन्मदिवसापासून तो मरण दिवसापर्यंत माझ्या हातून जे काही पातक घडले असेल, ते सर्व माझा येथे अंत झाल्यास तुला प्राप्त होईल.'

त्याचा विलाप ऐकून रामाला दया आली आणि 'आलेल्या दूताला सोडून द्या.', अशी रामाने वानरांना आज्ञा केली.

हा शाप की तळतळाट? शाप असला तर तो सशर्त आहे. तो देण्याचे सामर्थ्य शुकाला कसे प्राप्त झाले, हा प्रश्न उरतोच.

## ३७. ब्रह्मदेव < कुंभकर्ण युद्धकाण्ड/६१

रामाच्या पृच्छेवरून बिभीषण त्याला कुंभकर्णाविषयी सांगत आहे.

कुंभकर्ण हा विश्रवसाचा प्रतापी पुत्र. अन्य कोणीही राक्षस त्याची बरोबरी करू शकत नाही. युद्धात त्याने देव, दानव, यक्ष, भुजंग, राक्षस, गंधर्व, पन्नग, विद्याधर या सर्वांचा पराजय केला आहे. देवही त्याचा वध करू शकले नाहीत. तो राक्षसांमध्ये अत्यंत तेजस्वी व वरदानामुळे अति सामर्थ्यवान आहे. युद्धात त्याने इंद्राच्या ऐरावताचा दात मोडून टाकला. हजारो लोकांना तो भक्षण करू लागला असता भयभीत झालेले प्रजानन इंद्राला शरण गेले. इंद्राने त्याच्यावर वज्र–प्रहार केला असता तो प्रजेला अधिकच त्रस्त करू लागला. इंद्रालाही त्याने जर्जर केले. तेव्हा देव – दानवांसह इंद्र ब्रह्मदेवाकडे गेला आणि कुंभकर्णाचा दुष्टपणा, प्रजेचे भक्षण, परस्त्रियांचे अपहरण इत्यादीबाबत सारे कथन करून हे असेच चालू राहिले, तर थोड्याच कालात जगत् शून्य होईल, अशी भीती व्यक्त केली. इंद्राचे भाषण ऐकून ब्रह्मदेवाने राक्षसांना आव्हान करून कुंभकर्णाला अवलोकन केले. कुंभकर्णाला पाहून ब्रह्मदेवाचीही गाळण उडाली. परंतु तो कुंभकर्णाला म्हणाला –

ध्रुवं लोकविनाशाय पौलस्त्येनासि निर्मितः ।
तस्मात्त्वमद्यप्रभृति मृतकल्पः शयिष्यसे ।। २४

'विश्रवसाने तुला निःसंशय लोकांच्या नाशार्थ निर्माण केले आहे, तस्मात् तू आजपासून मृततुल्य निद्रिस्थ होऊन राहशील.'

कुंभकर्णाने ब्रह्मदेवासमोर साष्टांग नमस्कार घातला. ब्रह्मदेवाचा शाप ऐकून रावण त्याला म्हणाला, 'स्वताच्या नातवाला असा शाप देणे न्याय्य नव्हे. आपले वचन मिथ्या होणार नाही, तो निद्रिस्थ राहीलच, परंतु त्याच्या निद्रेची व जाग्रणाची आपण काही तरी वेळ ठरवून द्यावी.' रावणाची विनंती ऐकून ब्रह्मदेव म्हणाला –

शयिता ह्येष षण्मासमेकाहं जागरिष्यति ।। –२८

एकेनाह्ना त्वसौ वीरश्चरन्भूमिं बुभुक्षितः ।
व्यात्तास्यो भक्षयेल्लोकान्संवृद्ध इव पावकः ।। २९

'कमीत कमी हा सहा तरी महिने एकसारखा निजून राहिल्यावर एक दिवस जागा राहील. एका दिवसामध्ये हा वीर बुभुक्षित होऊन

व आ पसरून भूमीवर संचार करिता करिता वृद्धिगत झालेल्या अग्नी-प्रमाणे लोकांना भक्षण करीत सुटेल.'

रावणाच्या विनंतीवरून ब्रह्मदेवाने काढलेले उद्गार उःशापा-सारखे आहेत. येथे शापप्राप्त कुंभकर्णाने उःशाप न मागता रावणाने त्याचेसाठी मागितला आहे.

## ३८. पुलस्त्य < तृणबिंदुकन्या उत्तरकाण्ड/२

अगस्त्य ऋषी रामाला विश्रवा मुनीची जन्मकथा सांगत आहे.

कृतयुगात पुलस्त्य नामक ब्रह्मर्षी प्रजापतीचा पुत्र होऊन गेला. धर्म आणि शील यामुळे तो देवांनाही प्रिय होता. मेरु पर्वताजवळील तृणबिंदूच्या आश्रमात तो तपश्चर्या करण्यासाठी जाऊन राहिला होता. अनेक नागकन्या, ऋषिकन्या, राजर्षिकन्या, अप्सरा क्रीडा करीत करीत त्या आश्रमाजवळ आल्या. त्या नेहमीच तेथे येऊन नृत्य-गायनात दंग असत. त्या मुलींच्या आगमनाने पुलस्त्य ऋषीच्या तपात विघ्न येऊ लागल्याने तो क्रुद्ध झाला आणि

'जी कन्या माझ्या दृष्टीस पडेल तिला गर्भधारणा होईल –

**'या मे दर्शनमागच्छेत्सा गर्भं धारयिष्यति । –१३**

असे म्हणाला. ब्रह्मशापाच्या भीतीने त्या कन्या त्या प्रदेशाजवळ जाईनाशा झाल्या. परंतु तृणबिंदू राजर्षीच्या कन्येने, तो शाप न ऐकल्याने ती तेथ सहज गेली असता, तिला तेथे तिची एकही मैत्रीण दिसली नाही. ती तेथे निःशंक हिंडत असता त्या मुनीच्या दृष्टीस पडली आणि तत्क्षणी तिचे शरीर पांढुरके झाले, तिच्या ठायी गर्भाचा प्रादुर्भाव झाला. ह्या अनर्थामुळे उद्विग्न होऊन ती आश्रमात वडिलांसमोर येऊन उभी राहिली. तिची ती अवस्था पाहून व सारी विचारपूस करून तो ध्यानस्थ झाला. तेंव्हा सारा प्रकार त्याच्या लक्षात आला. कन्येला घेऊन तो पुलस्त्य ऋषीकडे जाऊन म्हणाला – 'भगवन्, स्वताच्याच गुणांनी

भूषित असलेली ही माझी कन्या आपण स्वीकारा. महर्षे, आपोआप चालून आलेली ही भिक्षा होय. तपश्चर्येने आपल्याला येणारा थकवा ही कन्या आपली शुश्रूषा करून घालवील.' पुलस्त्याने तृणबिंदूच्या विनंतीला मान्यता दिली. तिची सेवा, शील आणि वर्तन यामुळे मुनी संतुष्ट झाला आणि तिला म्हणाला –

**'स तु विज्ञाय तं शापं महर्षेर्भावितात्मनः । –२४**

'हे देवी, उभयतांचा वंश चालविणारा आणि पौलस्त्य म्हणून प्रसिद्ध होणारा असा एक आपल्यासारखाच पुत्र मी तुला अर्पण करतो. ज्या अर्थी मी अध्ययन करीत असताना तू वेद श्रवण केला आहेस, त्या अर्थी तो विश्रवा म्हणून प्रसिद्ध होईल.'

पुलस्त्याने तृणबिंदूची विनंती मान्य करणे हा उःशाप नव्हे. तृणबिंदुकन्येला शापामुळे गर्भधारणा झाली असली, तरी अंती तो शाप वरप्रद ठरला आहे.

## ३९. विश्रवा < कैकसी

उत्तरकाण्ड/९

अगस्त्य मुनी रामाला सुमाली कन्या कैकसीविषयी कथन करीत आहे.

सुमाली राक्षसाची कन्या कैकसी ही अत्यंत रूपवती होती. ती विवाहयोग्य झाली असता अनेकांनी तिला मागणी घातली; परंतु सुमालीने कोणाच्याही मागणीला साद दिली नाही. तेव्हा नकाराच्या भीतीने तिला पुढे कोणी मागणी घालीना व तिचे वय दिवसेदिवस वाढू लागले. तिचे यौवन वाया जात असलेले पाहून सुमाली चिंताग्रस्त झाला. तो आपल्या कन्येला म्हणाला – 'तू साक्षात् लक्ष्मीप्रमाणे आहेस आणि आम्ही सर्व धर्मनिष्ठ तुझ्याकरिता पंचायतीत पडलो आहोत. अब्रूची चाड बाळगणाऱ्या सर्वांनाच कन्या-पितृत्व दुःखदायक आहे. ह्यास्तव मुनींमध्ये उत्तम ब्रह्मदेवाच्या कुळात उत्पन्न झालेला आणि पुलस्त्य-पुत्र

असा जो श्रेष्ठ विश्रवा – त्याला तू आपण होऊनच वर. तेजाने रवितुल्य असलेला हा धनाधिपती ज्या प्रकारचा आहे, त्या प्रकारचे तुला पुत्र होतील, ह्यात संशय नाही. '

वडिलांच्या सांगण्याप्रमाणे ती कन्या विश्रवा मुनी तप करीत होता तेथे जाऊन उभी राहिली. त्याने तिची विचारपूस करून तिच्या येण्याचा उद्देश विचारला असता ती विनयपूर्वक म्हणाली – ' मुने, आपल्या प्रभावानेच आपण माझा उद्देश जाणाल. तथापि हे ब्रह्मर्षे, पित्याच्या आज्ञेने मी येथे आले आहे, एवढे आपण समजा. माझे नाव कैकसी. बाकीचे आपणाला समजेलच. '

ध्यानस्थ होऊन विश्रवाने तिच्या आगमनाचा उद्देश जाणला. तो तिला म्हणाला –

सुताभिलाषो मत्तस्ते मत्तमातङ्गगामिनी ।
दारुणायां तु वेलायां यस्मात्त्वं मामुपस्थिता ।। २२

श्रुणु तस्मात्सुतान्भद्रे यादृशाञ्जनयिष्यसि ।
दारुणान्दारुणाकारान्दारुणाभिजनप्रियान् ।। २३

प्रसविष्यसि सुश्रोणि राक्षसाङ्क्रूरकर्मण : । – २४

' हे मत्त गजगामिनी, माझ्यापासून पुत्रप्राप्ती व्हावी अशी तुझी इच्छा आहे; परंतु ज्या अर्थी क्रूर वेळ असताना तू माझ्याकडे आली आहेस, त्या अर्थी तुला पुत्र कसे होतील ते तू श्रवण कर. स्वभावाने व रूपानेही भयंकर, क्रूर बांधव आवडणारे आणि क्रूर कर्म करणारे राक्षस तुला होतील ! '

मुनीचे शब्द ऐकून ती विनयपूर्वक म्हणाली – ' भगवन्, आपणासारख्या ब्रह्मवेत्त्यापासून अशा प्रकारचे अत्यंत दुराचारी पुत्र प्राप्त होण्याची माझी इच्छा नाही. ह्यास्तव आपण मजवर कृपा करा. '

तिची विनंती लक्षात घेऊन, तो मुनी तिला म्हणाला – ' तुझा जो शेवटला पुत्र होईल, तो माझ्या वंशाला अनुरूप व धर्मात्मा

होईल.' कालौघात तिला रावण, कुंभकर्ण, शूर्पणखा व बिभीषण अशी अपत्ये झाली.

कैकसीची विनंती याचित उःशापासारखी आहे.

## ४०. विश्रवा < रावण उत्तरकाण्ड/११

अगस्त्य मुनी रामाला रावण–मंदोदरी विवाहाविषयी सांगत आहे.

रावणाने आपल्या प्रहस्त नावाच्या अमात्याला कुबेराकडे धाडून लंकेची मागणी केली. तेव्हा कुबेराने आपल्या पित्याला–विश्रवाला, काय करावे, असा सल्ला विचारला. रावणाला लंका देऊन कुबेराने कैलास पर्वतावर वास्तव्य करावे, असे त्याने सांगितले. इतकेच नव्हे तर पूर्वी रावणाने आपल्याकडेही लंका मागितली होती, असे तो म्हणाला. लंकेबाबत अट्टहास केल्यास ती तुझ्या नाशास कारणीभूत होईल, असा स्पष्ट इशारा विश्रवाने रावणास दिला होता, परंतु वरप्राप्तीने गर्विष्ठ झालेल्या रावणाने विश्रवाच्या उपदेशाकडे दुर्लक्ष केले. विश्रवा म्हणतो–

**' न वेत्ति मम शापाच्च प्रकृतिं दारुणां गतः ।। – ४०**

उत्तरकाण्ड/१२

' माझ्या शापामुळे त्याचा स्वभाव क्रूर झाला आहे.'

मृगयेसाठी एका निर्जन वनात हिंडत असता रावणाला मय नावाचा दैत्य त्याच्या कन्येसह दिसला. त्याला एकाकी पाहून रावणाने त्याची विचारपूस केली, तेव्हा तो म्हणाला– ' देवांनी हेमा नावाची अप्सरा मला दिली. तिच्या ठायी माझे मन हजारो वर्षे आसक्त झाले होते. एकदा ती देवकार्यासाठी देवलोकाला गेली असता तेरा वर्षे उलटून गेली तरी ती परत आली नाही. तिच्यापासून उत्पन्न झालेली ही कन्या आता विवाहयोग्य झाल्याने विरहाने व्याकुल झालेला मी हिच्यासाठी वरसंशोधनार्थ हिंडत हिंडत सांप्रत येथे आलो आहे.' एवढे त्याविषयी

सांगून त्याने रावणाला त्याची माहिती सांगण्याची विनंती केली. रावणानेही आपण पौलस्त्यपुत्र दशग्रीव असल्याचे सांगितले.

स हि तस्य मयो राम शापाभिज्ञस्तपोधनात् ।। – २०

विदित्वा तेन सा दत्ता तस्य पैतामहं कुलम् । – २१

'तुझा स्वभाव भयंकर होईल, म्हणून रावणाला जो (विश्रवा) मुनीपासून शाप मिळाला होता, तो त्या मयाला ठाऊक होता. परंतु त्याच्या पितामहाच्या कुलाकडे लक्ष्य देऊन त्याने आपली कन्या त्याला अर्पण केली.' हीच ती कन्या – मंदोदरी. रावणाने तिचा भार्या म्हणून अग्नीला साक्षी ठेऊन स्वीकार केला.

विश्रवाने रावणाला का शाप दिला होता, ते स्पष्टपणे दिलेले नाही. बहुधा त्याचा विश्रवा < कैकसी शापाशी संबंध असावा. पहा पृ.५२-५३

## ४१. पार्वती < कुबेर

उत्तरकाण्ड/१३

अगस्त्य मुनी रामाला रावणाच्या दुर्वर्तनाविषयी कथन करीत आहे. कुबेराने रावणाला दूताकरवी जो उपदेश कळविला आहे, तो दूत निवेदन करीत आहे.

देव, ऋषी, यक्ष, गंधर्व यांना ताडण करणे, नंदनादी उद्यानांचा विध्वंस करणे, नद्या, पर्वत, वृक्ष उध्वस्त करणे अशी रावणाची अनेक दुष्कृत्ये सतत कानी येत गेल्यामुळे कुबेराने लंकेत आपला दूत धाडून सद्वर्तनी होण्याविषयी उपदेश केला आहे. त्यात त्याने निर्दोष असताही पार्वतीच्या रोषाला आपण कसे बळी पडलो, हे उदाहरण दिले आहे. दूत रावणाला म्हणाला– "तुझ्या भावाचा निरोप मी तुला जसाच्या तसा सांगत आहे. मातापितरांचे कुल आणि वर्तन याला अनसरून तू आपले वर्तन चांगले ठेव. झाले तितके पातक पुरे. तुझे सर्व उद्योग माझ्या कानी आले असून तुझे पारिपत्य करण्यासाठी देवही सज्ज होत आहेत.

कडकडीत व्रताचे अवलंबन करीत शुद्ध व जितेंद्रिय असलेल्या मला माझा दोष नसताही पार्वतीच्या रोषाचा धनी व्हावे लागले. हिमालयावर धर्माचरण करण्यासाठी गेलो असता पार्वतीसह महादेवांचे दर्शन मला झाले. अनुपम रूप धारण करणारी ही स्त्री पाहून कुतुहलाने– दुसऱ्या कोणताही हेतू मनात नसताना – डाव्या डोळ्याने पाहिले मात्र, तोच–

देव्या दिव्यप्रभावेण दग्धं सव्यं ममेक्षणम् ।
रेणुध्वस्तमिव ज्योतिः पिङ्गलत्वमुपागतम् ।। २४

" देवीच्या दिव्य प्रभावामुळे माझा डावा डोळा जळून खाक झाला आणि तेजोमय असलेला उजवा डोळा केर गेल्यासारखा होऊन पिंगट बनला."

नंतर तपश्चर्येने मी महादेवाला प्रसन्न केले आणि त्याचे सख्यत्व मिळवले. परंतु 'एकाक्षि-पिंगली' हे माझे नाव अक्षय्य झाले. तरी तू पापकर्मापासून परावृत्त हो. कुलाला बट्टा लागेल असे काही करू नकोस."

दूताचे भाषण ऐकून रावण संतप्त झाला. दूतासह कुबेराला यमसदनी धाडण्याची त्याने प्रतिज्ञा करून दूताला ठार केले.

हा शाप शंकास्पद भासतो. कुबेराचा डावा डोळा दग्ध झाला व उजवा पिंगट बनला, तो पार्वतीच्या दिव्य तेजाने की शापाने? पार्वतीच्या मुखातून शब्दोच्चार झाला नसल्याने शाप म्हणता येणार नाही, कारण शाप ही वाचाशक्ती आहे.

## ४२. नंदीश्वर < रावण उत्तरकाण्ड/१६

अगस्त्य रामाला नंदीने रावणाला दिलेल्या शापाचे वृत्त कथन करीत आहे.

कुबेराला जिंकल्यानंतर त्याच्या पुष्पक विमानातून संचार करीत रावण एका पर्वतावर आरूढ झाला. तेथे ते यथेष्ट संचार करणारे

विमान कुंठित झाले. कुबेराचा व पुष्पकाचा संबंध तुटल्यामुळे ते निश्चल झाले असावे, असे मारीचाला वाटले. इतक्यात कृष्ण व पिंगट वर्णांनी युक्त, बलाढ्य, ठेंगणा, मुंडन केलेला, ऱ्हस्व भुजांनी युक्त, प्रचंड आणि भयंकर असा शंकराचा सेवक नंदीश्वर वानररूपाने त्याच्या पुढे ठाकला आणि त्याने त्याला पुढे जाण्यास विरोध केला. 'पर्वतावर शंकराची क्रीडा चालू असल्याने तेथे कुणालाही प्रवेश नाही', असे त्याने सांगितले असता रावणाने 'कोण हा शंकर?' अशी उर्मटपणे पृच्छा केली. हाता-तील प्रदीप्त शूलामुळे नंदी प्रतिशंकरच भासत होता. रावणाच्या उर्मटपणाने तो क्रुद्ध झाला आणि त्या राक्षसाला म्हणाला—

यस्माद्वानररूपं मामवज्ञाय दशानन ।
अशनीपातसंकाशमपहासं प्रयुक्तवान् ।। १६

तस्मान्मद्वीर्यसंयुक्ता मद्रूपसमतेजसः ।
उत्पत्स्यन्ति वधार्थं हि कुलस्य तव वानराः ।। १७

नखदंष्ट्रायुधाः क्रूरा मनःसंपातरंहसः ।
युद्धोन्मत्ता बलोद्रिक्ताः शैला इव विसर्पिणः ।। १८

ते तव प्रबलं दर्पमुत्सेधं च पृथग्विधम् ।
व्यपनेष्यन्ति सम्भूय सहामात्यसुतस्य च ।। १९

किं त्विदानीं मया शक्यं हन्तुं त्वां हे निशाचर ।
न हन्तव्यो हतस्त्वं हि पूर्वमेव स्वकर्मभिः ।। २०

'दशानना, ज्या अर्थी वानररूप धारण केलेल्या माझी अवज्ञा करून तू विद्युत्पात तुल्य अमर्याद हास्य केले आहेस, त्या अर्थी माझ्या वीर्याने युक्त व माझ्यासारखेच तेजस्वी आणि रूपवान वानर तुझ्या कुलाच्या वधाकरिता उत्पन्न होतील. हे क्रूरा, नखे व दाढा ही ज्यांची आयुधे आहेत, मनाप्रमाणे ज्यांचा वेग आहे, बलाने जे उचंबळत आहेत, युद्धात ज्यांना भान रहात नाही आणि गमन करणारे पर्वतच की काय असे जे प्रचंड आहेत, ते वानर एकत्र जुळून तुझा, तुझ्या अमात्यांचा व तुझ्या पुत्रांचा हरतऱ्हेचा फाजिल गर्व आणि बल नष्ट करतील. हे

राक्षसा, सांप्रत माझ्या हातून तुझा वध होणे जरी शक्य आहे, तरी तुला मारणे योग्य नाही; कारण आपल्या कर्मांच्या योगाने तू पूर्वीच वध पावला आहेस.'

नंदीने इतक्या स्पष्ट शब्दांत त्याला त्याच्या भवितव्याची यथार्थ कल्पना दिली; तरीही रावणाने शंकराची अवज्ञा करणे थांबविले नाही. रावणाने पर्वत उलथून टाकण्याच्या हेतूने आपला हात पर्वताखाली घातला, तेव्हा शंकराने पायाच्या अंगठ्याने पर्वत दाबला आणि त्याचे हात दडपून टाकले. हे पाहून सर्व आश्चर्यचकित झाले व त्यांनी शंकराला प्रसन्न करून घेण्याबाबत रावणाला सांगितले. रावणानेही शंकराला संतुष्ट केले.

सुन्दरकाण्ड/५०

हनुमानाला रावणाच्या सभेत आणल्यानंतर त्याला पाहून रावण अतिशय क्रुद्ध झाला. त्याचे मन साशंक झाले होते. तो त्या तेजस्वी वानराधिपासंबंधाने विचार करू लागला–

किमेष भगवान्नन्दी भवेत्साक्षादिहागतः ।। – २

येनं शप्तो ऽस्मि कैलासे मया प्रहसिते पुरा ।
सो ऽयं वानरमूर्तिः स्यात्किस्विद्बाणो ऽपि वासुरः ।। ३

'अरे हा प्रत्यक्ष भगवान नन्दीच येथे आला आहे की काय ? कारण पूर्वी मी त्याला कैलास पर्वतावर हसल्यामुळे – माझ्यासारखे ज्याचे मुख आहे, अशांच्या हातून तुझा नाश होईल, म्हणून त्याने मला शाप दिला होता. अथवा नन्दीने पाठविलेला हा बाणासुरच वानर रूप धारण करून येथे आला आहे की काय ?' –अशी आठवण रावणाला झाली.

युद्धकाण्ड/६०

रामाच्या बाणांनी त्रस्त झालेल्या रावणाला पूर्वी ज्यांनी ज्यांनी शाप दिले होते त्यांचे स्मरण झाले. नन्दीश्वराने दिलेला शापही त्याला आठवला, असा उल्लेख पुढील पंक्तीत आहे.

उमा नन्दीश्वरश्चापि रम्भा वरुणकन्यका ।। – ११
यथोक्तास्तन्मया प्राप्तं न मिथ्या ऋषिभाषितम् ।। – १२

रावणाला पूर्वी उमा, नंदिकेश्वर, रंभा आणि वरुण कन्या यांनी शाप दिल्याचा उल्लेख आहे.

## ४३. वेदवती < रावण उत्तरकाण्ड/१७

वेदवतीने रावणासंबंधी केलेल्या प्रतिज्ञेचे वृत्त अगस्त्य मुनी रामाला कथन करीत आहे.

हिमालयाच्या अरण्यात हिंडत असता रावणाच्या नजरेस एक अत्यंत रूपवती तरुणी तपश्चर्या करीत असलेली दिसली. तिला पाहून तो काममोहित झाला. तिच्या यौवनाची व रूपाची महती वर्णन करून तिला तपश्चर्येपासून परावृत्त करण्याचा तो प्रयत्न करू लागला. त्याने तिची विचारपूस केली व तिनेही त्याचे यथायोग्य आदरातिथ्य केले. वडिलांनी तिला विष्णूला अर्पण करण्याचे योजिले असता शंभू नामक दैत्याने क्रुद्ध होऊन तिच्या पित्याचा वध केला आणि आई सती गेली. वडिलांचा मनोदय पूर्ण करण्याचा निश्चय असून त्यासाठीच तपश्चर्या करीत असल्याचे तिने सांगितले. रावणाने ते ऐकून विष्णूविषयी अपमानास्पद उद्गार काढले व तिला भार्या होण्याची विनंती केली. विष्णूविषयी तुच्छतेने बोलणाऱ्या रावणाची तिने निर्भर्त्सना केली. तेव्हा त्याने क्रुद्ध होऊन तिचे केस धरले. तिने आपल्या हाताने केस तोडून टाकले आणि क्रोधाने अग्नीसारखी दाहक होऊन ती म्हणाली– ‘दुष्टा, तू माझ्या अंगावर हात टाकल्यामुळे मला आता जगण्याची इच्छा नाही. तस्मात् हे राक्षसा, तुझ्यासमक्ष अग्नीमध्ये मी प्रवेश करते.’

यस्मात्तु धर्षिता चाहं त्वया पापात्मना वने ॥ – ३१

तस्मात्तव वधार्थं हि समुत्पत्स्ये ह्यहं पुनः ।
नहि शक्यः स्त्रिया हन्तुं पुरुषः पापनिश्चयः ॥ ३२

शापे त्वयि मयोत्सृष्टे तपसश्च व्ययो भवेत् ।
यदि त्वस्ति मया किंचित्कृतं दत्तं हुतं तथा ॥ ३३

तस्मात्त्वयोनिजा साध्वी भवेयं धर्मिणः सुता । – ३४

'ज्या अर्थी वनामध्ये तू दुरात्म्याने माझ्या अंगावर हात टाकला आहेस, त्या अर्थी तुझ्या वधाकरिता मी पुनरपि उत्पन्न होईन. पापबुद्धी पुरुषाचा वध मज स्त्रीच्या हातून होणे शक्य नाही. कारण मी तुला शाप दिला असता माझ्या तपाचा व्यय होईल. मी जर काही तप केले असेल, जर काही दान दिले असेल आणि जर काही हवन केले असेल तर त्या पुण्याच्या योगाने एका धर्मनिष्ठ पुरुषाची मी अयोनिसंभव साध्वी कन्या होईन.'

असे बोलून तिने प्रज्वलित अग्नीत उडी घेतली. तेव्हा आकाशातून पुष्पवृष्टी झाली.

### युद्धकाण्ड/६०

रामाच्या बाणांच्या भीतीने ग्रस्त झालेल्या रावणाला पूर्वी वेदवतीने अग्निप्रवेश करिताना काढलेल्या उद्गारांचे स्मरण झाले.

शप्तोऽहं वेदवत्या च यथा सा धर्षिता पुरा ॥ – १०

सेयं सीता महाभागा जाता जनकनन्दिनी । – ११

'वेदवतीवर पूर्वी बलात्कार केल्यामुळे तिने शाप दिला आहे व ती वेदवतीच महाभाग्यवती सीता जनक-कन्या झाली आहे.'

वेदवतीचे उत्तरकांडातील उद्गार शापासारखे असले तरी अर्जित तपाचा व्यय होऊ नये, म्हणून ती शाप देण्याचे टाळते, हे स्पष्ट आहे. परंतु युद्धकाण्डातील रावणाला वेदवतीच्या उद्गाराचे जे स्मरण झाले

आहे, त्याचा त्याने ' शाप ' असाच उल्लेख केला आहे. त्यामुळे वेदवतीचे उद्गार शापतुल्य असले, तरी ती ' शापवाणी ' मानावी का, हे ठरविणे कठीण आहे. तिच्या उद्गारातील उत्तरार्ध मात्र निःसंदेह ' शपथ ' आहे.

वेदवतीप्रमाणेच उमा, नंदिकेश्वर, रंभा व वरुणकन्या यांच्या उद्गारांची रावणाला आठवण झाली.

## ४४. अनरण्य < रावण उत्तरकाण्ड/१९

अनरण्याने रावणाला दिलेल्या शापाविषयी अगस्त्य मुनी रामाला सांगत आहे.

मरुत्त राजाला जिंकल्यानंतर ' माझ्याशी युद्ध करा अथवा पराजित झालो ', अशी कबुली द्या, असे आव्हान देत रावण अनेक नगरे हिंडला. दुष्यंत, सुरथ, गाधी, गय इत्यादी राजांनी आपले व रावणाचे सामर्थ्य ओळखून ' पराजित ' झाल्याचे कबूल केले. त्या वेळी अयोध्येत इक्ष्वाकु-कुलोत्पन्न अनरण्य राजा राज्य करीत होता. त्याला रावणाने युद्धार्थ आव्हान दिले असता त्याने ते स्वीकारले. त्याने रावणावर बाण-वृष्टी केली. परंतु त्यामुळे रावणाला यत्किंचितही इजा झाली नाही. उलट त्याच्यावर रावणाने केलेल्या हस्तप्रहाराने तो रथातून जमिनीवर कोसळला. तेव्हा रावण उपहासाने त्याला म्हणाला– ' माझ्याशी द्वंद्व करणारा त्रैलोक्यातही कोणी नाही. परंतु विषयोपभोगामध्ये तू आसक्त असल्यामुळे माझे सामर्थ्यही तुझ्या कानावर आले नसावे, असे वाटते.' तेव्हा तो मुमुर्षु अनरण्य म्हणाला– ' आत्मप्रशंसा करणाऱ्या तुझ्या हातून मला मृत्यू येत नसून कालानेच मला पछाडले आहे. तू केवळ निमित्त मात्र आहेस. मी युद्ध-पराङ्मुख झालो नसून युद्ध करतानाच तू माझा वध करीत आहेस. तुझ्या भाषणाने इक्ष्वाकुकुलाचा तू अवमान केला आहेस. त्यास्तव मी तुला एवढेच सांगून ठेवतो की–

यदि दत्तं यदि हुतं यदि मे सुकृतं तपः ।
यदि गुप्ताः प्रजाः सम्यक्तदा सत्यं वचोऽस्तु मे ।। २९

उत्पत्स्यते कुले ह्यस्मिन्निक्ष्वाकूणां महात्मनाम् ।
रामो दाशरथिर्नाम स ते प्राणान्हरिष्यति ।। ३०

'मी जर काही दान दिले असेल, काही हवन केले असेल, जर काही चांगले तप आचरिले असेल आणि प्रजाजनांचे चांगल्या रीतीने परिपालन केले असेल तर माझे भाषण सत्य होईल. महात्म्या इक्ष्वाकूंच्या या कुलामध्ये राम म्हणून दशरथाचा पुत्र उत्पन्न होईल आणि तो तुझे प्राण हरण करील.'

## युद्धकाण्ड/६०

रामबाणांच्या भीतीने ग्रस्त झालेल्या रावणाला ब्रह्मदेवापासून मागून घेतलेल्या वराची आठवण झाली. त्याने देव, दानव, यक्ष, राक्षस व पन्नग यांच्यापासून अवध्यत्व मागून घेतले होते. त्याला मानवाची पर्वा नव्हती. त्याला जिंकणे सहज शक्य आहे, अशी त्याची खात्री असल्याने त्याने वरात मानवाचा उल्लेख केला नव्हता. त्या वेळी ब्रह्मदेवाने 'मानवापासून भय आहे, हे तू जाणून ठेव', असे स्पष्ट सांगितले होते. 'ज्या अर्थी महेंद्रासमान असलेल्या माझा मानवाने पराजय केला, त्या अर्थी मी केलेली पराकाष्ठेची तपश्चर्या खरोखर व्यर्थ झाली', अशी त्याला हळहळ वाटली. दशरथपुत्र राम भयाचे कारण आहे, अशी त्याची खात्री पटली. त्याचप्रमाणे वेदवती, उमा, नंदिकेश्वर. रंभा आणि वरुणकन्या यांची भाषणेही आठवली. पूर्वी इक्ष्वाकुकुलोत्पन्न अनरण्याच्या शापाचेही स्मरण झाले.

उत्पत्स्यति हि मद्वंशे पुरुषो राक्षसाधम ।
यस्त्वां सपुत्रं सामात्यं सबलं साश्वसारथिम् ।। ९
निहनिष्यति संग्रामे त्वां कुलाधम दुर्मते । – १०

'हे राक्षसाधमा, हे कुलाधमा, हे दुर्मते, माझ्या वंशामध्ये एक पुरुष उत्पन्न होईल आणि तो संग्रामामध्ये पुत्र, अमात्य सैन्य, अश्व व

सारथी यांसहवर्तमान तुझा वध करील', असे अनरण्य म्हणाला होता.

अनरण्याच्या उद्गारात शपथ आणि शाप या दोहोंचा अंतर्भाव होतो. उद्गारातील पहिला भाग (उत्तरकाण्ड १९/२९) शपथ असून (युद्धकाण्ड ६०/९–१० आणि उत्तरकाण्ड १९/३०) शेष भाग हा शाप आहे.

## ४५. (अनेक) पतिव्रता ≤ रावण उत्तरकाण्ड/२४

रावणाला अनेक पतिव्रतांनी दिलेल्या शापाची माहिती अगस्त्य मुनी रामाला सांगत आहे.

देव, दानव, राजर्षी, राक्षस, यक्ष, असुर, मानव यांच्या सुंदर स्त्रिया, कन्या दृष्टीस पडताच त्यांच्या आप्तेष्टांचा वध करून रावण त्यांना आपल्या विमानात बंदिस्त करू लागला. अशा प्रकारे त्याने अनेक स्त्रियांना अडकवून ठेवले. त्या अतिशय दुःखी झाल्या होत्या. आप्तेष्टांच्या वधाने चिंतातुर झाल्या होत्या. त्यांना रावणाची विलक्षण भीती वाटत होती. आपल्या दुर्दैवाला बोल लावत त्या जीवन कंठीत होत्या. आपल्या दुःखाला अंत नाही, अशी त्यांची खात्री झाली होती. परस्त्रियांवर हात टाकण्याची रावणाची कृती त्यांना संतप्त करीत होती.

यस्मादेष परक्यासु रमते राक्षसाधमः ॥ – २०

तस्माद्वै स्त्रीकृतेनैव वधं प्राप्स्यति दुर्मतिः । – २१

'ज्या अर्थी हा राक्षसाधम परस्त्रियांशी रममाण होत आहे, त्या अर्थी स्त्रीच कारण होऊन ह्या दुर्बुद्धी राक्षसाचा वध होईल', असा त्यांनी रावणाला शाप दिला.

त्या पतिव्रता असे म्हणाल्या असता स्वर्गातील दुंदुभी वाजू लागल्या व पुष्पवृष्टी होऊ लागली. पतिव्रतांच्या शापाने रावणाचे तेज

व प्रभा नाहीशी झाली व त्या स्त्रियांबरोबर राहणे त्याच्याही मनाला बरे वाटेनासे झाले.

युद्धकाण्ड/१११

रावणवधानंतर मंदोदरीने केलेल्या विलापात या शापाचा उल्लेख आला आहे.

यास्त्वया विधवा राजन्कृता नैकाः कुलस्त्रियः ॥ – ६४

पतिव्रता धर्मरता गुरुशुश्रूषणे रताः ।
ताभिः शोकाभितप्ताभिः शप्तः परवशं गतः ॥ ६५

त्वया विप्रकृताभिश्च तदा शप्तस्तदागतम् ।
प्रवादः सत्यमेवायं त्वां प्रति प्रायशो नृप ॥ ६६

' राजश्रेष्ठा, ज्या अनेक कुलस्त्रिया तू विधवा करून सोडल्यास, त्या पविव्रता धर्माविषयी तत्पर आणि गुरु-सेवेविषयी नेहमी उद्युक्त होत्या आणि त्याच शोकसंतप्त झालेल्या स्त्रियांनी तुला शाप दिल्यामुळे तू शत्रूचे तावडीत सापडलास. तू अपकार केलेल्या त्या पतिव्रता स्त्रियांनी तुला शाप दिल्यामुळे तू शत्रूचे तावडीत सापडलास. तू अपकार केलेल्या त्या पतिव्रता स्त्रियांनी त्या वेळी तुला जो शाप दिला होता, त्याचे हे फल सांप्रत प्राप्त झाले आहे. '

पतिव्रतांचे अश्रू काहीतरी अनर्थ ओढवल्यावाचून विनाकारण कधीही भूमीवर पडत नाहीत, अशी जी एक म्हण आहे, ती रावणासंबंधाने खरी ठरली आहे.

## ४६. नलकूबर < रावण

उत्तरकाण्ड/२६

नलकूबराने रावणास दिलेल्या शापाचे वृत्त अगस्त्य ऋषी रामाला कथन करीत आहे.

कैलास पर्वतावर संचार करीत असता दिव्य भूषणांनी अलंकृत चंद्रमुखी रंभा त्याच्या दृष्टीस पडली. ती लावण्यवती होती. तिने

चंदनाची उटी चर्चिली होती. कल्पवृक्षाच्या फुलांनी तिने आपला केश-कलाप शृंगारला होता. दिव्य रतिसुखाचा उपभोग घेण्यासाठी ती बाहेर पडली होती. ती नीलवर्ण वस्त्र परिधान केल्याने फारच सुंदर दिसत होती. मदनबाणांनी व्यथित झालेल्या रावणाने तिचा हात धरला आणि तू कोठे, कोणाकडे जात आहेस, अशी पृच्छा केली. आणि रतिसुखाची इच्छा व्यक्त केली. ती लाजली होती, भयभीत झाली होती. ती रावणाला विनयपूर्वक म्हणाली – 'माझ्याशी असे भाषण करणे आपल्याला योग्य नाही. आपण माझे श्वशुर आहात. माझे रक्षण करणे तुमचे कर्तव्य आहे. धर्माने विप्र, वीर्याने क्षत्रिय, क्रोधाने अग्नी आणि क्षमेने पृथ्वी-समान असा कुबेर-पुत्र नलकूबर माझा प्रियकर असून मी हा साजशृंगार करून संकेताप्रमाणे त्याचेकडे जात आहे. तो माझी वाट पहात असेल, तरी माझी सुटका करा आणि मला त्याच्याकडे त्वरित जाऊ द्या.' तिचे भाषण ऐकून रावण म्हणाला –'तू माझी स्नुषा असलीस तरी तू अप्सरा असल्याने सामान्यांचे नियम तुला लागू पडत नाहीत. अप्सरांना पती नाही आणि देवांनाही एकच भार्या असत नाही.' रावणाने बलात्काराने तिचा उपभोग घेतला. लज्जित झालेली रंभा शरीर थरथरत नलकूवराकडे गेली आणि त्याच्या पाया पडून झालेला वृत्तांत यथातथ्य सांगितला. तिचे बोलणे ऐकून नलकूबर अतिशय संतप्त झाला. हातामध्ये उदक घेऊन त्याने आचमन केले आणि –

> उत्ससर्ज तदा शापं राक्षसेन्द्राय दारुणम् ।
> अकामा तेन यस्मात्त्वं बलाद्भद्रे प्रधर्षिता ।। ५४
>
> तस्मात्स युवतीमन्यां नाकामामुपयास्यति ।
> यदा ह्यकामां कामार्तो धर्षयिष्यति योषितम् ।। ५५
>
> मूर्धा तु सप्तधा तस्य शकलीभविता तदा ।–५६

'हे कल्याणी, तू निरिच्छ असताना ज्या अर्थी त्याने तुझा बलात्काराने उपभोग घेतला आहे. त्या अर्थी तो पुनरपि इतर कोणत्याही निरिच्छ तरुणीशी समागम करण्यास तयार होणार नाही. मदनाने

पीडित होऊन हा जर निरिच्छ स्त्रीवर बलात्कार करू लागला, तर याच्या मस्तकाचे तत्क्षणीच सात तुकडे उडून जातील.'

'मी वैश्रवणपुत्र नलकूबर याच्याशी आज क्रीडेचा संकल्प केला असल्यामुळे त्याची **आज** मी भार्या आहे, म्हणून तुमची सून आहे.' श्रीराम-कोश, खण्ड १ भाग १, पृ. ६८.

'मी **आज** त्याची भार्या आहे', असा वाल्मीकीने उल्लेख केलेला नाही. उलट ती म्हणते – **धर्मतस्ते सुतस्याहं भार्या ...** । धर्माने आपल्या पुत्राची भार्या आहे. **यथा तस्य हि नान्यस्य भावो मां प्रति तिष्ठति ।** त्याच्याप्रमाणे दुसऱ्या कुणावरही माझे प्रेम नाही, हे सत्य आहे. ह्या पंक्ती लक्षात घेता श्रीराम-कोशकारांनी योजिलेला 'आज' हा शब्द-प्रयोग बरोबर वाटत नाही.

## ४७. मुनी < हनुमान

उत्तरकाण्ड/३६

हनुमानाची गती, मती आणि बल यामध्ये बरोबरी करू शकेल असा दुसरा कुणीही नाही. परंतु आपले बल काय आहे, हे त्याला समजणार नाही, असा शाप त्यास मुनींनी दिला असल्याबद्दल अगस्त्य ऋषी रामाला सांगत आहे.

वरदानरूप बलाने युक्त असलेला हनुमान वेगात अगाध समुद्राची बरोबरी करणारा आहे. त्याचा वेग दिवसेदिवस वृद्धिगत होत आहे. महर्षींच्या आश्रमात हा निःशंकपणे संचार करून, त्यांची यज्ञपात्रे अग्नी, वल्कले भग्न व उध्वस्त करून टाकत असे. ब्रह्मदंडाच्या योगाने त्याचा वध होणे शक्य नसल्याने ऋषी त्याचा अतिक्रम सहन करीत असत केसरीने व वायूने त्याचा निषेध केला, तरीही तो मर्यादेचे उल्लंघन करीत असे. भृगू आणि अंगिरस वंशातील ऋषी त्याच्या कृतीने संतप्त झाले. त्याचा घात करण्याची इच्छा न बाळगता किंवा फारसा संताप व्यक्त न करता ते म्हणाले –

बाधसे यत्समाश्रित्य बलमस्माद्प्लवंगम ।। – ३४

तद्दीर्घकालं वेत्तासि नास्माकं शापमोहितः ।
यदा ते स्मार्यते कीर्तिस्तदा ते वर्धते बलम् ।। ३५

'हे वानरा, ज्या बलाचा आश्रय करून तू आम्हाला पीडा देत आहेस, त्या बलाचीच आमच्या शापाने मोहित झाल्यामुळे तुला पुष्कळ वेळपर्यंत आठवण राहणार नाही. जेव्हा तुझ्या योग्यतेविषयी तुला कोणी आठवण करून, देईल तेव्हा तुझे बल वृद्धिगत होईल.'

महर्षींच्या या उद्गारांमुळे स्वसामर्थ्याविषयीचे हनुमानाचे ज्ञान नाहीसे झाल्याने हा सौम्य होऊन आश्रमात संचार करू लागला. वाली आणि सुग्रीव यांमध्ये वैर उपस्थित झाले असता याला स्वसामर्थ्याचे स्मरण राहिले नाही. त्यामुळे त्याला वालीचे पारिपत्य करता आले नाही.

शापाचा हा उत्तरभाग उःशापासारखा आहे. मात्र तो अयाचित आहे. उःशाप सामान्यतः याचितच असतो, परंतु येथे हनुमानाने उःशाप मागितल्याचा उल्लेख नाही.

उत्तरकाण्ड/३५

अमोघशापैः शापस्तु दत्तोऽस्य मुनिभिः पुरा ।
न वेत्ता हि बलं सर्वं बली सन्नरिमर्दन ।। १६

अगस्त्य मुनी रामाला सांगत आहे – 'हे शत्रुनाशका, हनुमान बलाढ्य असूनही आपले सर्व बल किती आहे, हे त्याला समजणार नाही', असा शाप–ज्यांचा शाप व्यर्थ होत नाही अशा मुनींनी पूर्वी त्याला दिलेला आहे.

केवळ पुनरुल्लेख.

## ४८. भृगू < विष्णू उत्तरकाण्ड/५१

लक्ष्मणाला त्याचा सारथी सुमंत्र पूर्वी दुर्वास मुनीने सांगितलेली एक कथा सांगत आहे.

एकदा दशरथ राजा वसिष्ठ मुनीच्या आश्रमात गेला असता दुर्वास ऋषीचे त्यास दर्शन झाले. तो तेथे पर्जन्यकाळच्या वास्तव्यासाठी आला होता. त्या उभय मुनिवर्यांना राजाने अभिवादन केले व त्यांनीही त्याचे यथोचित स्वागत केले. दशरथ राजाने दुर्वास ऋषीला आपला वंश किती पिढ्यांपर्यंत चालेल ? रामाचे आयुष्य किती ? इतर पुत्रांचे किती ? रामाची मुले किती दिवस वाचतील ? इत्यादी पृच्छा करून या संबंधात सांगण्याची प्रार्थना केली. तेव्हा दुर्वास ऋषीने त्याला पूर्ववृत्त कथन केले.

देव – दैत्यांचे युद्ध चालू असता देव दैत्यांची निर्भर्त्सना करू लागले. त्यामुळे दैत्यांनी भृगुपत्नीचा आश्रय घेतला. तिने त्यांना अभय दिले. तिने रक्षिलेल्या दैत्यांना पाहून विष्णू क्रुद्ध झाला आणि त्याने आपल्या चक्राने भृगुपत्नीचें मस्तक उडविले. पत्नीचा वध झालेला पाहून भृगू अतिशय संतप्त झाला.

> शशाप सहसा क्रुद्धो विष्णुं रिपुकुलार्दनम् ।। – १४
>
> यस्मादवध्यां मे पत्नीमवधीः क्रोधमूर्च्छितः ।
> तस्मात्त्वं मानुषे लोके जनयिष्यसि जनार्दन ।। १५
>
> तत्र पत्नीवियोगं त्वं प्राप्स्यसे बहुवार्षिकम् । – १६

शत्रु – समुदायाचा नाश करणाऱ्या त्या विष्णूला त्याने शाप दिला – ' हे जनार्दना, ज्या अर्थी माझ्या अवध्य पत्नीचा क्रोधाने धुंद होऊन तू वध केला आहेस, त्या अर्थी मनुष्य लोकामध्ये तू जन्माला येशील आणि तेथे अनेक संवत्सर लोटेपर्यंत तुला पत्नीचा वियोग होईल. '

शाप दिल्यानंतर भृगूला वाईट वाटले. त्याने विष्णूचे पूजन केले, त्याला संतुष्ट केले. तेव्हा भक्तवत्सल विष्णू म्हणाला ' अनेक-

कल्याणार्थ मला हा शाप स्वीकारलाच पाहिजे. ' नंतर दुर्वास दशरथाला म्हणाला, " साक्षात् विष्णूच तुझा पुत्र राम म्हणून जन्माला आला आहे. तो त्रैलोक्यात विख्यात होईल. भृगूच्या शापाचे प्रचंड फलही त्याला प्राप्त होईल. दीर्घकालपर्यंत अयोध्यापती राहील. अकरा हजार वर्षे राज्य करून तो ब्रह्मलोकी गमन करील. अश्वमेध यज्ञ करून राज-वंशांची वारंवार स्थापना करील. "

अवध्यां स्त्रीत्वादृषिपत्नीत्वाच्च वधानार्हाम् ।

## ४९. दोन ब्राह्मण < नृगराजा उत्तरकाण्ड/५३

रामाने सीतेचा त्याग करण्याचे ठरविल्यानंतर तिला वाल्मीकी ऋषींच्या आश्रमात सोडून येण्याचे अत्यंत दुर्घट कार्य लक्ष्मणाला करावे लागले. परतल्यानंतर लक्ष्मणाने रामाची भेट घेतली असता तो अत्यंत खिन्न दिसला. चार दिवस त्याने प्रजेचे कोणतेच काम केलेले नव्हते. ती गोष्टही त्याच्या मनास बोचत होती. लक्ष्मणाने त्याचे सांत्वन केले तेव्हा नागरिकांची कार्ये न करणाऱ्या राजाची गती काय होते, हे सांगण्यासाठी रामाने लक्ष्मणाला नृगराजाची कथा कथन केली.

पूर्वी नृग नावाचा एक महायशस्वी, ब्राह्मणप्रिय, सत्यवचनी, शुद्ध आणि खऱ्या अर्थाने भूपाल असा राजा होऊन गेला. एकदा पुष्कर तीर्थावर या राजाने सुवर्णभूषित व सवत्स अशा कोटचवधी गाई ब्राह्मणांना दान दिल्या. त्या वेळी शेतात पडलेले धान्यकण वेचून उप-जीविका करणाऱ्या एका दरिद्री ब्राह्मणाची एक गाय वासरासह त्या कळपाबरोबर गेली असता, राजाने तिचेही दान एका ब्राह्मणास केले. त्या अग्निहोत्री क्षुधित ब्राह्मणाने आपल्या गाईचा शोध ठिकठिकाणी व बराच काल केला. तो एकदा कनखल तीर्थाला गेला असता त्याला त्याची गाय वासरासह एका ब्राह्मणाकडे दिसली. ' शबले, इकडे ये ' अशी हाक मारताच आवाज ओळखून ती गाय त्याच्याकडे आली व त्याच्याबरोबर जाऊ लागली. प्रतिपाळ करणाऱ्या ब्राह्मणाने राजाने

आपल्याला गाय दिल्याचे सांगितले. त्या दोन्ही ब्राह्मणांत बराच वाद झाला. दोघेही आपापली भूमिका समजावून देऊ लागले व शेवटी राजाला भेटून निर्णय घेण्याचे उभयतांनी ठरविले. गोप्रदान करणाऱ्या नृगराजाकडे दोघेही गेले असता त्यांची व राजाची भेट तर झाली नाहीच, परंतु दीर्घकालपर्यंत त्यांना राजद्वारी तिष्ठत बसावे लागले. तेव्हा क्रुद्ध होऊन ते म्हणाले–

अर्थिनां कार्यसिद्ध्यर्थं यस्मात्त्वं नैषि दर्शनम् ॥ –१८

अदृश्यः सर्वभूतानां कृकलासो भविष्यसि।
बहुवर्षसहस्राणि बहुवर्षशतानि च ॥ १९

श्वभ्रे त्वं कृकलीभूतो दीर्घकालं निवत्स्यसि।
उत्पत्स्यते हि लोकेऽस्मिन्यदूनां कीर्तिवर्धनः ॥ २०

वासुदेव इति ख्यातो विष्णुः पुरुषविग्रहः।
स ते मोक्षयिता शापाद्राजंस्तस्माद्भविष्यसि ॥ २१

कृता च तेन कालेन निष्कृतिस्ते भविष्यति ॥–२२

'ज्या अर्थी गरजूंची कामे उरकावी, एतदर्थ तू बाहेर पडत नाहीस, त्या अर्थी तू सर्व भूतांना अदृश्य असा सरड होशील. इतकेच नव्हे तर शेकडो, हजारो वर्षे दीर्घकालपर्यंत तू सरड होऊन बिळामध्ये राहशील. या जगामध्ये यादवांची कीर्ती वृद्धिंगत करणारा विष्णू पुरुषदेह धारण करून वासुदेव या प्रसिद्ध नावाने उत्पन्न होईल आणि राजा, तो तुझी या शापापासून मुक्तता करील. सारांश, तू सरड होशील व तुझ्या पापाची निष्कृती इतका काल लोटला म्हणजे होईल.'

राजाला शाप देऊन दोघे ब्राह्मण स्वस्थ झाले व ती गाय थकली आहे, असे पाहून अग्निहोत्री ब्राह्मणाने ती दुसऱ्या ब्राह्मणास देऊन टाकली. तो राजा भयंकर शाप भोगत पडला. अल्प अपराध असताही राजाला तो भयंकर शाप भोगावा लागला, असे लक्ष्मणाला वाटले.

ब्राह्मणांच्या उद्गारातील उत्तरार्ध उःशापासारखा आहे. सामान्यतः उःशाप याचित असतो, परंतु नृगराजाने उःशापाची याचना केली नसताही शापमुक्तीविषयी ब्राह्मणांनी आपणहूनच सांगितले आहे.

राजांच्या अपराधासंबंधाने नृगराजाची कथा लक्ष्मणाला सांगितल्यानंतर रामाने निमिराजाची आणखी एक कथा सांगितली आहे.

## ५०. वसिष्ठ < निमिराजा उत्तरकाण्ड/५५

निमी हा इक्ष्वाकूचा बारावा पुत्र होता. तो वीर्यवान व धर्मनिष्ठ होता. गौतम मुनीच्या आश्रमाजवळ अमरावतीप्रमाणे त्याने वैजयंत नावाचे एक नगर वसविले. पित्याच्या मनाला आनंद देण्यासाठी दीर्घ सत्र करण्याची त्यास इच्छा झाली. तेव्हा पित्याचा विचार घेऊन ब्रह्मर्षिश्रेष्ठ वसिष्ठाला त्याने प्रथम ऋत्विग्वरण दिले. त्याचप्रमाणे अत्री, अंगिरस, भृगु यांनाही दिले. ‘ इंद्राने मला ऋत्विग्वरण पूर्वी दिले आहे, यास्तव त्याचा याग होईपर्यंत तू वाट पहा ’, असे वसिष्ठाने त्याला कळविले. निमिराजाने वसिष्ठाचे काम गौतम मुनीवर सोपवून हिमालयाच्या जवळच आपला याग सुरू केला व यागाकरिता पाच हजार वर्षेपर्यंत तो राजा दीक्षा घेऊन बसला. इंद्राचा याग पूर्ण झाल्यानंतर वसिष्ठ ऋषी राजाचे होत्र करण्यासाठी आला असता, त्याच्या जागी गौतम आलेला दिसला. त्यामुळे तो अतिशय क्रुद्ध झाला व राजाची भेट घेण्यासाठी मुहूर्तभर थांबला. परंतु त्या दिवशी राजाला निद्रेने घेरले होते, त्यामुळे भेट होऊ न शकल्याने वसिष्ठ ऋषी अधिकच संतप्त झाला आणि म्हणाला–

यस्मात्त्वमन्यं वृतवान्मामवज्ञाय पार्थिव ।
चेतनेन विनाभूतो देहस्ते पार्थिवैष्यति ।। १७

राजा ज्या अर्थी माझी अवज्ञा करून तू दुसरा ऋत्विज वरला आहेस, त्या अर्थी तुझा देह अचेतन होऊन राहील.

निद्रेतून जाग आल्यावर वसिष्ठ ऋषीने शाप दिल्याचे समजताच तो अतिशय क्रुद्ध झाला व त्याने वसिष्ठाला प्रतिशाप दिला व दोघेही स्थूलदेह-विरहित झाले.

पहा – निमिराजा < वसिष्ठ शाप, पृ. ७२–७३

## ५१. निमिराजा < वसिष्ठ

उत्तरकाण्ड/५५

पहा – वसिष्ठ < निमिराजा शाप, पृ. ७१–७२

निद्रेतून जाग आल्यावर वसिष्ठाने शाप दिल्यानें क्रुद्ध झालेल्या निमिराजानें वसिष्ठाला प्रतिशाप दिला –

> अजानतः शयानस्य क्रोधेन कलुषीकृतः ।
> उक्तवान् मम शापाग्नि यमदण्डमिवापरम् ।। १९
>
> तस्मात्तवापि ब्रह्मर्षे चेतनेन विनाकृतः ।
> देहः स सुचिरप्रख्यो भविष्यति न संशयः ।। २०

'आपण आल्याचे मला ठाऊक नसल्यामुळे मी निद्रिस्त असताना ज्या अर्थी आपण क्रोधाने व्याप्त होऊन प्रतियमदंडाप्रमाणे मजवर शापाग्नी सोडिला आहे, त्या अर्थी हे ब्रह्मर्षे, आपला अतिमनोहर देह निःसंशय अचेतन होऊन राहील.'

नृपश्रेष्ठ व द्विजश्रेष्ठ यांनी एकमेकाला शाप दिला व त्यामुळे ते दोघेही स्थूलदेहरहित झाले.

हे दोन्ही शाप इतर शापांहून वेगळे आहेत. शापाला प्रतिशाप आणि तोही तोच शाप दिलेला – असे हे एकमेव उदाहरण वाल्मीकी रामायणात सापडते. वसिष्ठानें सौदास राजाला शाप दिला असता (उत्तरकाण्ड ६५) सौदास राजा प्रतिशाप देण्यास उद्युक्त झाला होता. त्यानें हातात उदकही घेतले होते. परंतु 'देवतुल्य पुरोहिताला उलट शाप देणे योग्य नाही', असा त्याच्या पत्नीनें उपदेश केला असता त्याने

शाप दिलेला नाही. प्रत्यक्षात सौदासाने वसिष्ठाला शाप न दिल्याने वसिष्ठ < निमिराजा आणि निमिराजा < वसिष्ठ असा हा शाप – प्रतिशाप ऐकमेव ठरतो.

## ५२. मित्र < उर्वशी उत्तरकाण्ड/५६

वसिष्ठ आणि निमिराजा यांनी परस्परांना शाप देऊन देहत्याग केल्यानंतर त्यांना पुनरपि देहप्राप्ती कशी झाली, असा लक्ष्मणानें प्रश्न केला असता राम त्याला उत्तर देत आहे.

विदेही अवस्था प्राप्त झाल्यानंतर वायुरूप बनलेले ते दोघेही स्वयंभू ब्रह्मदेवाकडे गेले. अभिवादन करून वसिष्ठ म्हणाला – ‘ देहरहित स्थितीत कार्याचा लोप होत असल्यानें दुसरा देह प्राप्त होईल, अशी मजवर कृपा करा. ’ तेंव्हा ब्रह्मदेव म्हणाला, ‘हे महाकीर्तिमान वसिष्ठा, मित्र-वरुणांच्या तेजामध्ये तू प्रवेश कर. तेथेही तू अयोनिसंभव होशील. ’ हे ऐकून वसिष्ठानें ब्रह्मदेवाला प्रदक्षिणा घातली व तो वरुणलोकाला निघून गेला.

त्या वेळी मित्रही क्षीरसागररूप वरुणरूपाने युक्त असून श्रेष्ठ देवांनाही प्रिय होता. तो वरुणाचा अधिकार चालवीत होता. एकदा उर्वशी नावाची एक अप्सरा सख्यांसह तेथे आली. तिला पाहून वरुणाला अतिशय आनंद झाला. त्याची कामवासना उद्दीपित झाली व त्याने तिच्याजवळ रतिक्रीडेची इच्छा व्यक्त केली असता ‘ मित्राने पूर्वीच स्वत: माझी मागणी केली आहे ’, असे तिने विनयपूर्वक सांगितले. तेव्हा तो म्हणाला – ‘ माझ्याशी समागम करण्याची तुझी इच्छा नसेल तर तुझ्याकरिता तेजाचा उत्सर्ग करून मी ते तेज कुंभामध्ये टाकतो. ’

तिने त्यास अनुमती दिली; कारण त्याचे तिच्यावर प्रेम असले व तिचेही त्याच्यावर जडले असले तरी तिचा देह त्या वेळी मित्राधीन होता. वरुणाने आपले तेज कुंभात टाकले. उर्वशी नंतर मित्राकडे गेली असता तो क्रुद्ध झाला आणि संतापून म्हणाला –

मयाभिमन्त्रिता पूर्वं कस्मात्त्वमवर्सजिता ।
पतिमन्यं वृतवती किमर्थं दुष्टचारिणी ।। २३

अनेन दुष्कृतेन त्वं मत्क्रोधकलुषीकृता ।
मनुष्य-लोकमास्थाय कंचित्कालं निवत्स्यसि ।। २४

बुधस्य पुत्रो राजर्षिः काशिराजः पुरूरवाः ।
तमभ्यागच्छ दुर्बुद्धे स ते भर्ता भविष्यति ।। २५

'हे दुराचारिणी, मी तुला पूर्वी आवाहन केले असून तू मला कसे सोडलेस ? आणि दुसऱ्या पतीचा तू कशाकरिता स्वीकार केलास ? ह्या तुझ्या पातकामुळे तू माझ्या क्रोधाच्या तावडीत सापडली आहेस. ह्यास्तव मनुष्यलोकी जाऊन तू काही कालपर्यंत वास्तव्य करशील. राजर्षी बुधपुत्र काशिराज पुरुरवा – त्याच्याकडे तू जा. तो तुझा भर्ता होईल.'

मित्राच्या शापामुळे ती मनुष्यलोकी पुरुरवा राजाकडे गेली आणि काही अटींवर ती त्याच्या जवळ राहिली.

## ५३. भार्गव < ययाती उत्तरकाण्ड/५८

'निमिराजा शूर क्षत्रिय असता व विशेषतः त्याने दीक्षा घेतली असता महात्म्या वसिष्ठ मुनीशी त्याने योग्य वर्तन केले नाही, असे मला वाटते', असे लक्ष्मणाने रामाला म्हटले असता रामानें 'क्षमा सर्व पुरुषांचे ठिकाणी दृष्टोत्पत्तीस येतेंच असे नाही. रोष दुःसह आहे', असे सांगून आपले म्हणणे पटवून देण्यासाठी ययातीच्या शापाची कथा सागितली.

नहुष–पुत्र ययाती सत्त्वगुणसंपन्न होता. त्याला शर्मिष्ठा व देवयानी अशा दोन भार्या होत्या व त्यांच्यापासून अनुक्रमे पुरू आणि यदू असे दोन पुत्र झाले होते. पुरूच्या अंगभूत गुणांमुळे व शर्मिष्ठेवरील प्रीतीमुळे पुरू ययातीला अधिक प्रिय होता. यदूला ही मोठा [illegible] करीत

होती. एकदा तो आपल्या आईला – देवयानीला अतिशय दुःखित होऊन म्हणाला – 'तू भार्गव कुलात जन्माला येऊन दुःख व अवमान सहन करीत आहेस. हा त्रास अधिक काल सोसण्यापेक्षा आपण दोघेही अग्नि-प्रवेश करू. राजाला दैत्यकन्या शर्मिष्ठेबरोबर पाहिजे तितके दिवस सुखात राहू दे. तुला जर अग्निप्रवेश करावयाचा नसेल तर निदान मला तरी अनुज्ञा दे. कारण मी हा अवमान इतःपर सहन करू शकत नाही. मी निःसंशय प्राणत्याग करणार.' मुलाचे दुःख तिच्या हृदयाला भिडले आणि तिला विलक्षण क्रोध आला. पित्याचे शुक्राचार्यांचे स्मरण केले असता भार्गव मुनी सत्वर आला आणि देवयानीची दुःखीकष्टी अवस्था पाहून अस्वस्थ झाला. त्याने तिला तिच्या दुःखाचे कारण विचारले असता ती म्हणाली – 'मी अग्निप्रवेश किंवा पाण्यात उडी घेणार आहे, अथवा विष भक्षण करून प्राणत्याग करणार आहे. माझी अवज्ञा झाली असून मी ती सहन करण्यास असमर्थ आहे. माझे दुःख आपल्या गावीही नाही आणि म्हणूनच ययाती माझी अवज्ञा करीत असतो. मला तो मानीतच नाही.' कन्येचे बोलणे ऐकून अत्यंत क्रुद्ध होऊन शुक्राचार्यांनी ययातीला शाप दिला –

यस्मान्मामवजानीषे नाहुष त्वं दुरात्मवान् ।
वयसा जरया जीर्णः शैथिल्यमुपयास्यसि ।। २३

'हे नहुषपुत्रा, ज्या अर्थी तू माझी अवज्ञा करीत आहेस, त्या अर्थी उतारवयामुळे तुज दुरात्म्याला जरा येऊन तू दुर्बल होशील.'

क्षात्रधर्माचे अवलंबन करून ययातीने भार्गवाचा –शुक्राचार्यांचा शाप सहन केला.

## ५४. ययाती < यदू उत्तरकाण्ड/५९

भार्गवाने ययातीला शाप दिल्यानंतर प्राप्त झालेली जरा स्वीकारण्याविषयी आपल्या दोन्ही पुत्रांना ययातीने सांगितले असता

पुरूने तिचा स्वीकार केला व यदूने नकार दिला, तेव्हा ययातीने यदूला जो शाप दिला, त्यासंबंधी राम लक्ष्मणाला सांगत आहे.

ययातीला जरा प्राप्त झाल्याने तो दु:खी झाला. आपली जरा काही काल स्वीकारून तारुण्य प्राप्त करून घेण्यासाठी तो देवयानी-पुत्र यदूला म्हणाला– ' माझ्याकरिता तू या भयंकर जरेचा स्वीकार कर, म्हणजे मी विषयोपभोगात रममाण होईन. विषयासंबंधाने अद्यापि माझी तृप्ती झाली नाही. रतिक्रीडेचा काही काल अनुभव घेऊन नंतर मी आपली जरा परत घेईन.' हे पित्याचे बोलणे ऐकून यदू म्हणाला– ' आपणाला प्रिय असलेला पुत्र जो पुरू त्याने आपल्या जरेचा स्वीकार करावा. कारण आपण मला ऐश्वर्यापासून दूर केले आहे. इतकेच नव्हे तर आपण मला कधी जवळही येऊ देत नाही. तेव्हा ज्यांच्यासह आपण नेहमी भोजन करिता त्यांपैकीच कोणी तरी आपल्या जरेचा स्वीकार करावा.' शर्मिष्ठापुत्र पुरूला विचारले असता त्याने आपले तारुण्य पित्याला देऊन त्याच्या जरेचा स्वीकार केला. त्यामुळे ययाती आनंदित झाला. परंतु यदूच्या बोलण्याने तो क्रुद्ध होऊन त्याला म्हणाला–

राक्षसस्त्वं मया जातः क्षत्ररूपो दुरासदः ।
प्रतिहंसि ममाज्ञां त्वं प्रजार्थे विफलो भव ।। १४

पितरं गुरुभूतं मां यस्मात्त्वमवमन्यसे ।
राक्षसान्यातुधानांस्त्वं जनयिष्यसि दारुणान् ।। १५

न तु सोमकुलोत्पन्ने वंशे स्थास्यति दुर्मतेः ।
वंशोऽपि भावतस्तुल्यो दुर्विनीतो भविष्यति ।। १६

' तू माझ्यापासून क्षत्रियरूपाने महाभयंकर राक्षस उत्पन्न झाला आहेस. परंतु ज्या अर्थी तू माझ्या आज्ञेचा विघात करीत आहेस, त्या अर्थी प्रजेसंबंधाने तू निष्फल होशील. गुरुस्थानी असलेल्या मज पित्याचा ज्या अर्थी तू अवमान करीत आहेस त्या अर्थी भयंकर राक्षस व यातुधान तू उत्पन्न करशील. सोमकुलात उत्पन्न झालेल्या वंशात तुज दुष्टाची संतती राहणार नाही. तुझा वंशही तुझ्याप्रमाणे उद्धट होईल.'

असा शाप देऊन राजाने काही काल पुरूचे तारुण्य स्वीकारून हजारो यज्ञ केले व आपली ठेव ठेवलेली जरा पुरूकडून परत घेऊन त्याचे तारुण्य त्याला दिले आणि त्याला राज्याभिषेक केला.

## ५५. श्वान < भिक्षू उत्तरकाण्ड/ प्रक्षिप्त २/५९–६० या सर्गांमध्ये

रामराज्यातील नि:पक्षपाती न्यायपद्धतीचा गौरव करणारी ही एक कथा आहे.

वसिष्ठ, कश्यपादी ऋषी, मंत्री, धर्मशास्त्रवेत्ते, नीतिनिपुण सदस्य, राजे इत्यादींच्या सभेत राम राजधर्म अवलोकन करीत असे. सर्व कारभार धर्माने चालत असल्याने आणि कोणताच उपद्रव होत नसल्याने कुणाची कुणाविषयी तक्रार असत नसे. तरीही राम रोज कुणी अर्जदार एखादी तक्रार घेऊन आला आहे किंवा काय, याची खात्री करून घेत असे. एकदा राजसभेच्या जवळच एक श्वान आक्रोश करीत असलेला लक्ष्मणाला दिसला. त्याने त्याच्या दु:खाचे कारण विचारले असता, आचरणाने निर्मल, सर्व प्राण्यांना आश्रयभूत व भयप्रद प्रसंगी अभय देणाऱ्या रामालाच मी सांगू इच्छितो', असे त्याने सांगितले. लक्ष्मण त्याला राजसभेत नेऊ लागताच, 'प्रथम रामाची आज्ञा झाल्याशिवाय राजसभेत प्रवेश करणार नाही', असे त्याने निक्षून सांगितले. रामाने त्याला अभय देऊन प्रवेश करण्याची अनुमती दिली. तेव्हा डोक्याला खोक पडलेला श्वान रामाला म्हणाला– 'सर्व वस्तूंची ज्याच्या पाशी समृद्धी आहे, असा एक भिक्षू ब्राह्मणाचे घरी रहात आहे. त्या भिक्षूने माझा काही अपराध नसता मला विनाकारण प्रहार केला.' श्वानाची तक्रार ऐकून दूताकरवी निरोप धाडून भिक्षूला राजसभेत बोलविण्यात आले. श्वानाची तक्रार त्याला सांगितली असता तो भिक्षू प्रांजळपणे म्हणाला– 'भिक्षेची वेळ नसता मी एकदा भिक्षा मागत फिरत होतो. मला क्षुधा अतिशय व्याकुळ करीत होती व हा माझ्या मार्गात उभा

होता. मला वाट देत नव्हता. तेव्हा क्रोध अनावर होऊन यास मी प्रहार केला. हे राजाधिराज, मज अपराध्याला शासन करावे, कारण शासन केले म्हणजे मला नरकाचे भय राहणार नाही.' रामाने सभेतील सर्वांना भिक्षूला काय शिक्षा करावी, याविषयी आपापला अभिप्राय देण्यास सांगितले. ऋषी, धर्मशास्त्रवेत्ते, पंडितादी सर्वांनी 'ब्राह्मणाचा दंडांनी वध करू नये', असा अभिप्राय व्यक्त करून अंतिम निर्णय घेण्याचे रामावर सोपविले. तेव्हा श्वान रामाला विनयपूर्वक म्हणाला–

यदि तुष्टोऽसि मे राम यदि देयो वरो मम ।। –३७

प्रतिज्ञातं त्वया वीर किं करोमीति विश्रुतम् ।
प्रयच्छ ब्राह्मणस्यास्य कौलपत्यं नराधिप ।। ३८

कालञ्जरे महाराज कौलपत्यं प्रदीयताम् । – ३९

"राजा रामचंद्र, आपण जर माझ्यावर संतुष्ट झाला असाल आणि आपणाला जर माझा मनोदय शेवटास नेणे असेल, तर आपण माझी विनंती ऐका. हे वीरा, –'मी तुझे काय काम करू ?' असे आपण मला विचारून कार्य करण्याविषयी वचन दिले आहे. ह्यास्तव हे राजाधिपते, ह्या ब्राह्मणाला धर्मसंबंधी समाजाचे आधिपत्य द्यावे. हे महाराज, कालंजर पर्वतावर ह्याला आपण कुलपतीचा अधिकार द्यावा."

रामाने श्वानाच्या म्हणण्याप्रमाणे त्या भिक्षूला कुलाधिपतित्वाचा अभिषेक केला आणि तो हत्तीवर आरूढ होऊन गेला.

रामाचे सर्व मंत्री या घटनेने विस्मयचकित झाले आणि रामाला म्हणाले– 'महाराज, हा ह्या ब्राह्मणाला श्वानाने शाप दिला नसून वरच दिला आहे !' तेव्हा राम म्हणाला– 'तुम्हाला परिणामासंबंधी तत्त्वज्ञान नाही. ह्याचे कारण श्वानाला ठाऊक आहे.' रामाने पृच्छा केली असता श्वान म्हणाला– 'मी अवशिष्ट अन्न भक्षण करून त्या कालंजर पर्वतावर कुलपती होतो. देव व द्विज ह्यांची पूजा आणि दास व दासी ह्यांच्यावर मी अधिपती होतो. ह्यांना अन्न वगैरे देणारा मीच असून देवस्थानचे द्रव्य रक्षण करणाराही मीच होतो. शुभ कर्मा-

कडे माझ्या मनाचा कल असे. मी विनयसंपन्न व सुशील असून सर्व प्राण्यांच्या हिताविषयी तत्पर असे. तथापि ही अधम योनिरूप घोर अवस्था मला प्राप्त झाली आहे. तेव्हा क्रुद्ध, धर्मत्याग केलेला व प्राण्यांच्या अहिताविषयी तत्पर असलेला जो विप्र त्याला अशीच अवस्था प्राप्त होईल. कारण क्रुद्ध, दुष्ट, निर्दय, अविद्वान, अधार्मिक पुरुष आपल्या पूर्वीच्या सात पिढ्या व पुढल्या सात पिढ्या नरकात पाडतोच. कोणतीही अवस्था प्राप्त झाली, तरी कुलपतीचा अधिकार स्वीकारू नये. पुत्र, पशू व बांधव ह्यांसह वर्तमान ज्याला नरकात पडण्याची इच्छा असेल, त्याला देव, गाई व ब्राह्मण यांच्यावर अधिकारी नेमावे. ब्राह्मण, देव, स्त्रिया व बाल यांना दिलेले द्रव्य जो हरण करतो, तो पुत्र-पशु-प्रभृती इष्ट जनांसहवर्तमान नाश पावतो. ब्राह्मणांचे व देवांचे द्रव्य घेणारा पुरुष वीचिसंज्ञक घोर नरकामध्ये पडतो. इतकेच नव्हे तर देवांचे आणि ब्राह्मणांचे द्रव्य हरण करण्याचे कोणी मनामध्ये जरी आणले, तरी तो नराधम एकामागून दुसऱ्या नरकातच पडून राहतो.'

वरासारखा भासणारा एक आगळा शाप आहे.

## ५६. गौतम < ब्रह्मदत्त उत्तरकाण्ड/प्रक्षिप्त ३/५९ व ६० या सर्गांमध्ये

एका दुर्बुद्धी गृध्राने एका उलुकाच्या घरात प्रवेश मिळवला आणि नंतर ते घर स्वताचेच आहे, असे म्हणून भांडण सुरू केले. दोघेही एकमेकाचा द्वेष करू लागले. परंतु घराच्या मालकीचा निर्णय जगताचा राजा राम याचेकडून करून घेण्याबाबत त्यांचे एकमत झाले. दोघांनीही रामाची स्तुती करून आपापली बाजू मांडली. रामाने मंत्र्यांसह ती ऐकून घेतली. विचार-विनिमय केला व ते घर उलुकाचेच आहे, असा निर्णय दिला. गृध्राने उलुकाच्या घराचा अपहार केला असल्याचे स्पष्ट झाल्याने त्याला दंड करण्याचे ठरविले. त्या वेळी आकाशवाणी झाली–
'रामा, तपःसामर्थ्याने पूर्वी दग्ध झालेल्या या गृध्राचा तू वध करू नको. कारण हा कालरूप गौतम मुनीने दग्ध केला आहे. हा ब्रह्मदत्त,

नावाने प्रसिद्ध, शूर, सत्यनिष्ठ व शुची राजा होता. एकदा त्याच्या घरी एक विप्र आला आणि भोजन मागू लागला. शंभर वर्षे न केलेले भोजन त्याला करावयाचे होते. ब्रह्मदत्त राजानें अर्घ्य, पाद्यादींनी त्याचे स्वागत केले आणि भोजन करण्याची विनंती केली. परंतु–

मांसमस्याभवत्तत्र आहारे तु महात्मनः ।
अथ क्रुद्धेन मुनिना शापो दत्तोऽस्य दारुणः ।। ५९

गृध्रस्त्वं भव वै राजन्मामैनं ह्यथ सोऽब्रवीत् ।
प्रसादं कुरु धर्मज्ञ अज्ञानान्मे महाव्रत ।। ६०

शापस्यान्तं महाभाग क्रियतां वै ममानघ ।
तदज्ञानं कृतं मत्वा राजानं मुनिरब्रवीत् ।। ६१

उत्पस्यति कुले राज्ञां रामो नाम महायशः ।
इक्ष्वाकूणां महाभागो राजा राजीवलोचनः ।। ६२

तेन स्पृष्टो विपापस्त्वं भविता नरपुंगव । – ६३

त्या महात्म्याच्या भोजनार्थ तेथे मास होते. तेव्हा 'राजा तू गृध्र होशील', असा त्या मुनीने क्रुद्ध होऊन त्याला भयंकर शाप दिला. तथापि 'असे करू नका', असे बोलून पुन्हा तो त्या मुनीला म्हणाला– 'हे धर्मज्ञ, हे महातपस्वी, माझ्या अज्ञानामुळे झालेल्या अपराधाबद्दल आपण क्षमा करावी. हे निष्पाप, हे महाशय मुने, आपण हा माझा शाप नाहीसा करा.' नंतर अज्ञानाने ती गोष्ट झाली, असे समजून मुनी राजाला म्हणाला– 'इक्ष्वाकू राजांच्या वंशामध्ये महायशस्वी महाभाग्यवान आणि कमलनयन राम म्हणून राजा उत्पन्न होईल, आणि हे पुरुषश्रेष्ठा, त्याचा स्पर्श झाल्यावर तू शापापासून मुक्त होशील.'

रामाने (राजाला) गृध्राला स्पर्श करताच गृध्र-देहाचा त्याग करून चंदनलेपाने युक्त असा मानव-देह त्याला प्राप्त झाला. 'तू माझा शाप नाहीसा केल्यामुळे मी घोर नरकापासून मुक्त झालो आहे.', असे तो म्हणाला.

हा याचित उःशाप आहे. हा प्रक्षिप्त सर्ग गोरखपूर प्रतीत नाही.

## ५७. वसिष्ठ < सौदास उत्तरकाण्ड/६५

वाल्मीकी ऋषी शत्रुघ्नाला सौदास राजाची कथा कथन करीत आहे.

रामाने सांगितलेले कार्य करण्यासाठी शत्रुघ्न वाटेत वाल्मीकी ऋषीच्या आश्रमात थांबला. ऋषीने त्याचे यथायोग्य स्वागत केले. आश्रमाच्या बाजूलाच यज्ञसामग्री पाहून ती कुणाची असा प्रश्न शत्रुघ्नाने केला असता वाल्मीकी त्याला म्हणाला– 'सौदास नावाचा एक राजा तुमचा पूर्वज होता. बालवयातच राजा एकदा मृगयेस गेला असता त्याला व्याघ्ररूप धारण करणारे दोन राक्षस अनेक मृगांचा संहार करताना दिसले. वन मृगरहित होत असलेले पाहून त्याला अतिशय संताप आला व त्याने एका राक्षसाचा बाणाने वध केला. तेव्हा त्याचा जोडीदार राक्षस संतापून राजाला म्हणाला की ज्या अर्थी निरपराध अशा माझ्या मित्राचा तू वध केला आहेस, त्या अर्थी मी तुझा सूड घेईन.'

काही काळ लोटल्यानंतर राजाने अनेक वर्षे चालणारा यज्ञ सुरू केला. तो देवयज्ञासमान होता. पूर्वीचे वैर लक्षात घेऊन यज्ञसमाप्तीनंतर राक्षसाने वसिष्ठ ऋषीचे रूप धारण करून राजाकडे मासयुक्त भोजन सत्वर देण्यास सांगितले. तो मायावी राक्षस वसिष्ठाचे रूप घेऊन आला आहे, हे लक्षात न आल्याने राजाने आचाऱ्यांना भोजन सिद्ध करण्यास सांगितले. तेवढ्यात राक्षसाने वसिष्ठरूप टाकून देऊन आचाऱ्याचे रूप घेतले व नरमासाचे भोजन सिद्ध केले आणि ते जेव्हा (खऱ्या) वसिष्ठाला देण्यात आले, तेव्हा ते नरमास असल्याचे त्याच्या चटकन लक्षात आले व तो अत्यंत संतप्त झाला आणि म्हणाला–

यस्मात्त्वं भोजनं राजन्ममैतद्दातुमिच्छसि ।
तस्माद्भोजनमेतत्ते भविष्यति न संशयः ।। २८

'राजा ज्या अर्थी हे भोजन मला देण्याचे तू मनात आणले आहेस, त्या अर्थी असले भोजन निःसंशय तुलाच प्राप्त होईल.'

वसिष्ठाचा शाप ऐकून सौदास राजा त्याला प्रतिशाप देऊ इच्छित असता त्याच्या पत्नीने त्याची समजूत घालून त्याला परावृत्त केले.

पहा सौदास < वसिष्ठ शाप, पृ. ८२–८३

## ५८. सौदास < वसिष्ठ उत्तरकाण्ड/६५

पहा – वसिष्ठ < सौदास शाप, पृ. ८१–८२

वसिष्ठाने सौदास राजाला दिलेला शाप ऐकून तो अतिशय संतप्त झाला. वसिष्ठानेच मासयुक्त भोजन सिद्ध करण्यास सांगितले होते, असाच त्याचा समज होता. राक्षसाने वसिष्ठरूप घेतलेले व नंतर नरमास सिद्ध केलेले त्याला ज्ञात नसल्याने तो स्वताला निरपराध समजत होता. वसिष्ठाने अकारण शाप दिल्याने तो प्रतिशाप देण्यासाठी हातात उदक घेऊन सिद्ध झाला. परंतु त्याची पत्नी मदयंती त्याला तसे करू देईना. तिने त्याची समजूत पटवून दिली. ती त्याला म्हणाली –

‘राजन्प्रभुर्यतोऽस्माकं वसिष्ठो भगवानृषिः ।
प्रतिशप्तुं न शक्तस्त्वं देवतुल्यं पुरोधसम् ।। ३०

‘ज्या अर्थी भगवान वसिष्ठ ऋषी आपले प्रभू आहेत, त्या अर्थी त्या देवतुल्य पुरोहितांना उलट शाप देणे आपल्याला योग्य नाही.’ त्याने पत्नीचा उपदेश मानला.

तेज व बल यांनी युक्त असलेले ते हातात घेतलेले उदक राजाने आपल्या पायावरच ओतून घेतले. त्यामुळे त्याचे पाय चित्रविचित्र वर्णाचे झाले. सौदास राजा कल्माषपाद झाला व त्या नावानेच त्याला लोक ओळखू लागले.

राजाने वसिष्ठाला राक्षसाच्या मायावी रूपाची व त्यानेच सिद्ध केलेल्या अन्नाची हकिगत सांगितली. तेव्हा तो निरपराध आहे, हे लक्षात घेऊन वसिष्ठ म्हणाला

मया रोषपरीतेन यदिदं व्याहृतं वच: ।
नैतच्छक्यं वृथा कर्तुं प्रदास्यामि च ते वरम् ।। ३५

कालो द्वादशवर्षाणि शापस्यान्तो भविष्यति ।
मत्प्रसादाश्च राजेन्द्र अतीतं न स्मरिष्यसि ।। ३६

'मी क्रुद्ध होऊन जे भाषण केले आहे, ते व्यर्थ होणे शक्य नाही. तथापि मी तुला वर देतो– बारा वर्षे लोटली असता या शापाची समाप्ती होईल, आणि हे राजेन्द्रा, माझ्या प्रसादामुळे तुला पूर्वीचे स्मरण राहणार नाही.'

प्रत्यक्षात शाप दिलेला नाही.

वसिष्ठाने कल्माषपादाला दिलेला वर हा उ:शापासारखा आहे.

## ५९. भार्गव < दंड उत्तरकाण्ड/८१

अगस्त्य मुनी दंड राजाच्या शापाचे वृत्त कथन करीत आहे.

एकदा चैत्र महिन्यात दण्ड राजा रमणीय भार्गवाश्रमात गेला असता अत्यंत लावण्यसंपन्न अशी भार्गवकन्या त्याच्या दृष्टीस पडली. तिचे दर्शन घडताच तो मदनबाणांनी घायाळ झाला. त्याने तिची विचारपूस केली आणि आपली व्यथा स्पष्ट केली. तेव्हा ती भार्गवकन्या त्याला विनयपूर्वक म्हणाली – 'राजेंद्रा, मी भार्गवांची ज्येष्ठ कन्या अरजा. आपण बलात्काराने माझ्यावर हात टाकू नका. माझा पिता आपला गुरू असून आपण त्याचे शिष्य आहात, हे विसरू नका. माझा महातपस्वी पिता क्रुद्ध झाल्यास आपणास फार मोठे दु:ख होईल. तुम्हाला माझी अपेक्षा असेल तर माझ्या पित्याकडे रीतसर मागणी घाला. कदाचित् ते अनुमतीही देतील.' परंतु मदनाच्या अधीन झालेला तो मदोन्मत्त राजा तिला म्हणाला – 'तुझ्यासाठी माझा जीव तिळतिळ तुटत आहे. कालक्षेप मी सहन करू शकत नाही. तू प्राप्त झाल्यावर माझा वध होवो अथवा मला भयंकर पातक लागो. तू मला सत्वर वश

हो, कारण मदनाने मी व्याकुळ झालो आहे.' असे बोलून त्याने तिच्या इच्छेविरुद्ध बलात्काराने तिला हातांनी आवळून धरले व ती तडफड करीत असतानाही तिच्याशी यथेच्छ समागम केला. अरजा अत्यंत कष्टी होऊन आश्रमाजवळ पित्याची वाट पहात बसली आणि दंड राजा आपल्या नगरीला गेला (उत्तरकाण्ड/८०).

शोकाकुल कन्येला पाहता क्षणीच त्या महातेजस्वी भार्गवाला सारा प्रकार लक्षात आला. तो अतिशय क्रुद्ध झाला. तो आपल्या शिष्यांना म्हणाला (उत्तरकाण्ड/८१)–

पश्यध्वं विपरीतस्य दण्डस्याविदितात्मनः ।
विपत्तिं घोरसंकाशां क्रुद्धादग्निशिखामिव ॥ ४

क्षयोऽस्य दुर्मतेः प्राप्तः सानुगस्य दुरात्मनः ।
यः प्रदीप्तां हुताशस्य शिखां वै स्प्रष्टुमर्हति ॥ ५

यस्मात्स कृतवान्पापमीदृशं घोरसंहितम् ।
तस्मात्प्राप्स्यति दुर्मेधाः फलं पापस्य कर्मणः ॥ ६

सप्तरात्रेण राजासौ सपुत्रबलवाहनः ।
पापकर्मसमाचारो वधं प्राप्स्यति दुर्मतिः ॥ ७

'आपली योग्यता न समजणाऱ्या विपरीत दंड राजावर मी क्रुद्ध झाल्यामुळे अग्निज्वालेप्रमाणे कसा भयंकर अनर्थ गुदरेल, तो तुम्ही अवलोकन करा. ह्या अविचारी राजाचा अनुयायांसहवर्तमान नाश होण्याचा समय प्राप्त झाला आहे, व अग्नीच्या प्रदीप्त ज्वालेचाच समागम होण्यास हा योग्य आहे. ज्या अर्थी त्याने हे अशा प्रकारचे घोर पातक केले आहे, त्या अर्थी ह्या पापकर्माचे फल त्या दुर्बुद्धी राजाला प्राप्त होईल. सारांश, पाप कर्म करणाऱ्या ह्या दुर्बुद्धी राजाचा पुत्र, सैन्य, वाहने यासहवर्तमान सात दिवसांत वध होईल.'

शाप दिल्यानंतर आश्रमनिवासी जनांना मुनीने त्या राज्याच्या सीमेबाहेर जाण्यास सांगितले आणि सात दिवसांत दंड राजाचे राज्य, सेवक, सैन्य, वाहने जळून खाक झाली.

## ४०. भार्गव < दंडकारण्य — उत्तरकाण्ड/८१

दण्डकारण्य निर्मनुष्य का झाले, या रामाच्या प्रश्नाला उत्तर म्हणून अगस्त्याने हे कथन केले आहे.

पहा – भार्गव < दंड शाप, पृ. ८३–८४

धर्मयुक्त अशा कृतयुगात धर्मविरुद्ध आचरण त्या राजाच्या हातून घडल्यामुळे त्याचे वास्तव्य असलेल्या प्रदेशालाही – दंडकारण्याला – भार्गवाने शाप दिला.

समन्ताद्योजनशतं विषयं चास्य दुर्मतेः ।
धक्ष्यते पांसुवर्षेण महता पाकशासनः ॥ ८

सर्वसत्त्वानि यानीह स्थावराणि चराणि च ।
महता पांसुवर्षेण विलयं सर्वतोऽगमन् ॥ ९

दण्डस्य विषयो यावत्तावत्सर्वं समुच्छ्रयम् ।
पांसुवर्षमिवालक्ष्यं सप्तरात्रं भविष्यति ॥ १०

'ह्या दुर्बुद्धी राजाचा प्रदेश आसपास शंभर योजनेपर्यंत इंद्र मोठ्या धूलिवृष्टीच्या योगाने नष्ट करून टाकील. ह्या प्रदेशामध्ये स्थावर व जंगम असे जे प्राणी असतील, ते सर्व प्रचंड धूलिवृष्टीच्या योगाने सर्व प्रकारे लयास जातील; आणि दंड राजाचा जितका म्हणून प्रदेश आहे, तितक्या प्रदेशावर धूलिवृष्टीने धुळीचा ढीग होऊन सात दिवसांत येथे काही दिसेनासे होईल.'

## ४१. दुर्वास < लक्ष्मण — उत्तरकाण्ड/१०५

रामाचे अवतार कार्य संपत आल्याचे व पुढे त्याने काय करावयाचे याविषयी महत्त्वाचा संदेश घेऊन प्रत्यक्ष काल ब्रह्मदेवाच्या आज्ञेने त्याला भेटावयास आला. संदेश केवळ रामाने एकट्याने

एकांतात ऐकायला हवा, हे त्याने स्पष्ट केले. तेव्हा रामाने लक्ष्मणाला द्वारपालास दूर करून स्वता द्वारी राहण्यास सांगितले. व कुणालाही आत न सोडण्याबाबत बजावले. त्या दोघांचे संभाषण जो कोणी श्रवण करील, त्याचा वध करण्याचे रामाने कालाला आश्वासन दिले.

लक्ष्मण रामाच्या आज्ञेची कडक रीतीने अंमलबजावणी करीत असता दुर्वास ऋषी रामाची भेट घेण्यास आला. लक्ष्मणाने अभिवादन करून त्याला मुहूर्तमात्र थांबण्यास सांगितले आणि राम काही महत्त्वाच्या कार्यात असल्याने त्याची भेट होण्यास थोडी वाट पहावी लागेल, अशी विनंती केली. लक्ष्मणाचे बोलणे ऐकून दुर्वास ऋषीला अतिशय संताप आला. लक्ष्मणावर डोळे वटारून तो म्हणाला –

अस्मिन्क्षणे मां सौमित्रे रामाय प्रतिवेदय ।
अस्मिन्क्षणे मां सौमित्रे न निवेदयसे यदि ।
विषयं त्वां पुरं चैव शपिष्ये राघवं तथा ।। ६

भरतं चैव सौमित्रे युष्माकं या च संततिः ।
न हि शक्ष्याम्यहं भूयो मन्युं धारयितुं हृदि ।। ७

'हे सुमित्रानंदना, ह्या क्षणी मी आल्याचे तू रामाला निवेदन कर. जर त्याने मी आल्याचे आत्ताचे आत्ता मनावर घेतले नाही, तर तुला, अयोध्यानगरीला, ह्या देशाला आणि रामालाही मी शाप देईन. इतकेच नव्हे तर भरताला व तुमच्या संततीलाही मी शाप देईन ! क्रोध दाबून ठेवण्यास मी समर्थ नाही.'

दुर्वासाचे बोलणे ऐकून लक्ष्मणाने विचार केला की एकाला मरण आलेले परवडले, परंतु सर्वांचा नाश होणे उचित नव्हे, आणि रामाज्ञेचा भंग करून त्याने रामाला दुर्वास ऋषी आल्याचे सांगितले. काल गेल्यानंतर लक्ष्मणाने रामाला सांगितले – माझा वध करून स्वताच्या प्रतिज्ञेचे तू पालन करावे.

प्रत्यक्षात हा शाप दिलेला नाही.

## १. रामाची लक्ष्मणाला शपथ

**अरण्यकाण्ड/२४**

खर राक्षसाच्या सैन्याबरोबर घनघोर युद्ध चालू असता खर रामाच्या आश्रमाकडे येत होता. त्या वेळी रामाला जे अनेक उत्पात दिसले ते प्रजेच्या दृष्टीने अहितकारी असल्याने तो अस्वस्थ झाला होता. आकाशात रक्ताचा वर्षाव करणारे धूसर वर्णाचे मेघ जमले होते. काही शुभ शकुन जय सूचित करीत असले, तरी अनर्थ टाळण्यासाठी रामाने लक्ष्मणाला धनुष्यबाण घेऊन सीतेसह वृक्षांनी गजबजलेल्या एखाद्या पर्वताच्या गहन गुहेत जाण्यास सांगितले. त्या वेळी लक्ष्मणाने आपली आज्ञा तात्काळ जशीच्या तशी मानावी, यास्तव राम म्हणतो–

**प्रतिकूलितुमिच्छामि न हि वाक्यमिदं त्वया ।**
**शापितो मम पादाभ्यां गम्यतां वत्स मा चिरम् ॥** १३

'माझ्या या सांगण्याचे विरुद्ध तू वागावेस, अशी माझी इच्छा नाही. माझ्या पायांची तुला शपथ आहे. वत्सा, तू सीतेला घेऊन जा. विलंब लावू नकोस.'

लक्ष्मण त्या सर्व राक्षसांना पुरून उरेल, अशी रामाची खात्री असूनही रामाने स्वताच त्यांचा वध करण्याचे काम आपल्याकडे घेतले. लक्ष्मणाला काही बोलण्यास त्याने संधीच दिली नाही.

## २. सीतेची अग्नीला आण

**सुन्दरकाण्ड/५३**

सभेत आलेल्या हनुमानाला पाहून रावण साशंक झाला. त्याला नंदीश्वराने पूर्वी दिलेल्या शापाची आठवण झाली आणि त्याने त्याचा वध करण्याचे योजिले. परंतु हनुमानाने आपण सुग्रीवाचा दूत म्हणून स्वताची ओळख करून दिली असल्याने त्याचा–दूताचा–वध करणे अयोग्य असल्याचे बिभीषणाने रावणाच्या निदर्शनास आणून देऊन

त्याला विचारापासून परावृत्त केले. तेव्हा हनुमानाला बांधून ठेऊन त्याचे पुच्छ प्रदीप्त करून सर्व नगरातून व चव्हाटयावरून त्याला फिरविण्याची त्याने राक्षसांना आज्ञा केली. राक्षसांनी त्याच्या शेपटीला चिंध्या गुंडाळून त्यांवर तेल ओतून ते पेटवून दिले. राक्षसांचा समाचार घेणे हनुमानाला कठीण नव्हते. परंतु त्याने इच्छित कार्यासाठी सारी अवहेलना मुकाटयाने सहन केली. खेरीज त्याला लंकेचे जवळून सूक्ष्म रीतीने दर्शन घ्यावयाचे होतेच, ते यामुळे अनायासे घडले. शेंपटी पेटवल्याने हनुमानाला काही इजा झाली नाही. परंतु लंका मात्र दग्ध झाली. सीतेला राक्षसांनी ही अप्रिय वार्ता सांगितली असता, ती अत्यंत शोकाकुल झाली. कारण हनुमानाची भेट झाली असता तो खरा रामदूत आहे, अशी तिची खात्री पटली होती. त्या महाकपीच्या कल्याणाची इच्छा मनोमनी बाळगून तिने अग्नीला प्रार्थना केली –

यद्यस्ति पतिशुश्रूषा यद्यस्ति चरितं तपः ।
यदि वा त्वेकपत्नीत्वं शीतो भव हनूमतः ।। २७

'मी जर पतीची शुश्रूषा केली असेल, जर काही तप केले असेल, अथवा माझे ठिकाणी जर पातिव्रत्य असेल, तर हे अग्ने, तू हनुमानाला शीतल हो.'

गोरखपूर प्रतीत आणखी तीन श्लोक दिले आहेत. ते येणेप्रमाणे–

यदि किञ्चिदनुक्रोशस्तस्य मय्यस्ति धीमतः ।
यदि वा भाग्यशेषो मे शीतो भव हनूमतः ।।

यदि मां वृत्तसम्पन्नां तत्समागमलालसाम् ।
स विजानाति धर्मात्मा शीतो भव हनूमतः ।।

यदि मां तारयेदार्यः सुग्रीवः सत्यसंगरः ।
अस्माद्दुःखाम्बुसंरोधाच्छीतो भव हनूमतः ।।

कै. काशिनाथ शास्त्री लेले यांनी यांचा मराठी अनुवाद दिलेला नाही.

## ३. रामाची शपथ युद्धकाण्ड/१९

राम बिभीषणाला शपथपूर्वक सांगत आहे.

बिभीषण रामाला शरण आला असता त्याने त्यास अभय दिले, आणि राक्षसांच्या यथातथ्य बलाविषयी खरी माहिती सांगण्याची विनंती केली. त्याने ब्रह्मदेवाच्या वरामुळे रावण कसा अवध्य झाला आहे, कुंभकर्ण किती सामर्थ्यवान आहे आणि इंद्रजित युद्धात किती निष्णात आहे, हे सांगून महोदर, महापार्श्वादी अन्य राक्षसांच्या बलाबलाविषयी इत्थंभूत कल्पना दिली. ती ऐकून संतुष्ट झालेला राम त्याला विचार करून म्हणाला– 'तू जे सांगितलेस ते मला समजले.

अहं हत्वा दशग्रीवं सप्रहस्तं सहात्मजम् ।
राजानं त्वां करिष्यामि सत्यमेतच्छृणोतु मे ।। १९

रसातलं वा प्रविशेत्पातालं वापि रावणः ।
पितामहसकाशं वा न मे जीवन्विमोक्ष्यते ।। २०

अहत्वा रावणं संख्ये सपुत्रजनबान्धवम् ।
अयोध्यां न प्रवेक्ष्यामि त्रिभिस्तैर्भ्रातृभिः शपे ।। २१

'प्रहस्त आणि पुत्र यांसह रावणाचा वध करून मी तुला राजा करीन, हे माझे सत्यवचन तू श्रवण करून ठेव. रावण रसातळामध्ये प्रवेश करो, पातालामध्ये शिरो अथवा ब्रह्मदेवापाशी गमन करो, माझ्या हातून तो जिवंत सुटणार नाही. पुत्र, स्वजन आणि बांधव ह्यांसह वर्तमान संग्रामामध्ये रावणाचा वध केल्यावाचून मी अयोध्या नगरीत प्रवेश करणार नाही, हे त्या तीन भ्रात्यांची शपथ वाहून मी सांगतो.'

हे ऐकून विभीषणाने रामाला प्रणाम केला आणि राक्षसांचा वध व लंकेवर हल्ला करताना साहाय्य देण्याचे कबूल केले. त्यामुळे रामाला अतिशय आनंद झाला, आणि त्याने लक्ष्मणाला समुद्राचे जल आणून बिभीषणाला राक्षसांचा राजा म्हणून राज्याभिषेक करण्यास सांगितले.

## ४. लक्ष्मणाची बाणाला शपथ युद्धकाण्ड/९०

इंद्रजित आणि लक्ष्मण यांचे युद्ध अत्यंत घनघोर व प्रेक्षणीय झाले. लक्ष्मणाने इंद्रजिताचे सर्व बाण निकामी केले. पूर्वी देव – दैत्यांच्या युद्धात इंद्राने ज्या बाणाने दैत्यांना जिंकले होते, तो सर्प-विषतुल्य आणि सर्व देवांना प्रिय असा बाण ऐंद्रास्त्राने अभिमंत्रित करून लक्ष्मणाने तो आपल्या श्रेष्ठ धनुष्याला लावला आणि आपला हेतू सिद्धीस जावा, या हेतूने त्या बाणाला उद्देशून तो म्हणाला –

धर्मात्मा सत्यसन्धश्च रामो दाशरथिर्यदि ।
पौरुषे चाप्रतिद्वन्द्वस्तदैनं जहि रावणिम् ।। ६९

' दाशरथी राम जर धर्मात्मा, सत्यवचनी व पराक्रमामध्ये अनुपम असेल, तर ह्या रावणपुत्राचा तू वध कर. '

## ५. रामाची शपथ उत्तरकाण्ड/४५

अग्निदिव्य करून सीतेने आपले निष्कलंक चारित्र्य सिद्ध केले असले व ती शुद्ध आणि सर्वस्वी निर्दोष असल्याची रामाचीही खात्री झाली असली, तरी लोकांच्या मनातील संशय पूर्णपणे नष्ट झालेला नव्हता. त्याच्या विषयी व सीतेविषयी जी कुजबूज चालू होती, ती त्याला सहन होण्यासारखी नव्हती. कारण राजकर्तव्याच्या त्याच्या कल्पनांत लोकनिंदेला अनन्यसाधारणस्थान होते. तिच्याकडे तो दुर्लक्ष करूच शकत नव्हता. जगात ज्या प्राण्याची निंदा होते, तो निंदा कायम असेपर्यंत नरकात पडून राहतो, अशी त्याची श्रद्धा होते. पत्नी या नात्याने सीतेवर त्याचे अपार प्रेम असले, तरी तिचे राजप्रासादातील वास्तव्य लोकनिंदेचा विषय बनल्याने, राजा या नात्याने तिचा त्याग करणे, हे त्याला परम कर्तव्य वाटत होते. त्याने तिचा – ती गरोदर असूनही – त्याग करण्याचा निर्णय घेतला. आपली इच्छा आणि वागणे प्रजेला व आप्तेष्टांना रुचणार नाही, असे त्याला वाटत असल्याने त्याने अत्यंत

कठोर शब्दांत लक्ष्मणाला देशाच्या हद्दीबाहेर सीतेला वाल्मीकींच्या आश्रमाजवळ गंगातीरी सोडून येण्याची आज्ञा केली. तिच्या संबंधी कोणतीही रदबदली ऐकून घेण्यास तो तयार नव्हता. आपल्या निर्णयाच्या आड कोणीही येऊ नये, ह्यास्तव त्याने पुढीलप्रमाणे शपथ घातली –

शापिता हि मया यूयं पादाभ्यां जीवितेन च ।
ये मां वाक्यान्तरे ब्रूयुरनुनेतुं कथंचन ।। २१

अहिता नाम ते नित्यं मदभीष्टविघातनात् । –२२

' मी आपल्या पायांची व जीविताची शपथ घातली आहे. माझ्या भाषणाविरुद्ध जे कोणी माझी समजूत घालण्याकरिता कसल्याही प्रकारचे भाषण करतील, त्यांच्या योगाने मला इष्ट असलेल्या गोष्टीचा विघात होत असल्यामुळे ते माझे सर्वदा शत्रू समजले जातील. '

ह्या शपथेने लक्ष्मणासह सर्वांनाच निरुत्तर केले. आज्ञेविरुद्ध एक अक्षरही उच्चारण्यास त्याने कोणालाही अवसर दिला नाही.

## ६. सीतेच्या शुद्धीविषयी वाल्मीकींची शपथ

उत्तरकाण्ड/९५

रामाचा अश्वमेध यज्ञ चालू असता वाल्मीकीने लवकुशांना रामायणाचे गायन करण्याची आज्ञा केली. त्यांनी अनेक ऋषी, राजे, वेदवेत्ते यांच्या उपस्थितीत रामायणाच्या पहिल्या वीस सर्गांचे गायन सुरेल स्वरात व तालबद्ध रीतीनें केले. ते ऐकून रामासह सारी सभा आश्चर्यचकित झाली. त्यांचे कौतुक करण्यासाठी द्रव्य व त्यांना हवे ते देण्याची रामाने आज्ञा केली असता, त्या मुलांनी त्यांचा स्वीकार करण्यास नकार दिला. ' हे काव्य त्यांना कसे प्राप्त झाले ? त्याचा कर्ता कोण ? त्या कवीचे निवास-स्थान कोणते ? काव्याची (श्लोक–) संख्या किती ? इत्यादी प्रश्न रामाने केले असता लवकुश त्याला म्हणाले – ' ज्या

काव्यात तुझे हे चरित्र पूर्ण दर्शविले आहे, त्या ह्या काव्याचे कर्तृत्व भगवान वाल्मीकी मुनीचे आहे.' ते सांप्रत यज्ञभूमीत आले आहेत. या ग्रंथात उत्तरकांडासह सात कांडें, पाचशें सर्ग आणि चोवीस हजार श्लोक ग्रथिले आहेत, त्यात संपूर्ण रामचरित आले आहे. ते ऐकण्याची इच्छा दर्शविल्यानें त्यांनी संपूर्ण रामायण गाऊन दाखविले. लवकुश हे सीतेचे पुत्र आहेत, हें कळल्यावर रामाने वाल्मीकी मुनीकडे दूतांकरवी निरोप धाडला.

यदि शुद्धसमाचारा यदि वा वीतकल्मषा ।
करोत्विहात्मनः शुद्धिमनुमान्य महामुनिम् ।। ४

'सीतेचे आचरण जर स्वाभाविकच शुद्ध असेल अथवा आश्रमात वास्तव्य केल्यामुळे ती जर निर्दोष झाली असेल, तर महर्षींची अनुज्ञा घेऊन तिने आपल्या शुद्धोविषयी येथे शपथ करावी.' वाल्मीकी मुनीचा व सीतेचा अभिप्राय जाणून घेंऊन रामाने कळविले –

श्वः प्रभाते तु शपथं मैथिली जनकात्मजा ।
करोतु परिषन्मध्ये शोधनार्थं ममैव च ।। ६

'उदयिक प्रभात काली जनककन्या मैथिलीने सभेमध्यें स्वतावरील व माझ्यावरील अपवाद दूर करण्याकरिता शपथ करावी.' ही शपथ ऐकण्यास गुरुजन, राजे, शिष्यसमुदाय आणि अन्य कोणीही यावे व पहावी यासाठी सर्वांना ती खुली ठेवण्यात आली. पती हे स्त्रीचे दैवत असल्यानें, राम जसे म्हणेल तसे सीता करील, असे वाल्मीकीने आश्वासनात्मक सांगितले.

## उत्तरकाण्ड/९६

ठरलेल्या तिथीला वाल्मीकी मुनी सीतेला घेऊन वेळेवर जनसमूहात प्रविष्ट झाला. वाल्मोकी मुनी रामाला म्हणाला – हे दाशरथे, लोकापवादाकरिता माझ्या आश्रमासमीप जिचा तू त्याग केलास, ती ही धर्मानें वागणारी पतिव्रता सीता, ही लोकापवादाची भीती बाळ-

गणाऱ्या तुझी खात्री करण्यास तयार आहे. तू तिला अनुज्ञा दे. जुळें झालेलें हे उभयता जानकीनंदन तुझेच अजिंक्य पुत्र आहेत, हें मी तुला सत्य सांगतो. मी प्राचेतसाचा दहावा पुत्र आहें. अनृत भाषण केल्याचे मला कधीही स्मरत नाही. हे पुत्र तुझे आहेत.' राघवा, सीता शुद्ध आहे, असा पाच ज्ञानेंद्रिये व सहावे मन त्यांच्या योगानें माझा निश्चय झाल्यावरच मी हिचा स्वीकार केला. हिचे आचरण शुद्ध आहे; ही पापरहित आहे आणि पती हेंच हिचे दैवत आहे.

बहुवर्षसहस्राणि तपश्चर्या मया कृता ।
नोपाश्नीयां फलं तस्या दुष्टेयं यदि मैथिली ।। २०

मनसा कर्मणा वाचा भूतपूर्वं न किल्बिषम् ।
तस्याहं फलमश्नामि अपापा मैथिली यदि ।। २१

'ही मैथिली जर दोषयुक्त असेल, तर अनेक सहस्र वर्षें पर्यंत जी मी तपश्चर्या केली आहे, त्याचे फळ मला प्राप्त होणार नाही ! मैथिली जर पापरहित असेल तरच आजपर्यंत जे कायिक, वाचिक व मानसिक पातक माझ्या हातून घडले नाही, त्याचे फळ मला प्राप्त होईल.'

वाल्मीकी रामाला पुढे म्हणाला की लोकापवादाला भ्यालेल्या तुझी ही खात्री करून देईल. ही अंतःकरणानेही शुद्ध आहे, असे दिव्य ज्ञानाने मला कळून आले आहे. तुला सुद्धा हे समजले असूनही लोकापवादामुळे तुझे मन कलुषित झाल्याकारणाने तू हिचा त्याग केला आहेस.

## ७. सीतेची शपथ उत्तरकाण्ड/९७.

पहा सीतेच्या शुद्धीविषयी वाल्मीकीची शपथ, पृ. ९२ ते ९५

सीतेच्या शुद्धतेबाबत वाल्मीकीने शपथपूर्वक सांगितले असता रामाचीही खात्री झाली. तो म्हणाला–' पूर्वी देवांचे सन्निध सीतेची शपथ होऊन खात्री झाली व नंतर मी तिला घरात येण्याची अनुज्ञा

दिली. परंतु लोकापवाद दुस्तर आहे, हे समजून मी मैथिलीचा त्याग केला. त्या अपराधाबद्दल आपण मला क्षमा करावी. जुळे झालेले हे पुत्र कुश–लव माझेच आहेत, हेही मी जाणून आहे. जगात शुद्ध ठरलेल्या सीतेचे ठिकाणी माझे प्रेम असो. तेथे जमलेले देव प्रभृती सारे सीतेच्या शपथेच्या वेळी आश्चर्यचकित झाले.

सीतेने काषायवस्त्र परिधान केले होते. तेथे जमलेल्या जन-समूहा-कडे अवलोकन करून ती म्हणाली–

यथाहं राघवादन्यं मनसापि न चिन्तये ।
तथा मे माधवी देवी विवरं दातुमर्हति ।। १४

मनसा कर्मणा वाचा यथा रामं समर्चये ।
तथा मे माधवी देवी विवरं दातुमर्हति ।। १५

यथैतत्सत्यमुक्तं मे वेद्मि रामात्परं न च ।
तथा मे माधवी देवी विवरं दातुमर्हति ।। १६

'रघूत्तम रामाशिवाय मी जर इतर पुरुष मनात आणला नसेल, तर ही विष्णुपत्नी भूदेवी मला विवर देईल. मनानें कायेने व वाचेने जर मी रामाचेच आराधन करीत असेन, तर ही विष्णुपत्नी भूमाता मला द्वार देईल. रामाशिवाय दुसऱ्या पुरुषाची मला ओळखही नाही. हे जर माझे म्हणणे सत्य असेल, तर ह्या विष्णुपत्नी भूमीने मला प्रवेश कर-ण्यास मार्ग द्यावा.'

सीतेनें शपथेच्या शब्दांचा उच्चार करताच, भूमीतून एक दिव्य सिंहासन वर आले. त्या सिंहासनावर प्रत्यक्ष भूदेवी होती. तिने सीतेला हातांनी उचलून घेतले. तिचे अभिवंदन करून तिला सिंहासनावर घेतले. सिंहासनाधिष्ठित सीता रसातळात प्रवेश करू लागताच तिच्यावर दिव्य पुष्पांची वृष्टी झाली आणि लोकांच्या मुखातून धन्योद्‌गार निघाले.

## १. दशरथ < कैकेयी

बालकाण्ड/१

अमोघ पराक्रमी, बहुगुणसंपन्न आणि प्रजाहितदक्ष अशा आपल्या ज्येष्ठ व प्रिय पुत्राला-रामाला प्रजाजनांच्या इच्छापूर्तीसाठी यौवराज्याभिषेक करण्याचे दशरथ राजाच्या मनाने घेतले व त्यासाठी आवश्यक ते साहित्य त्याने जमा करविले. ते पाहून

**पूर्वं दत्तवरा देवी वरमेनमयाचत ।**
**विवासनं च रामस्य भरतस्याभिषेचनम् ।। २२**

'पूर्वी जिला वर देण्याचे (दशरथ राजाने) आश्वासन दिले होते, त्या (कैकेयी नामक त्याच्या) भार्येने रामाला (चौदा वर्षे) वनवास (द्यावा) आणि भरताला (यौवराज्य) अभिषेक (करावा), असा वर मागितला.'

अयोध्याकाण्ड/९

दशरथ राजाने कैकेयीला वर देऊ केले असल्याचे मंथरेला प्रथम माहीत नव्हते. परंतु केव्हातरी कैकेयीने स्वताच तिला सांगितले होते. मंथरा त्याची कैकेयीला आठवण करून देत आहे.

दंडकारण्यातील वैजयंत नगरीत तिमि-ध्वज (शंबर) नावाचा दैत्य राज्य करीत असे. त्याला अनेक माया अवगत होत्या. त्याने देवगणांसह असलेल्या इंद्राशी युद्ध आरंभिले. संग्रामात जखमी झालेल्या पुरुषांना तो जबरदस्तीने ओढून नेऊन हाल करून ठार करीत असे. दशरथ राजाने मोठ्या शौर्याने राक्षसांचा प्रतिकार केला, तत्रापि त्यांनी त्याच्या शरीराचे लचके तोडले, क्षते पाडली. त्या वेळी कैकेयीने मोठ्या युक्तीने दशरथ राजाला संग्रामातून दूर नेऊन त्याचे रक्षण केले. त्या प्रसंगाची आठवण करून देत मंथरा सांगते—

**तुष्टेन तेन दत्तौ ते द्वौ वरौ शुभदर्शने ।**
**स त्वयोक्तः पतिर्देवि यदेच्छेयं तदा वरम् ।। १७**

संतुष्ट होऊन राजाने तुला वर देऊ केले असता–' इच्छेस येईल, तेव्हा मी हे वर मागून घेईन, म्हणून तू त्याला सांगितले आहेस.' असे तू मला म्हणाली होतीस. तेव्हा तू पतीला वश करून घे आणि राजाला रामाच्या यौवराज्याभिषेकापासून परावृत्त कर. भरताला राज्याभिषेक आणि रामाला चौदा वर्षे वनवास, हे दोन वर तू मागून घे–असा सल्ला मंथरेने दिला.

ती पुढे म्हणते – कैकेयी, देव-दैत्यांच्या युद्धप्रसंगी तुला जे त्याने वर दिले आहेत त्यांचे तू त्याला स्मरण कर, म्हणजे तुझी इच्छा निष्फळ होणार नाही. जेव्हा स्वता राजा शय्येवरून उठून तुला वर देईल, तेव्हा शपथा घालून तू त्याला शब्दांत पकड; आणि

रामप्रव्रजनं दूरं नव वर्षाणि पञ्च च।
भरतः क्रियतां राजा पृथिव्यां पार्थिवर्षभ ॥ ३०

' हे राजाधिराज, चौदा वर्षे रामाला दूर (वनामध्ये) हाकून देऊन भरताला पृथ्वीचा राजा करावे'–असा वर तू त्याच्यापाशी माग.'

राम चौदा वर्षे दूर गेल्याने भरताच्या राज्याला चांगली बळकटी येईल, असे तिने पटवून देण्याचा प्रयत्न केला.

अयोध्याकाण्ड/११

वर-याचना करताना कैकेयी दशरथाला म्हणाली–

यथा क्रमेण शपसे वरं मम ददासि च।–१३

' प्रथम प्रिय पुत्राची आणि नंतर पुण्याची क्रमाने शपथ घेऊन तू मला वर देत आहेस– हे इंद्रप्रभृती तेहेतीस कोटी देव ऐकून ठेवोत आणि त्याचप्रमाणे चंद्र, सूर्य, आकाश, ग्रह, रात्री, दिवस, दिशा, जगत, ही पृथ्वी, गंधर्व आणि राक्षस यांसह स्वर्गातील देवता, निशाचर प्राणी, घरातील गृहदेवता आणि इतर प्राणी हे तुझे प्रतिज्ञेचे भाषण ऐकून ठेवोत.' अशा रीतीने राजाची त्याच्या सत्यप्रतिज्ञत्वादी गुणांविषयी प्रशंसा करीत ती पुढे म्हणाली–' राजा, पूर्वीच्या वृत्तांताचे स्मरण कर.

त्या देव-दैत्यांच्या संग्रामामध्ये शंबर नावाच्या दैत्यराजाने तुला जर्जर केले होते. केवळ जीव मात्र घेतला नव्हता. त्या वेळी

तत्र चापि मया देव यत्त्वं समभिरक्षितः ।
जाग्रत्या यतमानायास्ततो मे प्रददौ वरौ ।। १९

तौ दत्तौ च वरौ देव निक्षेपौ मृगयाम्यहम् ।
तवैव पृथिवीपाल सकाशे रघुनन्दन ।। २०

तत्प्रतिश्रुत्य धर्मेण न चेद्दास्यसि मे वरम् ।
अद्यैव हि प्रहास्यामि जीवितं त्वद्विमानिता ।। २१

'मी जागृत राहून तुझे रक्षण केले आणि तुझ्या जिवाकरिता मी तडफड केली. म्हणून तू मला दोन वर दिलेस. राजा, तू दिलेले वर मी तुझ्यापाशी आजपर्यंत ठेव म्हणून ठेवले होते आणि आज मी ते मागत आहे. तस्मात् धर्माची शपथ घेऊन तू वचन दिले असूनही जर मला वर देणार नाहीस, तर आपणाकडून माझा अपमान झाला, असे समजून मी आजच्या आजच प्राणत्याग करीन.'

आपल्या वाक्चातुर्याने काममोहित होऊन वर देण्यास उद्युक्त झालेल्या दशरथ राजाला कैकेयीने शब्दांत बांधून घेतले व आता तो वचनभंग करू शकणार नाही, अशी खात्री झाल्यावर ती म्हणाली–

वरौ देयौ त्वया देव तदा दत्तौ महीपते ।।–२३
तौ तावदहमद्यैव वक्ष्यामि शृणु मे वचः ।
अभिषेकसमारम्भो राघवस्योपकल्पितः ।। २४
अनेनैवाभिषेकेण भरतो मेऽभिषिच्यताम् ।
यो द्वितीयो वरो देव दत्तः प्रीतेन मे त्वया ।। २५
तदा देवासुरे युद्धे तस्य कालोऽयमागतः ।
नव पञ्च च वर्षाणि दण्डकारण्यमाश्रितः ।। २६
चीराजिनधरो धीरो रामो भवतु तापसः ।
भरतो भजतामद्य यौवराज्यमकण्टकम् ।। २७

'हे भूपते, त्या वेळी देऊ केलेले वर आपण आता मला द्या. ते मी आजच मागून घेत आहे. ह्यास्तव माझे भाषण श्रवण करा–रामाच्या अभिषेकाचा जो हा समारंभ योजिला आहे, त्याच समारंभाने माझ्या भरताला अभिषेक व्हावा. राजा, त्या देव-दैत्यांच्या युद्धामध्ये आपण प्रसन्न होऊन जो वर मला देऊ केला होता, तो मागून घेण्याचा हा समय प्राप्त झाला आहे. ह्यास्तव वल्कले आणि अजिनें परिधान करून ज्ञानवान रामाने तापस बनून चौदा वर्षेपर्यंत दण्डकारण्यामध्ये वास्तव्य करावे आणि भरताने आज निष्कंटक यौवराज्याचा स्वीकार करावा–हीच माझी मुख्य इच्छा आहे.'

आपल्या म्हणण्याच्या पुष्टयर्थ ती पुढे ठासून म्हणते–'**दत्तमेव वरं वृणे**'. आपण दिलेलाच वर मी मागून घेत आहे.

अयोध्याकाण्ड/१२

कैकेयीची वर-याचना कानी पडताच दशरथ राजा अतिशय संतप्त झाला. शोकाकुलतेमुळे त्याला मूर्च्छा आली. सावध झाल्यावर त्याने कैकेयीची अत्यंत दाहक शब्दांत निर्भर्त्सना केली. तिला समजावून सांगण्याचा प्रयत्न केला; इतकेच नव्हे तर तिला आपला हेका सोडण्यासाठी दयेची भीकही मागितली. दुःखाने संतप्त, शोकाने व्याप्त, मूर्च्छित, शरीराला कंप सुटलेला दशरथ राजा पुन्हा पुन्हा तिची विनवणी करीत असता कैकेयी अत्यंत भयंकर शब्दांनी त्याला म्हणाली–

**यदि दत्त्वा वरौ राजन्पुनः प्रत्यनुतप्यसे ।**
**धार्मिकत्वं कथं वीर पृथिव्यां कथयिष्यसि ।। ३९**

'राजा, वर देऊन-सवरूनही जर तू पुन्हा पश्चात्ताप पावत आहेस, तर हे वीरा, पृथ्वीमध्ये लोकांना धार्मिकपणाबद्दल तुझी प्रशंसा कशी करता येईल?' जिच्या कृपेने तू जिवंत राहिलास व जिने तुझे रक्षण केले, तिचे वचन मिथ्या कसे करणार?

**यो दत्त्वा वरमद्यैव पुनरन्यानि भाषसे ।।–४२**

ज्या अर्थी वर देऊनही तू पुन्हा भलतीच भाषणे करीत आहेस, त्या

अर्थी आपल्या कुलातील राजांच्या नावाला कलंक लावशील. आपल्या म्हणण्याच्या पुष्टयर्थ ती अलर्क व शैब्य राजांची उदाहरणे देऊन ते दिलेल्या शब्दाला कसे जागले, हे त्याच्या निदर्शनाला आणून देते.

दशरथ राजा अत्यंत दीन व व्याकुळ शब्दांत तिला म्हणतो—'हित-कारक दिसणाऱ्या अनर्थाचा तुला कुणी उपदेश केला ? पिशाचाने अंतः-करण झपाटावे, असे भाषण माझ्याशी करताना तुला लाज कशी वाटली नाही ? तुझा हा सारा प्रकार मला विपरीत दिसतो.

कुतो वा ते भयं जातं या त्वमेवंविधं वरम् ।।-५८
राष्ट्रे भरतमासीनं वृणीषे राघवं वने ।
विरमैतेन भावेन त्वमेतेनानृतेन च ।। ५९

' भरताला राज्यावर बसवून रामाला वनवासात पाठविण्याविषयी तू वर मागत आहेस, परंतु अशा प्रकारचा वर मागण्यासारखे भय तुला कोठून प्राप्त झाले ?'

भर्ता, लोक आणि भरत यांना प्रिय असलेले जर तुला कर्तव्य असेल तर ह्या विचारापासून, अनृत मार्गापासून परावृत्त हो— असे त्याने तिला सांगितले.

## अयोध्याकाण्ड/१३

अत्यंत शोकाकुल झालेल्या दशरथ राजाला लोकापवादाची तमा न बाळगणारी, रामापासून भरताला भय उत्पन्न होईल, अशी कल्पना करणारी कैकेयी म्हणाली—

त्वं कत्थसे महाराज सत्यवादी दृढव्रतः ।
मम चेदं वरं कस्माद्विधारयितुमिच्छसि ।। ३

' हे महाराज, सत्यवादी आणि स्वीकारलेले व्रत नेटाने चाल-विणारा म्हणून तुझी मोठी ख्याती आहे. तस्मात् माझा हा वर कशा-करिता आपल्याकडे ऋण ठेवण्याची इच्छा करीत आहेस ?'

## अयोध्याकाण्ड/१४

पुत्रशोकामुळे व्याकुळ होऊन तडफडणाऱ्या दशरथ राजाला कैकेयी म्हणाली–

**पापं कृत्वेव किमिदं मम संश्रुत्य संश्रवम् ।–२**

'मला वर दण्याची प्रतिज्ञा करून तू पाप केल्याप्रमाणे व्याकुळ होऊन भूतलावर पडला आहेस, हे काय? सज्जनांच्या सत्यपालनरूप मर्यादेनेच वागणे तुला योग्य आहे. धर्मासाठीच मी तुला रामाला वनात धाडण्यास सांगत आहे. ही माझी अट जर तू पाळणार नसशील, तर तुझ्याकडून उपेक्षा झालेली मी तुझ्यासमोर जीव देईन.'

## अयोध्याकाण्ड/१८

राम कैकेयीच्या मंदिरात गेला असता त्याला दशरथ राजा अत्यंत दीन व दुःखी दिसला; त्याचा चेहरा निस्तेज झाला होता. त्याने माता-पित्यांना वंदन केले. दशरथाला तशा अवस्थेत पाहून रामही खिन्न झाला. त्याने कैकेयीला राजाच्या म्लानतेबद्दल विचारले असता, ती रामाला म्हणाली– 'राजा क्रुद्ध झालेला नाही किंवा त्याच्यावर काही संकटही आलेले नाही. त्याला तुला काही सांगावयाचे आहे. परंतु तू त्याचा अत्यंत लाडका असल्याने अप्रिय बोलण्यास तो धजत नाही. त्याने मला काही वचन दिले आहे व ते तुला पूर्ण करावयास हवे.

**एष मह्यं वरं दत्त्वा पुरा मामभिपूज्य च ।**
**स पश्चात्तप्यते राजा यथान्यः प्राकृतस्तथा ।। २२**
**अतिसृज्य ददानीति वरं मम विशाम्पतिः ।–२३**

"ह्याने आधी मला वर देऊन माझा मानही राखला; आणि नंतर हा राजा आता एखाद्या प्राकृत जनाप्रमाणे पश्चात्ताप करीत बसला आहे. ह्या प्रजाधिपतीने 'वर देईन' म्हणून जर माझ्याशी प्रतिज्ञा केली आहे तर आता त्याचे पश्चात्ताप पावणे म्हणजे पाणी

निघून गेल्यानंतर बांध घालण्यासारखे निरर्थक आहे." राजाच्या अनुमतीने जे सांगेन, ते शेवटास नेण्याची प्रतिज्ञा रामाकडून आधी करवून घेऊन कैकेयी त्याला म्हणाली–

पुरा देवासुरे युद्धे पित्रा ते मम राघव।
रक्षितेन वरौ दत्तौ सशल्येन महारणे ॥ ३२

'पूर्वी देव-दैत्यांच्या युद्धामध्ये ह्याला शल्य लागले असता ते काढून मी ह्याचे रक्षण केले. तेव्हा त्या महासंग्रामामध्ये ह्या तुझ्या पित्याने मला दोन वर देऊ केले होते.'

तत्र मे याचितो राजा भरतस्याभिषेचनम्।
गमनं दण्डकारण्ये तव चाद्यैव राघव ॥ ३३

'भरताला राज्याभिषेक आणि तुझे आजच्या आज दण्डकारण्यामध्ये गमन–म्हणून ते दोन वर देण्याविषयी मी राजाला प्रार्थना केली आहे; तेव्हा पित्याची व स्वताची प्रतिज्ञा खरी करण्यास तू तत्पर हो.'

त्वयारण्यं प्रवेष्टव्यं नववर्षाणि पञ्च च ॥– ३५
भरतश्चाभिषिच्येत यदेतदभिषेचनम्।
त्वदर्थे विहितं राज्ञा तेन सर्वेण राघव ॥ ३६
सप्त सप्त च वर्षाणि दण्डकारण्यमाश्रितः।
अभिषेकमिदं त्यक्त्वा जटाचीरधरो भव ॥ ३७

ह्या तुझ्या पित्याने मला वर देऊ केल्याप्रमाणे–'तुला चौदा वर्षे अरण्यामध्ये गेले पाहिजे, आणि तुझ्याकरिता जी ही अभिषेक-सामुग्री राजाने जुळविली आहे, त्या सर्व सामुग्रीने भरताला अभिषेक झाला पाहिजे. ह्या राज्याभिषेकाचा त्याग कर आणि जटा-वल्कले धारण करून तू चौदा वर्षेपर्यन्त दण्डकारण्याच्या आश्रयाने रहा.'

एतत्कुरु नरेन्द्रस्य वचनं रघुनन्दन।–४०

येथे कैकेयीने 'वर' ऐवजी 'वचन' शब्द वापरला आहे.

हा अयाचित वर आहे.

## ह्या वराबाबतच्या विविध व्यक्तींच्या प्रतिक्रिया

लक्ष्मण अयोध्याकाण्ड/२३

रामाने वनात जाण्याची प्रतिज्ञा केली असता लक्ष्मणाने तिचा स्पष्ट शब्दांत निषेध केला. आपले म्हणणे रामाला पटवून देण्याचा त्याने विविध रीतींनी प्रयत्न केला आहे. पित्राज्ञेचे उल्लंघन झाल्यास धर्माला विरोध होईल, म्हणून रामाने वनवासाला जाण्याबाबत त्याने घेतलेला निर्णय लक्ष्मणाला उतावीळपणाचा वाटतो. त्या दुष्ट स्त्री-पुरुषांविषयी (कैकेयी व दशरथ) त्याच्या मनात शंका कशी येत नाही असे तो स्पष्टपणे विचारतो. धर्माचे पांघरूण घेऊन पुरुष पापासक्त असतात, असे तो दशरथाला उद्देशून म्हणतो. वनात गेल्याने कपटाने तुझा त्याग करणाऱ्या कैकेयी व दशरथाचा स्वार्थ सहज साधला जात आहे, हे तो रामाच्या निदर्शनास आणून देतो आणि आपली शंका पुढीलप्रमाणे व्यक्त करतो–

यदि नैवं व्यवसितं स्याद्धि प्रागेव राघव।
तयोः प्रागेव दत्तश्च स्याद्वरः प्रकृतश्च सः॥ ९

'असे जर ठरलेले नसते तर प्रस्तुत जो वर पुढे आला आहे, त्याची देवघेव त्यांच्यात पूर्वीच व्हायला हवी होती.' ज्या अर्थी असे झाले नाही, त्या अर्थी पूर्वी वर देऊ केला होता व तो आजपर्यन्त मागावयाचा राहिला होता – हे सर्व काही तरी खोटे निमित्त पुढे केले जात आहे.

यदयं किल्बिषाद्भेदः कृतोऽप्येवं न गृह्यते।
जायते तत्र मे दुःखं धर्मसङ्गश्च गर्हितः॥ १३

'हे वराचे निमित्त तुझा अभिषेक हाणून पाडण्याच्या दुष्ट बुद्धीने जाणून-बुजून केलेले आहे,' हे इतके स्पष्ट असूनही त्याबद्दल रामाला काहीं वाटत नसल्याने लक्ष्मण दुःखी झाला होता.

लक्ष्मणाने वराचा उल्लेख एकवचनी केला आहे.

वसिष्ठ अयोध्याकाण्ड/३७

वनवासाला जाताना रामाने भोग्य वस्तूंचा त्याग करून गेले पाहिजे, असा आग्रह धरणारी कैकेयी, त्याच्या बरोबर निघालेल्या सीतेनेही वल्कले धारण करून गेले पाहिजे, असे जेंव्हा बोलू लागली, तेंव्हा वसिष्ठ मुनीने सीतेला तसे करण्यास प्रतिबंध केला आणि कैकेयीला तिने मागितलेल्या वराच्या मर्यादा स्पष्ट शब्दांत विशद करून सांगितल्या. वसिष्ठ म्हणाला–

एकस्य रामस्य वने निवासस्त्वया वृतः केकयराजपुत्रि ।
विभूषितेयं प्रतिकर्मनित्या वसत्वरण्ये सह राघवेण ।। ३५

यानैश्च मुख्यैः परिचारकैश्च सुसंवृता गच्छतु राजपुत्री ।
वस्त्रैश्च सर्वैः सहितैर्विधानैर्नेयं वृता ते वरसम्प्रदाने ।। ३६

'हे केकयराजकन्ये, एकट्या रामालाच तू वनवास मागून घेतला आहेस. ह्यास्तव नेहमी अलंकार धारण करणाऱ्या ह्या सीतेला भूषित होऊन अरण्यामध्ये रामाबरोबर वास्तव्य करू दे. उत्कृष्ट वाहने, सेवक, सर्व प्रकारची वस्त्रे आणि सामानसुमान बरोबर घेऊन ही राजकन्या चांगल्या बंदोवस्ताने जाऊ दे. कारण वरदानसमयी तू हिच्याविषयी मागणी केलेली नाहीस.'

दशरथ अयोध्याकाण्ड/३४

वनवासास जाण्यास सिद्ध झालेला राम निरोप घेण्यासाठी दशरथाकडे आला असता तो रामाला म्हणाला–

अहं राघव कैकेय्या वरदानेन मोहितः ।
अयोध्यायां त्वमेवाद्य भव राजा निगृह्य माम् ।। २६

'राघव, कैकेयीने मला वरदानामुळे मोहित केले आहे. तस्मात् मला बांधून टाकून तूच आज अयोध्येचा राजा हो.'

तेंव्हा रामाने दशरथ राजाला सांगितले – ' मला राज्याची इच्छा नाही. आपण हजारो वर्षे पृथ्वीपती असावे. मी अरण्यातच वास्तव्य करीन वनवासाची चौदा वर्षे संपली, म्हणजे प्रतिज्ञा-पूर्तीनंतर पुन्हा आपल्या पायांची सेवा करण्यास येईन. ' रामाने आजच्या आजच वनात गेले पाहिजे, म्हणून कैकेयी सतत हट्ट करीत होती; तर अगतिक झालेला दशरथ राजा अत्यंत कष्टी व शोकाकुल झाला होता. रामाने वनवासात जाणे त्याला बिलकुल पसंत नव्हते. रामाने आपल्या निश्चयात बदल होणार नाही, असे निक्षून सांगितले व शोक आवरण्याची विनंती केली आणि तो म्हणाला –

यस्तु युद्धे वरो दत्तः कैकेय्यै वरद त्वया।।– ४२
दीयतां निखिलेनैव सत्यस्त्वं भव पार्थिव।
अहं निदेशं भवतो यथोक्तमनुपालयन्।। ४३
चतुर्दश समा वत्स्ये वने वनचरैः सह।
मा विमर्शो वसुमती भरताय प्रदीयताम्।। ४४
न हि मे कांक्षितं राज्यं सुखमात्मनि वा प्रियम्।
यथानिदेशं कर्तुं वै तवैव रघुनन्दन।। ४५

' हे वरप्रद, आपण युद्ध समयी कैकेयीला जो वर देऊ केला आहे, तो पूर्णपणे तिला द्या. हे भूपते, आपण खरे व्हा, मी आपल्या सांगण्या-प्रमाणे आपल्या आज्ञेचे परिपालन करून वनचरांसह चौदा वर्षेपर्यंत वना-मध्ये वास्तव्य करीन. आपण आता विचार करू नका. भरताला पृथ्वी देऊन टाका. हे रघुनंदन, आपल्या आज्ञेप्रमाणे वागणे, हे जसे माझ्या मनाला प्रिय आहे, तसे (ऐहिक) सुख मला प्रिय नाही व राज्याचीही मला इच्छा नाही. '

## अयोध्याकाण्ड/३६

रामाने वनवासाला जाणे ही गोष्ट दशरथाला अत्यंत दुःसह झाली होती. कैकेयीने त्याला शब्दांत पकडून अत्यंत क्लेशदायक असा वर देण्यास भाग पाडले होते. त्याला कैकेयीचा [illegible] आला

असला, तरी वर दिल्याने तो अगतिक झाला होता. ' सार काढून घेत-लेल्या सुरेप्रमाणे धनरहित आणि म्हणूनच ज्यात यत्किंचितही चव राहि-लेली नाही, असे शून्य राज्य भरत स्वीकारणार नाही ', असे रामाला उद्देशून काढलेले कैकेयीचे दुष्ट उद्‌गार त्याच्या हृदयाला झोंबत होते. तेव्हा संतप्त झालेला दशरथ कैकेयीला म्हणाला–

वहन्तं किं तुदसि मां नियुज्य धुरि माहिते ।
अनार्ये कृत्यमारब्धं किं न पूर्वमुपारुधः ।। १४

' हे अहितकारिणी स्त्रिये, तू माझ्या मानेवर जू दिले आहेस. परंतु ते मी वाहात असतानाही तू मला कशाकरिता वरे पीडा देत आहेस? हे दुष्टे, आता जे तू हे कृत्य आरंभिले आहेस, ते तू मला पूर्वीच का सांगितले नाहीस ?'

संस्कृत श्लोकात ' वर ' शब्द स्पष्टपणे नाही, परंतु अनुवादकाने कंसामध्ये पुढीलप्रमाणे जो मजकूर दिला आहे, त्यात ' वरा'चा स्पष्ट उल्लेख आहे.

[भोग्य वस्तूंसहवर्तमान रामाने वनवासाला जाऊ नये, असे जें आता म्हणत आहेस, ते तू पूर्वी वर मागून घेते वेळीच म्हणावयाला पाहिजे होते. ज्या अर्थी त्या वेळी तू हे मागून घेतले नाहीस, त्या अर्थी मी ते तुला दिलेही नाही. आणि म्हणूनच रामानें भोग्य वस्तू बरोबर नेऊ नये, असे म्हणण्याचा तुला आता अधिकारही नाही.]

## अयोध्याकाण्ड/५९

सुमंत्राकडून वनात गेलेल्या रामाचा वृत्तान्त ऐकून दशरथ राजा अत्यंत कष्टी झाला. शोकमग्न होऊन तो कौसल्येला म्हणाला–' रामा-संबंधी शोक हाच ज्याचा प्रचंड वेग आहे, सीतेचा विरह हेच ज्याचे तीर आहे, दुःखाचे सुस्कारे हेच ज्यातील लाटांनी भरलेले मोठमोठे भोवरे आहेत, बाष्पप्रवाहरूप नदीजलाने जो कलुषित झालेला आहे, शोकभरात होणारे हस्तविक्षेप हेच ज्यातील मत्स्य आहेत, आक्रोश हीच

ज्याची मोठी गर्जना आहे, अस्ताव्यस्त झालेले केश हेच ज्यातील शेवाळ आहे, कैकेयी हाच ज्यातील वडवानल आहे,

ममाश्रुवेगप्रभवः कुब्जावाक्यमहाग्रहः ।
वरवेलो नृशंसाया रामप्रव्राजनायतः ।। ३१

माझ्या अश्रुप्रवाहाचा जो उत्पादक आहे, कुबडचा मंथरेची भाषणे हेच ज्यातील मोठमोठें मगर आहेत, दुष्ट कैकेयीला दिलेला वर हीच मर्यादा आहे आणि रामाला वनवासात हाकून देणे हेच कालकूट विष ज्यापासून निघाले आहे–अशा या शोकसागरात मी निमग्न झालो आहे.'

## सिद्धार्थ अयोध्याकाण्ड/३६

परंतु कैकेयीने रघुवंशातीलच सगराने असमंज नावाच्या आपल्या ज्येष्ठ पुत्राला राज्यभोगाचा प्रतिबंध करून वनवासात धाडताना भोग्य वस्तू बरोबर नेण्यास प्रतिबंध केल्याचा दाखला देऊन निरुत्तर केले. कैकेयीचे भाषण ऐकून दशरथाने तिचा धिक्कार केला. तेव्हा सारा सेवकवर्ग लज्जित झाला. रामाची असमंजाशी तुलना करणे कसे चुकीचे आहे, हे प्रधान सिद्धार्थ याने स्पष्ट करून सांगितले आणि लोकापवादाची तरी लाज बाळगणे आवश्यक कसे आहे, ते तिच्या निदर्शनास आणून दिले.

## सुमंत्र अयोध्याकाण्ड/५८

वनवासाला निघालेल्या रामाला पोहोचविण्यासाठी रथासहित सुमंत्राला धाडण्यात आले होते. रामाला निरोप देऊन आल्यावर तो दशरथ राजाला प्रवासातील माहिती देत आहे. लक्ष्मण सुस्कारे टाकीत अत्यंत क्रुद्ध होऊन जे बोलला, ते तो सांगत आहे–

कोणत्या अपराधासाठी रामाला वनवासात हाकलून देण्यात आले आहे ? उतावीळपणाने कैकेयीला वचन देऊन राजाने जी ही गोष्ट केली, ती चांगली असो अथवा वाईट असो, आम्हाला मात्र अतिशय संताप झालेला आहे.

यदि प्रव्राजितो रामो लोभकारणकारितम् ।
वरदाननिमित्तं वा सर्वथा दुष्कृतं कृतम् ।। २८

'रामाला वनात हाकून दिले, हे लोभामुळे झालेले असो अथवा कैकेयीला वरदान दिल्यामुळे झालेले असो, राजानें ही गोष्ट सर्वस्वी वाईट केली, हे खचित आहे.'

भरत अयोध्याकाण्ड/७२

अयोध्येला परतल्यानंतर भरताला आपल्या प्रिय पित्याचा मृत्यू आणि रामाचा वनवास ह्या दुष्ट घटना समजल्या आणि याचे कारण आपली आई आहे, असे कळताच तो अतिशय क्रुद्ध झाला. तो कैकेयीला म्हणाला–कोणत्या कारणास्तव रामाला वनवासाला धाडण्याचे घोर कृत्य तू केलेस ? रामाच्या हातून असा कोणता अपराध घडला ? त्याने अनेक प्रश्न विचारून कैकेयीला छेडले. परंतु स्वताला अकारण शहाण्या समजणाऱ्या कैकेयीने आनंदित होऊन उतावीळपणे सांगितले–

न ब्राह्मणधनं किंचिद्धृतं रामेण कस्यचित् ।
कश्चिन्नाढ्यो दरिद्रो वा तेनापापो विहिंसितः ।
न रामः परदारान्स चक्षुर्भ्यामपि पश्यति ।। ४८
मया तु पुत्र श्रुत्वैव रामस्येहाभिषेचनम् ।
याचितस्ते पिता राज्यं रामस्य च विवासनम् ।। ४९

'रामाने कोणाच्याही ब्रह्मस्वाचा अपहार केलेला नाही. त्याने निरपराधी अशा धनाढ्य पुरुषाचा अथवा दरिद्र्याचा प्राणही घेतलेला नाही. परस्त्रीकडे राम तर कधी नेत्रांनी पहातदेखील नाही. परंतु त्याला येथे अभिषेक होणार, हे ऐकता क्षणी तुला राज्य आणि रामाला वनवास हे दोन वर मी तुझ्या पित्यापासून मागून घेतले.'

संस्कृत श्लोकात 'वर' शब्द नाही. परंतु तो अभिप्रेत आहे. मराठी अनुवादात वराचा स्पष्ट उल्लेख आहे.

## अयोध्याकाण्ड/१०७

वनवासात गेलेल्या रामाला अयोध्येला परत आणून राज्याभिषेक करण्याच्या हेतूने प्रेरित होऊन भरत त्याच्या भेटीसाठी गेला. रामाची भेट होताच त्याने त्याला अयोध्येला परतण्याची कळकळीची विनंती केली. परंतु राम आपल्या निश्चयापासून यत्किंचितही ढळला नाही. तो भरताला म्हणाला – " तू जे भाषण केलेस ते तुला योग्यच आहे. कारण दशरथ राजापासून तू कैकेयीच्या पोटी जन्माला आला आहेस. आपल्या पित्याने जेव्हा तुझ्या मातेचे पाणिग्रहण केले, तेव्हा 'हिचे पोटी जो पुत्र जन्माला येईल, त्याला मी राज्य देईन', अशी तुझ्या आजापाशी त्याने प्रतिज्ञा केली होती. कन्येबद्दल राज्यरूप उत्कृष्ट द्रव्य तुला देण्याचे त्याने तुझ्या आजाला वचन दिले होते आणि मगच पाणिग्रहण केले होते. शिवाय –

देवासुरे च संग्रामे जनन्यै तव पार्थिवः।
सम्प्रहृष्टो ददौ राजा वरमाराधितः प्रभुः ॥ ४

ततः सा सम्प्रतिश्राव्य तव माता यशस्विनी।
अयाचत नरश्रेष्ठं द्वौ वरौ वरवर्णिनी ॥ ५

तव राज्यं नरव्याघ्र मम प्रव्राजनं तथा।
तच्च राजा तथा तस्यै नियुक्तः प्रददौ वरम् ॥ ६

तेन पित्राहमप्यत्र नियुक्तः पुरुषर्षभ।
चतुर्दश वने वासं वर्षाणि वरदानिकम् ॥ ७

'देवदैत्यांच्या संग्रामामध्ये तुझ्या मातेने पृथ्वीपती राजाची सेवा केली असता, त्या प्रभूने संतुष्ट होऊन तुझ्या मातेला दोन वर देऊ केले होते. तेव्हा दोन वर देण्याची प्रतिज्ञा त्या वेळी त्याच्याकडून करवून घेऊन स्त्रियांमध्ये श्रेष्ठ असलेल्या तुझ्या यशस्विनी मातेने, तुला राज्य आणि मला वनवास, असे दोन वर त्या पुरुषश्रेष्ठ दशरथ राजापाशी मागून घेतले आणि वचनबद्ध झालेल्या त्या राजाने तिला ते देऊन वरप्रदान निमित्तक चौदा वर्षे वनामध्ये वास्तव्य करण्याविषयी मला आज्ञा केली.

मला सत्यवचन परिपालन करणाऱ्या धर्मज्ञ राजाची आज्ञा पाळायलाच हवी. तुलाही त्याचप्रमाणे राज्य करण्याविषयी पित्याची आज्ञा झाली असल्याने तूही राज्य केलेच पाहिजेस.

अयोध्याकाण्ड/१११

भरताने रामाला राज्य स्वीकृतीसाठी विविध रीतींनी आग्रह केला असता, राम आपल्या निश्चयापासून यत्किंचितही ढळला नाही, उलट त्यानेही भरताने राज्य करणे व आपण वनवासात राहणे कसे योग्यच आहे, हे भरताला पटवून देण्यासाठी पराकाष्ठा केली. शेवटी भरतालाही रामाचे म्हणणे पटले. आचमन करून तो म्हणाला –

शृण्वन्तु मे परिषदो मन्त्रिणः शृणुयुस्तथा ।।– २४
न याचे पितरं राज्यं नानुशासामि मातरम् ।
एवं परमधर्मज्ञं नानुजानामि राघवम् ।। २५
यदि त्ववश्यं वस्तव्यं कर्तव्यं च पितुर्वचः ।
अहमेव निवत्स्यामि चतुर्दश वने समाः ।। २६

'सभाजनांनी व मंत्र्यांनी माझे म्हणणे ऐकून घ्यावे. मी राज्याकरिता पित्याची प्रार्थना केली नाही, असा वर माग म्हणून मातेला सांगितले नाही आणि ह्याप्रमाणे ह्या परम धर्मवेत्त्या रामालाही वनात जाण्याची मी अनुज्ञा दिलेली नाही. तथापि वनामध्ये वास्तव्य करून ह्या रामाला पित्याची आज्ञाच जर शेवटास नेणें असेल, तर मीच वनामध्ये चौदा वर्षे वास्तव्य करीन.'

संस्कृत श्लोकांत 'वर' शब्द नसला तरी तो अभिप्रेत आहे व तो मराठी अनुवादातही आहे.

भरताचे भाषण ऐकून राम आश्चर्यचकित झाला. तो नागरिकांना म्हणाला – भरताने वनवासात राहून चालणार नाही. वडिलांचा शब्द

यथायोग्य रीतीनें पाळावयाचा तर मीच वनवास स्वीकारावयास हवा आणि भरतानेच अयोध्येत राहून राज्य केले पाहिजे. त्याचे ठायी राज्य चालविण्यास आवश्यक ते सर्व गुण आहेत, हे मला ठाऊक आहे. मी वनवास संपवून परत आल्यावर पृथ्वीचे परिपालन करीन.

वृतो राजा हि कैकेय्या मया तद्वचनं कृतम् ।
अनृतान्मोचयानेन पितरं तं महीपतिम् ।। ३२

'कैकेयीने राजापाशी वर मागितला आणि मी ते वचन मान्य केले. तेव्हा भरता, ह्या माझ्या सांगण्याप्रमाणे वागून तू त्या भूपती पित्याला अनृतापासून मुक्त कर.'

## रामाचे सीतेला कथन अयोध्याकाण्ड/२६

कौसल्येला वंदन करून वनवासाला जाण्यास सिद्ध झालेला राम सीतेकडे आला. अभिषेकाचा समय जवळ आलेला असूनही चेहऱ्यावर हास्याची छटाही नसलेल्या अधोमुख रामाला पाहून सीता विस्मित झाली. राम तिला म्हणाला–' हे धर्मचारिणी जानकी, पिता मला कोणत्या कारणास्तव वनात धाडत आहे, ते तू ऐक–

राज्ञा सत्यप्रतिज्ञेन पित्रा दशरथेन वै ।
कैकेय्यै मम मात्रे तु पुरा दत्तौ महावरौ ।। २१

तयाद्य मम सज्जेऽस्मिन्नभिषेके नृपोद्यते ।
प्रचोदितः स समयो धर्मेण प्रतिनिर्जितः ।। २२

चतुर्दश हि वर्षाणि वस्तव्यं दण्डके मया ।
पित्रा मे भरतश्चापि यौवराज्ये नियोजितः ।। २३

'सत्यप्रतिज्ञ पित्या दशरथ राजाने माझ्या कैकेयी मातेला पूर्वी दोन वर देऊ केले होते. राजाच्या उपक्रमाने आज माझा अभिषेक होण्याचे ठरल्यावर तिने तो पूर्वीचा संकेत पुढे करून धर्ममार्गाने राजाला वश करून घेतले. ह्यामुळे मला चौदा वर्षेपर्यंत दण्डकारण्यात

वास्तव्य केले पाहिजे. माझ्या पित्याने भरताला यौवराज्य-अभिषेक करण्याचे ठरविले आहे.

पित्याची आज्ञा खरी करण्यासाठी मी आजच वनात जात आहे-हे तुला सांगण्यासाठी मी आलो आहे.' मी येथे नसताना सीतेने कसे वागावे, याबाबत तिला त्याने नंतर उपदेश केला.

## पुनरुल्लेख

१ अरण्यकाण्ड/२

विराधाने सीतेला आपल्या अंकावर बसविलेले पाहून राम अतिशय दुःखी झाला. त्याने आपली व्यथा लक्ष्मणापाशी बोलून दाखविली.

यदभिप्रेतमस्मासु प्रियं वरवृतं च यत् ।।-१८
कैकेय्यास्तु सुसंवृत्तं क्षिप्रमद्यैव लक्ष्मण ।
या न तुष्यति राज्येन पुत्रार्थे दीर्घदर्शिनी ।। १९
ययाहं सर्वभूतानां प्रियः प्रस्थापितो वनम् ।
अद्येदानीं सकामा सा या माता मध्यमा मम ।। २०

'लक्ष्मणा, वनामध्ये आम्हाला जे दुःख व्हावे, म्हणून कैकेयीला वाटत होते ते व वर प्राप्त करून जे प्रिय करून घ्यावयाचे होते ते, हे सर्व तिचे इच्छित तिला आजच प्राप्त झाले ! ती मोठी दीर्घदर्शी असल्यामुळे आपल्या पुत्राला राज्य प्राप्त झाले, एवढ्यानेच तृप्त नसून ते त्याला चिरकाल मिळण्याकरिता आमच्या नाशाची इच्छा करीत आहे.'

२ अरण्यकाण्ड/४७

ब्राह्मण वेषात आलेल्या रावणाला न ओळखल्याने, अतिथीच्या पृच्छेला योग्य उत्तर न दिल्यास तो शाप देईल, अशी भीती वाटल्याने सीतेने रावणाला आपली हकिगत सांगितली. ह्या संदर्भात ह्या वराचा उल्लेख आला आहे.

कैकेयी नाम भर्तारं ममार्या याचते वरम् ।।-६

कैकेयीने आपल्या भर्त्यापाशी वर-प्रदान मागितले.

परिगृह्य तु कैकेयी श्वशुरं सुकृतेन मे ।
मम प्रव्राजनं भर्तुर्भरतस्याभिषेचनम् ।। ७
द्वावयाचत भर्तारं सत्यसंधं नृपोत्तमम् ।-८

'माझ्या सासऱ्याला प्रथम तिने धर्माची शपथ घातली. नंतर माझ्या भर्त्याला वनवास व भरताला अभिषेक असे दोन वर तिने त्या आपल्या सत्यवचनी नृपश्रेष्ठ भर्त्यापाशी मागितले.'

दिलेले वचन पूर्ण न केल्यास जीव देण्याची भीतीही तिने घातली.

३

किष्किन्धाकाण्ड/५६

विंध्य पर्वताच्या गुहेतून बाहेर आलेल्या वानरांना पाहून गृध्र-राज संपाती आनंदित झाला. प्रायोपवेशन करताना जो जो वानर मृत होईल, तो भक्षण करण्याची संधी प्राप्त झाल्याने तो संतुष्ट झाला होता. परंतु त्याला पाहून अंगद हनुमानाला म्हणाला– हा गृध्रराज वानरांच्या नाशासाठीच येथे प्राप्त झाला आहे. जटायू व दशरथाचा मृत्यू, सीतेचे अपहरण यांमुळे वानरांवर संकट प्राप्त झाले आहे.

सीतेसह राम-लक्ष्मणांचे अरण्यात वास्तव्य, रामाच्या बाणाने वालीचा वध, आणि रामाच्या कोपामुळे सर्व राक्षसांचा वध इत्यादी–

कैकेय्या वरदानेन इदं च विकृतं कृतम् ।।-१६

सर्व अनर्थ दशरथ राजाने कैकेयीला वर दिल्यामुळे झाला आहे.

४

सुन्दरकाण्ड/३३

अशोकवनात सीतेची भेट घेण्यासाठी आलेल्या हनुमानाविषयी तिला शंका आली असता आपण रामदूत आहोत, अशी त्याने तिची खात्री पटवून दिली. हनुमानाच्या पृच्छेला उत्तर देताना ती वृत्तान्त

कथन करीत आहे. आपण दाशरथी रामाची पत्नी असून त्याच्या यौव-राज्य-अभिषेकाची तयारी चालू असता कैकेयी दशरथाला म्हणाली, ' रामाला जर राज्याभिषेक व्हावयाचा असेल, तर मी भोजन व जल-प्राशनही करणार नाही.

यत्तदुक्तं त्वया वाक्यं प्रीत्या नृपतिसत्तम ।
तच्चेन्न वितथं कार्यं वनं गच्छतु राघवः ।। २१
स राजा सत्यवाग्देव्या वरदानमनुस्मरन् ।
मुमोह वचनं श्रुत्वा कैकेय्याः क्रूरमप्रियम् ।। २२

त्या वेळेला जे तू वरप्रदानरूप माझ्याशी प्रेमाने भाषण केलेस ते जर व्यर्थ करावयाचे नसेल, तर रामाला वनात जाऊ दे. ' हे कैकेयीचे क्रूर व अप्रिय भाषण ऐकून तिला वर दिल्याचे त्याला स्मरण झाले, आणि तो सत्यवचनी राजा मूर्च्छित झाला. '–असे सीतेने हनुमानाला सांगितले.

## २. ब्रह्मदेव < वाल्मीकी बालकाण्ड/२

कामभोगासक्त क्रौंच पक्ष्यांच्या मिथुनापैकी नराचा एका निषादाने वेध घेतलेला पाहून वाल्मीकी मुनीच्या मुखातून

' मा निषाद प्रतिष्ठां त्वमगमः शाश्वतीः समाः । '

अशी शापवाणी बाहेर पडली. परंतु तपश्चर्येचा विघात करणारे शब्द आपण उच्चारावयास नको होते, अशी चुटपुट लागून तो अतिशय दुःखी झाला. ती श्लोकबद्ध शापवाणी त्याच्या मनात घोळत असता साक्षात् ब्रह्मदेव त्याच्या भेटीस आला. पाद्य, अर्घ्य, आसन वंदनादींनी वाल्मीकीने ब्रह्मदेवाचे यथायोग्य पूजन केले. त्याचा स्वीकार करून चिता-ग्रस्त वाल्मीकीला ब्रह्मदेव हसत हसत म्हणाला – ' तू ग्रथित केलेला हा श्लोक शापोद्गार असला, तरीही यशोरूपच होईल. कारण माझ्याच प्रेर-णेने तुझ्या ठायी सरस्वती प्रवृत्त झाली आहे. तुझी वाणी यत्किंचितही असत्य होणार नाही. आणि त्याने अशी आज्ञा केली–

कुरु रामकथां पुण्यां श्लोकबद्धां मनोरमाम् ।
यावत्स्थास्यन्ति गिरयः सरितश्च महीतले ।। ३६
तावद्रामायणकथा लोकेषु प्रचरिष्यति ।
यावद्रामस्य च कथा त्वत्कृता प्रचरिष्यति ।। ३७
तावदूर्ध्वमधश्च त्वं मल्लोकेषु निवत्स्यसि ।– ३८

'मनोहर व पुण्यदायक अशी श्लोकबद्ध रामकथा तू वर्णन कर. जोपर्यंत पर्वत व नद्या भूतलावर राहतील, तोपर्यंत रामकथा लोकांमध्ये प्रचारात राहील, आणि जोपर्यंत तू ग्रथित केलेली रामकथा लोकांमध्ये राहील, तोपर्यंत (क्रोधामुळे) अधोभागी राहण्यासच योग्य असलेलाही तू सर्वांचे ऊर्ध्वभागी असलेल्या माझ्या लोकांमध्ये वास्तव्य करशील.'

ब्रह्मदेवाची आज्ञा शिरसावद्य मानून वाल्मीकीने रामायणाची रचना केली.

ब्रह्मदेवाचे शब्द वरप्रदानासारखे असले तरी 'वर' असा स्पष्ट उल्लेख नाही. त्यामुळे ते आशीर्वादासारखे, सदिच्छादर्शक वाटतात. हा वर मानलाच तर तो अयाचित वर होय.

## २. (अनेक) मुनी < कुश–लव बालकाण्ड/४

एकदा सर्वसुलक्षण-संपन्न आणि महाभाग्यवान कुश-लव, ऋषींच्या सभेमध्ये 'रामायण' हे काव्य गाऊ लागले असता, ते ऐकून श्रोत्यांचे नेत्र अश्रूंनी भरून आले. अनेकांनी त्यांचे अनेक प्रकारे कौतुक करून प्रशंसा केली. ज्यांच्यापाशी जे जे काही देण्यासारखे होते ते सारे त्यांनी दिले. ज्यांच्यापाशी काही नव्हते, त्यांनी तोंड भरून आशीर्वाद दिले आणि त्यांना दीर्घायुष्य चिंतिले.

ददुश्चैवं वरान्सर्वे मुनयः सत्यवादिनः ।–२६

'ज्यांची वाणी कधीही असत्य होणार नाही, अशा सर्व मुनींनी ह्याप्रमाणे त्यांना वर दिले.'

वर नेमके काय दिले, त्यांचे स्वरूप, व त्यांची संख्या स्पष्ट नाही. हे अयाचित वर होत.

## ४ ब्रह्मदेव < रावण बालकाण्ड/१५

दशरथाची विनंती मान्य करून ऋष्यशृंग मुनीने त्याच्या साठी पुत्रप्राप्तीला साधनभूत होणारी इष्टी करण्यास प्रारंभ करून अग्नीत समंत्रक हवन केले. तेव्हा यथाविधी प्रतिग्रह करण्याच्या हेतूने देव, गंधर्व, सिद्ध, महर्षी तेथे एकत्र जमले आणि अंतर्धान शक्तीने इतरांच्या दृष्टीस न पडता त्या यज्ञमंडपात उपस्थित झालेल्या ब्रह्मदेवाला विनयपूर्वक म्हणाले–' हे भगवान, आपल्या प्रसादाने रावण नावाचा राक्षस उन्मत्त होऊन आपल्या स्वताच्या सामर्थ्याने आम्हा सर्वांना पीडा देत आहे.

त्वया तस्मै वरो दत्तः प्रीतेन भगवंस्तदा ।
मानयन्तश्च तं नित्यं सर्वं तस्य क्षमामहे ।। ७

' हे भगवान, आपण प्रसन्न होऊन त्याला वर दिला, तेव्हापासून आपल्या वचनाला मान देऊन आम्ही त्याचे सर्व काही सहन करीत आहो. ' तो दुर्मती त्रैलोक्याला त्रास देत असून स्वर्गाधिपती इंद्रालाही जिंकण्याची इच्छा करीत आहे.

ऋषीन्यक्षान्सगन्धर्वान्ब्राह्मणानसुरांस्तदा ।
अतिक्रामति दुर्धर्षो वरदानेन मोहितः ।। ९

' आपले वरदान (प्राप्त) झाल्यामुळे त्याला कसलाही सुमार राहिला नाही, आणि त्यामुळे कोणाच्याही हातून पराभव पावण्यास शक्य नसलेला तो राक्षस ऋषी, गंधर्व, यक्ष, ब्राह्मण आणि असुर ह्यांचे अतिक्रमण करीत आहे. '

देवांची प्रार्थना ऐकून ब्रह्मदेवाने क्षणभर विचार केला आणि तो त्यांना म्हणाला– " त्या दुरात्म्याचा वध होण्याचा मला एक उपाय सुचला आहे.

तेन गन्धर्वयक्षाणां देवतानां च रक्षसाम् ।
अवध्योऽस्मीति वागुक्ता तथेत्युक्तं च तन्मया ।। १३
नाकीर्तयदवज्ञानात्तद्रक्षो मानुषांस्तदा ।
तस्मात्स मानुषाद्वध्यो मृत्युर्नान्योऽस्य विद्यते १४ ।।

'गंधर्व, यक्ष, देव आणि राक्षस ह्यांना मी अवध्य असावे', असा त्याने वर मागितला असता मी 'तथास्तु' म्हटले. मनुष्यांची त्याला मुळीच पर्वा नसल्यामुळे त्याने त्या वेळी (वर मागताना) मनुष्यांचा उल्लेख केला नाही." तस्मात् मनुष्यापासूनच त्याचा वध होणे शक्य आहे. त्याला मारणारा दुसरा कोणी नाही. ब्रह्मदेवाचे भाषण ऐकून सर्व देव संतुष्ट झाले. विष्णूची स्तुती करून ते त्याला म्हणाले–'लोकांच्या हितासाठी आम्ही आपणास एक विनंती करीत आहो. आपण मनुष्यावतार घेऊन संग्रामामध्ये रावणाचा वध करावा, कारण तो इतरांना अवध्य आहे आणि केवळ मनुष्याकडूनच त्याचा वध होऊ शकेल, असे ब्रह्मदेवाने आम्हाला सांगितले आहे.'

### बालकाण्ड/१६

रावणाने पूर्वी पुष्कळ काळपर्यंत तीव्र तपश्चर्या केली होती.

येन तुष्टोऽभवद्ब्रह्मा लोककृल्लोकपूर्वजः ।।– ४
संतुष्टः प्रददौ तस्मै राक्षसाय वरं प्रभुः ।
नानाविधेभ्यो भूतेभ्यो भयं नान्यत्र मानुषात् ।। ५
अवज्ञाताः पुरा तेन वरदाने हि मानवाः ।
एवं पितामहात्तस्माद्वरदानेन गर्वितः ।। ६
उत्सादयति लोकांस्त्रीन्स्त्रियश्चाप्युपकर्षति ।
तस्मात्तस्य वधो दृष्टो मानुषेभ्यः परंतप ।। ७

"तेव्हा लोकांचा आद्य जनक ब्रह्मदेव संतुष्ट झाला आणि –'मनुष्यांवाचून इतर कोणत्याही प्राण्यापासून तुला भीती नाही', असा त्या प्रभूने त्या राक्षसाला वर दिला. कारण त्या राक्षसाने वरदानप्रसंगी

मनुष्यांची गणनाच केली नव्हती. ह्याप्रमाणे ब्रह्मदेवापासून वरप्राप्ती झाल्यामुळे तो गर्विष्ठ झाला आहे आणि त्रैलोक्य उच्छिन्न करीत असून लोकांच्या स्त्रियाही तो (जबरदस्तीने) ओढून नेऊ लागला आहे. तस्मात् हे शत्रुतापना, मनुष्यापासूनच त्याचा वध होणार, हे निश्चित आहे."

उत्तरकाण्ड/१०

अगस्त्य मुनी रामाला, त्याने पृच्छा केली असता, रावणाच्या तपश्चर्येबाबत सांगत आहे–

कोणत्याही प्रकारच्या आहाराचे सेवन न करता रावणाने दहा हजार वर्षे तपश्चर्या केली. एक हजार वर्षे झाल्यानंतर तो अग्नीमध्ये एका मस्तकाचे हवन करीत असे. अशा रीतीनें नऊ हजार वर्षे तपश्चर्या केली असता नऊ मस्तके अग्नीला अर्पण केली. त्यानंतर दहा हजार वर्षे पूर्ण होताच, रावण दहावे मस्तक अग्नीस अर्पण करण्यास उद्युक्त झाला असता ब्रह्मदेव देवांसहवर्तमान त्याच्या समोर प्रकट झाला आणि त्याला म्हणाला–'दशग्रीवा, मी तुझ्यावर प्रसन्न झालो आहे.

शीघ्रं वरय धर्मज्ञ वरो यस्तेऽभिकाङ्क्षितः ।
कं ते कामं करोम्यद्य न वृथा ते परिश्रमः ।। १४

तेव्हा हे धर्मवेत्त्या, तुझ्या मनात असेल तो वर तू सत्वर मागून घे. मी तुझा आज कोणता मनोरथ पूर्ण करू, म्हणजे तुझे हे परिश्रम व्यर्थ होणार नाहीत ?'

संतुष्ट झालेला रावण नतमस्तक होऊन ब्रह्मदेवाला म्हणाला–

भगवन्प्राणिनां नित्यं नान्यत्र मरणाद्भयम् ।
नास्ति मृत्युसमः शत्रुरमरत्वमहं वृणे ।। १६

'भगवन्, प्राण्यांना मरणापेक्षा केव्हाही दुसरे भय नाही आणि मृत्यूसारखा दुसरा कोणता शत्रूही नाही. ह्यास्तव मी अमरत्व मागतो.'

रावणाने असा वर मागितला असता 'पूर्ण अमरत्व तुला प्राप्त

होणार नाही. तू दुसरा वर मागून घे.' असे ब्रह्मदेवाने सांगितले. तेव्हा, रावण हात जोडून म्हणाला—

> सुपर्णनागयक्षाणां दैत्यदानवरक्षसाम् ।
> अवध्योऽहं प्रजाध्यक्ष देवतानां च शाश्वत ॥ १९
>
> नहि चिन्ता ममान्येषु प्राणिष्वमरपूजित ।
> तृणभूता हि ते मन्ये प्राणिनो मानुषादयः ॥ २०

'हे प्रजाधिपते, हे सनातन! सुपर्ण, नाग, यक्ष, दैत्य, दानव, राक्षस आणि देवता ह्यांच्या हातून माझा वध होऊ नये. हे देवमान्य, इतर प्राण्यांसंबंधाने मला काळजीच नाही; कारण मी ते मनुष्यादी प्राणी कस्पटाप्रमाणे मानतो.' तेव्हा 'हे राक्षसश्रेष्ठा, तुझ्या म्हणण्या-प्रमाणे सारे होईल', असे ब्रह्मदेवाने त्याला आश्वासन दिले.

देव, राक्षस, ऋषी, यक्ष, मानवादी विविध थरांत ह्या वराच्या प्रतिक्रिया निरनिराळ्या रीतींनी प्रकट झालेल्या दिसतात.

## ह्या वराबाबतच्या विविध व्यक्तींच्या प्रतिक्रिया

**राम** युद्धकाण्ड/३७

विभीषणाने रामाला रावणाच्या साऱ्या दुष्कृत्यांचा पाढा सांगितल्यानंतर तो ऐकून घेऊन राम त्याला त्याने रचलेली योजना सांगत आहे.

" लंकेच्या पूर्व द्वाराशी नील, दक्षिण द्वारी अंगद, पश्चिमेच्या द्वाराशी अतर्क्य स्वरूपाने हनुमान — यांनी अनेक वानरांसह राक्षसांवर तुटून पडावे.

> दैत्यदानवसङ्घानामृषीणां च महात्मनाम् ।
> विप्रकारप्रियः क्षुद्रो वरदानबलान्वितः ॥ २९
>
> परिक्रमति यः सर्वाँल्लोकान्सन्तापयन्प्रजाः ।
> तस्याहं राक्षसेन्द्रस्य स्वयमेव वधे धृतः ॥ ३०

वरप्रदानामुळे बल प्राप्त झाल्याने तो नीच, दैत्य-दानव व महात्मे ऋषी यांना दुःख देण्यात आनंद मानीत असतो. आणि जो प्रजेला संताप उत्पन्न करीत असून सर्व लोक पादाक्रांत करीत असतो, त्या राक्षसाधिपती रावणाच्या वधाविषयी मीच प्रतिज्ञा केलेली आहे. ह्यास्तव रावण ज्या ठिकाणी सैन्यासह आहे, त्या नगराच्या उत्तरेकडील द्वारावर हल्ला करून मीं लक्ष्मणासह आत प्रवेश करीन. ''

युद्धकाण्ड/४१

राक्षसांच्या वधासाठी रामाने सैन्य सुसज्ज केल्यानंतर युद्धाला प्रारंभ करण्यापूर्वी रामाने अंगदाला रावणाकडे शिष्टाईसाठी धाडले, आणि रावणाला असा निरोप कळविण्यास सांगितले–' समुद्राचे उल्लंघन करून मी निर्भयपणे तुझ्या लंकानगरीला आलो आहे. '

ऋषीणां देवतानां च गन्धर्वाप्सरसां तथा।
नागानामथ यक्षाणां राज्ञां च रजनीचर ।। ६२

यच्च पापं कृतं मोहादवलिप्तेन राक्षस।
नूनं ते विगतो दर्पः स्वयम्भूवरदानजः ।।
तस्य पापस्य सम्प्राप्ता व्युष्टिरद्य दुरासदा ।। ६३

' हे निशाचरा, ब्रह्मदेवाचा वर मिळाल्यामुळे ऋषी, देव, गन्धर्व अप्सरा, नाग, यक्ष आणि राजे ह्यांना तू गर्विष्ठ होऊन मूर्खपणाने जो त्रास दिला आहेस, तो तुझा ब्रह्मदेवाच्या वरप्रसादाने प्राप्त झालेला गर्व आज खरोखर नाहीसा होईल. '

युद्धकाण्ड/१२३

सुग्रीव, विभीषण, अनेक वानर, ऋक्ष यांना सवे घेऊन राम सीतेसह कुबेराच्या पुष्पक विमानात आरूढ झाला. त्याच्या अनुज्ञेने विमान आकाशात संचार करू लागल्यावर राम सीतेला म्हणाला–' वैदेही, कैलास शिखराप्रमाणे ज्याचा आकार आहे, अशा त्रिकूटाचलाच्या शिख-

रावर असलेली व विश्वकर्म्याने निर्माण केलेली ही लंका तू अवलोकन कर. सीते, वानर व राक्षस ह्यांची मोठी कत्तल ज्यामध्ये झाली आहे आणि मास व रक्त ह्यांचा जेथे चिखल झालेला आहे, असे रण तू अवलोकन कर.

एष दत्तवरः शेते प्रमाथी राक्षसेश्वरः ।
तव हेतोर्विशालाक्षि निहतो रावणो मया ।। ५

'हे विशालनयने, वर प्राप्त झालेला महाबलाढ्य राक्षसाधिपती रावण तुझ्याकरिता माझ्या हातून येथेच वध पावून पडला.'

देव

उत्तरकाण्ड/१८

वेदवतीने अग्निप्रवेश केल्यानंतर रावण पुष्पक विमानातून पृथ्वीपर्यटन करू लागला. तेव्हा उशीरबीज नावाच्या देशात मरुत राजा देवांसह याग करीत असलेला त्यास दिसला. बृहस्पतीचा भ्राता संवर्त महर्षी त्याचा पुरोहित होता.

दृष्ट्वा देवास्तु तद्रक्षो वरदानेन दुर्जयम् ।
तिर्यग्योनिं समाविष्टास्तस्य धर्षणभीरवः । ४

'वरप्रदानाने अजिक्य झालेल्या त्या राक्षसाला अवलोकन करिता क्षणी त्याचा हल्ला होईल, म्हणून भ्यालेल्या देवांनी तिर्यग् योनीत प्रवेश केला.' इंद्र मयूर पक्षी झाला, धर्मराज यम काक पक्षी बनला, धनाध्यक्ष कुबेराने सरडयाचे रूप धारण केले आणि वरुणाने हंसाचे रूप स्वीकारले.

मरुत राजा

उत्तरकाण्ड/१८

यज्ञ–मंडपात प्रवेश करून रावणाने मरुत राजाला 'युद्धाला सज्ज हो अथवा पराजित झालो', असे कबूल करण्याचे आव्हान दिले. मरुताने त्याला 'तू कोण ?' अशी पृच्छा केली असता गर्वोन्नत रावणाने आपण राक्षसश्रेष्ठ असून आपला कुबेराचा पराभव करून त्याचे

पुष्पक विमान हिरावून घेतल्याचे सांगितले व आपणासारख्या बलाढच राक्षसाधिपतीला न ओळखणाऱ्या मरुत राजाचा उपहास केला. तेव्हा तो मरुत राजा रावणाला म्हणाला– ज्येष्ठ भ्रात्याला रणात जिंकणाऱ्या तुझी धन्य होय ! तुझ्यासारखा स्तुतीला पात्र अन्य कोणी नाही.

कं त्वं प्राक्केवलं धर्मं चरित्वा लब्धवान्वरम् ।।–१२

'पूर्वी केवळ तपश्चर्या करून तू कोणता वर प्राप्त करून घेतला आहेस ?' ज्या प्रकारचा तू मला आता दिसत आहेस, तसा पूर्वी कधीही दिसला नाहीस. हे दुर्बुद्धे, माझ्या हातून तू आता जिवंत परत जाणार नाहीस. आज तीक्ष्ण बाणांनी मी तुला यमसदनी धाडतो.

मरुत राजा युद्धार्थ सज्ज झाला असता, पुरोहित संवर्ताने त्याला परावृत्त केले. कारण दीक्षा घेतलेल्या पुरुषाला युद्धाचा अधिकार असत नाही. गुरूची आज्ञा प्रमाण मानून त्याने धनुष्य टाकून दिले.

## ब्रह्मदेव उत्तरकाण्ड/२२

धर्मराज यमाचे व रावणाचे युद्ध जुंपले असता राक्षसाचा निःपात करण्याच्या उद्देशाने यमाने अमोघ असा कालदण्ड हाती घेतला. केवळ दृष्टिक्षेपानेही प्राण हरण करण्याचे सामर्थ्य कालदण्डाचे ठायी होते. त्या कालदण्डाने यम रावणाला दग्ध करण्याला उद्युक्त झाला असता, प्रत्यक्ष ब्रह्मदेवाने यमाला दर्शन दिले आणि तो त्याला म्हणाला–

वैवस्वत महाबाहो न खल्वमितविक्रम ।
न हन्तव्यस्त्वयैतेन दण्डेनैष निशाचरः ।। ३९

वरः खलु मयैतस्मै दत्तस्त्रिदशपुङ्गव ।
स त्वया नानृतः कार्यो यन्मया व्याहृतं वचः ।। ४०

'हे महापराक्रमी वैवस्वत, हे अतुलविक्रम, ह्या दंडाने तू राक्षसाचा वध करू नको. कारण हे सुरश्रेष्ठ, मी जो खरोखर ह्या रावणाला वर दिला आहे, त्याला तू असत्यता आणशील.'

' देव असो वा मनुष्य असो, जो माझे वचन असत्य करील त्याला त्रैलोक्य असत्य केल्याचे पातक लागेल. रावणाच्या मस्तकावर तू ह्या दंडाचा प्रहार करू नको, कारण ह्याच्या प्रहाराने कोणीही क्षणभर सुद्धा जिवंत राहणे शक्य नाही. ह्या दंडाने राक्षस मेला किंवा न मेला तरी मी असत्य ठरणार, म्हणून तू हादंड मागे घे. ' ब्रह्मदेवाच्या विनंती-नुसार यमाने कालदंड मागे घेतला आणि तो ब्रह्मदेवाला म्हणाला –

किं त्विदानीं मया शक्यं कर्तुं रणगतेन हि ।
न मया यद्ययं शक्यो हन्तुं वरपुरस्कृत: ।।४८

आपण आमचे अधिपती आहा, परंतु ह्या राक्षसाला वर मिळाल्यामुळे माझ्या हातून जर याचा वध होणे शक्य नाही, तर संग्रामामध्ये राहून आता माझ्या हातून होणार तरी काय ? तेव्हा मी ह्या राक्षसाच्या दृष्टिआड जातो.

## इंद्र आणि विष्णू — उत्तरकाण्ड/२७

कैलास पर्वत ओलांडून रावण सैन्य व वाहनांसह इंद्रलोकी गेला. त्याला पाहून इंद्र भयभीत झाला. वसू, रुद्र, आदित्यादी देवांना त्याने रावणाशी यद्ध करण्यास सज्ज होण्यास सांगितले. विष्णूचे जवळ जाऊन ' रावणासंबंधाने मी काय करावे ? ' असा त्याने प्रश्न केला.

वरप्रदानाद्बलवान्न खल्वन्येन हेतुना ।
तत्तु सत्यं वच: कार्यं यदुक्तं पद्मयोनिना ।। ८

' दुसरे कोणतेही कारण नसून वरदानामुळे हा बलाढ्य झाला आहे, परंतु ब्रह्मदेवाने जे वचन दिले आहे, ते सत्य केले पाहिजे. ' तेव्हा रावणाच्या वधाचा मला उपाय सांगा ', अशी इंद्राने विष्णूला विनंती केली. ' रावणाशी आपण स्वताच खड्ग व चक्र घेऊन युद्ध करणार आहा काय ? ' अशीही पृच्छा केली. इंद्राची विनंती ऐकून विष्णू म्हणाला, ' भिण्याचे कारण नाही. '

न तावदेष दुष्टात्मा शक्यो जेतुं सुरासुरै: ।
हन्तुं चापि समासाद्य वरदानेन दुर्जय: ।।१०

'देवदैत्यांच्या हातूनही ह्या दुरात्म्याचा पराजय अथवा वध होण्याचा संभव नाही. हा वरप्रदानामुळे अजिंक्य झालेला आहे.' विष्णूने स्वता रावणाशी युद्ध करणार नसल्याचे स्पष्ट सांगितले, कारण

नाहत्वा समरे शत्रुं विष्णुः प्रतिनिवर्तते: ।
दुर्लभश्चैव कामोऽद्य वरगुप्ताद्धि रावणात् ।। १८

'संग्रामात शत्रूचा वध केल्याशिवाय विष्णू परत फिरत नाही. परंतु वरप्रदानाने सुरक्षित असलेल्या रावणाची गाठ पडल्यावर हा संकल्प सिद्धीस जाणे कठीण आहे.' परंतु त्या राक्षसाच्या मृत्यूचे कारण त्यास सांगून 'वेळ येईल तेव्हा त्याचा वध मीच करीन व देवदानवांना आनंद देईन', असे इंद्राला त्याने आश्वासन दिले व त्याला निर्भय रीतीने देवांसह त्याच्याशी युद्ध करण्यास सांगितले.

उत्तरकाण्ड/२९

रावणाशी संग्राम चालू असता इंद्र देवांना म्हणाला – रावणाला तुम्ही चांगल्या रीतीने जिवंत धरा. वायूसारख्या वेगवान रथाच्या योगाने हा अतिबलाढ्य राक्षस सैन्यातून निघून जाईल.

नह्येष हन्तुं शक्योऽद्य वरदानात्सुनिर्भयः ।
तद्ग्रहीष्यामहे रक्षो यत्ता भवत संयुगे ।।१५

'वरदानाने हा अत्यंत निर्भय झाला असल्यामुळे ह्याचा वध होणे शक्य नाही. तस्मात्, रणामध्ये तुम्ही तयार रहा, आपण त्या राक्षसाचा निग्रह करू.'

## सहस्रार्जुन

उत्तरकाण्ड/३२

**सहस्रार्जुन** व रावण यांचे गदायुद्ध झाले असता अत्यंत क्रुद्ध होऊन त्याने आपली गदा रावणाच्या विशाल वक्षस्थलावर टाकली. परंतु –

वरदानकृतत्राणे सा गदा रावणोरसि ।
दुर्बलेव यथावेगं द्विधाभूतापतत्क्षितौ ।।६१

'वरदानामुळे सुरक्षित असलेल्या त्या रावणाच्या वक्षस्थलावर ती गदा स्वताच्या वेगाप्रमाणे प्रहार करण्यास असमर्थ झाली आणि दोन तुकडे होऊन भूतलावर पडली !' मात्र गदा-प्रहाराने रावण विव्हळ झाला. तेव्हा सहस्रार्जुनाने त्याच्यावर झडप घालून त्यास धरले व त्याने त्यास बांधून टाकले. राक्षसांनी केलेल्या विरोधाला न जुमानता, त्यांना हैराण करून रावणाला घेऊन तो आपल्या नगरीला आला.

## माल्यवान

युद्धकाण्ड/३५

रावणाचा मातामह अतिबुद्धिवान असा जो माल्यवान, त्याला रावणाने रामाशी तह करावा, असे वाटत होते. आपले म्हणणे पटवून देण्याचा त्याने प्रयत्न केला. तो रावणाला म्हणाला –

देवदानवयक्षेभ्यो गृहीतश्च वरस्त्वया ।
मनुष्या वानरा ऋक्षा गोलाङ्गूला महाबलाः ।
बलवन्त इहागम्य गर्जन्ति दृढविक्रमाः ॥ २३

'देव, दानव आणि यक्ष ह्यांच्या हातून अवध्य म्हणून ब्रह्मदेवापासून तुला वर प्राप्त झाला आहे, परंतु बलाढ्य मनुष्य, वानर, ऋक्ष आणि गोलांगूल हेच येथे आले आहेत, आणि ते महापराक्रमी व बलाढ्य मनुष्यादिकच येथें येऊन गर्जना करीत आहेत.' राक्षसांचा विनाश-काल जवळ आल्याची धोक्याची सूचना त्याने दिली. परंतु गर्वोन्नत रावणाला ती मानवली नाही.

## हनुमान

युद्धकाण्ड/५९

माल्यवानाप्रमाणे हनुमानानेही रावणाला त्याच्या वराच्या निश्चित मर्यादांची जाणीव करून दिली आहे. बाणांच्या वर्षावाने लक्ष्मणाला आच्छादित करणाऱ्या रावणाचे निवारण करीत हनुमान त्याला म्हणाला,

देवदानवगन्धर्वैर्यक्षैश्च सह राक्षसैः ।
अवध्यत्वं त्वया प्राप्तं वानरेभ्यस्तु ते भयम् ॥ ५५

'देव, दानव, गंधर्व, यक्ष आणि राक्षस ह्यांच्यापासून तुला अवध्यत्व प्राप्त झाले असले, तरी वानरांपासून तुला मृत्यूचे भय आहे.'

## बिभिषण युद्धकाण्ड/१९

शरण आलेल्या बिभीषणाला रामाने अभय दिले. रामाने त्याला राक्षसांचे बलाबल कसे आहे, ते तू खरे सांग, अशी विनंती केली असता तो म्हणाला –

अवध्यः सर्वभूतानां गन्धर्वोरगपक्षिणाम् ।
राजपुत्र दशग्रीवो वरदानात्स्वयंभुवः ।।९

'हे राजपुत्रा, गंधर्व, उरग, पक्षी वगैरे सर्व प्राण्यांना तो दशानन ब्रह्मदेवाच्या वरदानामळे अवध्य झाला आहे.' रावणाविषयी असे सांगून अन्य राक्षसांच्या सामर्थ्याविषयी त्याने यथातथ्य कथन केले.

## रावणाची खंत युद्धकाण्ड/६०

रामाच्या बाणांनी ग्रस्त झालेला रावण अन्य राक्षसांना म्हणाला–"ज्या अर्थी महेन्द्रासमान असलेल्या माझा मानवाने पराजय केला, त्या अर्थी मी केलेली तपश्चर्या खरोखर व्यर्थ झाली. 'मानवापासून भय आहे, हे तू जाणून ठेव', असे मला उद्देशून ब्रह्मदेवाने जे वाक्य उच्चारले होते, ते सफल होण्याचा प्रसंग मजवर येऊन ठेपला आहे."

देवदानवगन्धर्वैर्यक्षराक्षसपन्नगैः ।
अवध्यत्वं मया प्रोक्तं मानुषेभ्यो न याचितम् । ७

'देव, दानव, गंधर्व, यक्ष, राक्षस आणि पन्नग ह्यांच्या हातून माझा वध होऊ नये, असा वर मी मागितला, परंतु मानवापासून वध न होण्याविषयी मी वर मागितला नाही.' याची रावणास आता खंत वाटत आहे.

युद्धकाण्ड/९२

मेघनादाच्या (इंद्रजिताच्या) वधाने अत्यंत संतप्त झालेला रावण

राक्षसांना निश्चल ठेवण्याच्या उद्देशाने म्हणाला – 'हजारो वर्षे परा-काष्ठेची तपश्चर्या करून मी ब्रह्मदेवाला वेळोवेळी संतुष्ट करून घेतले आहे.

तस्यैव तपसो व्युष्टया प्रसादाश्च स्वयंभुवः
नासुरेभ्यो न देवेभ्यो भयं मम कदाचन । २९

तीच तपश्चर्या फळाला येऊन ब्रह्मदेवाचा प्रसाद प्राप्त झाल्यामुळे असुर आणि देव यांपासून मला कधीही भय प्राप्त होणार नाही, असा वर मला मिळाला आहे.'

ब्रह्मदेवाने दिलेले कवच धारण करून संग्रामात रथारूढ असलेल्या मजवर प्रत्यक्ष इंद्रही चाल करून येऊ शकणार नाही. देवदैत्यांच्या युद्ध प्रसंगी त्यानेच दिलेल्या प्रचंड धनुष्याचा उपयोग राम-लक्ष्मण यांच्या वधासाठी करण्याकरिता ते उचलून धरा.

## राक्षस-स्त्रिया

युद्धकाण्ड/९४

इंद्रजित-वधानंतर लंकेत हाहाकार उडाला. राक्षस-स्त्रिया अत्यंत भयभीत झाल्या. युद्धात त्यांच्या आप्तेष्टांचा वध झाल्याने अत्यंत शोकाकुल होऊन त्या करुण विलाप करू लागल्या – रामरूपाने रुद्र, विष्णू, महेंद्र अथवा खुद्द मृत्यूच आमचा वध करीत आहे. रामाने आमच्या वीरांचा वध केल्याने आम्हाला आता जगण्याची आशा उरली नाही, व हे भय संपण्याचा संभव दिसत नाही–

रामहस्ताद्दशग्रीवः शूरो दत्तमहावरः ।
इदं भयं महाघोरं समुत्पन्नं न बुद्ध्यते ।। २६

'ब्रह्मदेवाने मोठा वर दिला असल्यामुळे ह्या शूर रावणाला रामाच्या हातून उत्पन्न झालेले हे महाघोर भय समजत नाही.' असे त्यांना वाटत होते. रावणाच्या प्रत्येक रणात भयंकर उत्पात दिसत आहेत. देव, गंधर्व, पिशाच आणि राक्षस यांनी एकत्र येऊनही त्याचे रक्षण करण्याचे योजिले, तरी त्यांना यश मिळणार नाही; कारण–

पितामहेन प्रीतेन देवदानवराक्षसैः ।
रावणस्याभयं दत्तं मनुष्येभ्यो न चिन्तितम् ।। २९

ब्रह्मदेवाने प्रसन्न होऊन रावणाला देव, दानव आणि राक्षस ह्यांपासून अभय दिले आहे, परंतु मनुष्यांपासून अभय असावे, असा वर त्याने मागितला नाही व ब्रह्मदेवाने तो दिला नाही – हे त्या राक्षसस्त्रियांना ज्ञात होते.

## सुमाली उत्तरकाण्ड/११

निशाचरांना वर प्राप्त झाल्याचे समजताच सुमाली राक्षस निर्भय होऊन आपल्या अनुयायांसह रसातळातून बाहेर आला. राक्षसांमध्ये श्रेष्ठ अशा मंत्र्यांसह सुमाली रावणाकडे गेला व त्याला आनंदाने मिठी मारून म्हणाला–

**दिष्टया ते वत्स सम्प्राप्तश्चिन्तितोऽयं मनोरथः।**
**यस्त्वं त्रिभुवनश्रेष्ठाल्लब्धवान्वरमुत्तमम्॥ ४**

'वत्सा, त्रैलोक्यामध्ये श्रेष्ठ अशा ब्रह्मदेवापासून उत्कृष्ट वर तुला प्राप्त झाला. ही पुष्कळ दिवस आमच्या मनात असलेली गोष्ट तुला प्राप्त झाली आहे.' विष्णूमुळे उत्पन्न झालेल्या भयास्तव आम्ही रसातळात गेलो होतो, ते भय आता उरले नाही. काही तरी करून ही लंकानगरी रावणाने कुबेराकडून हस्तगत करावी, असा त्याने त्याला सल्ला दिला.

## विश्वामित्र बालकाण्ड/२०

यज्ञात विघ्न आणणाऱ्या राक्षसांचा निःपात करण्यासाठी रामाला साहाय्यार्थ धाडावे, अशी विश्वामित्राने दशरथाला विनंती केली. दशरथाने प्रथम अनुमती दिली असली, तरी प्रत्यक्ष विनंती ऐकल्यानंतर मात्र तो विचलित झाला. एवढी एक विनंती सोडून अन्य काहीही मागावे, असे त्याने ऋषीला विनयाने सांगितले. तेव्हा त्याचे भाषण ऐकून विश्वामित्र म्हणाला–

**पौलस्त्यवंशप्रभवो रावणो नाम राक्षसः।**
**स ब्रह्मणा दत्तवरस्त्रैलोक्यं बाधते भृशम्॥ १६**

' रावण नामक राक्षस पौलस्त्यवंशामध्ये उत्पन्न झाला आहे व त्याला ब्रह्मदेवाने वर दिला असल्यामुळे तो त्रैलोक्याला अतिशय पीडा देत आहे. तो विश्रवा मुनीचा पुत्र असून कुबेराचा भाऊ आहे. तो महाबलाढ्य असल्याने स्वता यज्ञात विघ्न आणण्याचे कमीपणाचे मानतो व मारीच आणि सुबाहू यांच्या करवी यज्ञात विघ्ने आणतो. तरी त्यांचे निराकरण करण्यासाठी रामाला बरोबर धाड. '

## उत्तरकाण्ड/१४

गर्वोन्नत रावण आपल्या सहा मंत्र्यांसह कैलास पर्वतावर गेला. तेथे त्याचा भाऊ धनाध्यक्ष कुबेर राज्य करीत होता. त्याने रावणाच्या प्रतिकारासाठी यक्षसैन्य धाडले. परंतु रावणाने त्याचा पराभव केला. रावण प्रवेशद्वाराजवळ आला असता द्वारपालांनी प्रतिबंध केला, तथापि रावणाने त्याला जुमानले नाही.

ततस्तोरणमुत्पाट्य तेन यक्षेण ताडितः ।
रुधिरं प्रस्रवन्भाति शैलो धातुस्रवैरिव ॥ २७

स शैल शिखराभेण तोरणेन समाहतः ।
जगाम न क्षतिं वीरो वरदानात्स्वयम्भुवः ॥ २८

' तेव्हा द्वाराजवळ असलेला दंड घेऊन त्या यक्षाने त्याला (रावणाला) ताडण केले. त्यामुळे शरीरातून रुधिर-स्राव होऊ लागला असता तो राक्षस धातुस्रावाने शोभणाऱ्या पर्वताप्रमाणे शोभू लागला. परंतु पर्वतशिखर-तुल्य दंडाचा प्रहार होऊनही ब्रह्मदेवाच्या वर-प्रदानामुळे त्या वीराला क्षत पडले नाही. त्याच दंडाने यक्षाला ताडण करून त्याने त्याचे चूर्ण केले. ब्रह्मदेवाने, रावणाला ज्यांच्यापासून अवध्यत्व प्राप्त होईल, म्हणून वर दिला होता, त्याचे जे उल्लेख वर दिले आहेत, त्यांत थोडी फार भिन्नता आढळते. सर्वत्र सर्व प्राण्यांचा समान उल्लेख नाही. मनुष्य, वानर, ऋक्ष यांचा मात्र उल्लेख कोठेही नाही. वर प्राप्तीच्या उद्देशानेच तपश्चर्या केली असल्याने रावणाला मिळालेला वर याचित आहे.

ह्या वराखेरीज ब्रह्मदेवाने आणखी दोन-तीन वर रावणाला दिल्याचे आढळते.

उत्तरकाण्ड/९

रावणाची आई कैकसी हिने रावणाला वैश्रवणाप्रमाणे होण्याचा यत्न करण्याविषयी उपदेश केला. आईचा उपदेश शिरसावंद्य मानून तिच्या इच्छेचा मान राखण्याची रावणाने प्रतिज्ञा केली. ब्रह्मदेवाला संतुष्ट करण्यासाठी त्याने गोकर्णाला जाऊन घोर तपश्चर्या करण्याचा निश्चय केला.

स राक्षसस्तत्र सहानुजस्तदा तपश्चचारातुलमुग्रविक्रमः ।
अतोषयच्चापि पितामहं विभुं ददौ स तुष्टश्चावरान्जयावहान् ।। ४८

' भावांसहवर्तमान त्या पराक्रमी राक्षसाने तेथे अतुल तपश्चर्या केली आणि ब्रह्मदेवाला संतुष्ट केले. संतुष्ट झालेल्या त्या ब्रह्मदेवानेही त्यांना जयावह असे वर दिले. '

उत्तरकाण्ड/१०

रावणाने सुपर्ण, नाग, यक्ष, दैत्य, दानव, राक्षस आणि देवता यांच्यापासून अवध्यत्व प्राप्त व्हावे, असा वर ब्रह्मदेवापाशी मागितला असता त्याने त्यास अनुमती दिली. खेरीज

शृणु चापि वरो भूयः प्रीतस्येह शुभो मम ।
हुतानि यानि शीर्षाणि पूर्वमग्नौ त्वयानघ ।। २३
पुनस्तानि भविष्यन्ति तथैव तव राक्षस ।
वितरामीह ते सौम्य वरं चान्यं दुरासदम् ।। २४
छन्दतस्तव रूपं च मनसा यद्यथेप्सितम् ।–२५

' प्रसन्न झालेल्या माझा एक दुसराही चांगला वर तू ऐकून घे. हे निष्पापा, पूर्वी ज्या मस्तकांचे तू अग्नीमध्ये हवन केले आहेस, ती मस्तके पूर्वीप्रमाणेच तुला प्राप्त होतील. शिवाय हे विनयसंपन्न, जे जे रूप तू

मनामध्ये आणशील, ते ते रूप तू स्वेच्छेने धारण करशील, असा आणखीही एक दुर्लभ वर मी तुला देत आहे', असे ब्रह्मदेव त्याला म्हणाला.

हा अयाचित वर आहे.

### उत्तरकाण्ड/प्रक्षिप्त ४

चंद्रकिरणांच्या योगाने राक्षसांना भय उत्पन्न झाले असता, संक्रुद्ध रावणाने नाराच बाणांनी चंद्राचा वेध घेतला. तेव्हा ब्रह्मदेव चंद्रलोकी जाऊन रावणाला म्हणाला–'तू येथून परत जा. चंद्राला पीडा देऊ नको. तो जगाच्या हिताविषयी दक्ष आहे. मी तुला एक मंत्र देईन. प्राण जाण्याचा प्रसंग प्राप्त झाला असता जो पुरुष ह्या मंत्राचा जप करील, त्याला मृत्यू प्राप्त होणार नाही.' तेव्हा रावणाने तो मंत्र देण्यास सांगितले. ब्रह्मदेवाने त्याला महत्त्वाच्या सूचना दिल्या. केवळ प्राण जाण्याचा प्रसंग आला तरच ह्या मंत्राचा जप करावा, एरव्ही करू नये. जप केल्याशिवाय सिद्धी प्राप्त होऊ शकत नसल्याने शिरोमंत्राचा जप करण्यास त्याने सांगितले आणि मंत्र सांगितला.

मया प्रोक्तमिदं पुण्यं नामाष्टशतमुत्तमम् ।
सर्वपापहरं पुण्यं शरण्यं शरणार्थिनाम् ।।
जप्तमेतद्दशग्रीव कुर्याच्छत्रुविनाशनम् ।। ५०

'रावणा, हे जे पवित्र व उत्कृष्ट नामाष्टोरशत मी कथन केले आहे ते सर्वपापनाशक, पुण्यकारक, शरणेच्छूंनी आश्रय करण्यास योग्य आहे. याचा जप केला असता हे शत्रुविनाशक आहे.' असे ब्रह्मदेव म्हणाला.

### उत्तरकाण्ड/प्रक्षिप्त ५

**दत्त्वातु रावणस्यैवं वरं स कमलोद्भवः ।–१**

ह्याप्रमाणे रावणाला वर दिल्यानंतर पितामह ब्रह्मदेव ब्रह्मलोकी गेला.

हा अयाचित वर आहे.

## ५. विष्णू < देव बालकाण्ड/१५

दशरथ राजाच्या पुत्रकामेष्टी यज्ञाचा आर्त्विज ऋष्यश्रृंग मुनी होता. त्याने पुत्रप्राप्ति-साधनभूत इष्टी करण्याचा उपक्रम सुरू केला असता देव, सिद्ध, महर्षी यथाविधी प्रतिग्रह करण्यासाठी अंतर्धान शक्तीच्या योगाने इतरांच्या दृष्टीस न पडता यज्ञ-मंडपात एकत्र आले आणि ब्रह्मदेवाला म्हणाले – 'हे भगवन्, आपल्या प्रसादाने रावण नामक राक्षस उन्मत्त होऊन आपल्या स्वताच्या सामर्थ्याने आम्हा सर्वांना पीडा देत आहे. आम्ही त्याचे शासन करण्यास समर्थ नाही. आपण प्रसन्न होऊन त्याला वर दिला, तेव्हापासून आपल्या वचनाला मान देऊन आम्ही नेहमी त्याचे सर्व काही सहन करीत आहोत. तो दुर्मती त्रैलोक्याला त्रास देत असून स्वर्गाधिपती इंद्रालाही जिंकण्याची इच्छा करीत आहे. आपल्या वरदानामुळे त्याला कसलाही सुमार राहिलेला नाही. तरी त्याच्या वधाचा आपण उपाय योजा.' देवांची विनंती ऐकून विचारमग्न झालेल्या ब्रह्मदेवाला रावणाच्या वधाचा एक उपाय सुचला. वर मागताना रावणाने गंधर्व, यक्ष, देव आणि राक्षस यांचेपासून अवध्यत्व मागून घेतले होते. त्यात मनुष्यांचा उल्लेख नव्हता, कारण त्याला मनुष्यांची मुळीच पर्वा नव्हती. त्याचा वध मनुष्याकडूनच होणे शक्य आहे, असे त्याच्या लक्षात आले. तेव्हा सर्व देवांनी विष्णूला विनंती केली – 'हे विष्णो, लोकहितासाठी आम्ही आपली एका कार्यार्थ योजना करणार आहोत. दशरथ राजाच्या तीन भार्यांच्या ठायी आपल्या स्वताचे चार अंश करून आपण मनुष्य रूपाने त्यांचे पुत्र म्हणून अवतीर्ण व्हावे आणि देवांना अवध्य असणाऱ्या मदोन्मत्त रावणाचा वध करावा. आम्हा सर्वांचा मुख्य आधार आपणच आहात. देवशत्रूचा वध करण्यासाठी मनुष्य-लोकात अवतीर्ण होण्याचे आपण मनात आणावे. देवांची विनंती ऐकून विष्णू म्हणाला –

भयं त्यजत भद्रं वो हितार्थं युधि रावणम्।
सपुत्रपौत्रं सामात्यं समन्त्रिज्ञातिबान्धवम्॥ २८

हत्वा क्रूरं दुराधर्षं देवर्षीणां भयावहम् ।
दशवर्षसहस्राणि दशवर्षशतानि च ॥ २९

वत्स्यामि मानुषे लोके पालयन्पृथिवीमिमाम् ।
एवं दत्वा वरं देवो देवानां विष्णुरात्मवान् ॥ ३०

'तुमचे कल्याण असो. तुम्ही भय सोडा, देव आणि ऋषी यांना भयावह आणि जिकण्यास कठीण अशा त्या क्रूर रावणाचा–पुत्र, पौत्र, अमात्य, मंत्री आणि ज्ञातिबांधव यांसहवर्तमान, तुमच्या कल्याणाकरिता संग्रामामध्ये वध करून या पृथ्वीचे परिपालन करीत करीत मी अकरा हजार वर्षे मनुष्य-लोकात वास्तव्य करीन'–याप्रमाणे देवांना वर दिला.

देवांनी सांगितल्याप्रमाणे मनुष्य-लोकामध्ये अनुरूप अशी जन्मभूमी दशरथ राजाच्या भार्याच आहेत, असे त्याने मनात आणले. आपले चार अंश करून दशरथ राजा पिता होण्यास योग्य आहे, असे ठरविले.

हा याचित वर आहे.

## ६.१८ जया, सुप्रभा बालकाण्ड/२१

वसिष्ठ मुनी दशरथ राजाला विश्वामित्राच्या सामर्थ्याविषयी सांगून दिलेले वचन खरे करून दाखविण्यासाठी त्याला उद्युक्त करीत आहे.

मारीच आणि सुबाहू हे दोन राक्षस विश्वामित्राच्या यज्ञात विघ्ने आणून यज्ञाचा नाश करीत असत. त्यांचे पारिपात्य करणे विश्वामित्राला अशक्य नव्हते. परंतु त्याने यज्ञ-दीक्षा घेतल्याने त्याच्यावर काही मर्यादा पडल्या होत्या. आपला यज्ञ निर्विघ्नपणे पार पडावा, म्हणून तो दशरथ राजाला विनंती करण्यासाठी त्याच्याकडे गेला. विश्वामित्राने विनंती करण्यापूर्वीच दशरथाने ती पूर्ण करण्याचे वचन देऊन टाकले. तेव्हा विश्वामित्राने यज्ञ-रक्षणासाठी आणि राक्षसांपासून यज्ञाला होणारा उपद्रव टाळण्यासाठी रामाला त्याच्याबरोबर धाडण्याची विनंती केली.

ती ऐकून दशरथ राजा दुःखी झाला. निरनिराळे पर्याय सुचवून रामाला त्याचेबरोबर धाडण्याची टाळाटाळ करू लागला, हे पाहून विश्वामित्राला विलक्षण क्रोध आला. इक्ष्वाकु-कुलोत्पन्नांना प्रतिज्ञा-भंग शोभत नाही, असे सांगून तो जाऊ लागला. विश्वामित्राचा क्रोध अनावर होऊ नये व दशरथ राजाने दिलेल्या वचनाचे पालन करावे, यासाठी वसिष्ठ ऋषी दशरथाला उपदेशात्मक बोलला—'दशरथा, धर्मात्मा म्हणून तुझी त्रैलोक्यात ख्याती आहे. विश्वामित्राच्या विनंतीनुसार त्याच्या यज्ञाचे रक्षण करण्यास तू रामाला देऊन टाक. कुशिक-पुत्राने त्याचे रक्षण केले असता राक्षस त्याला स्पर्शही करू शकणार नाहीत. विश्वामित्रासारखा तपस्वी त्रैलोक्यात नाही. त्याला अनेक विद्या अवगत असून तो अस्त्रज्ञानी आहे. त्याच्यासारखे अस्त्रज्ञान कुणालाही प्राप्त होण्याचा संभव नाही. हा विश्वामित्र राज्य करीत असता पूर्वी शिवाने अत्यंत धार्मिक असे कृशाश्वाचे पुत्र सर्व प्रकारची अस्त्रे म्हणून ह्याला दिले.

जया च सुप्रभा चैव दक्षकन्ये सुमध्यमे ।
ते सूतेऽस्त्राणि शस्त्राणि शतं परमभास्वरम् ।। १५

पञ्चाशतं सुताँल्लेभे जया लब्धवरा वरान् ।
वधायासुर - सैन्यानामप्रमेयानरूपिण: ।। १६

सुप्रभाजनयच्चापि पुत्रान्पञ्चाशतं पुन: ।
संहारान्नाम दुर्धर्षान्दुराक्रामान्बलीयस: ।। १७

'जया, सुप्रभा या उभयता सौंदर्यसंपन्न स्त्रिया दक्ष प्रजापतीच्या कन्या असून त्यांना पुत्ररूपाने अत्यंत तेजस्वी अशी शंभर अस्त्रे व शस्त्रे प्राप्त झाली. पैकी वर प्राप्त झालेल्या जयेला असुरसैन्याचा वध करण्याकरिता अचिंत्य आणि अदृश्य असे पन्नास श्रेष्ठ पुत्र प्राप्त झाले असून सुप्रभेला दुसऱ्यांना सहन होण्यास अशक्य व अजिंक्य असे संहार नामक पन्नास बलाढ्य पुत्र प्राप्त झाले. दक्ष-कन्यांच्या पोटी जन्मास आलेले ते पुत्र देदीप्यमान, विजयशाली व महावीर्यवान असून नाना प्रकारची रूपे धारण करण्याची शक्ती त्यांचे ठायी आहे. ही सर्व अस्त्रे कुशिक-पुत्र विश्वामित्र सांगोपांग जाणत असून अन्य अपूर्व अस्त्रे निर्माण करण्याचे

सामर्थ्यही त्यांचे ठायी आहे. महातेजस्वी व महावीर्यवान विश्वामित्र मुनी रामाला घेऊन जात असता कोणताही संशय बाळगण्याचे तुला कारण नाही. तुझ्या पुत्रांवर अनुग्रह करण्यासाठीच हा तुझ्यापाशी त्यांची याचना करीत आहे.'

वसिष्ठाच्या उपदेशाने दशरथाची समजूत पटली व रामाला विश्वामित्राच्या बरोबर धाडण्यास त्याचे मन अनुकूल झाले.

जया व सुप्रभा यांना कोणी वर दिला व का दिला, हे स्पष्ट नाही. त्यामुळे हा वर याचित का अयाचित, हे निश्चित सांगता येत नाही.

## ७. इंद्र < मलद, करुष बालकाण्ड/२४

विश्वामित्र मुनीच्या यज्ञाचे रक्षण करण्यासाठी राम-लक्ष्मण त्याच्या बरोबर जात असता रामाच्या इच्छेवरून मुनी त्याला सरयू नदीची उत्पत्ती आणि ताटकावन इत्यादीसंबंधी कथन करीत आहे.

पूर्वी देवांच्या प्रयत्नांनी मलद व करुष या देशांची निर्मिती झाली. ते देश फार समृद्ध होते. वृत्रासुराच्या वधाच्या वेळी अशुद्ध आचरण आणि क्षुधा यांनी इंद्र व्याप्त झाल्यामुळे ब्रह्महत्या त्याच्या मागे लागली. तेव्हा त्या मलीन इंद्राला देव आणि ऋषी यांनी गंगाजलाने स्नान घालून त्याचा मल काढून टाकला. ह्या भूमीचे ठिकाणी देवांनी महेंद्राच्या शरीरातील मल व क्षुधा (बुभुक्षितपणा) याचे विसर्जन केले. इंद्र शुद्ध झाल्याने व त्याचे दोष या देशांनी स्वीकारल्यामुळे इंद्र या प्रदेशांवर संतुष्ट झाला.

ततो देशस्य सुप्रीतो वरं प्रादादनुत्तमम् ।
इमौ जनपदौ स्फीतौ ख्यातिं लोके गमिष्यतः ॥ २२

'माझ्या शरीराचा मल व माझी क्षुधा धारण करणारे हे प्रदेश मलद व करुष या नावांनी प्रसिद्ध होऊन नेहमी समृद्ध होतील, आणि पृथ्वीमध्ये यांची मोठी ख्याती होईल', असा [illegible] उत्कृष्ट वर दिला.

त्या देवांचा सन्मान झालेला पाहून देवांनीही इंद्राला अनुमोदन दिले.

हा अयाचित वर आहे.

## ८. ब्रह्मदेव < सुकेतू, ताटका बालकाण्ड/२५

विश्वामित्र रामाला ताटकेचा वृत्तान्त कथन करीत आहे.

पूर्वी सुकेतू नावाचा एक मोठा यक्ष होऊन गेला. तो वीर्यवान असूनही त्याला अपत्य नव्हते. त्या सदाचरणसंपन्न यक्षाने अपत्यप्राप्तीसाठी मोठी तपश्चर्या केली. तेव्हा संतुष्ट झालेल्या ब्रह्मदेवाने यक्षाधिपतीला ताटका म्हणून ख्यात असलेली कन्या दिली.

**वरदानकृतं वीर्यं धारयत्यबला बलम् ॥–४**

'ही अबला वरप्रदानामुळे असले बल व वीर्य धारण करीत आहे.' ब्रह्मदेवाने तिला–

**ददौ नागसहस्रस्य बलं चास्याः पितामहः ।–७**

सहस्र गजाचे बल दिले.

ब्रह्मदेवाने यक्षाधिपतीला केवळ कन्यारत्नच दिले, पुत्ररत्न दिले नाही; कारण त्याला पुत्र दिला असता तर त्याने जनतेला खूपच पीडा दिली असती. कन्या देऊनही काही कमी त्रास झाला नाही. शेवटी तिच्या वधाचा उपाय त्याला शोधावा लागला.

अपत्यप्राप्तीच्या हेतूनेच तपश्चर्या केली असल्याने ती सकाम आहे. म्हणून सुकेतूला प्राप्त झालेला वर याचित आहे. ताटकेने वर मागितल्याचा उल्लेख नसल्याने तिला प्राप्त झालेला वर मात्र अयाचित आहे.

## ९. विष्णू < कश्यप बालकाण्ड/२९

विश्वामित्र रामाला सिद्धाश्रमाची कथा सांगत आहे.

तपश्चर्येकडे लोकांची प्रवृत्ती व्हावी, एतदर्थ देवांना वंद्य अशा महातपस्वी विष्णूने या आश्रमात पुष्कळ वर्षे तपश्चर्या केली, शेकडो युगे वास्तव्य केले. वामनावतार घेण्यापूर्वी विष्णूने या आश्रमाचा स्वीकार केला. त्याची तपश्चर्या चालू असता विरोचन - पुत्र बलीने इंद्र आणि मरुद्गण यांना जिंकून इंद्रपद स्वताकडे घेण्याचा प्रयत्न केला. त्याने मोठा यज्ञही केला. तेव्हा अग्निप्रभृती सर्व देव या आश्रमात विष्णूकडे आले, आणि बलीचे व्रत पूर्ण होण्यापूर्वीच देवहितार्थ वामनावतार स्वीकारून त्याचे निर्दालन करण्याची विनंती केली. त्या वेळी अग्नितुल्य प्रभा असलेला भगवान् कश्यप अदितीसह तेथे आला. त्याने विष्णूची स्तुती केली व तो म्हणाला–' मी आचरिलेल्या तपाच्या योगाने तुझ्या शरीराचे ठिकाणी सर्व जगत अवलोकन करीत आहे. तू अनादी व अतर्क्य आहेस. मी तुला शरण आलो आहे. '

वरं वरय भद्रं ते वरार्होऽसि मतो मम ।।–१४

' वर माग, तुझे कल्याण असो. तू वराला योग्य आहेस, असे मी समजतो. ' असे श्रीहरीने प्रसन्न होऊन पाप-क्षालन झालेल्या कश्यप मुनीला सांगितले. तेव्हा कश्यप मुनी म्हणाला–

अदित्या देवतानां च मम चैवानुयाचितम् ।।–१५
वरं वरद सुप्रीतो दातुमर्हसि सुव्रत ।
पुत्रत्वं गच्छ भगवन्नदित्या मम चानघ ।। १६
भ्राता भव यवीयांस्त्वं शक्रस्यासुरसूदन ।
शोकार्तानां तु देवानां साहाय्यं कर्तुमर्हसि ।। १७
अयं सिद्धाश्रमो नाम प्रसादात्ते भविष्यति ।–१८

' हे वरप्रद, अदिती, देवता आणि मी ह्यांनी प्रार्थित असा वर आपण प्रसन्न होऊन मला द्या. सारांश, हे सुव्रत, हे भगवन्, हे निष्पाप, माझे व अदितीचे आपण पुत्र व्हा. हे दैत्यनाशक, आपण इंद्राचे कनिष्ठ बंधू व्हा, आणि शोकाकुल झालेल्या देवांना साहाय्य करा. आपल्या प्रसादामुळे हा प्रदेश सिद्धाश्रम म्हणून प्रसिद्ध होईल.'

कश्यप मुनीच्या प्रार्थनेनुसार विष्णूने अदितीच्या पोटी जन्म घेतला व वामन होऊन बळीचा वध केला.

हा याचित वर आहे.

## १०. चूली < सोमदा बालकाण्ड/३३

कुशनाभाने आपल्या मुलींची समजूत घालून त्यांचा विवाह ब्रह्मदत्ताशी लावून दिल्याची कथा विश्वामित्र रामाला कथन करीत आहे.

एकदा कुशनाभाच्या शंभर कन्या उत्तम वस्त्रालंकार धारण करून एका उपवनात नृत्य-गायनात दंग झाल्या असता, वायूने त्यांना पाहिले. त्यांचे तारुण्य व सौंदर्य यांनी मोहित झालेल्या वायूने त्यांना त्याच्या भार्या होण्याची बिनंती केली. ती त्यांनी साफ धुडकावून लावली. तेव्हा क्रुद्ध होऊन वायूने त्यांचा अंगभंग केला. त्यांचे सौंदर्य नष्ट होऊन त्या कुबड्या झाल्या.

अंगभंगामुळे लज्जित व भयभीत झालेल्या कुशकन्यांनी आपल्या पित्याला घडलेली सारी हकिगत सांगितली. त्यांची दयनीय अवस्था पाहून तोही व्यथित झाला. परंतु शाप देण्याचे सामर्थ्य असूनही त्यांनी जी क्षमाशील वृत्ती आचरली, त्यास्तव त्यांचे कौतुक केले. दान, सत्य यज्ञ, यश व धर्म यांचा अंतर्भाव क्षमेत होत असून क्षमा ही साऱ्या जगाचा आधार आहे, अशी कुशनाभाची धारणा होती. त्यानें आपल्या मुलींची समजूत घातली. मन्त्रिमंडळाशी विचार-विनिमय करून कन्यांसाठी योग्य वराचा शोध घेऊ लागला. त्या वेळी महातेजस्वी ऊर्ध्वरेत आणि सदाचार-संपन्न असा चूली नावाचा एक महर्षी ब्रह्मप्राप्तीसाठी तप करीत होता. सोमदा नावाची एक गंधर्वी त्याची अनन्यभावे सेवा करीत असे. तिच्या विनयशील निष्ठापूर्ण सेवेने मुनी प्रसन्न होऊन तिला म्हणाला –

**परितुष्टोऽस्मि भद्रं ते किं करोमि तव प्रियम ।।–१४**

'तुझे कल्याण असो. तुझे कोणते प्रिय करू तें मला सांग.' मुनीची संतुष्टता पाहून ती म्हणाली –

लक्ष्म्या समुदितो ब्राह्म्या ब्रह्मभूतो महातपाः ।
ब्राह्मेण तपसा युक्तं पुत्रमिच्छामि धार्मिकम् ।। १६

अपतिश्चास्मि भद्रं ते भार्या चास्मि न कस्यचित् ।
ब्राह्मेणोपगतायाश्च दातुमर्हसि मे सुतम् ।। १७

तस्याः प्रसन्नो ब्रह्मर्षिर्ददौ ब्राह्ममनुत्तमम् ।
ब्रह्मदत्त इति ख्यातं मानसं चूलिनः सुतम् ।। १८

'हे महातपस्वी, आपण आपल्या ब्रह्मतेजाच्या योगाने युक्त होऊन केवळ ब्रह्मरूप बनलेले आहा, तस्मात् ब्रह्मतपाने युक्त असा धार्मिक पुत्र व्हावा, अशी मला इच्छा आहे. हे मुने, देव तुमचे बरे करो. मी पतिरहित आहे आणि तशीच पुढेही राहणार आहे. मी कुणाचीही भार्या होणार नाही. करिता आपणाला शरण आलेल्या मला ब्रह्मसंबंधी उपायाने आपण एक पुत्र प्राप्त करून द्यावा.'

तिची ही प्रार्थना ऐकून त्या महर्षीने ब्रह्मविषयक तपःसामर्थ्याने ब्रह्मदत्त नावाचा एक मानस-पुत्र तिला दिला

चूलीने हा याचित वर सोमदेवर प्रसन्न होऊन तिला दिला. त्याने तिला वर मागण्यास सांगितले.

## ११. भृगू < सागर, केशिनी, सुमती बालकाण्ड/३८

विश्वामित्र रामाला सगर राजाचा वृत्तांत सांगत आहे.

पूर्वी सगर नावाचा एक धर्मात्मा अयोध्यापती होऊन गेला. त्याला अपत्य नसल्याने संतान-प्राप्ती विषयी तो उत्सुक होता. धर्मनिष्ठ व सत्यवचनी विदर्भ-राजकन्या केशिनी त्याची ज्येष्ठ पत्नी होती. अरिष्टनेमीची कन्या सुमती ही त्याची दुसरी भार्या हिमालयासंन्निध असलेल्या भृगू प्रस्रवण पर्वतावर याने आपल्या भार्यांसह तपश्चर्या केली. शंभर वर्षे तपश्चर्या केल्यानंतर भृगू मुनी संतुष्ट झाला. आणि

सगराय वरं प्रादाद्भृगुः सत्यवतां वरः ।।-६

अपत्यलाभः सुमहान्भविष्यति तवानघ ।
कीर्ति चाप्रतिमां लोके प्राप्स्यसे पुरुषर्षभ ।। ७
एका जनयिता तात पुत्रं वंशकरं तव ।
षष्टिं पुत्रसहस्राणि अपरा जनयिष्यति ।। ८

'सत्य भाषण करणाऱ्यांमध्ये श्रेष्ठ असलेल्या भृगू महर्षीने सगराला असा वर दिला की – हे निष्पापा, तुला मोठा अपत्यलाभ होईल. लोकांमध्ये तुझी अप्रतिम कीर्ती होईल. बा सगरा, तुझ्या एका पत्नीला वंश चालविणारा पुत्र होईल व दुसऱ्या पत्नीचे ठिकाणी साठ हजार पुत्र उत्पन्न होतील.'

भृगू ऋषीचे बोलणे ऐकून अत्यंत संतुष्ट झालेल्या सगर-भार्यांनी-एक पुत्र कोणाला होईल व साठ हजार पुत्र कोणाला होतील, हे जाणून घेण्याची इच्छा व्यक्त केली. तेव्हा मुनीने त्यांना त्यांच्या इच्छा विचारल्या.

एको वंशकरो वास्तु बहवो वा महाबलाः ।
कीर्तिमन्तो महोत्साहाः का वा कं वरमिच्छति ।। १२

'वंश चालविणारा पुत्र पाहिजे असल्यास एकच होईल, आणि कीर्तिमान, मोठे उत्साही व महाबलाढ्य असे पुष्कळ पुत्रही होतील.'

केशिनीने वंश चालविणारा असा एकच पुत्र मागितला तर सुमतीने साठ हजार पुत्र मागून घेतले. केशिनीला असमंज नावाचा एकच पुत्र झाला. तर सुमतीला एक गर्भतुंब झाला. तो तुंब फुटून त्यातून साठ हजार पुत्र बाहेर निघाले.

हा याचित वर आहे.

## १२. ब्रह्मदेव < भगीरथ बालकाण्ड/४२

गंगा-प्राप्तीसाठी भगीरथाने केलेल्या तपश्चर्येविषयी विश्वामित्र ऋषी रामाला कथन करीत आहे.

धर्मनिष्ठ भगीरथ राजर्षीला संतान नसल्याने राज्य आणि प्रजा मंत्र्यांच्या स्वाधीन करून गंगेच्या प्राप्तीनें पितरांना स्वर्गप्राप्ती व्हावी, या उद्देशाने त्यानें गोकर्णामध्ये दीर्घ तपश्चर्या आरंभिली. पंचाग्निसाधन करून तो महिन्याने एकदा आहार घेत असे. अशा रीतीने एक हजार वर्षे लोटली असता, भगवान् ब्रह्मदेव त्याच्यावर अतिशय प्रसन्न झाला आणि देवगणांसह त्याच्या भेटीला येऊन म्हणाला –

भगीरथ महाराज प्रीतस्तेऽहं जनाधिप ।
तपसा च सुतप्तेन वरं वरय सुव्रत ।। १६

' हे प्रजाधिपते भगीरथ महाराजा, उत्कृष्ट प्रकारे आचरिलेल्या तपाच्या योगाने मी तुझ्यावर प्रसन्न झालो आहे. हे सदाचरण-संपन्न नृपश्रेष्ठा, तुला अपेक्षित असेल तो वर तू मागून घे. ' ब्रह्मदेवाचें बोलणे ऐकून महातेजस्वी व महापराक्रमी भगीरथ हात जोडून म्हणाला–

यदि मे भगवान्प्रीतो यद्यस्तिः तपसः फलम् ।
सगरस्यात्मजाः सर्वे मत्तः सलिलमाप्नुयुः ।। १८

गङ्गायाः सलिलक्लिन्ने भस्मन्येषां महात्मनाम् ।
स्वर्गं गच्छेयुरत्यन्तं सर्वे च प्रपितामहाः ।। १९

देव याचे ह सन्तत्यै नावसीदेत्कुलं च नः ।
इक्ष्वाकूणां कुले देव एष मेऽस्तु वरः परः ।। २०

' भगवान् जर माझ्यावर प्रसन्न झाले असतील आणि माझ्या तपाचे जर काही फल मला प्राप्त व्हावयाचे असेल, तर सर्व सगरपुत्रांची माझ्या हातून उदक-क्रिया व्हावी. ह्या महात्म्यांचे भस्म गंगोदकामध्ये भिजले, म्हणजे या प्रपितामहांना अक्षय्य स्वर्गप्राप्ती होईल. देवा, आमचे कुल उच्छिन्न होऊ नये, एतदर्थ मी संतानाची याचना करीत आहें. करिता हे देवा, इक्ष्वाकू वंशजांच्या कुलामध्ये उत्पन्न झालेल्या मला हा दुसरा एक वर आपणापासून प्राप्त व्हावा. '

भगीरथाची विनंती ऐकून ब्रह्मदेव म्हणाला –

मनोरथो महानेष भगीरथ महारथ।
एवं भवतु भद्रं ते इक्ष्वाकुकुलवर्धन ।। २१

'हे महारथी, ही तुझी इच्छा आहे. हे इक्ष्वाकुकुलवर्धना, तुझ्या म्हणण्याप्रमाणे होईल.' परंतु त्याकरिता हिमालयाची ज्येष्ठ कन्या गंगा-हिला धारण करण्यासाठी शंकराची योजना करावयास हवी. कारण गंगेचा प्रपात पृथ्वीला सहन होणार नाही. आणि गंगेला धारण करण्यास शंकरावाचून अन्य कोणीही समर्थ नाही. असे बोलून गंगेलाही भगीरथा-वर योग्य काली अनुग्रह करण्यास सांगितले.

तपश्चर्येचा उद्देशच ब्रह्मदेवाला प्रसन्न करून घेऊन पितरांना स्वर्गप्राप्ती व स्वताला अपत्य-प्राप्ती करून घेणे, हा असल्याने दोन्ही वर याचित होत.

## २३. कश्यप < दिती बालकाण्ड/४६

विश्वामित्र ऋषी रामाला मरुद्गणांचे जन्मवृत्त सांगत आहे.

दिती आणि अदिती या कश्यपाच्या भार्या. दितीचे पुत्र दैत्य आणि अदितीचे पुत्र देव. अमृतमंथनाचे वेळी देव-दैत्यांचे जे युद्ध झाले, त्यात देवांनी दैत्यांचा वध केला. त्यामुळे दिती अतिशय दुःखी झाली आणि आपल्या पतीला म्हणाली–'भगवन्, आपल्या महापराक्रमी पुत्रांनी माझ्या पुत्रांचा वध केला आहे. यास्तव दीर्घ तपश्चर्येच्या योगाने आपणा-पासून इंद्र-घातक पुत्र प्राप्त व्हावा, अशी माझी इच्छा आहे. मी तप-श्चर्या करीन. आपण मला गर्भ द्या.' तेव्हा इंद्र-घातक पुत्र प्राप्त व्हावा यासाठी तपश्चर्या करण्याकरिता तिने अनुज्ञा मागितली असता कश्यप मुनी तिला म्हणाला–

**एवं भवतु भद्रं ते शुचिर्भव तपोधने ।**
**जनयिष्यसि पुत्रं त्वं शक्रहन्तारमाहवे ।। ५**

**पूर्णे वर्षसहस्रे तु शुचिर्यदि भविष्यसि ।**
**पुत्रं त्रैलोक्यहन्तारं मत्तस्त्वं जनयिष्यसि ।। ६**

'हे तपोधने, तुझे कल्याण असो. तू शुचिर्भूत रहा, म्हणजे संग्रामामध्ये इंद्राचा वध करणारा पुत्र तुला प्राप्त होईल. सहस्र संवत्सर पूर्ण होईपर्यंत जर तू शुचिर्भूत राहशील, तर माझ्यापासून त्रैलोक्याधिपती इंद्राचा वध करणारा पुत्र तुला प्राप्त होईल.'

महातेजस्वी कश्यपाने असे सांगून तिच्या अंगावरून हात फिरवला व तिच्याशी समागम केल्यावर 'कल्याण असो' असा आशीर्वाद देऊन तो तपश्चर्येला गेला. दितीला अतिशय आनंद झाला. तिने अत्यंत उग्र तपश्चर्या केली. त्या समयी इंद्राने तिची उत्कृष्ट सेवा केली. हजार वर्षे तप पूर्ण होण्यास केवळ दहा वर्षे कमी असता, ती आनंदून इंद्राला म्हणाली— 'हे सुरश्रेष्ठा, तुझ्या नाशाकरिता म्हणून जो मी पुत्र मागून घेतला, तो तसा न होता तुला जय देण्याविषयी उत्सुक असणाराच पुत्र मी जन्माला घालीन. तुझ्या सेवेने मी संतुष्ट झाले आहे.'

वरो वर्षसहस्रान्ते मम दत्तः सुतं प्रति ।।–१५

तुझ्या पित्याला प्रार्थना केली असता 'हजार वर्षांनी तुला पुत्र होईल', असा त्या महात्म्याने मला पुत्र-प्राप्तीचा वर दिला आहे.

एकदा सूर्य माध्यान्ही आला असता दिती उशाकडे पाय करून निद्रिस्त झाली. त्यामुळे जी अशुची निर्माण झाली तिचा इंद्राला आनंद झाला. अत्यंत सावधपणे तिच्या शरीरात प्रवेश करून त्याने तिच्या गर्भाचे सात तुकडे केले. तेव्हा तो गर्भ रडू लागला. ते रोदन ऐकून दिती 'मा रुद, मा रुद' असे म्हणाली. 'गर्भाचा नाश करू नको', असे तिने इंद्रालाही सांगितले. तेव्हा तिच्या शरीराबाहेर येऊन इंद्र तिला म्हणाला—'पाय ठेवण्याच्या जागी तू मस्तक ठेवल्याने अशुची झाली. तुझे हे न्यूनत्व लक्षात घेऊन संग्रामामध्ये माझा वध करणाऱ्या तुझ्या पुत्राचे मी सात तुकडे केले, यास्तव मला क्षमा कर.' हे ऐकून दिती इंद्राला म्हणाली— 'तू जे केलेस ते उभयतांना प्रिय व्हावे. हे सात पुत्र सात मरुद्गणांच्या स्थानांचे रक्षण करणारे होवोत.' इंद्राने तिच्या इच्छेला मान दिला व ते सात पुत्र मरुत् म्हणून विख्यात झाले.

हा सशर्त याचित वर आहे.

## १४. इंद्र < दिती बालकाण्ड/४७

विश्वामित्र ऋषी रामाला मरुद्गणांचे जन्मवृत्त सांगत आहे.

कश्यपाने दितीला तिच्या इच्छेप्रमाणे इंद्रघातक पुत्र होईल, असा वर दिला. परंतु वराचे फल प्राप्त होण्यासाठी शुचिर्भूत राहून एक हजार वर्षे तपश्चर्या करण्यास सांगितले. त्यानुसार आवश्यक तो कालखंड पूर्ण होण्यास केवळ दहा वर्षांचा काळ उरला असता एकदा माध्यान्ही दिती उशाकडे पाय करून झोपी गेली, त्यामुळे अशुची निर्माण झाली. इंद्राने दितीच्या उदरात शिरून गर्भाचे सात तुकडे केले. त्यामुळे दितीला अतिशय दुःख झाले. ती इंद्राला म्हणाली–

ममापराधाद्गर्भोऽयं सप्तधा शकलीकृतः ।
नापराधो हि देवेश तवात्र बलसूदन ।। २
प्रियं त्वत्कृतमिच्छामि मम गर्भविपर्यये ।
मरुतां सप्त सप्तानां स्थानपाला भवन्तु ते ।। ३
वातस्कन्धा इमे सप्त चरन्तु दिवि पुत्रक ।
मारुता इति विख्याता दिव्यरूपा ममात्मजाः ।। ४

'हे देवाधिपते, माझ्या अपराधामुळे या गर्भाचे सात तुकडे झाले आहेत. यात तुझा अपराध नाही. आता, माझ्या गर्भाच्या नाशाकरिता तू जे कृत्य केलेस ते उभयतांनाही प्रिय व्हावे, अशी माझी इच्छा आहे. करिता हे सात पुत्र सात मरुद्गणांच्या स्थानांचे रक्षण करणारे होवोत. हे पुत्रा, आकाशामध्ये जे सात वायुप्रवाह आहेत, त्यांचे ठिकाणी मारुत म्हणून विख्यात असलेले हे माझे दिव्यरूपी पुत्र संचार करोत.' तिची विनंती ऐकून इंद्र हात जोडून तिला म्हणाला–

सर्वमेतद्यथोक्तं ते भविष्यति न संशयः ।।–८

'तू म्हटल्याप्रमाणे हे सर्व काही होईल, ह्यात संशय नाही.'

तिचे कल्याण चिंतून तिचे पुत्र तिच्या म्हणण्याप्रमाणे संचार करतील, असे इंद्राने तिला आश्वासन दिले.

वर असा स्पष्ट निर्देश नसला तरी इंद्राचे आश्वासन हे वरासारखेच आहे.

हा याचित वर होय.

## १५. शंकर < विश्वामित्र बालकाण्ड/५५

विश्वामित्राला अस्त्रप्राप्ती कशी झाली, याविषयी शतानंद रामाला सांगत आहे.

वसिष्ठाची कामधेनू विश्वामित्राने बळजबरीने नेली असता तिच्या हंबरण्यामुळे कांबोज आणि अवयवांपासून बर्बर, यवन, शक, म्लेच्छ, हारीत, किरात इत्यादी उत्पन्न झाले आणि त्यांनी विश्वामित्राचे सर्व सैन्य नष्ट करून टाकले. तेव्हा संतप्त झालेले विश्वामित्र-पुत्र वसिष्ठावर धावून गेले असता केवळ हुंकारानेच वसिष्ठाने त्यांना दग्ध केले. मुलांचा व सैन्याचा नाश झालेला पाहून विश्वामित्र लज्जित झाला, निस्तेज झाला. आपल्या एका मुलाच्या स्वाधीन राज्य करून तो तपश्चर्येसाठी वनात गेला. महादेवाला प्रसन्न करून घेण्यासाठी त्याने उग्र तप केले. प्रसन्न झालेल्या शंकराने त्याला दर्शन दिले आणि तो म्हणाला –

**किमर्थं तप्यसे राजन्ब्रूहि यत्ते विवक्षितम् ।**
**वरदोऽस्मि वरो यस्ते काङ्क्षितः सोऽभिधीयताम् ।। १४**

हे राजा, तू कशाकरिता तप करीत आहेस ? तुला काय पाहिजे आहे ? मी वर देण्यास उद्युक्त झालो आहे. तेव्हा तू इच्छिला असशील तो वर मागून घे.

**यदि तुष्टो महादेव धनुर्वेदो ममानघ ।**
**साङ्गोपाङ्गोपनिषदः सरहस्यः प्रदीयताम् ।। १६**

**यानि देवेषु चास्त्राणि दानवेषु महर्षिषु ।**
**गन्धर्वयक्षरक्षःसु प्रतिभान्तु ममानघ ।। १७**

**तव प्रसादाद्भवतु देवदेव ममेप्सितम् ।**
**एवमस्त्विति देवेशो वाक्यमुक्त्वा गतस्तदा ।। १८**

'हे महादेव, हे निष्पाप, आपण जर संतुष्ट झाला असाल, तर अंगे, प्रत्यंगे, मंत्र आणि रहस्य यांसहवर्तमान मला धनुर्वेद द्या; आणि हे निष्पाप ! देव, दानव, महर्षी, गंधर्व, यक्ष आणि राक्षस यांच्यापाशी जी अस्त्रे असतील त्यांची मला स्फूर्ती होवो. हे देवाधिदेव, आपल्या प्रसादाने माझी ही इच्छा परिपूर्ण व्हावी.' त्यावर 'ठीक आहे' असे म्हणून देवाधिदेव शंकराने अनुमती दिली.

हा वर प्राप्त झाल्याने वसिष्ठाचा नाश झालाच, असे विश्वामित्राला वाटू लागले. दाहक अस्त्रे सोडून तो वसिष्ठाच्या आश्रमाला त्रस्त करू लागला. तेव्हा वसिष्ठाच्या आश्रमातील सर्व प्राणिमात्र भयभीत होऊन दाही दिशांना पळू लागले आणि थोड्याच अवधीत वसिष्ठाच्या आश्रमात शुकशुकाट झाला.

हा याचित वर आहे.

## १६. ब्रह्मदेव < विश्वामित्र बालकाण्ड/६५

विश्वामित्राला ब्रह्मर्षिपद कसे प्राप्त झाले, याविषयी शतानंद रामाला कथन करीत आहे.

क्षात्रतेजापेक्षा ब्रह्मतेज अधिक प्रभावी आहे, असे प्रत्ययास आल्यावर 'ब्रह्मर्षी' होण्याच्या उद्देशाने विश्वामित्राने घोर तप आरंभिले. मौनव्रत धारण करून, श्वासोच्छ्वास न करता एक हजार वर्षे तपश्चर्या केली असता त्याच्या मस्तकातून धूर निघू लागला. त्या धुराने सारे त्रैलोक्य संतप्त होऊन गोंधळले. देव, ऋषी, गंधर्व, पन्नग, उरग राक्षस त्याच्या तपोरूपी तेजाने मोहित झाले. सूर्यही निस्तेज बनला. तेव्हा ते सर्व ब्रह्मदेवाकडे जाऊन म्हणाले —'तपाच्या योगाने विश्वामित्राचे माहात्म्य वाढतच आहे. कामक्रोधादी कोणताही दोष त्याचे ठायी दिसत नाही. तेव्हा ह्याने मनात ज्याची इच्छा केली आहे, ते त्याला मिळाले नाही, तर स्थावर-जंगमात्मक प्राण्यांसह त्रैलोक्याचा नाश संभवेल. ह्या अग्नितुल्य मुनीला कसेही करून प्रसन्न केले पाहिजे. त्याला देवराज्य हवे असेल, तरी ते द्यावे आणि त्रैलोक्याचा संभाव्य नाश

टाळावा.’ देवांची विनंती मान्य करून ब्रह्मदेव प्रभृती सर्व देव विश्वामित्राला म्हणाले –

ब्रह्मर्षे स्वागतं तेऽस्तु तपसा स्म सुतोषिताः ।।–१९
ब्राह्मण्यं तपसोग्रेण प्राप्तवानसि कौशिक ।
दीर्घमायुश्च ते ब्रह्मन्ददामि समरुद्गणः ।। २०
स्वस्ति प्राप्नुहि भद्रं ते गच्छ सौम्य यथासुखम् ।–२१

‘ हे ब्रह्मर्षे, तुझे स्वागत असो. तुझ्या तपाने आम्ही फारच संतुष्ट झालो आहो. हे कुशिकवंशजा, उग्र तपाच्या योगाने तुला ब्राह्मण्य प्राप्त झाले आहे. हे ब्रह्मन्, मरुद्गणांसहवर्तमान तुला दीर्घ आयुष्य देतो. हे सत्त्वगुण-संपन्न मुने, तुला सुखप्राप्ती होवो. तुझे कल्याण असो. तपश्चर्या समाप्त करून तू आता खुशाल पाहिजे तिकडे जा. ’ हे ऐकून विश्वामित्र अतिशय आनंदित झाला आणि देवांना प्रणाम करून म्हणाला. –

ब्राह्मण्यं यदि मे प्राप्तं दीर्घमायुस्तथैव च ।। – २२
ॐ कारोऽथ वषट्कारो वेदाश्च वरयन्तु माम् ।
क्षत्रवेदविदां श्रेष्ठो ब्रह्मवेदविदामपि ।। २३
ब्रह्मपुत्रो वसिष्ठो मामेवं वदतु देवताः ।
यद्येवं परमः कामः कृतो यान्तु सुरर्षभाः ।। २४

‘ब्राह्मण्य आणि त्याचप्रमाणे दीर्घायुष्य जर मला प्राप्त झाले असेल तर ॐकार, वषट्कार आणि वेद मला वरोत. सारांश अध्यापन, याजन वगैरे कर्मे करण्याचा मला अधिकार येवो आणि धनुर्विद्या जाणणाऱ्या मध्येही श्रेष्ठ असलेला ब्रह्मपुत्र वसिष्ठ मला ब्राह्मण म्हणो. अशा प्रकारे जर माझा मनोरथ सिद्धीस गेला असेल, तर हे सुरश्रेष्ठांनो, आपण स्वस्थानी जावे. ’

वसिष्ठाने विश्वामित्राला ‘ ब्रह्मर्षी ’ म्हणावे, यासाठी देवांनी वसिष्ठाचे मन वळविले. त्यानेही त्यांच्या विनंतीला मान्यता देऊन विश्वामित्राशी सख्य साधले.

ब्रह्मर्षिस्त्वं न सन्देहः सर्वं सम्पद्यते तव ।– २६

'तू ब्रह्मर्षी झालास यात संशय नाही. ब्राह्मण्य-प्राप्तीला जे काही आवश्यक आहे, ते सर्व तुला प्राप्त झाले आहे,' असे विश्वामित्राला सांगून देव स्वस्थानी गेले.

हा याचित वर आहे.

## १७. कैकेयी < मंथरा अयोध्याकाण्ड/७

रामाला यौवराज्याभिषेक होणार असल्याची अत्यंत दुष्ट वार्ता कैकेयीला सांगून तिला वेळीच सावध करण्याचा मंथरेचा प्रयत्न असफल झाला. कारण ही वार्ता ऐकून कैकेयी अतिशय आनंदित झाली. कैकेयीच्या भावी जीवनाचा विचार करता ही वार्ता किती अशुभ, भयानक आणि तिचे जीवन उध्वस्त करून टाकणारी आहे, हे कैकेयीला पटवून देण्याची मंथरेने शिकस्त केली. कैकेयीच्या हिताच्या चार गोष्टी तिने तिला परोपरीने सांगितल्या. परंतु कैकेयीला त्या रुचल्या नाहीत, उलट ही अत्यंत प्रिय वार्ता ऐकून 'शुभ' नावाचे एक दिव्य भूषण तिला दिले. तिला आणखी काय द्यावे, असा तिला प्रश्न पडला. राम आणि भरत यांमध्ये ती कसलाही भेद मानत नव्हती. रामाला यौवराज्याभिषेक होणार, हे ऐकून अत्यंत संतुष्ट झालेली कैकेयी मंथरेला म्हणाली–

न मे परं किंचिदितो वरं पुनः
प्रियं प्रियार्हे सुवचं वचोऽमृतम् ।
तथा ह्यवोचस्त्वमतः प्रियोत्तरं
वरं परं ते प्रददामि तं वृणु ।। ३६

'हे प्रियदानयोग्य मंथरे, ह्या तुझ्या प्रिय वार्तेपेक्षा मला कोणतेही चांगले भाषण अधिक प्रिय नाही. कारण तू अशीच काही अमृततुल्य वार्ता मला कथन केली आहेस. ह्याकरिता प्रिय वार्ता श्रवण केल्यानंतर मी तुला श्रेष्ठ वर देते. तो मागून घे.'

प्रत्यक्षात हा वर दिला गेला नाही व मंथरेनेही त्याचा स्वीकार केलेला नाही. मंथरेने वर मागितला नसताही संतुष्ट झालेल्या कैकेयीने तो देऊ केला आहे, म्हणून हा अयाचित वर होय. कैकेयीने मंथरेला दिलेले 'शुभ' भूषण मात्र वर नसून देणगी आहे.

## १८. अलर्क < अंध ब्राह्मण अयोध्याकाण्ड/१२

वचनपूर्तीसाठी केवढाही मोठा त्याग करावा लागला तरी तो करणे किती आवश्यक आहे, हे पटवून देण्यासाठी कैकेयी दशरथाला निरनिराळी उदाहरणे देत आहे.

देव-दानवांच्या युद्ध-प्रसंगी रथाच्या मोडलेल्या आसाच्या जागी स्वताचा हात घालून कैकेयीने दशरथाला यशप्राप्तीसाठी बहुमोल साहाय्य केले होते. तेव्हा संतुष्ट झालेल्या दशरथानें तिला देऊ केलेले दोन वर तिने योग्य वेळी मागून घेईन, असे सांगितले. रामाला यौवराज्याभिषेक करण्याचे दशरथाने योजिले असता मंथरेनें तिचा मत्सर जागृत केला. पूर्वी दिलेले वर मागून घेण्यास हीच वेळ योग्य आहे, असे मानून तिने दशरथाशी वर मागण्याचे ठरविले. वर मागण्यापूर्वी वचनपूर्तीसाठी तिने दशरथाकडून शपथ घेवविली होती; इतकेच नव्हे तर–'सत्य-प्रतिज्ञ, महातेजस्वी, धर्मज्ञ, सत्यवक्ता, आणि आचरणाने शुद्ध असा राजा मला वर देत आहे', असे सर्व देवांना तिने आवर्जून सांगितले होते. काममोहित होऊन वर देण्यास उद्युक्त झालेल्या राजाला प्रथम शब्दांनी बांधून घेऊन मगच तिने रामाला वनवास आणि भरताला यौवराज्याभिषेक हे दोन वर मागून घेतले. कैकेयीचे शब्द ऐकून दशरथ राजा मूर्च्छित झाला. शुद्धीवर आल्यानंतर त्याने कैकेयीची अत्यंत क्रुद्ध होऊन निर्भर्त्सना केली. वर देऊ केल्याचा त्याला पश्चात्ताप झाला. अनेक रीतींनी त्यानें तिची समजूत पटवून देण्याचा विफल प्रयत्न केला. त्याच्या बोलण्याचा तिच्या मनावर सुपरिणाम तर झाला नाहीच, परंतु दिलेले वचन मोडू पाहणाऱ्या दशरथाची तिने दाहक शब्दांत निर्भर्त्सना केली. सत्यप्रतिज्ञ पुरुषांनी दिलेल्या वचनाच्या परिपूर्तीसाठी किती विलक्षण त्याग केले आहेत, ते तिने अनेक दाखले देऊन सांगितले.

वचनभंगाने कुलाला कलंक लागेल, असे स्पष्ट बजावले. या संदर्भात तिने शैब्य राजाचे, समुद्राचे व अलर्क राजाचे दाखले दिले.

अलर्क राजाने एका अंध ब्राह्मणाला वर देऊ केला असता, त्या ब्राह्मणानें त्याला त्याचे डोळे मागितले. तेव्हा–

**अलर्कश्चक्षुषी दत्त्वा जगाम गतिमुत्तमाम् ॥ – ४३**

'अलर्क राजा प्रतिज्ञा शेवटास नेण्याकरिता त्याला आपले नेत्र देऊन उत्तम गतीला गेला.'

हा अयाचित वर आहे.

## १९. ऋषी < कैकेय अयोध्याकाण्ड/३५

रामाला वनवासाला धाडण्याच्या हट्टाला पेटलेल्या कैकेयीची सुमंत्र अत्यंत दाहक शब्दांत निर्भर्त्सना करीत आहे.

परिणामांची क्षिती न बाळगता कैकेयीने जेव्हा आपल्या वरांची परिपूर्ती करण्याचा आग्रह धरला, त्या वेळी राजा दशरथ, लक्ष्मण, वसिष्ठादींनी तिची समजूत घालण्याचा हर प्रकारे प्रयत्न केला, निंदा केली; परंतु तिचा दुराग्रह कायम होता. सुमंत्राला तिचा विलक्षण राग आला होता. तिचा मर्मभेद करण्याच्या उद्देशाने तो तिला म्हणाला – 'तू पतीचा व परिणामी सर्व कुलाचा घात करणारी आहेस. तू आपल्या वर्तनाने दशरथ राजाला संतप्त करीत आहेस. वयाच्या क्रमाला अनुसरून राजाच्या मरणानंतर त्याच्या मुलांना राज्ये प्राप्त होत असतात. परंतु इक्ष्वाकुकुलोत्पन्न दशरथ राजा जिवंत असता त्या क्रमाचा लोप करण्याची तू इच्छा करीत आहेस. तुझा पुत्र राजा होवो. भरत पृथ्वीचे परिपालन करो. परंतु जिकडे राम तिकडेच आम्ही जाऊ. तुझ्या देशात कोणत्याही ब्राह्मणाने वास्तव्य करणे योग्य नव्हे; एवढे तुझे कर्म अमर्याद आहे. लिंबाच्या झाडातून कधी मध पाघळत नाही, हेच खरे. तुझा कुलीनपणा तुझ्या आईप्रमाणेच मी समजत आहे. तुझ्या मातेची पापकर्माची आसक्ती मला ऐकून इत्थंभूत ज्ञात आहे.

पितुस्ते वरदः कश्चिद्ददौ वरमनुत्तमम् ।। १८
सर्वभूतरुतं तस्मात्संजज्ञे वसुधाधिपः ।
तेन तिर्यग्गतानां च भूतानां विदितं वचः ।। १९

'एका वरप्रद ऋषीने तुझ्या पित्याला अनुपम वर दिला होता. त्या योगाने सर्व प्राण्यांच्या भाषेचा अर्थ त्या राजाला समजू लागला व त्यामुळे सर्व पशुपक्ष्यांचे भाषण त्याला विदित झाले.'

एकदा तुझा पिता– कैकेय– शय्येवर शयन करीत असता अतिशय तेजस्वी अशा जृंभ पक्ष्यांच्या जोडप्याचे संभाषण त्याला ऐकू आले. आवाजावरून त्याला त्यांचा अभिप्राय कळून आला, म्हणून तो वारंवार हसू लागला. पतीच्या मृत्यूची इच्छा करणारी तुझी माता संतापली आणि तिने त्याच्या हसण्याचे कारण सांगण्याचा आग्रह धरला. तेव्हा राजा तिला म्हणाला– 'मी का हसलो, ते तुला सांगितले, तर मला लागलीच मरण येईल.' ते ऐकून ती म्हणाली, 'तू जग किंवा मर'– पण तुझ्या हसण्याचे कारण मला कळलेच पाहिजे. तिचा हट्ट ती सोडीना. तेव्हा राजा वरप्रद ऋषीकडे गेला व घडलेली सर्व हकिगत त्याने सविस्तरपणें सांगितली. त्याच्याच आदेशावरून त्याने आपल्या भार्येला राजवाड्याबाहेर हाकलून लावले. हे सांगून सुमंत्र कैकेयीला म्हणाला 'तुझे वागणेही तुझ्या आईसारखेच आहे. दुराग्रह सोडून दे आणि पतीच्या इच्छेप्रमाणे वागून तू जनांचे रक्षण कर.'

वरप्रद ऋषीचे नाव आणि त्यानें वर का दिला होता, हे स्पष्ट नाही; त्यामुळें हा वर याचित की अयाचित, हे निश्चितपणे सांगता येत नाही.

## २०. च्यवनभार्गव < कालिंदी अयोध्याकाण्ड/११०

वसिष्ठ ऋषी रामाला रघुवंशातील पुरुषांची महती सांगत आहे.

भरताचा पुत्र असित. याला संग्रामामध्ये हैहय, तालजंघ, शूर शशबिंदू या शत्रूंनी पराजित केले. नंतर तो राजर्षी एका पर्वतावर

जाऊन मरण पावला. मृत्युसमयी त्याच्या दोन भार्या गरोदर होत्या. कालिंदी नावाच्या भार्येने उत्कृष्ट पुत्र प्राप्त होण्याची इच्छा धरून हिमालय पर्वतावर वास्तव्य करणाऱ्या देवतुल्य, तेजस्वी, भगवान् भार्गव मुनीला अभिवंदन केले. तेव्हा–

स तामभ्यवदत्प्रीतो वरेप्सुं पुत्रजन्मनि ।
पुत्रस्ते भविता देवि महात्मा लोकविश्रुतः ।। २१

धार्मिकश्च सुभीमश्च वंशकर्तारिसूदनः ।
श्रुत्वा प्रदक्षिणं कृत्वा मुनिं तमनुमान्य च ।। २२

पुत्रजन्माविषयी वरप्राप्तीची इच्छा करणाऱ्या त्या कालिंदीला मुनी म्हणाला – 'हे राजभार्ये, तुला महात्मा, जगद्विख्यात, धार्मिक, वंश चालविणारा आणि फारच भयंकर शत्रुनाशक असा पुत्र होईल.' हे त्या मुनीचे भाषण ऐकून कालिंदीनें मुनीला प्रदक्षिणा केली व त्याची अनुमती घेऊन ती परत गेली.

यथाकाल ती प्रसूत झाली असता तिला पुत्र झाला. ती गरोदर असताना तिच्या सवतीने तिच्या गर्भाचा नाश करण्याचा हेतूने तिला विष (गर) दिले होते. परंतु त्याचा गर्भावर काही परिणाम न होता कालिंदीचा पुत्र गरासह जन्माला आल्याने त्याचे नाव 'सगर' ठेवले.

सगर-जन्माची कथा बालकाण्डात (सर्ग ७०/३४-३५) आली आहे. पुत्रेच्छेने अभिवादन करणाऱ्या कालिंदीला च्यवन ऋषी म्हणाला–

स तामभ्यवदद्विप्रः पुत्रेप्सुं पुत्रजन्मनि ।
तव कुक्षौ महाभागे सुपुत्रः सुमहाबलः ।। ३४

महावीर्यो महातेजा अचिरात्संजनिष्यति ।
गरेण सहितः श्रीमान्मा शुचः कमलेक्षणे ।। ३५

'हे महाभाग्यवती, अत्यंत बलाढ्य, महावीर्यवान आणि महातेजस्वी असा एक वैभवशाली सत्पुत्र लवकरच विषासहवर्तमान तुझ्या उदरी येईल. हे कमलनयनें, तू शोक करू नकोस.' हे उद्‌गार 'वर' की 'आशीर्वाद'? याचा स्पष्ट उल्लेख वाल्मीकीने केलेला नाही.

मराठी अनुवादात मात्र या उद्गाराचा ‘ वर ’ असा उल्लेख तीन वेळा आला आहे. अयोध्याकाण्डात ‘ वरेप्सुं ’ असा स्पष्ट निर्देश असल्याने हा ‘ वर’ आहे, आशीर्वाद नाही.

हा याचित वर आहे.

## २१. अनसूया < सीता अयोध्याकाण्ड/११८

राम, लक्ष्मण, सीता वनात संचार करीत अत्री ऋषीच्या आश्रमात आले. ऋषीनेही त्यांचा पुत्रवत् स्वीकार केला. अनसूयेला-पत्नीला सीतेचा स्वीकार करण्यास सांगितले. अनसूयेच्या उग्र तपश्चर्येविषयी रामाला ऋषीने सांगितले असता, त्यानेंही सीतेला ऋषिपत्नीकडे जाण्यास अनुमती दिली. सीतेने अनसूयेला अभिवादन केले. तिचे क्षेम कुशल, आरोग्य याविषयी आस्थेनें विचारपूस केली, आणि स्त्रीधर्म, तिचे कर्तव्य इत्यादीविषयी उपदेश केला. सीतेला तो उपदेश अतिशय आवडला. सीतेनेंही आपण कसे वागत आहोत व पतिविषयी आपल्या निष्ठा कशा प्रकारच्या आहेत, हे विस्तारानें सांगितले. ते ऐकून अनसूया संतुष्ट झाली. सीतेचे मस्तक हुंगून ती म्हणाली –

नियमैर्विविधैराप्तं तपो हि महदस्ति मे ।<br>
तत्संश्रित्य बलं सीते छन्दये त्वां शुचिव्रते ।। १४

उपपन्नं च युक्तं च वचनं तव मैथिलि ।<br>
प्रीता चास्म्युचितां सीते करवाणि प्रियं च किम् ।। १५

‘ नाना प्रकारच्या नियमांनी मी मोठे तप संपादन करून ठेवले आहे. तेन्हा त्या तपोबलाचा आश्रय करून तू माझ्यापाशी वर मागावास अशी माझी इच्छा आहे. हे मैथिली, तुझे भाषण अर्थयुक्त असून योग्य आहे. यावरून हे सीते, मी तुझे काय प्रिय करावे, ते सांग. ’

अनसूयेचे भाषण ऐकून सीता विस्मित झाली. ती अनसूयेला म्हणाली– ‘ आपल्या अनुग्रहानेच माझे सर्व काही यथास्थित झाले आहे.

मला कसलीही उणीव नाही.' सीतेचे शब्द ऐकून अनसूया अधिकच प्रसन्न झाली आणि तिने सीतेला दिव्य श्रेष्ठ माला, वस्त्र, भूषणे, उटी आणि मोठे मूल्यवान अनुलेपन दिले.

अयाचित वर देणाऱ्या अनसूयेनेंच तो स्वीकारण्याविषयी सीतेला गळ घातली आहे, परंतु तिने त्याचा स्वीकार केलेला नाही. सीतेला अनसूयेने दिलेल्या माला, वस्त्र, भूषणे, उटी, अनुलेपन इत्यादी गोष्टी ह्या अनुग्रह-स्वरूपाच्या आहेत, वर नाहीत.

## २२. ब्रह्मदेव < विराध अरण्यकाण्ड/३

राम, लक्ष्मण आणि सीता दंडकारण्यात संचार करीत असता, त्यांना एक राक्षस दिसला. तो अतिशय प्रचंड, ओवड-धोबड, बीभत्स आणि कुरूप होता. त्याची मुद्रा भेसूर, डोळे खोल गेलेले आणि उदर विशाल होते. रामलक्ष्मणांनी तापसी वेष धारण करूनही हातात आयुधे घेतली होती. ती पाहून राक्षस क्रुद्ध झाला. त्यांना तो अत्यंत गर्विष्ठपणे म्हणाला– 'मुनिवेषाला न शोभणारी अशी आयुधे धारण करून एकाच स्त्रीचे ठिकाणी रत असलेले असे अधर्मनिष्ठ पापी आणि मुनींच्या नावाला बट्टा लावणारे तुम्ही कोण आहात ? मी विराध नामक राक्षस आहे. ऋषींच्या मासाचे मी भक्षण करीत असतो. वरण्यास योग्य असलेली ही स्त्री माझी भार्या होईल आणि युद्धामध्ये तुम्हा पापरूपी उभयतांचे रुधिर मी प्राशन करीन.' असे म्हणून भयाने थरथरत असलेल्या सीतेला ओढून त्याने तिला आपल्या अंकावर बसविले. ते पाहून राम अत्यंत कष्टी व म्लानवदन झाला. सीतेला परपुरुषाचा स्पर्श झालेला पाहून त्याला विलक्षण वेदना झाल्या. राक्षसाच्या कृतीने शोकाकुल झालेल्या रामाचे क्रुद्ध झालेंल्या लक्ष्मणाने सांत्वन केले आणि राक्षसाच्या पारिपत्यासाठी तो सज्ज झाला. तेव्हा विराधाने पुन: 'तुम्ही कोण? कोठे निघालात?' असा प्रश्न केला असता रामाने आपण इक्ष्वाकुकुलोत्पन्न असल्याचे सांगून 'तू कोण ?' असा प्रतिप्रश्न केला. तो ऐकून विराध म्हणाला–

पुत्रः किल जवस्याहं माता मम शह्रतदा ।
विराध इति मामाहुः पृथिव्यां सर्वराक्षसाः ।। ५

तपसा चाभिसम्प्राप्ता ब्रह्मणो हि प्रसादजा ।
शस्त्रेणावध्यता लोके ऽ छेद्याभेद्यत्वमेव च ।। ६

'मी जव नामक राक्षसाचा पुत्र असून माझी माता शतह्दा होय. ह्या पृथ्वीवर सर्व राक्षस मला विराध असे म्हणतात. मी तपाच्या योगाने ब्रह्मदेवाला प्रसन्न करून घेऊन त्याच्यापासून या लोकामध्ये शस्त्राने अवध्यता, अच्छेद्यता, अभेद्यता ही प्राप्त करून घेतली आहेत.' प्राणदान हवे असेल तर ह्या स्त्रीला येथे सोडून तुम्ही निघून जा. असे तो म्हणाला असता रामाने राक्षसाला बाणांचे तीक्ष्ण प्रहार केले. लक्ष्मणानेही त्याच्यावर बाणांची वृष्टी केली, परंतु त्याच्या शरीरापासून सगळे बाण आपोआप गळून पडू लागले; कारण

'स्पर्शात्तु वरदानेन प्राणान्संरोध्य राक्षसः ।–१७

'वरदानामुळे अत्यंत वेदना झाल्या असताही त्याचे प्राण गेले नाहीत.'

नंतर विराध रामाला शरण आला व आपल्या मृत्यूचा उपाय त्यानेंच सांगितला. तेव्हा रामाने त्याच्या सांगण्याप्रमाणे त्याला खड्डयात पुरून गतप्राण केले.

हा याचित वर आहे.

## २३. इंद्र < शरभंग

अरण्यकाण्ड/५

विराध राक्षसाचा वध केल्यानंतर राम, लक्ष्मण आणि सीता शरभंग ऋषीच्या आश्रमाला आले. कारण अत्यंत पीडादायक आणि गमन करण्यास अयोग्य अशा वनात राहण्याचा त्यांना अनुभव नव्हता. त्या आश्रमाच्या जवळ येत असता रामाला एक अद्‌भुत प्रकार दिसला. अनेक महात्म्यांनी परिवेष्टित असा इंद्र आपल्या दिव्य रथातून ऋषीच्या

आश्रमाकडे येत होता. रामाने इंद्राला ओळखले व लक्ष्मणाला त्याने रथारूढ इंद्र दाखविला. शरभंग ऋषीचे व त्याचे काही संभाषण चालू असताच इंद्राला राम येत असल्याचे समजले. तेव्हा घाईघाईने शरभंग ऋषीची आज्ञा घेऊन इंद्र स्वर्लोकी गेला. कारण त्याला त्या वेळी रामाला भेटावयाचे नव्हते. रावणाला त्याने जिंकल्यानंतर तो त्याला दर्शन देणार होता. राम, लक्ष्मण, सीता यांनी ऋषीला वंदन केले व मुनीनेही त्यांचे भोजनादी आतिथ्य करून त्यांच्या निवासाची व्यवस्था केली. रामाने इंद्राच्या आगमनाविषयी पृच्छा केली असता शरभंग मुनी म्हणाला–

मामेष वरदो राम ब्रह्मलोकं निनीषति ।
जितमुग्रेण तपसा दुष्प्रापमकृतात्मभिः ॥ २८

‘रामा, चित्तशुद्धी न केलेल्या पुरुषांना प्राप्त होण्यास दुर्धर असा तो ब्रह्मलोक मी उग्र तपश्चर्येने संपादन करून ठेवला आहे.’ त्या ब्रह्मलोकाला मला नेण्याची हा वरप्रद इंद्र इच्छा करीत आहे. परंतु रामासारखा अतिथी जवळ येत असल्याचे पाहून शरभंगाने ब्रह्मलोकाला जाण्याचा विचार पुढे ढकलला.

इंद्राला ‘वरद’ हे विशेषण दिले असले, तरी वराबाबत स्पष्ट तपशील नाही.

## २४. शरभंग < राम अरण्यकाण्ड/५

पहा वर – इंद्र < शरभंग पृ. १५८–१५९

ब्रह्मलोकी घेऊन जाण्यास साक्षात् इंद्र आला असताही रामासारखा अतिथी येत असल्याचे पाहून शरभंगाने त्याचेबरोबर जाण्याचे नाकारले. तो रामाला म्हणाला, ‘तुझ्यासारख्या धर्मनिष्ठ महात्म्याची भेट घेऊन नंतरच निकृष्ट स्वर्ग आणि उत्कृष्ट ब्रह्मलोकाला जाण्याचे मी योजिले आहे.’

अक्षया नरशार्दूल जिता लोका मया शुभाः ।
ब्राह्म्याश्च नाकपृष्ठ्याश्च प्रतिगृह्णीष्व मामकान् ॥ ३१

'हे पुरुषोत्तमा, मी तपश्चर्येच्या योगाने अक्षय व शुभ असे ब्रह्मलोक आणि स्वर्गलोक संपादन करून ठेवले आहेत. त्या माझ्या लोकांचा तू स्वीकार कर.' हे ऐकून राम मुनीला म्हणाला–

अहमेवाहरिष्यामि सर्वांल्लोकान्महामुने ।
आवासं त्वहमिच्छामि प्रदिष्टमिह कानने ।। ३३

'हे महामुने, मीच तपश्चर्येने सर्व लोक संपादन करीन. आपण फक्त ह्या अरण्यामध्ये वास्तव्य करण्याकरिता एक जागा दाखवून द्यावी, एवढीच माझी इच्छा आहे.'

शरभंग मुनीने रामाला सुतीक्ष्ण मुनीच्या आश्रमाला जाण्यास सांगितले.

हा अयाचित आणि अस्वीकृत वर आहे.

## २५ ब्रह्मदेव < मारीच                                        अरण्यकाण्ड/३८

सीताहरणाच्या कृत्यात साहाय्याची याचना करणाऱ्या रावणाला मारीच हितोपदेश करीत आहे.

रामाशी वैर करणे, त्याच्या स्त्रीचे अपहरण करणे हे रावणाच्या स्वताच्या आणि त्याच्या बांधवांच्या हिताचे नाही, असे मारीच रावणाला परोपरीने सांगत आहे. कारण रामाच्या सामर्थ्याचा त्याला अनुभव आहे. रामाने त्याची केलेली दुर्दशा त्याने रावणाला सविस्तरपणे सांगितली. त्याच्या नाशासाठी विश्वामित्राने दशरथाकडे जाऊन रामाला यज्ञ-संरक्षणार्थ धाडण्याची विनंती केली होती; याचे कारण राक्षसांचा निःपात करण्याचे सामर्थ्य रामाशिवाय अन्य कुणाजवळही नाही, हे त्याला ज्ञात होते. मारीच स्वताविषयी सांगतो–

ततोऽहं मेघसंकाशस्तप्तकाञ्चनकुण्डलः ।
बली दत्तवरो दर्पादाजगामाश्रमान्तरम् ।। १६

'तदनंतर मेघतुल्य, शुद्ध सुवर्णाची कुण्डले धारण केलेला आणि

महाबलाढ्य असा मी देवांना अवध्य म्हणून ब्रह्मदेवाचा वर प्राप्त झाला असल्यामुळे गर्वाने आश्रमामध्ये आलो.'

रामाने प्रथम परिघ संज्ञक आयुध घेऊन प्रवेश करणाऱ्या मला पाहिले नाही, परंतु मी दिसताच यत्किंचितही न घाबरता त्याने आपल्या धनुष्याला प्रत्यंचा चढविली. तो बालक आहे, असे समजून त्याला दुर्लक्षून मी वेदीकडे धाव घेतली. परंतु रामाने एक तीक्ष्ण बाण सोडून समुद्रामध्ये शंभर योजने दूर मला फेकून दिले, असे मारीचाने स्वताच कबूल केले आहे. माझा वध करण्याचीं त्याची इच्छा नसल्यामुळेच मी वाचलो, असेही त्याने सांगितले.

रामाशी कलह उपस्थित केल्यास घोर विपत्ती प्राप्त होऊन तुझा सत्वर नाश होईल, असा इशाराही त्याने रावणास दिला.

याला वर का व कसा प्राप्त झाला, हे स्पष्ट नसल्याने हा वर याचित की अयाचित आहे, हे सांगणे कठीण आहे.

## २६. इंद्र < सीता अरण्यकाण्ड/ प्रक्षिप्त/ ५६ नंतर

रावणाने सीतेला जबरदस्तीने पळवून नेऊन लंकेत अशोकवनात राक्षसींच्या नजरकैदेत ठेवले असता, तिने जगण्यास आवश्यक अशा अन्नोदकाचा त्याग केला. त्यामुळे ब्रह्मदेवाला मोठी चिंता उत्पन्न झाली. सीतेने प्राणत्याग करू नये, म्हणून त्याने इंद्राला लंकेत जाण्यास आणि प्रयत्नांची पराकाष्ठा करून तिला उत्कृष्ट हविष्यान्न अर्पण करण्यास सांगितले. इंद्राने आपल्याबरोबर निद्रेला घेतले. आणि राक्षसींना मोह पाडण्याची आज्ञा केली. राक्षसी मोहित झाल्यावर इंद्राने सीतेची भेट घेतली आणि आपल्या आगमनाचा हेतू स्पष्ट करून सांगितला. रामाची योजना देवकार्यासाठी झाली असून त्याला सर्वतोपरी साहाय्य केले जाईल आणि

मत्प्रसादात्समुद्रं स तरिष्यति बलैः सह ।– १३

माझ्या प्रसादामुळे राम सैन्यासह समुद्र तरून जाईल, असे त्याने आश्वासन दिले. राक्षस स्त्रियांना मोह पाडण्यासाठी मीच निद्रेला बरोबर घेऊन आलो असून तुझ्यासाठी हे हविष्यान्न आणले आहे.

एतदत्स्यसि मद्धस्तान्न त्वां बाधिष्यते शुभे ।
क्षुधा तृषा च रम्भोरु वर्षाणामयुतैरपि ।। १५

'हे कल्याणी, जर तू हे भक्षण करशील, तर लाखो वर्षे लोटली, तरी तुला क्षुधेपासून अथवा तृषेपासून पीडा होणार नाही.'

भेट होण्याकरिता आलेली व्यक्ती इंद्रच आहे, याची खात्री करून घेण्यासाठी राम-लक्ष्मणांच्या ठायी असलेल्या आणि तिच्या दृष्टोत्पत्तीस आलेल्या देवांच्या चिन्हांचे दर्शन स्वताच्या ठायी दाखविण्याची तिने इंद्राला विनंती केली. इंद्राने तिची खात्री पटवून देताच, तिने हविष्यान्नाचा स्वीकार करण्यास अनुमती दिली.

हा वर की इंद्राच्या शक्तीचा प्रभाव? वर असलाच तर तो अयाचित होय. हविष्यान्नाची प्राप्ती ही अनुग्रह-स्वरूपाची आहे.

## २७, तपस्वी < शबरी — अरण्यकाण्ड/७४

कबंधाने दाखविलेल्या मार्गानुसार पंपा सरोवराच्या अनुरोधाने जाणाऱ्या राम–लक्ष्मणांना वाटेत शबरीचा आश्रम लागला. असंख्य वृक्षांनी व्याप्त आणि वनसौंदर्याने नटलेला तो आश्रम अत्यंत रमणीय होता. ते शबरी समीप गेले असता ती आनंदित झाली. तिने अत्यंत विनयपूर्वक हात जोडून पाद्य, आचमनीय इत्यादींनी त्यांचे यथोचित स्वागत केले. रामाने तिला तिचे तप, त्यात विघ्न आणणाऱ्या षड्रिपूंचे दमन, कोपनिग्रह, स्वाधीन आहार, नियमांचे पालन इत्यादी अनेक प्रश्न विचारून तिचे कुशल जाणून घेतले. ती रामाला विनयाने म्हणाली– 'तुझ्या दर्शनामुळे आज माझ्या तपाची सिद्धी मला प्राप्त झाली. आज माझा जन्म सफल झाला. उत्कृष्ट रीतीने गुरु-शुश्रूषा केल्याचे आज सार्थक झाले. तुज शूर पुरुषश्रेष्ठाचे माझ्या हातून पूजन झाल्यामुळे

मला आता स्वर्ग-प्राप्तीही होईल. तुझ्या सौम्य दृष्टीने मी आज पवित्र झाले आहे. तुझ्या प्रसादामुळे मला अक्षय लोक प्राप्त होणार आहेत.'

चित्रकूटं त्वयि प्राप्ते विमानैरतुलप्रभैः ।
इतस्ते दिवमारूढा यानहं पर्यचारिषम् ।। १४
तैश्चाहमुक्ता धर्मज्ञैर्महाभागैर्महर्षिभिः ।
आगमिष्यति ते रामः सुपुण्यमिममाश्रमम् ।। १५
स ते प्रतिग्रहीतव्यः सौमित्रिसहितोऽतिथिः ।
तं च दृष्ट्वा वरांल्लोकानक्षयांस्त्वं गमिष्यसि ।। १६

'तू चित्रकूट पर्वताला येता क्षणी, अतुल प्रभेने युक्त असलेल्या विमानांच्या योगाने ह्या आश्रमातून मी सेवा केलेले तपस्वी लोक स्वर्गाला चालते झाले. जाता जाता ते धर्मवेत्ते महाभाग्यवान महर्षी मला म्हणाले– ह्या तुझ्या महापुण्यदायक आश्रमामध्ये राम येईल आणि लक्ष्मणासहवर्तमान तो अतिथी राम आला असता, तू त्याचे स्वागत कर. कारण त्याचे दर्शन झाल्यावर तुला अक्षय असे उत्तम लोक प्राप्त होतील.'

असे त्यांनी सांगितल्याने त्यांच्या स्वागतासाठी अनेक वन्य पदार्थ गोळा करून ठेवल्याचे तिने रामाला सांगून त्याचा स्वीकार करण्याची विनंती केली.

शबरीच्या वन्य फळांचा स्वीकार करून राम तिला म्हणाला– 'हे कल्याणी, तू माझे पूजन केले आहेस. आता अनायासे तुझा मनोरथ पूर्ण होईल.' रामाने अनुज्ञा दिल्यावर शबरी अग्नीमध्ये आपले हवन करून स्वर्गाला गेली. जाता जाता दिव्य अलंकार, दिव्य पुष्पे, दिव्य चंदन आणि दिव्य वस्त्रे यांनी ती युक्त झाली.

तपस्वींचे सांगणे ही सदिच्छा का वर? वर असलाच तर तो अयाचित होय. दिव्य पुष्पे, चंदन आणि वस्त्रे यांची प्राप्ती हा वर नसून अनुग्रह आहे.

## २८. १९ दुंदुभी किष्किन्धाकाण्ड/११

सुग्रीव रामाला वालीच्या अतुल सामर्थ्याबावत कथन करीत आहे.

ब्राह्ममुहूर्तावर उठून सूर्योदयापूर्वी वाली यत्किंचितही श्रमी न होता पश्चिम समुद्रापासून पूर्व समुद्रापर्यंत आणि दक्षिण समुद्रापासून उत्तर समुद्रापर्यंत रोज फेरी मारत असतो. पर्वतारोहण करून वेगाने उड्डाण करतो आणि पर्वतांची शिखरे चेंडूप्रमाणे हाताळतो. मोठमोठे वृक्ष तो हाताने मोडतो.

कैलास पर्वताच्या शिखरासारख्या प्रभेने युक्त आणि महिषरूप धारण केलेला दुंदुभी नावाचा एक दैत्य होता. त्याचे ठायी सहस्त्र गजांचे बल होते.

स वीर्योत्सेकदुष्टात्मा वरदानेन मोहितः ।– ८

‘ वरप्रदानामुळे मोहित होऊन वीर्याच्या गर्वाने दुरात्मा बनलेला, तो राक्षस समुद्राकडे गेला व त्याने त्याला युद्धार्थ आव्हान दिले. त्याच्याशी युद्ध करण्याची असमर्थता प्रकट करून समुद्राने त्याला हिमवान पर्वताकडे जाण्यास सांगितले. ‘ मी रणकर्मात प्रवीण नाही ’, अशी हिमवानाने कबुली देऊन त्याला वालीकडे जाण्यास सांगितले. वालीने त्याला ठार केले.

दुंदुभीला वर कोणी दिला, याचा स्पष्ट उल्लेख नाही. त्याने तो तपश्चर्येने मिळवला असल्याने याचित वर होय.

## २९. आदित्य ( सूर्य ) < मेरू किष्किन्धाकाण्ड/४२

सुग्रीवाने सीतेच्या शोधार्थ कपिश्रेष्ठांना अनेक वानरांसह निर-निराळ्या दिशांना धाडले. पश्चिम दिशेला शोध घेण्याचे काम मरीची महर्षीच्या पुत्राकडे सोपविले. त्यांचा प्रमुख अर्चिष्मन यास सुग्रीव सूक्ष्म तपशिलासह मार्गदर्शन करताना मेरू पर्वताविषयी सांगत आहे.

विविध पर्वतांचे उल्लंघन केल्यानंतर एक इंद्ररक्षित महापर्वत लागेल. त्याच्या पलीकडे साठ हजार पर्वतांचा एक समूह आहे. ते सर्व पर्वत कांतीने बालसूर्याप्रमाणे असून सर्व बाजूंनी झळकणारे आहेत. त्या पर्वतांच्या मध्यभागी त्यांचा राजा मेरू नावाचा पर्वत आहे.

आदित्येन प्रसन्नेन शैलो दत्तवरः पुरा ।।– ३८

तेनैवमुक्तः शैलेन्द्रः सर्व एव त्वदाश्रयाः ।
मत्प्रसादाद्भविष्यन्ति दिवा रात्रौ च काञ्चनाः ।। ३९

त्वयि ये चापि वत्स्यन्ति देवगन्धर्वदानवाः ।
ते भविष्यन्ति भक्ताश्च प्रभया काञ्चनप्रभाः ।। ४०

त्या पर्वताला सूर्याने प्रसन्न होऊन पूर्वी वर दिला आहे. सूर्य त्या पर्वतराजाला असे म्हणाला की– 'तुझ्या आश्रयाला राहणारे सर्व रात्रंदिवस माझ्या प्रसादामुळे सुवर्णमय होतील आणि तुझ्यावर जे देव, गंधर्व आणि दानव वास्तव्य करतील, तेही माझे भक्त होतील व त्यांची कांती सुवर्णासारखी होईल.'

स्पष्ट उल्लेखाच्या अभावी वर याचित की अयाचित याचा निश्चय करता येत नाही.

### ३०. ब्रह्मदेव < मय किष्किन्धाकाण्ड/५१

हनुमानाच्या विनंतीवरून स्वयंप्रभा ऋक्ष-बिळाचे वृत्त कथन करीत आहे.

मयो नाम महातेजा मायावी वानरर्षभ ।। –१०

तेनेदं निर्मितं सर्वं मायया काञ्चनं वनम् ।
पुरा दानवमुख्यानां विश्वकर्मा बभूव ह ।। ११
येनेदं काञ्चनं दिव्यं निर्मितं भवनोत्तमम् ।

स तु वर्षसहस्राणि तपस्तप्त्वा महद्वने ।। १२
पितामहाद्वरं लेभे सर्वमौशनसं धनम् । –१३

'हे वानरश्रेष्ठा, मय म्हणून एक महातेजस्वी मायावी आहे आणि त्याने मायेच्या योगाने हे सर्व सौवर्णवन निर्माण केले आहे. पूर्वी श्रेष्ठ श्रेष्ठ दानवांचा तो शिल्पी होता, हे प्रसिद्ध आहे; आणि त्यानेच दिव्य व सर्वोत्कृष्ट असे हे वसतिस्थान तयार केले आहे. मोठ्या अरण्यामध्ये हजारो वर्षे तपश्चर्या केल्यावर ब्रह्मदेवापासून त्याला वर प्राप्त झाला आणि त्यामुळे उशन (शुक्राचार्य) महर्षीने ग्रथित केलेले सर्व शिल्पशास्त्र-स्वरूप धन त्याला मिळाले.'

हवा तो भोग्य पदार्थ उत्पन्न करण्याचे सामर्थ्य असलेला तो बलाढ्य मयदानव हे सर्व निर्माण करून त्या महावनामध्ये काही काळ-पर्यंत सुखाने राहिला. परंतु हेमा नामक अप्सरेच्या ठिकाणी तो लंपट झाल्याने इंद्राने त्याचा वज्राघाताने प्राण घेतला.

हा याचित वर होय.

## ३१. हेमा < स्वयंप्रभा किष्किन्धाकाण्ड/५१

स्वयंप्रभा हनुमानाला त्याच्या विनंतीवरून ऋक्षबिळ-वृत्त कथन करीत आहे.

सीतेच्या शोधार्थ अरण्यात संचार करीत करीत हनुमानादी वान-रांनी ऋक्षबिळात प्रवेश केला. तेथील अपूर्व सौंदर्य आणि वैभव पाहून ते आश्चर्यचकित झाले. तेथे त्यांना वल्कले व कृष्णाजिन परिधान केलेली एक तपस्विनी दिसली. तिने त्या सर्वांचे यथायोग्य आदरातिथ्य केले आणि हनुमानाच्या विनंतीवरून ऋक्षबिळाचे वृत्त कथन केले. मयाने निर्माण केलेले सौवर्णवन, अक्षय भोग्य पदार्थ व सुवर्णमय वसतिस्थान इंद्राने त्याचा वध केल्यानंतर ब्रह्मदेवाने त्याची भार्या हेमा या अप्सरेला दिले. हे सांगून स्वयंप्रभा स्वताची माहिती सांगते—

दुहिता मेरुसावर्णेरहं तस्याः स्वयंप्रभा ।।–१६
इदं रक्षामि भवनं हेमाया वानरोत्तम ।
मम प्रियसखी हेमा नृत्तगीतविशारदा ।। १७
तया दत्तवरा चास्मि रक्षामि भवनं महत् ।–१८

'मी मेरुसावर्णीची स्वयंप्रभा नामक कन्या आहे व त्या हेमा अप्सरेचे हे वसतिस्थान संभाळीत आहे. नृत्य आणि गायन यांमध्ये निष्णात असलेली ती हेमा माझी प्रिय सखी आहे आणि रक्षणसामर्थ्याविषयी तिने मला वर दिला असल्यामुळे मी ह्या प्रचंड गृहाचे रक्षण करीत आहे.'

नंतर तिने हनुमानाला त्याच्या आगमनाचे कारण विचारून हे दुर्गम वन त्यांच्या दृष्टीस कसे पडले, ते कथन करण्यास सांगितले.

हा वर अयाचित असावा.

## ३२. हनुमान < स्वयंप्रभा किष्किन्धाकाण्ड/५२

हेमा अप्सरेची सखी स्वयंप्रभा ऋक्षबिळाचे संरक्षण करीत असता तेथे प्रविष्ट झालेल्या हनुमानादी वानरांना तिने त्यांची हकिगत सांगण्यास विनंती केली. सीतेच्या शोधार्थ संचार करीत करीत ते सारे तेथे कसे येऊन पोहोचले, हे वृत्त हनुमानाने इत्थंभूत सांगितले. तो कृतज्ञतापूर्वक म्हणाला——

त्वां चैवोपगताः सर्वे परिद्यूना बुभुक्षिताः ।
आतिथ्यधर्मदत्तानि मूलानि च फलानि च ॥ १६

अस्माभिरुपयुक्तानि बुभुक्षापरिपीडितैः ।
यत्त्वया रक्षिताः सर्वे म्रियमाणा बुभुक्षया ॥ १७

ब्रूहि प्रत्युपकारार्थं किं ते कुर्वन्तु वानराः । –१८

'आम्ही सर्वजण बुभुक्षित व खिन्न होऊन तुझ्या समीप आलो, याचे तरी कारण हेच. आम्ही अतिथी समजून आम्हांला दिलेली मुळे व फळे क्षुधेने व्याकुळ झाल्यामुळे आम्ही भक्षण केली. तस्मात् क्षुधेने आम्ही मृत्युपंथाला लागलो असताना, ज्या अर्थी तू सर्व वानरांचे रक्षण केले आहेस, त्या अर्थी या उपकाराची फेड होण्याकरिता वानरांनी तुझे काय काम करावे, हे तू सांग.'

तेव्हा स्वयंप्रभा वानरप्रमुख हनुमानाला म्हणाली–

सर्वेषां परितुष्टास्मि वानराणां तरस्विनाम् ।।– १९

चरन्त्या मम धर्मेण न कार्यमिह केनचित् ।– २२

' सर्व बलाढ्य वानरांवर मी प्रसन्न झाले आहे. धर्माने वागत असलेल्या मला कोणाच्याही हातून कसलेही कार्य करून घेण्याचे उरलेले नाही. '

' वर ' असा स्पष्ट उल्लेख वाल्मीकीने केलेला नाही. ' प्रत्युपकारार्थम् ' या शब्दामुळे कृतज्ञता व्यक्त झाली आहे. वर असलाच तर तो अयाचित आणि अस्वीकृत होय.

## ३३. निशाकर < संपाती किष्किन्धाकाण्ड/६२,६३

संपाती वानरांना आपला पूर्व-वृत्तान्त कथन करीत आहे.

भगवान् निशाकर मुनीच्या विनंतीनुसार संपाती आपले पंख कसे दग्ध झाले, हे विस्ताराने सांगत आहे. एकदा गर्वाने मोहित होऊन तो व त्याचा धाकटा भाऊ जटायू यांच्यात स्पर्धा लागली. जो लांब उडून जाईल तो श्रेष्ठ, असे ठरवून ते आकाशात गेले. अनेक प्रदेश, नद्या, पर्वत ओलांडून ते खूप उंच गेले. दिशेचे भान उरले नाही. त्यांना थकवा येऊ लागला व ते भयभीत झाले. अग्नीने दग्ध होत असल्याचा त्यांना अनुभव येऊ लागला. सूर्याकडे पाहिले असता तो खूप मोठा दिसू लागला. काही एक न बोलता जटायू एकदम जमिनीवर कोसळला. पंख पसरून संपातीने त्याच्यावर छाया केली, त्यामुळे तो दग्ध झाला नाही. मात्र उष्णतेमुळे संपातीचे पंख दग्ध झाले व विंध्यपर्वतावर तो गोळा होऊन पडला. भ्रात्यापासून वियोग, राज्यभ्रष्टता आणि पराक्रमहीनता यामुळे दुःखी होऊन मरणाच्या विचाराने पर्वतावरून उडी घेण्याची आपली इच्छा त्याने निशाकर मुनीपाशी प्रकट केली. तेव्हा तो म्हणाला, ' पुढे होणारे एक महत्कार्य मी पुराणात श्रवण केले असून तपश्चर्येच्या योगानेही त्याचे अवलोकन केले आहे. सीतेच्या शोधार्थ येणाऱ्या वानरांना

तुला एक महत्त्वाचे निवेदन करावे लागणार आहे, म्हणून तू हे स्थळ सोडून कोठेही जाणे योग्य नाही.'

पक्षौ च ते प्रपक्षौ च पुनरन्यौ भविष्यतः ।
चक्षुषी चैव प्राणाश्च विक्रमश्च बलं च ते ।। २

'तुला मुख्य पक्ष व उपपक्ष पुनरपि दुसरे फुटतील; आणि त्याप्रमाणे चक्षू, प्राण, पराक्रम व बल ही पण तुझी उत्कृष्ट होतील.'

देशकालौ प्रतीक्षस्व पक्षौ त्वं प्रतिपत्स्यसे ।। –१२

'देश आणि काल ह्यांची तू वाट पहा, म्हणजे तुला आपोआप पंख प्राप्त होतील.'

तो पुढे असेही म्हणाला– 'मी आजच तुला पंखयुक्त केले असते, परंतु पंखांची प्राप्ती झाल्यावर तू हे स्थान सोडून जाण्याचा संभव असल्याने, तुझ्या हातून देवकार्य होणार नाही; म्हणून सांप्रत मी तसे करीत नाही.'

निशाकर मुनीच्या सांगण्याप्रमाणे संपाती विंध्यपर्वतावर वानरांची वाट पहात कालक्रमण करू लागला. वानरसमूह आल्यावर त्यांना आपला पूर्ववृत्तान्त कथन करीत असतानाच–

उत्पेततुस्तदा पक्षौ समक्षं वनचारिणाम् ।
स दृष्ट्वा स्वां तनुं पक्षैरुद्गतैररुणच्छदैः ।। सर्ग ६३–९

'त्या वानरांसमक्ष त्याला पंख फुटले. तेव्हा आपलें शरीर नूतन फुटलेल्या अरुणवर्ण पंखांनी युक्त झाले आहे', असे अवलोकन करून संपातीला अतिशय आनंद झाला.

हा अयाचित वर होय.

## ३४. ब्रह्मदेव < हनुमान किष्किन्धाकाण्ड/६६

जाम्बवान हनुमानाला त्याच्या जन्माचे वृत्त कथन करीत आहे.

अंजनाचे अनुपम सौंदर्य पाहून कामपीडित झालेल्या वायूने तिला आलिंगन देऊन आपले तेज तिच्या ठायी स्थापन केले. आपले पातिव्रत्य कोणाकडून तरी भ्रष्ट होत असल्याचे लक्षात येताच ती गोंधळली. तेव्हा वायू तिला म्हणाला– ' हे सुंदरी, मी तुझा घात करीत नाही. तू मनात भय बाळगू नकोस. तुला आलिंगन देऊन ज्या अर्थी मी मानसिक भोगाच्याच योगाने तुझ्या ठिकाणी आपले तेज ठेवले आहे, त्या अर्थी तुला वीर्यवान व बुद्धिवान पुत्र होईल. तो पुत्र महावीर्यवान, महातेजस्वी, महाबलाढ्य व महापराक्रमी होऊन मार्ग उल्लंघून जाण्यात आणि उडी मारण्यात माझी बरोबरी करील. ' वायूचे बोलणे ऐकून अंजना संतुष्ट झाली आणि एका गुहेत प्रसूत झाली असता, हनुमानाचा जन्म झाला. सूर्योदय पाहताच ते फळ आहे, असे वाटून ते घेण्याकरिता उडी मारून अंतरिक्षात तीनशे योजने हनुमान उंच गेला. त्यामुळे क्रुद्ध झालेल्या इंद्राने त्याच्या शरीरावर वज्रप्रहार केला. त्याच्या हनुवटीचा डावा भाग मोडला म्हणून त्याला ' हनुमान ' असे नाव पडले. हनुमानावर इंद्राने वज्रप्रहार केल्याने वायू क्रुद्ध झाला आणि त्याने आपला त्रैलोक्यातील संचार स्थगित केला. तेव्हा सारे त्रैलोक्य व देव घाबरून गेले व वायूला प्रसन्न करून घेऊ लागले.

प्रसादिते च पवने ब्रह्मा तुभ्यं वरं ददौ ।
अशस्त्रवध्यतां तात समरे सत्यविक्रम ॥ २७

देवांनी वायूला प्रसन्न करून घेतले असता 'समरांगणामध्ये शस्त्राच्या योगाने तुझा वध होणार नाही'– असा ब्रह्मदेवाने वर दिला.

हा अयाचित वर आहे.

## ६५. इंद्र < हनुमान किष्किन्धाकाण्ड/६६

जाम्बवान हनुमानाला त्याच्या जन्माचें वृत्त सांगत आहे.

वर – ब्रह्मदेव < हनुमान पृ. १६९–१७०

वज्रस्य च निपातेन विरुजं त्वां समीक्ष्य च।
सहस्त्रनेत्रः प्रीतात्मा ददौ ते वरमुत्तमम् ॥ २८
स्वच्छन्दतश्च मरणं तव स्यादिति वै प्रभो ।- २९

" वज्रप्रहार झाला असताही तुला काही एक इजा झाली नाही, असे अवलोकन करून इंद्राचे मन प्रसन्न झाले आणि ' तू इच्छा-मरणी होशील ', असा त्याने तुला उत्कृष्ट वर दिला. "

हा अयाचित वर आहे.

## ३६. इंद्र < मैनाक सुन्दरकाण्ड/१

लंकेला जाण्यासाठी समुद्रावरून उड्डाण करणाऱ्या हनुमानाला साहाय्य करण्याच्या इच्छेने सागराने त्याच्या उदरात आच्छादित असलेल्या मैनाक पर्वताला वर येण्यास सांगून हनुमानाला त्याच्या शिखरावर थोडा वेळ विश्रांती घेता येईल, अशी व्यवस्था करण्यास सांगितले. त्याप्रमाणे मैनाक समुद्राचे पृष्ठभागातून वर आला. त्याला पाहून हनुमानाला आपल्या मार्गात एक विघ्न उत्पन्न झालें, असे वाटले आणि त्याने आपल्या वक्षःस्थलाची धडक देऊन त्यास समुद्रात खाली पाडले. हनुमानाचें बल पाहून मैनाक संतुष्ट झाला व मनुष्यरूप धारण करून पुन्हा वर आला आणि हनुमानाला म्हणाला– ' हे कपिश्रेष्ठा, तू दुर्घट कर्म केले आहेस. तुला फार लांब–शंभर योजने जावयाचे आहे, तरी माझ्या शिखरावर तू विश्रांती घे. रामहिताविषयी उद्युक्त असलेल्या सागराची तुला हीं विनंती आहे.' त्याने हनुमानाची स्तुती करून आपले पूर्वापार संबंधही कथन केले. पूर्वी पर्वतांना पंख होते व त्यांना इच्छेनुरूप कोठेही भ्रमण करता येत असे. एकदा असेच उड्डाण करीत असता, देवादिकांना पर्वताच्या पतनाची शंका आली; तेंव्हा क्रुद्ध होऊन इंद्रानें वज्रप्रहार करून पर्वतांचे पंख तोडून टाकले. त्या वेळी माझ्याकडें इंद्र येत असलेला अवलोकन करून वायूने– तुझ्या पित्यानें– मला आकाशात उडवून देऊन माझे रक्षण केले आहे, असे सांगून, तू मला वंद्य आहेस, असे म्हटले. हनुमानाने त्याचा भाव जाणला, हाताने त्याला स्पर्श केला

आणि आपली संतुष्टता व्यक्त केली; परंतु उड्डाणात कोठेही थांबावयाचे नाही, अशी प्रतिज्ञा केली असल्याने त्याच्या शिखरावर विश्रांती घेण्यास नकार दिला.

रामाच्या कार्यात साहाय्यभूत होणाऱ्या मैनाक पर्वताच्या उत्थानामुळे इंद्र त्याच्यावर संतुष्ट झाला. मैनाक पर्वतालाही त्याचा आनंद झाला. इंद्र त्याला म्हणाला—

हिरण्यनाभ शैलेन्द्र परितुष्टोऽस्मि ते भृशम्।
अभयं ते प्रयच्छामि गच्छ सौम्य यथासुखम्।। १३९

‘ हे सुवर्णमय पर्वतराजा, मी तुझ्यावर अत्यंत संतुष्ट झालो आहे. मी तुला अभय देतो. हे विनयसंपन्न तू खुशाल चालता हो.’ असा वर दिल्यानंतर तो मैनाकपर्वत जलामध्यें पूर्वीप्रमाणेच मग्न झाला.

स वै दत्तवरः शैलो बभूवावस्थितस्तदा।– १४३

हा अयाचित वर आहे.

## ३७. ब्रह्मदेव < सुरसा सुन्दरकाण्ड/१

कितीही संकटें आली, तरी राक्षसराज रावणाला बांधून आणून सीतेसहवर्तमान परत येईन, अशी प्रतिज्ञा करणाऱ्या हनुमानाच्या पराक्रमाची व बलाची परीक्षा घेण्याच्या उद्देशाने देव, गंधर्व, सिद्ध आणि महर्षी सुरसेला विनंती करीत आहेत.

‘हा वायुपुत्र समुद्रावरून जात असता पर्वतप्राय भयंकर राक्षसरूप धारण कर आणि आकाशाला स्पर्श करण्याइतके मोठें मुख करून तू त्याला क्षणभर विघ्न आण.’ अशी विनंती केली असता हनुमानाचा मार्ग अडवून भीतिदायक राक्षसरूप धारण करून ती त्याला म्हणाली—

मम भक्ष्यः प्रदिष्टस्त्वमीश्वरैर्वानरर्षभ।
अहं त्वां भक्षयिष्यामि प्रविशेदं ममाननम्।। १५०

**वर एष पुरा दत्तो मम धात्रेति सत्वरा।**
**व्यादाय वक्त्रं विपुलं स्थिता सा मारुतेः पुरः॥ १५१**

'ईश्वराने तुज वानरश्रेष्ठाला माझे भक्ष्य नेमिले आहे. ह्यास्तव मी तुला भक्षण करणार! ह्या माझ्या मुखामध्ये तू प्रविष्ट हो. कारण जो समोर येईल तो माझ्या मुखामध्ये प्रविष्ट होईल, असा विधात्याने मला हा पूर्वी वरच देऊन ठेविला आहे.' असे म्हणून तिने आपले मुख विशाल केले. हनुमानानें तिला आपले कार्य किती महत्त्वाचे आहे, हे प्रसन्नपणे सांगून रामाच्या कार्याला मदत करण्यासाठी सुटका करण्याची विनंती केली आणि ही विनंती मान्य करणे शक्य नसेल तर सीतेला आणि उदार कृत्य करणाऱ्या रामाला अवलोकन करून परत येण्याचे प्रतिज्ञेवर कबूल केले. परंतु यथेष्ट रूप धारण करणारी सुरसा त्याला म्हणाली—

अब्रवीन्नातिवर्तेन्मां कश्चिदेष वरो मम ॥– १५६

'माझ्या तावडीतून सुटून कोणीही जाणार नाही, हा तर मला वर मिळालेला आहे.' असे सुरसा सांगत असतानाही हनुमान पुढें जाऊ लागला. तेंव्हा त्याच्या बलाची परीक्षा पाहण्याच्या उद्देशाने ती म्हणाली,

**निविश्य वदनं मेऽद्य गन्तव्यं वानरोत्तम।**
**वर एष पुरा दत्तो मम धात्रेति सत्वरा॥ १५८**

'हे वानरश्रेष्ठा, आता माझ्या मुखामध्यें प्रवेश करून नंतर तू चालता हो. कारण विधात्यानें मला हा पूर्वी वरच दिलेला आहे.' तिने आपले मुख आणखी विस्तृत केले. तेव्हा हनुमान तिला म्हणाला— 'ज्या मुखानें तू मला सहन करू शकशील, ते आपले मुख एकदा हवे तेवढें पसर.' तिनें आपला जवडा खूपच पसरला, तेव्हा हनुमानाने अंगुष्ठा-एवढें रूप धारण केले आणि तो तिच्या मुखात प्रविष्ट झाला व लगेच बाहेर आला व अंतरिक्षात स्थित होत्साता तिला म्हणाला—

**प्रविष्टोऽस्मि हि ते वक्त्रं दाक्षायणि नमोऽस्तु ते।**
**गमिष्ये यत्र वैदेही सत्यश्चासीद वरस्तव॥ १६९**

'अहो दाक्षायणी, नमो नमः ! आपल्या म्हणण्याप्रमाणें मीं आपल्या मुखात प्रविष्ट झालो होतो ! आता जिकडे विदेह राजकन्या सीता आहे, तिकडे मी जातो. आपल्याला मिळालेला वर खरा झाला !' सुरसा देवीनें आपले नेहमीचे रूप धारण केले आणि म्हणाली– 'आता तू कार्यसिद्धीकरिता खुशाल जा आणि महात्म्या रघुवंशज रामाशी सीतेचा समागम करून दे.'

हनुमान वानरांना आपला लंकेचा वृत्तान्त कथन करीत असताना सुरसेच्या वराचा उल्लेख करतो. कार्यसिद्धी होताच तिच्या म्हणण्याप्रमाणे तिच्या मुखात प्रवेश करण्याचे प्रतिज्ञेवर मान्य करून सुद्धा तिने माझी विनंती मान्य केली नाही व ती मला म्हणाली–

अब्रवीन्नातिवर्तेन्मा कश्चिदेष वरो मम ।– १५६

'हा मला प्राप्त झालेला वर व्यर्थ करण्यास कोणीही समर्थ नाही.' असे तिने म्हटल्याचे हनुमानाने सांगितले.

सुरसेला वर का आणि कसा प्राप्त झाला, याची स्पष्टता नाही. त्यामुळे हा वर याचित की अयाचित, हे निश्चितपणे कळू शकत नाही.

## ३८. ब्रह्मदेव < लंकादेवी सुन्दरकाण्ड/३

लंकादेवी हनुमानाला आपले वृत्त कथन करीत आहे.

लंकेत प्रवेश करणाऱ्या हनुमानाला लंकादेवीने विरोध केला. हनुमानाने आपला उद्देश सांगितला असताही ती अतिशय गर्विष्ठपणे त्याच्याशी बोलत होती. तिने हनुमानाला एक चपराक लगावली. हनुमानाने ती स्त्री आहे, हे लक्षात घेऊन आपल्या सामर्थ्याची चुणूक दाखविणारा तिला सौम्य तडाखा दिला; पण तेवढ्यानेही ती जमिनीवर कोसळली. तिचा गर्व ओसरला. स्फुंदत स्फुंदत ती हनुमानाला म्हणाली, 'हे वानरश्रेष्ठा, प्रसन्न हो आणि माझे रक्षण कर. सत्त्वशील असलेले महाबलाढ्य पुरुष ज्या शास्त्रमर्यादेला अनुसरून वागतात, त्याप्रमाण मला क्षमा कर.'

अहं तु नगरी लङ्का स्वयमेव प्लवङ्गम ।
निर्जिताहं त्वया वीर विक्रमेण महाबल ।। ४५

इदं च तथ्यं शृणु मे ब्रुवन्त्या वै हरीश्वर ।
स्वयं स्वयंम्भुवा दत्तं वरदानं यथा मम ।। ४६

यदा त्वां वानरः कश्चिद्विक्रमाद्वशमानयेत् ।
तदा त्वया हि विज्ञेयं रक्षसां भयमागतम् ।। ४७

स हि मे समयः सौम्य प्राप्तोऽद्य तव दर्शनात् । ४८

" हे महाबलाढ्य वीरा, मी स्वता लंकानगरी असून तू माझा पराजय केला आहेस. हे वानराधिपते, हे तथ्य मी तुला कथन करीत आहे, ते तू श्रवण कर. ' पराक्रमाने जेव्हा कोणी वानर तुझा पराजय करील तेव्हा राक्षसांना भय प्राप्त झाले आहे, असे तू समज ' - स्वता ब्रह्मदेवाने मला असे वरदान दिले होते. तो ब्रह्मदेवाने ठरविलेला सत्यसमय आज तुझ्या भेटीमुळे प्राप्त झाला आहे "

असे सांगून तिने हनुमानाला लंकानगरीत प्रवेश दिला आणि इच्छेप्रमाणे सर्व कार्यं उरकून घेण्याची मुभा दिली.

हा वर याचित का अयाचित, हे सांगणें कठीण आहे. हा वर देण्याचे कारणही स्पष्ट नाही.

## ३९. ब्रह्मदेव < हनुमान सुन्दरकाण्ड/४८

हनुमानाने वन, राक्षस, चैत्यप्रासाद यांचा विध्वंस करून मंत्रीपुत्र, जम्बुमाली, विरूपाक्ष, अक्षादी अनेकांना यमसदनी धाडलेले पाहून संतप्त झालेल्या रावणाने इंद्रजिताला त्याचा समाचार घेण्यास सांगितले. इंद्रजित व हनुमान तुल्यबल होते आणि एकमेकाच्या सामर्थ्याची उभयतांना यथायोग्य कल्पना होती. त्या दोघांचे युद्ध सर्वांना थक्क करून सोडणारे झाले. वानर अवध्य आहे, हे धर्मबलाने इंद्रजिताने जाणले होते त्याला अस्त्रांचे चांगले ज्ञान असल्याने त्याने हनुमानावर ब्रह्मा-

स्त्राचा प्रयोग केला. परंतु ब्रह्मास्त्रानेही तो अवध्य आहे, हे जाणून त्याने त्यास ब्रह्मास्त्राने केवळ बांधून टाकले. तेव्हा हनुमान भूतलावर निश्चेष्ट होऊन पडला. परंतु प्रभूच्या कृपेने त्या अस्त्रापासून त्याला यत्किंचित्‌ही पीडा झाली नाही, कारण

ततः स्वायम्भुवैर्मन्त्रैर्ब्रह्मास्त्रं चाभिमन्त्रितम् ।
हनुमांश्चिन्तयामास वरदानं पितामहात् ॥ ४०

ब्रह्मविषयक मंत्रांनी अभिमंत्रण केलेल्या ब्रह्मास्त्राचा बंध आपणाला प्राप्त झाला आहे, असे अवलोकन करून 'माझ्या अस्त्रापासून एका क्षणात तू मुक्त होशील' असा जो वर ब्रह्मदेवाने दिला होता, त्याचे मारुतीने स्मरण केले.

ब्रह्मदेवाचा अनुग्रह आणि अस्त्रबंधातून मुक्त होण्याची आपली शक्ती यांचा क्षणभर विचार करून त्याने ब्रह्मदेवाच्या आज्ञेचे अवलंबन केले. मनाचा निश्चय करून तो निश्चेष्ट पडून राहिला असता राक्षसांनी झाडांच्या सालींनी व तागाच्या दोऱ्यांनी त्याला बांधले. रावणाशी संवाद करण्याची त्याची इच्छा असल्याने राक्षसांनी केलेली त्याची अवहेलना व निर्भर्त्सना त्याने मुकाट्याने सहन केली.

स बद्धस्तेन वल्केन विमुक्तोऽस्त्रेण वीर्यवान् ।
अस्त्रबन्धः स चान्यं हि न बन्धमनुवर्तते ॥ ४८

'तो वीर्यवान हनुमान झाडांच्या साली इत्यादींनी बद्ध झाल्यामुळे अस्त्रांच्या बंधांतून मुक्त झाला. कारण दुसरा बंध प्राप्त झाला असता तो अस्त्रबंध कायम राहात नाही.'

इंद्रजिताच्या हे लक्षात आले व तो चिंताग्रस्त झाला. कारण त्याने योजिलेले अस्त्र राक्षसांनी व्यर्थ करून टाकले होते आणि एकदा ते व्यर्थ झाल्यावर त्याचा पुन्हा उपयोग करणे शक्य नसते, हे त्याला ज्ञात होते आणि म्हणूनच जयाविषयी तो मनात साशंक झाला.

रावणाला भेटण्यास हनुमान उत्सुक असल्याने अस्त्रबंधातून मुक्त होऊनही मुक्त झाल्याचे त्याने राक्षसांना दर्शविले नाही. त्याला

राक्षसांनी ओढत ओढत रावणाच्या सभेत आणले. रामाच्या आज्ञेवरून सीतेच्या शोधार्थ लंकेस जाऊन हनुमानानें अतुल पराक्रम केला. अक्ष नावाच्या शूर रावणपुत्राचे त्याने मर्दन केले. इंद्रजिताच्या ब्रह्मास्त्र-पाशाच्या अधीन तो आपण होऊन झाला.

अस्त्रेणोन्मुक्तमात्मानं ज्ञात्वा पैतामहाद्वरात् ।
मर्षयन्राक्षसान्वीरो यन्त्रिणस्तान्यदृच्छया ।। ७६

'ब्रह्मदेवाच्या वराने अस्त्रापासून आपली सुटका होते, हे समजूनही बांधून नेणाऱ्या राक्षसांना त्यानें त्या वेळेपुरती क्षमा केली.'

सुन्दरकाण्ड/५०

राक्षसांनी हनुमानाला रावणसभेत आणले असता रावणाने त्याला अनेक प्रश्न विचारले. खरे सांगितले तर मुक्त करीन, परंतु खोटें बोलल्यास जीवितही दुर्लभ होईल, अशी धमकीही दिली. तेव्हा हनुमान त्याला निर्भयपणे म्हणाला— 'इंद्राचे, यमाचे अथवा वरुणाचे रूप धारण करून मी आलो नाही. कुबेराशी माझे सख्य नाही आणि विष्णूनेंही मला पाठविले नाही. ही माझी जातीच आहे. मी वानरच येथें राक्षस-राजाच्या दर्शनास आलो आहे. हे दुर्लभ दर्शन प्राप्त व्हावे, म्हणून मी वन-विध्वंस केला. तेव्हा बलाढ्य राक्षस माझ्या अंगावर धावून आले.

रक्षणार्थं च देहस्य प्रतियुद्धा मया रणे ।
अस्त्रपाशैर्न शक्योऽहं बद्धुं देवासुरैरपि ।। १६

पितामहादेष वरो ममापि हि समागतः ।
राजानं द्रष्टुकामेन मयास्त्रमनुवर्तितम् ।। १७

'देहाच्या रक्षणार्थ मी संग्रामामध्यें त्यांच्याशी उलट युद्ध केले. देवदैत्यांच्या हातूनही अस्त्रपाशांच्या योगाने मी बद्ध होणे शक्य नाही, कारण ब्रह्मदेवापासून मला हा वरच प्राप्त झाला आहे. राजाच्या दर्शनाकरिता मी ह्या अस्त्राला मान दिला.'

हा वर याचित का अयाचित आहे, याची स्पष्ट कल्पना येत नाही.

## ४०. ब्रह्मदेव < मैंद, द्विविद (अश्विनीकुमार-पुत्र)

सुन्दरकाण्ड/६०

लंकेहून परत आल्यावर अंगदासह सर्व वानरांना हनुमानाने सर्व वृत्तान्त कथन केला. तदनंतर काय करावयाचे, याचा विचार-विनिमय करीत असता अंगद म्हणाला–

**अश्विपुत्रौ महावेगौ बलवन्तौ प्लवंगमौ ।।– १**

**पितामहवरोत्सेकात्परमं दर्पमास्थितौ ।**
**अश्विनोर्माननार्थं हि सर्वलोकपितामहः ।। २**

**सर्वावध्यत्वमतुलमनयोर्दत्तवान्पुरा ।**
**वरोत्सेकेन मत्तौ च प्रमथ्य महतीं चमूम् ।। ३**

"हे महावेगवान अश्विनीकुमार-पुत्र मैंद व द्विविद वानर बलाढ्य आहेत. ब्रह्मदेवाच्या वराने ते पराकाष्ठेचे गर्विष्ठ झाले आहेत. अश्विनीकुमारांना मान देण्याकरिता सर्वलोकाधिपती ब्रह्मदेवाने पूर्वी ह्यांना, 'तुम्हाला कुणापासूनही पीडा होणार नाही', असा अतुल वर दिला असता, त्या वराने मत्त होऊन व प्रचंड सेनेचा पराजय करून ह्या महाबलाढ्य वानरवीरांनी देवांचे अमृत प्राशन केले."

सर्व वानर स्वस्थ बसले तरी हे दोघेच अश्व, रथ, गजांसह सर्व लंकेचा नाश करण्यास समर्थ आहेत. तेव्हा किष्किंधेला परत न जाता सर्वांनी लंकेला जाऊन राक्षसांचा नाश करावा आणि सीतेला घेऊनच रामाकडे परत जावे, असे अंगदाने सुचविले.

हा वर याचित का अयाचित, हे निश्चितपणे सांगता येत नाही.

## ४१. ? < कालकेय

युद्धकाण्ड/७

लंकेवर राम चाल करून येत असल्याचे कळताच रावणाने महाबलाढ्य राक्षसांना एकत्र बोलावून त्यांच्याशी विचार-विनिमय केला.

तेव्हा रावणाच्या पूर्वपराक्रमाचें वर्णन करीत असता राक्षस रावणाला म्हणतात– तुझा विजय निश्चित आहे. खेद करण्याचे कारणच काय ? पूर्वी पातालातील भोगवती नगरीतील भुजंगांचा, कुबेराचा, वासुकीचा, तक्षकाचा असा अनेकांचा तू दारुण पराभव केला आहेस. इतकेच नव्हे तर–

अक्षया बलवन्तश्च शूरा लब्धवराः पुनः ।
त्वया संवत्सरं युद्ध्वा समरे दानवा विभो ॥ १०

'अक्षय, बलाढ्य, शूर आणि वर प्राप्त झालेले असे जे कालकेय दानव, त्यांच्याशी समरांगणामध्ये एक संवत्सरपर्यंत युद्ध करून आपण स्वसामर्थ्याने त्यांना पादाक्रांत केले आहे.'

कालकेयांना कोणी, केव्हा, कोणता आणि कशासाठी वर दिला होता, हे स्पष्ट नाही. केवळ वर प्राप्त झाल्याचा हा एक उल्लेख आहे.

## ४२. १ < इंद्रजित युद्धकाण्ड/७

लंकेवर राम चाल करून येत असल्याचे कळताच रावणाने महाबलाढ्य राक्षसांना एकत्र बोलावून त्यांच्याशी विचार-विनिमय केला. तेव्हा रावणाच्या सामर्थ्याचे व पूर्वीच्या पराक्रमाचे वर्णन करीत राक्षस रावणाला म्हणतात–

पूर्वी तू अनेक बलाढ्य शत्रूंना समरात अतुल पराक्रमाने जिंकले असता तुला रामाची धास्ती बाळगण्याचे कारण नाही. तुझा जय निश्चित आहे. त्याने ज्यांचा ज्यांचा पराजय केला, त्यांचा नामोल्लेख करीत करीत इंद्रजिताच्या अतुलनीय सामर्थ्याविषयी ते गौरवाने बोलतात. एकटा इंद्रजितही रामाचा व त्याच्या वानरसेनेचा समाचार घेण्यास पुरेसा आहे. कारण–

अनेन च महाराज माहेश्वरमनुत्तमम् ।
इष्ट्वा यज्ञं वरो लब्धो लोके परमदुर्लभः ॥ १९

‘ हे महाराजा, ह्या इंद्रजिताने अत्यंत उत्कृष्ट माहेश्वरी याग करून जगतामध्ये अत्यंत दुर्लभ असा वर प्राप्त करून घेतला आहे. ’

तेंव्हा रामाच्या नाशासाठी त्याचीच योजना करावी.

इंद्रजिताला वर कोणी दिला, त्याचा स्पष्ट उल्लेख नसला, तरी तो शंकरानेच दिला असावा. कारण त्याने जे सात यज्ञ केले, त्यांपैकी माहेश्वरी यज्ञ एक असून शिवप्रसादाने त्याला दिव्य रथ, धनुष्य-बाण, शस्त्रे, तामसी माया इत्यादींची प्राप्ती झाली होती. हा वास्तविक अनुग्रह होय, वर नाही. परंतु वाल्मीकीने वर शब्द योजिला आहे.

येथे वराचा केवळ उल्लेख आहे.

पहा : वर–महेश्वर < मेघनाद, पृ. २०७–२०८ उत्तरकाण्ड २५

## ४३. राम < मरू प्रदेश　　　　　　　　युद्धकाण्ड/२२

‘आज मी समुद्र तरी तरून जाईन किंवा माझ्या हातून सागराला मृत्यू तरी प्राप्त होईल. ’ – अशी प्रतिज्ञा करून समुद्राला हात जोडून रामाने दर्भ पसरून शयन केले. रामाने समुद्राचा सत्कार करून तीन रात्री उलटल्या तरीही सागराने दर्शन दिले नाही. सागर मंदबुद्धी तर होताच, परंतु त्याला गर्व झाला होता. रामाला सागराचा विलक्षण राग आला आणि त्याने उग्र बाणांचा वर्षाव करून सागराला क्षुब्ध केले. रामाच्या बाणांनी समुद्रातील जलचर व पाताळातील दानव त्रस्त झाले. सागर एकसारखा गर्जना करू लागला. सर्वत्र हाहाकार उडाला, तेंव्हा लक्ष्मणाने रामाला ‘ अनर्थ करू नको ’ अशी विनंती केली. राम सागराला म्हणाला, ‘ माझ्या बाणांनी मी तुला शुष्क करून टाकीन.’ तुझ्या जलात वास्तव्य करणारे प्राणी माझ्या हातून वध पावतील. ब्रह्मास्त्राने अभिमंत्रित केलेला एक बाण त्याने धनुष्याला लावला. बाण सोडताच स्वर्ग व पृथ्वीवरील चराचर सृष्टी विदीर्ण झाली. महासागर खवळून गेला. तेंव्हा जलाशयाच्या मध्यभागातून सागर वर येऊन रामाला विनयपूर्वक म्हणाला– ‘ हे सौम्य रामा, पृथ्वी, वायू, आकाश, उदक आणि अग्नी हे [illegible] मार्गाचे अवलंबन करून आपापल्या धर्माने वागत

असतात. मी अगाध असून तरून जाण्यास अशक्य आहे, आणि हाही माझा धर्मच आहे. उथळपणा हा माझा विकार होय. अभिलाष, लोभ, भय, अनुराग यामुळे जलचर प्राण्यांनी व्याप्त असलेल्या माझ्या उदकाचे मी कधीही स्तंभन करणार नाही. तथापि तुला जाता येईल, अशी मी तजवीज करीन. तुझी सेना तरून जाईपर्यंत मकरप्रभृती जलचर प्राणीही वानरांवर प्रहार करणार नाहीत,' असे मी तुला निश्चयाने सांगतो. तेव्हा रामाने तो अमोघ बाण कोणत्या प्रदेशात टाकावा, ते सांगण्याची सागराला विनंती केली. रामाला सागर म्हणाला– 'द्रुमकुल्य म्हणून जगात प्रसिद्ध असलेले माझे एक पवित्र स्थल उत्तरेस आहे. त्या ठिकाणी आभीर प्रभृती दुष्ट दस्यू माझे उदकपान करून वास्तव्य करतात. ते असंख्य असून त्यांच्या मुद्रा व कृत्येही भयंकर आहेत. मला ते पापी दस्यू जो स्पर्श करतात, तो सहन होत नाही. ह्यास्तव ह्या उत्कृष्ट बाणाचे सार्थक तू तेथे कर.'

सागराच्या सांगण्याप्रमाणे रामाने तो तेजस्वी बाण 'मरुकांतार' नावाच्या प्रदेशावर सोडला. त्या वेळी बाणाने पीडित झालेल्या पृथ्वीने गर्जना केली. बाणामुळे पृथ्वीला जेथे रंध्र पडले होते, तेथून रसातळापासून उदक एकदम बाहेर आले. तेथे व्रण नावाचा कूप तयार झाला. जवळपासच्या सरोवरांचे पाणीही बाणाने शुष्क करून टाकले. तो मरुकांतार प्रदेश अशा रीतीने शुष्क करून टाकल्यावर–

वरं तस्मै ददौ विद्वान्मरवेऽमरविक्रमः ।।– ४१

पशव्यश्चाल्परोगश्च फलमूलरसायुतः ।
बहुस्नेहो बहुक्षीरः सुगन्धिर्विविधौषधिः ।। ४२

एवमेतैश्च संयुक्तो बहुभिः संयुतो मरुः ।
रामस्य वरदानाच्च शिवः पन्था बभूव ह ।। ४३

देवतुल्य पराक्रमी दशरथपुत्र ज्ञानी रामाने त्या मरू देशाला असा वर दिला की– 'पशूंना हितकारक, अल्परोगाने युक्त, फळे, मुळे, रस, विपुल स्नेह, क्षीर, सुगंध आणि नाना प्रकारच्या औषधी ह्यांनी हा देश संपन्न होईल.'

रामाने असा वर दिल्यामुळें ह्या गुणांनी तो मरुप्रदेश युक्त झाला, आणि रामाच्या वरप्रदानामुळे तो प्रदेश कल्याणकारक झाला.

हा अयाचित वर होय.

## ४४. विश्वकर्मा < नल (वानर) युद्धकाण्ड/२२

सागर रामाला विश्वकर्म्याचा पुत्र नल या वानराच्या सामर्थ्या-विषयी सांगत आहे. रामाने त्या मरुप्रदेशाला वर दिल्यानंतर संतुष्ट झालेला सागर रामाला म्हणाला–

अयं सौम्य नलो नाम तनयो विश्वकर्मणः ।
पित्रा दत्तवरः श्रीमान्प्रीतिमान्विश्वकर्मणः ।। ४५

' हे विनय-संपन्न रामा, हा नल नामक वानर विश्वकर्म्याचा पुत्र आहे. आणि विश्व निर्माण करणाऱ्या तुझ्या ठिकाणी अनुरक्त असलेल्या ह्या नलाला हवी ती वस्तू निर्माण करता येईल, म्हणून पित्याने वर दिला आहे. '

तेंव्हा ह्या उत्साही वानराने माझे ठिकाणी सेतू बांधावा. तो आपल्या पित्याप्रमाणे कुशल असल्यानें त्याने निर्माण केलेला सेतू मी धारण करीन. असे सांगून सागर गुप्त झाला आणि वानरांच्या साहाय्याने नलाने सेतू बांधण्यास प्रारंभ केला.

पित्याने मातेला दिलेल्या वरामुळे नल पित्याप्रमाणे शिल्पविद्येत प्रवीण असल्याचे नल स्वताच रामाला सांगतो.

वर देण्याचे कारण स्पष्ट नाही. हा अयाचित वर असावा.

## ४५. विश्वकर्मा < नल (वानराची माता) युद्धकाण्ड/२२

नल वानर रामाला स्वताविषयी सांगत आहे.

'महासागराने माझ्याविषयी जे सांगितले, ते खरे आहे. पित्याचे सामर्थ्य माझ्या अंगी असल्यामुळे मी ह्या विस्तीर्ण समुद्रामध्ये सेतू बांधीन. जगतामध्ये पुरुषाला दंडच कार्यसाधक होतो, असे मला वाटते. अकृतज्ञ पुरुषाचे ठिकाणी साम, दान आणि क्षमा यांचा उपयोग करणे व्यर्थ आहे. जलाचें प्रचंड निधान असलेल्या ह्या भयंकर सागराला दंडाच्या भीतीमुळे सेतुकर्म अवलोकन करण्याची इच्छा उत्पन्न झाली आहे आणि म्हणूनच राघवाला सेतू बांधण्याकरिता अवकाश देण्यास हा तयार झाला आहे.

मम मातुर्वरो दत्तो मन्दरे विश्वकर्मणा ।
मया तु सदृशः पुत्रस्तव देवि भविष्यति ॥ ५१

'हे देवी, माझ्यासारखा तुझा पुत्र होईल, असा विश्वकर्म्याने मंदर पर्वतावर माझ्या मातेला वर दिला होता.'

'मीं त्याचा औरसपुत्र असून शिल्पविद्येतही त्याच्यासारखा आहे. परंतु विचारल्यावाचून मी स्वताचे गुण तुम्हाला सांगणार नाही. मी समुद्रामध्ये सेतू बांधण्यास समर्थ आहे.'

वर देण्याचे कारण स्पष्ट नाही. हा अयाचित वर असावा.

आईच्या नावाचा स्पष्ट उल्लेख नसला तरी ती घृताची अप्सरा असावी, असे वाटते.

## ४६. इंद्र < जाम्बवान युद्धकाण्ड/२७

रावणाचा अमात्य सारण रावणाला रामाला साहाय्य करणाऱ्या वानर वीर सेनापतींच्या सामर्थ्याविषयी सांगत आहे.

सागरावर सेतू बांधून वानर सैन्यासह राम लंकेत आला असता त्याचे सैन्य पाहण्यासाठी रावणाने शुक व सारण या अमात्यांना धाडले. रामाला पाहून ते अतिशय भयभीत झाले. बिभीषणाने तें रावणाचे हेर असल्याचें सांगितले होते. रामाने त्यांना त्यांचे कार्य झालें असल्यास

निर्भयपणे परत जा, असे सांगितले आणि सीतेचा अपहार करणाऱ्या रावणाला दुसरे दिवशी स्वसामर्थ्य दाखविण्याबाबत निरोप धाडला. वानर वीर सेनापतींचे वर्णन सारण रावणाला सविस्तरपणे सांगत आहे. अनेक वीरांची माहिती देऊन तो जाम्बवानाविषयी सांगतो–

' पर्वतश्रेष्ठ ऋक्षवानावर वास्तव्य करणारा धूम्र नामक सेनापती ऋक्षांचा अधिपती होय. त्याचा कनिष्ठ भ्राता रूपाने त्याच्यासारखाच, परंतु पराक्रमाने त्याहून सरस असा पर्वततुल्य आहे. त्याचे नाव जाम्बवान. हा स्वभावाने शांत असून भावाच्या आज्ञेप्रमाणे वागणारा आहे. '

एतेन साह्यं तु महत्कृतं शक्रस्य धीमता ।
देवासुरे जाम्बवता लब्धाश्च बहवो वरा: ।। १२

' देव–दैत्यांचे युद्ध चालले असताना ह्या बुद्धिवान जाम्बवानाने इंद्राला मोठे साहाय्य करून पुष्कळ वरही मिळवलेले आहेत. '

अनेक वर मिळवल्याचा केवळ उल्लेख आहे. प्रत्यक्ष कोणते वर मिळवले आहेत, हे स्पष्ट नाही.

## ४७. १ < कुंभकर्ण युद्धकाण्ड/६१

बिभीषण रामाला कुंभकर्णाविषयी सांगत आहे.

कुंभकर्णाचे धिप्पाड शरीर, मेघतुल्य कांती, किरीट, सुवर्णालंकार इत्यादी पाहून वानरसेना भयभीत झाली. रामालाही तो कोण हे जाणून घेण्याची उत्सुकता लागली व त्याने बिभीषणाला विचारले असता तो म्हणाला– ' ज्याने यम व इंद्र यांना युद्धामध्ये पराजित केले, तो हा विश्रवसाचा प्रतापी पुत्र कुंभकर्ण. मोठेपणात याची बरोबरी करणारा दुसरा राक्षस नाही. हजारो देव, दानव, यक्ष, भुजंग, राक्षस, गंधर्व, विद्याधर, पन्नग ह्यांचा ह्याने युद्धात पराजय केलेला आहे. उग्र नेत्र आणि शूलयुक्त हात ह्यांनी युक्त असलेल्या महाबलाढ्य कुंभकर्णाचा वध करण्यास देव समर्थ झाले नाहीत. '

प्रकृत्या ह्येष तेजस्वी कुम्भकर्णो महाबलः ।
अन्येषां राक्षसेन्द्राणां वरदानकृतं बलम् ।। १२

'हा महाबलाढ्य कुंभकर्ण स्वभावतःच इतर राक्षसाधिपतींमध्ये तेजस्वी आहे आणि वरप्रदानामुळे ह्याला बल प्राप्त झालेले आहे.'

वर कुणी दिला व त्याचे स्वरूप काय होते, हे स्पष्ट नाही. वर-प्रदानाचा केवळ उल्लेख आहे.

## ४८. ब्रह्मदेव < आतिकाय युद्धकाण्ड/६९

कुंभकर्णाचा वध झाल्यानंतर रावण अत्यंत शोकाकुल होऊन विलाप करू लागला. तेव्हा त्रिशिरा त्याचे सांत्वन करीत म्हणाला– 'हे राजा, तुझ्यासारखे शूर पुरुष विलाप करीत बसत नाहीत. तुझ्यापाशी ब्रह्मदत्त शक्ती, कवच, बाण, धनुष्य, रथ इत्यादी साधनें आहेत. पूर्वी तू अनेक वेळा देव-दानवांना शस्त्रांच्या योगाने फाडून काढले आहेस. रामाला शासन करणे हे तुझे कर्तव्य आहे.' असे म्हणून त्याने प्रतिज्ञा केली– 'तू स्वस्थ रहा. आज माझ्या हातून युद्धामध्ये वध पावलेला राम रणभूमीवर शयन करताना तू पाहशील.'

त्रिशिराची प्रतिज्ञा ऐकून रावणपुत्र देवांतक, नरांतक आणि तेजस्वी अतिकाय हेही युद्धासाठी सिद्ध झाले. ते मायेंमध्ये निपुण, संग्रामात कुणासही हार न जाणारे, अंतरिक्षात संचार करणारे, महाबलाढ्य, देवांचा दर्प नष्ट करणारे व महाकीर्तिमान होते.

देवैरपि सगन्धर्वैः सकिन्नरमहोरगैः ।
सर्वेऽस्त्रविदुषो वीराः सर्वे युद्धविशारदाः ।
सर्वे प्रवरविज्ञानाः सर्वे लब्धवरास्तथा ।। १३

'संग्राम प्राप्त झाला असता देव, गंधर्व, किन्नर व महोरग ह्यांच्या हातून पराजय पावल्याची वार्ता कुणाच्याही संबंधाने ऐकण्यात आलेली नव्हती. सर्वजण अस्त्रवेत्ते असून युद्धामध्ये निपुण होते. सर्व महाज्ञानी होते आणि सर्वांनाही वर मिळालेले होते.'

हे वर कोणी दिले, त्याची कारणे कोणती व त्यांचे स्वरूप काय, हे येथे स्पष्ट नाही. केवळ वर प्राप्त झाल्याचा येथे उल्लेख आहे.

### युद्धकाण्ड/७१

संग्रामात वालीपुत्र अंगदाने नरांतकाचा आणि हनुमानाने देवांतकाचा वध केला. आपले प्रचंड सैन्य जर्जर झालेले, इंद्रतुल्य भ्राते वध पावलेले व निःपात झालेले पितृव्य अवलोकन करून अतिकाय अतिशय क्रुद्ध झाला.

चुकोप च महातेजा ब्रह्मदत्तवरो युधि ।
अतिकायोऽद्रिसंकाशो देवदानवदर्पहा ।। ३

' त्या अतिकायाला ब्रह्मदेवाने वर दिला होता. शरीराने अतिशयच मोठा असलेला तो पर्वततुल्य अतिकाय देव-दानवांचाही गर्वपरिहार करणारा होता. '

येथेही ब्रह्मदेवाने अतिकायाला कोणता वर दिला होता, हे स्पष्ट नाही. केवळ वर दिल्याचा उल्लेख आहे.

अतिकायाला पाहून वानरांची भीतीने गाळण उडाली व ते रामाला शरण गेले. त्याला पाहून रामही अतिशय विस्मित झाला. रामाने बिभीषणाला त्याच्यासंबंधी विचारले असता बिभीषण म्हणाला-- सामर्थ्यात रावणाशी बरोबरी करणारा त्याचा अतिकाय नावाचा हा मुलगा आहे. तो अस्त्रवेत्त्यांमध्ये श्रेष्ठ आणि बलाविषयी प्रख्यात आहे. तो युद्धकर्मात निपुण आहे.

एतेनाराधितो ब्रह्मा तपसा भावितात्मना ।
अस्त्राणि चाप्यवाप्तानि रिपवश्च पराजिताः ।। ३१

सुरासुरैरवध्यत्वं दत्तमस्मै स्वयम्भुवा ।
एतच्च कवचं दिव्यं रथश्च रविभास्वरः ।। ३२

' तपाच्या योगाने ज्याचे अंतःकरण शुद्ध झालेले आहे, अशा या रावणपुत्राने ब्रह्मदेवाचे आराधन करून अस्त्रे प्राप्त करून घेतली आहेत

आणि शत्रूंचा पराजय केलेला आहे. ' देव-दैत्यांना तू अवध्य होशील ', असा वर ब्रह्मदेवाने ह्याला दिला असून हे दिव्य कवच आणि सूर्या-सारखा तेजस्वी रथ ही त्यानेच ह्याला दिली आहेत.

लक्ष्मणाचे व त्याचे युद्ध जुंपल्यावर बाणांचा वर्षाव करूनही अतिकायावर त्याचा परिणाम होऊ शकला नाही. तेंव्हा वायू लक्ष्मणाला म्हणाला-

ब्रह्मदत्तवरो ह्येष अवध्यकवचावृतः ।
ब्राह्मेणास्त्रेण भिन्ध्येनमेष वध्यो हि नान्यथा ।।
अवध्य एष ह्यन्येषामस्त्राणां कवची बली ।। १०३

' अभेद्य कवचाने आच्छादित झालेल्या ह्या अतिकायाला ब्रह्म-देवाने वर दिला आहे. ह्यास्तव ब्रह्मास्त्राने तू त्याचा वध कर. दुसऱ्या अस्त्राने ह्याचा वध होणे शक्य नाही. कारण, कवच धारण केलेला हा बलाढ्य अतिकाय इतर अस्त्रांना अवध्य आहे. '

लक्ष्मणाने ब्रह्मास्त्राने अभिमंत्रित केलेला बाण अतिकायावर सोडून त्याचा वध केला.

हा याचित वर असून दिव्य कवच आणि तेजस्वी रथ यांची प्राप्ती अनुग्रह-स्वरूपाची आहे.

## ४९. इंद्र < राम युद्धकाण्ड/१०२

राम-रावण-युद्धप्रसंगी रावण रथारूढ होता तर राम जमिनीवरूनच रावणावर बाणांचा वर्षाव करीत होता. देव, गंधर्व, किन्नरांनी हे पाहून इंद्राला म्हटले- ' भूमीवर असलेल्या रामाचे आणि रथारूढ झालेल्या राक्षसाचे युद्ध सारखे नव्हे. ' तेंव्हा इंद्र त्याचा सारथी मातलीस म्हणाला, ' माझा रथ घेऊन भूमीवर असलेल्या रघुवंशजश्रेष्ठ रामाकडे तू सत्वर जा आणि त्याला हाक मारून देवांचे मोठे हित कर. '

इंद्राचा सुसज्ज विजयशाली रथ घेऊन मातली रणांगणावर आला आणि हात जोडून रामाला विनयपूर्वक म्हणाला-

सहस्राक्षेण काकुत्स्थ रथोऽयं विजयाय ते ।
दत्तस्तव महासत्त्व श्रीमञ्शत्रुनिबर्हण ।। १४
इदमैन्द्रं महच्चापं कवचं चाग्निसंनिभम् ।
शराश्चादित्यसंकाशाः शक्तिश्च विमला शिवा ।। १५

'हे वैभवशाली, हे शत्रुनाशका, हे महाशय, हे ककुत्स्थ कुलोत्पन्ना, इंद्राने हा रथ जय प्राप्त होण्याकरिता तुला दिला आहे. त्याचप्रमाणे हे प्रचंड धनुष्य, अग्निसारखे दैदीप्यमान कवच, सूर्यासारखे तेजस्वी बाण आणि कल्याणकारक निर्मल शक्ती ही पण तुला इंद्राने दिली आहेत.' तस्मात् तू रथारूढ हो आणि मी सारथ्य करीत असता रावण राक्षसाचा वध कर.

राम रथारूढ झाला व त्याने इंद्राने दिलेल्या सर्व गोष्टींचा स्वीकार केला.

हा वर की इंद्राची रामाला युद्धासाठी मदत आहे ? वर असलाच तर तो अयाचित होय. रथ, धनुष्य, कवच, बाण आणि शक्ती ह्या गोष्टी अनुग्रहासारख्या आहेत.

## युद्धकाण्ड/१२०

रावणवध आणि सीतेचे अग्निदिव्य झाल्यानंतर संतुष्ट झालेल्या इंद्राने रामाला त्याचा मनोरथ पूर्ण करण्याचे अभिवचन देऊन वर मागण्यास सांगितले. तेव्हा राम आनंदाने म्हणाला–

यदि प्रीतिः समुत्पन्ना मयि ते विबुधेश्वर ।
वक्ष्यामि कुरु मे सत्यं वचनं वदतां वर ।। ४
मम हेतोः पराक्रान्ता ये गता यमसादनम् ।
ते सर्वे जीवितं प्राप्य समुत्तिष्ठन्तु वानराः ।। ५
मत्कृते विप्रयुक्ता ये पुत्रैर्दारैश्च वानराः ।
तान्प्रीतमनसः सर्वान्द्रष्टुमिच्छामि मानद ।। ६

विक्रान्ताश्चापि शूराश्च न मृत्युं गणयन्ति च।
कृतयत्ना विपन्नाश्च जीवयैतान्पुरन्दर ।। ७

मत्प्रियेष्वभिरक्ताश्च न मृत्युं गणयन्ति ये।
त्वत्प्रसादात्समेयुस्ते वरमेतमहं वृणे ।। ८

नीरुजो निर्व्रणांश्चैव सम्पन्नबलपौरुषान्।
गोलाङ्गूलांस्तथर्क्षांश्च द्रष्टुमिच्छामि मानद ।। ९

अकाले चापि पुष्पाणि मूलानि च फलानि च।
नद्यश्च विमलास्तत्र तिष्ठेयुर्यत्र वानरा: ।। १०

'देवराज, माझ्यावर जर आपण संतुष्ट झाला असाल, तर मी जे आपणाला सांगणार आहे, ते आपण खरे करा. माझ्याकरिता पराक्रम करून जे वानर यमलोकी गेले आहेत, ते सर्व जिवंत होऊन उठावे. हे मान्यवर, माझ्याकरिता ज्या वानरांना पुत्रांचा व स्त्रियांचा वियोग झाला आहे, ते सर्व प्रसन्न झालेले अवलोकन करण्याची माझी इच्छा आहे. हे पुरंदरा, पराक्रमी, शूर, मृत्यूची पर्वा न करणारे असे हे वानर युद्धार्थ श्रम करून मृत्यु पावले आहेत, त्यांना तू जिवंत कर. मला प्रिय असलेली कृत्ये करण्याविषयी तत्पर आणि मृत्यूची पर्वा न करणारे असे जे वानर, त्यांचा तुझ्या प्रसादामुळे स्वजनांशी समागम व्हावा. हा वर मी मागत आहे. हे मान्य, गोलांगूल व ऋक्ष ह्यांना पीडारहित, व्रणरहित आणि बल व पराक्रम ह्यांनी संपन्न असल्याचे अवलोकन करण्याची माझी इच्छा आहे. ज्या ठिकाणी वानर असतील, त्या ठिकाणी अकाली सुद्धा पुष्पे, फळे, मुळे व निर्मळ नद्या असाव्यात.'

हा वर ऐकून इंद्र रामाला म्हणाला– 'बा रघूत्तमा, तू मागितलेला हा वर मोठा आहे. परंतु ज्या अर्थी एकदा सांगितलेले मी आजपर्यंत कधी फिरविले नाही, त्या अर्थी हे तुझे मागणे सिद्धीस जाईल.'

**'वरमेतमहं वृणे'**– हा वर मी मागत आहे– असे शब्द रामाच्या मुखातून निघाले असले तरीही हा वर अयाचित आहे. कारण प्रथम इंद्रानेच रामाला वर मागण्यास सांगितले आहे.

## युद्धकाण्ड/१२४

वनवास पूर्ण झाल्यावर राम भरद्वाज मुनीच्या आश्रमास आला असता त्याच्या पृच्छेला उत्तर देताना भरद्वाजाने पुढील उल्लेख केला आहे.

**यथा च निहते तस्मिन्रावणे देवकण्टके ।**
**समागमश्च त्रिदशैर्यथा दत्तश्च ते वरः ।। १५**

'त्या देवकंटक रावणाचा वध झाल्यावर देवांशी तुझा समागम कसा झाला आणि त्यांच्यापासून तुला वर कसा प्राप्त झाला', हे सर्व तपश्चर्येमुळे मला समजून चुकले आहे, असे मुनीने सांगितले.

हा वर आणि इंद्राने दिलेला वर एकच की वेगवेगळे ? देवांनी दिलेला वर वेगळा असावा; कारण वर एकच असला, तरी देवांचा उल्लेख अनेकवचनी आहे. वराचे स्वरूप स्पष्ट नाही, परंतु हाही वर अयाचितच असावा.

## युद्धकाण्ड/१२५

रामाने हनुमानाला अयोध्येला पुढे पाठवून आपले कुशल सांगून संतुष्ट करण्यास सांगितले. सीताहरण, सुग्रीवाशी मैत्री, वालीवध, समुद्राचे उल्लंघन, समुद्रदर्शन, सेतुबंधन, रावणवध इत्यादी घटना सविस्तर सांगण्याबाबत सूचना देत असता पुढील उल्लेख आला आहे—

**वरदानं महेन्द्रेण ब्रह्मणा वरुणेन च ।**
**महादेवप्रसादाच्च पित्रा मम समागमम् ।। ११**

'इंद्र, ब्रह्मा, वरुण ह्यांनी काय वरदान दिले आणि महादेवाच्या प्रसादाने पित्याशी माझी भेट कशी झाली', हे कळवून मी जवळ आल्याचेही तू भरताला सांग.

येथे इंद्राबरोबरच ब्रह्मदेव आणि वरुणाने रामाला वर दिल्याचा उल्लेख आहे. इंद्राचा वर (युद्धकाण्ड–सर्ग १२०) स्पष्ट आहे.

## युद्धकाण्ड/१२६

हनुमानाच्या मुखाने रामाची वार्ता ऐकून भरताला अतिशय आनंद झाला. त्याने सविस्तर कथन करण्याची विनंती केली. हनुमानाने जे कथन केले, त्यात पुढील उल्लेख आला आहे.

**स शक्रेण समागम्य यमेन वरुणेन च।**
**महेश्वर-स्वयम्भूभ्यां तथा दशरथेन च ।। ५१**

**तैश्च दत्तवरः श्रीमानृषिभिश्च समागतैः।**
**सुरर्षिभिश्च काकुत्स्थो वरॉंल्लेभे परंतपः ।। ५२**

'इंद्र, यम, वरुण, महेश्वर, ब्रह्मदेव आणि दशरथ यांचा समागम झाल्यावर त्यांनी आणि तेथे असलेल्या ऋषींनी त्या वैभवशाली रामाला वर दिला आणि शत्रूंना ताप देणाऱ्या त्या ककुत्स्थ-कुलोत्पन्न रामाला देवर्षींपासूनही वर प्राप्त झाला.'

येथे इंद्राबरोबर अन्य देव व ऋषींनीही वर दिल्याचा उल्लेख आहे. रावणवधाचे अत्यंत बिकट कार्य रामाने केल्यामुळे संतुष्ट होऊन उपस्थित देव, ऋषी इत्यादींनी त्याला वर दिले. अर्थात् हे सर्व वर अयाचित आहेत.

## बालकाण्ड/१

लंकेमध्ये बिभीषणाला अभिषेक करून राम कृतकृत्य झाला.

**देवताभ्यो वरं प्राप्य समुत्थाप्य च वानरान्।**
**अयोध्यां प्रस्थितो रामः पुष्पकेण सुहृद्वृतः ।। ८६**

'युद्धात पडलेले वानर झोपेतून उठल्याप्रमाणे जिवंत होऊन उठोत', असा वर देवतांपासून प्राप्त झाल्यानंतर वानरांना उठवून सुहृद् जनांनी परिवेष्टित असलेला राम पुष्पक विमानामध्ये बसून अयोध्या नगरीकडे निघाला.

वर देणाऱ्या देवता एकाहून अधिक असल्याचा येथे उल्लेख आहे.

## ५० भरद्वाज < राम युद्धकाण्ड/१२४

वनवासाची चौदा वर्षे पूर्ण झाल्यावर भरद्वाजमुनीच्या आश्रमाला येऊन रामाने त्यास अभिवंदन केले. अयोध्येचे क्षेमकुशल विचारले. मुनीने संतुष्ट मनाने अयोध्येची कुशल वार्ता सांगितली. पादुकांचे पूजन करीत आज्ञाधारी भरत यथायोग्य प्रकारे अयोध्येचे पालन करीत असल्याचे सांगितले. तपश्चर्येच्या योगानें वनवासातील सारी हकीगत त्याला ज्ञात झाली होती. देवांनी त्याला वर दिल्याचे त्याला ठाऊक झाले होते. रामाच्या पराक्रमावर व चारित्र्य-संपन्न वर्तनाने संतुष्ट होऊन तो म्हणाला–

अहमप्यत्र ते दद्मि वरं शस्त्रभृतां वर ।– १७

' हे शस्त्रधरश्रेष्ठ, मीही ह्या ठिकाणी तुला एक वर देतो. त्याचा तू स्वीकार कर आणि नंतर अयोध्येला जा. ' रामाने भरद्वाज मुनीचे म्हणणे शिरसामान्य केले आणि संतुष्ट मनाने वर मागितला.

अकालफलिनो वृक्षाः सर्वे चापि मधुस्रवाः ।
फलान्यमृतगन्धीनि बहूनि विविधानि च ।। १९
भवन्तु मार्गे भगवन्नयोध्यां प्रतिगच्छतः ।– २०

' भगवन्, अयोध्येला जाताना मार्गामध्ये सर्व वृक्ष समय नसतानाही फलयुक्त होवोत. सर्वांपासून मधाचा स्राव सुरू होवो आणि अमृतासारख्या स्वादाने युक्त असलेली नाना प्रकारची असंख्य फळे तेथे होवोत. '

रामाच्या इच्छेला मुनीने अनुमती दिली. सर्व वृक्ष पाना-फुलांनी, फळांनी बहरून आले.

हा अयाचित वर होय.

## ५१. ब्रह्मदेव < वैश्रवण उत्तरकाण्ड/३

रावणाचे कुळ, त्याचा जन्म, त्याला प्राप्त झालेले वर इत्यादी

जाणून घेण्याची इच्छा रामाने व्यक्त केली असता अगस्त्य मुनी त्याला कथन करीत आहे.

वैश्रवण एका तपोवनात रहात असे. धर्म हीच अंतिम गती असल्याने आपण श्रेष्ठ धर्माचे पालन करावे ही त्याची उत्कट इच्छा होती. जितेंद्रिय राहून त्याने विविध यम-नियमांचे काटेकोरपणे पालन केले. सहस्र वर्षे उग्र तपश्चर्या केली. त्याच्या तपश्चर्येने संतुष्ट होऊन ब्रह्मदेव इंद्रादी देवगणांसह त्याच्या आश्रमात आला आणि म्हणाला–

परितुष्टोऽस्मि ते वत्स कर्मणानेन सुव्रत ।।– १४

वरं वृणीष्व भद्रं ते वरार्हस्त्वं महामते ।– १५

'वत्सा, हे सदाचार-संपन्न, ह्या तुझ्या कर्माने मी संतुष्ट झालो आहे. हे महामते, वरप्राप्ती होण्यास तू योग्य आहेस. ह्यास्तव वर मागून घे, तुझे कल्याण असो.' हे ऐकून वैश्रवण म्हणाला–

'भगवंल्लोकपालत्वमिच्छेयं लोकरक्षणम् ।– १६

भगवान्, लोकरक्षण ज्याच्या योगाने होते, असे लोकपालत्व प्राप्त व्हावे, अशी माझी इच्छा आहे. तेव्हा ब्रह्मदेव संतुष्ट होऊन म्हणाला–

'अहं वै लोकपालानां चतुर्थं स्रष्टुमुद्यतः ।।– १७
यमेन्द्रवरुणानां च पदं यत्तव चेप्सितम् ।
तद्गच्छ बत धर्मज्ञ निधीशत्वमवाप्नुहि ।। १८
शक्राम्बुपयमानां च चतुर्थस्त्वं भविष्यसि ।
एतच्च पुष्पकं नाम विमानं सूर्यसंनिभम् ।। १९
प्रतिगृह्णीष्व यानार्थं त्रिदशैः समतां व्रज ।
स्वस्ति तेऽस्तु' . . . ।। २०

'चौथा लोकपाल निर्माण करण्यास मी उद्युक्त झालो आहे. ह्यास्तव यम, इंद्र, वरुण ह्यांना जे लोकपालपद प्राप्त झाले आहे, ते तुलाही प्राप्त होईल, व दुसरेही जें काही तुझ्या मनात असेल ते सिद्धीस जाईल. तस्मात्, हे धर्मवेत्त्या, जा. तुला निधीशत्व प्राप्त होईल आणि इंद्र, वरुण व यम यांमध्ये तूही चौथा लोकपाल होशील. हे सूर्यासारखे

पुष्पक नामक विमान गमन करण्याकरिता तू घे आणि देवांच्या बरोबरीचा हो. तुझे कल्याण असो.'

वैश्रवणाने ब्रह्मदेवाला वर मागितलेला नाही. ब्रह्मदेवाने संतुष्ट होऊन त्याला वर मागण्यास सांगितले, म्हणून त्याने आपले मनोगत व्यक्त केले असल्याने हा अयाचित वर होय. निधीशत्व आणि पुष्पक विमान मिळावे, म्हणून त्याने इच्छा प्रकट केली नसताही ब्रह्मदेवाने आपणहून ते त्यास दिले. त्यामुळे हा वर अयाचित आहे, हे स्पष्ट होते. पुष्पक विमानाची प्राप्ती हा वर नसून अनुग्रह आहे.

## ५२. शंकर < सुकेश उत्तरकाण्ड/४

रामाच्या पृच्छेवरून अगस्त्य मुनी राक्षसोत्पत्ती कशी झाली हे सांगत आहे.

प्रजापतीने प्रथम उदक निर्माण केले आणि त्याच्या रक्षणासाठी प्राणी उत्पन्न केले. क्षुधा, तृषा आणि भय यांमुळे प्राणी व्याकुळ झाले असता त्यांनी 'आम्ही काय करावे' असा प्रजापतीला प्रश्न केला. तेव्हा प्रजापतीने त्यांना उदक रक्षण करण्यास सांगितले. 'रक्षामः' असे जे म्हणाले ते 'राक्षस' व 'यक्षामः' असे म्हणणारे 'यक्ष' झाले.

हेती व प्रहेती हे राक्षसाधिपती होते. प्रहेती धर्मनिष्ठ असल्याने तो तपोवनात गेला. कालाची बहीण माया हिच्याशी हेतीने विवाह केला. त्यांचा पुत्र विद्युत्केश. तो यौवन-संपन्न झाला असता हेतीने संध्येची कन्या सालकटंकटा हिच्याशी त्याचा विवाह लावून दिला. तो राक्षस तिच्याशी इंद्राप्रमाणे रममाण होत असे. तिला गर्भसंभव झाल्यानंतर यथाकाल मंदार पर्वतावर ती प्रसवली, परंतु तिने ते मूल तिथेच सोडून दिले व ती पतीबरोबर रममाण होऊ लागली. उमेसह गमन करणाऱ्या शंकराला त्या परित्यक्त बालकाचे रोदन ऐकू आले. पार्वतीला त्याची दया आली. तिने शंकराला प्रार्थना केली. तेव्हा

तं राक्षसात्मजं चक्रे मातुरेव वयःसमम् ।
अमरं चैव तं कृत्वा महादेवोऽक्षरोऽव्ययः ।२९

'स्वमाहात्म्यापासून च्युत न होणाऱ्या अविनाशी महादेवाने राक्षस-पुत्राला अमर करून मातेप्रमाणे त्याचे वय प्रौढ केले.' आणि पार्वतीचे प्रिय करण्यासाठी त्याला आकाशगामी नगरही दिले. हा परित्यक्त राक्षस-पुत्र म्हणजे सुकेश होय.

आकाशगामी नगर हा अनुग्रह आहे, वर नाही.

उत्तरकाण्ड/५

सुकेशं धार्मिकं दृष्ट्वा वरलब्धं च राक्षसम्।
ग्रामणीर्नाम गन्धर्वो विश्वावसुसमप्रभः ।। १

सुकेश राक्षसाला वर प्राप्त झाला आहे आणि तो धार्मिक आहे असे अवलोकन करून, प्रभेने विश्वावसूप्रमाणे असणाऱ्या ग्रामणी नामक गन्धर्वाने आपली सुंदर कन्या देववती त्याला पत्नी म्हणून दिली.

वरदानकृतैश्वर्यं सा तं प्राप्य पतिं प्रियम् ।।–३
आसीद्देववती तुष्टा धनं प्राप्येव निर्धनः ।–४

वरप्रदानामुळे ज्याला ऐश्वर्य प्राप्त झाले आहे, असा प्रिय पती प्राप्त झाल्याकारणाने ती देववती धनप्राप्ती झाल्याने संतुष्ट होणाऱ्या दरिद्री पुरुषाप्रमाणे आनंदित झाली.

हा अयाचित वर आहे. पहा : वर – ब्रह्मदेव < माल्यवान, सुमाली, माली पृ. १९६

## ५३. उमा < राक्षसी उत्तरकाण्ड/४

पहा : वर–शंकर < सुकेश पृ. १४४–१४५

उमयापि वरो दत्तो राक्षसीनां नृपात्मज ।।–३०
सद्योपलब्धिर्गर्भस्य: प्रसूतिः सद्य एव च ।
सद्य एव वयःप्राप्ति मातुरेव वयःसमम् ।। ३१

हे राजपुत्रा, समागम होताच गर्भ प्राप्त होणे, गर्भ प्राप्त होता क्षणीच प्रसूती होणे आणि गर्भ उत्पन्न होता क्षणी त्याला मातेप्रमाणे

प्रौढ वय प्राप्त होणे ', असा वर उमेने ही राक्षसींना दिला.

राक्षसींना वर का दिला, हे स्पष्ट नाही. हा अयाचित वर आहे.

## ५४. ब्रह्मदेव < माल्यवान, सुमाली, माली उत्तरकाण्ड/५

रामाने पृच्छा केली असता अगस्त्य ऋषी राक्षसोत्पत्ती आणि सुकेश-पुत्र व त्यांची संतती याविषयी कथन करीत आहे.

सुकेशाला देववतीपासून माल्यवान, सुमाली आणि माली असे तीन तेजस्वी पुत्र झाले. पित्याला तप:सामर्थ्याने वरप्राप्ती आणि ऐश्वर्य मिळाल्याचे जाणून त्या तिन्ही भावांनी मेरुपर्वतावर घोर तपश्चर्या आरंभिली. त्यांच्या तपश्चर्येने ब्रह्मदेव संतुष्ट झाला आणि '**वरदोऽस्मीत्यभाषत**'– 'मी तुम्हाला वर देण्यास उद्युक्त झालो आहे', असे म्हणाला, तेव्हा ते हात जोडून ब्रह्मदेवास म्हणाले–

**तपसाऽऽराधितो देव यदि नो दिशसे वरम् ।।– १४**
**अजेयाः शत्रुहन्तारस्तथैव चिरजीविनः ।**
**प्रभविष्णवो भवामेति परस्परमनुव्रताः ।।–१५**
**एवं भविष्यथेत्युक्त्वा सुकेशतनयान्विभुः ।– १६**

'देवा, तपश्चर्येमुळे तू प्रसन्न होऊन जर आम्हाला वर देत असशील, तर आम्ही अजिक्य, शत्रुघातक, चिरंजीव, प्रभू आणि परस्परांवर प्रीती करणारे असे व्हावे.' 'ह्याप्रमाणे तुम्ही व्हाल', असे ब्रह्मदेवाने सुकेश-पुत्रांना सांगितले.

ब्रह्मदेवाच्या वरामुळे निर्भय झालेले ते निशाचर देवांना आणि असुरांना पीडा देऊ लागले. विश्वकर्म्याकडून त्यांनी स्वतासाठी महेश्वराप्रमाणे सुवेल पर्वताच्या शिखरावर गृह करून घेतले.

ब्रह्मदेवाने संतुष्ट होऊन आपणहून वर देऊ केला असला, तरी वर मिळवण्याच्या हेतूनेच त्यांनी तपश्चर्या केली असल्याने हा याचित वर मानावयास हवा.

## उत्तरकाण्ड/६

देव आणि तपोधन ऋषी यांचा सुकेश-पुत्र वध करू लागल्याने ते महेश्वराला शरण जाऊन म्हणाले–

**सुकेशपुत्रैर्भगवन्पितामहवरोद्धतैः ।**
**प्रजाध्यक्ष प्रजाः सर्वा बाध्यन्ते रिपुबाधनैः ॥ ४**

'भगवन्, हे प्रजाधिपते, ब्रह्मदेवाच्या वरामुळे गर्विष्ठ झालेले शत्रुनाशक सुकेश-पुत्र सर्व प्रजेला पीडा देत आहेत.'

आमचे आश्रम त्यांनी अयोग्य करून टाकले असून देवांना स्वर्गातून हाकलून लावून ते स्वता देवांप्रमाणे तेथे क्रीडा करीत आहेत. तरी आपण उग्र रूप धारण करून त्या देव-कंटकांचा वध करावा. देवांची विनंती शंकराने ऐकून घेतली, तरी सुकेशावर त्याची कृपादृष्टी असल्याने 'मला ते अवध्य आहेत; मी त्यांचा वध करणार नाही. परंतु त्यांच्या वधाचा उपाय सांगेन', असे तो म्हणाला. 'तुम्ही विष्णूला शरण गेल्यास, तो त्यांचा वध करील', असे त्याने सुचविले. त्याप्रमाणे विष्णूला शरण जाऊन ते म्हणाले–

**सुकेशतनयैर्देव त्रिभिस्त्रेताग्निसंनिभैः ।**
**आक्रम्य वरदानेन स्थानान्यपहृतानि नः ॥ १४**

'देवा, अग्निहोत्रादी श्रौतकर्मसंबंधी तीन अग्नीप्रमाणे तेजस्वी असलेल्या सुकेशपुत्रांनी वरदानामुळे आमची स्थाने पादाक्रांत करून हरण केली आहेत.' तरी त्या मदोन्मत्त राक्षसांचा वध करून आमचे भय नाहीसे करावे. देवांना अभय देऊन विष्णू म्हणाला, 'तुम्ही काळजी करू नका. मी त्यांचा वध करीन.' देवांचा हा उद्योग ऐकून माल्यवान राक्षस आपल्या भावांना म्हणाला– 'देव आणि ऋषी एकत्र येऊन शंकराकडे गेले असून त्यांनी त्याला

**सुकेशतनया देव वरदानबलोद्धताः ।**
**बाधन्ते ऽस्मान्समुद्दृप्ता घोररूपाः पदे पदे ॥ २५**

'वरदानाच्या प्रभावामुळे फुगून गेलेले सुकेशपुत्र अतिशय गर्विष्ठ

झाले असून पदोपदी आम्हाला पीडा देत आहेत.' असे सांगितले. तेव्हा त्याने त्यांचा वध करावा अशी विनंती केली. शंकराने स्वता वध करण्याचे नाकारले असले तरी वधाचा उपाय त्यांना कथन केला.

सुमाली वरलब्धांस्तु ज्ञात्वा चैतान्निशाचरान् ।
उदतिष्ठद्भयं त्यक्त्वा सानुगः स रसातलात् ।। ११–१

निशाचरांना ब्रह्मदेवांनी वरदान केल्याचे ऐकून सुमाली राक्षस निर्भय होऊन अनुयायांसह रसातळातून बाहेर आला, असा हा उल्लेख उत्तरकाण्ड ११–१ मध्ये आहे.

## ५५. ब्रह्मदेव < बिभीषण उत्तरकाण्ड/१०

रावण आणि त्याचे भ्राते यांची तपश्चर्या व वरप्राप्ती याविषयी अगस्त्य मुनी रामाला सांगत आहे.

रावण आणि त्याच्या भ्रात्यांनी जितेंद्रिय राहून अनेक प्रकारचे धर्मविधी केले. विभीषणाने एका पायावर उभे राहून पाच हजार वर्षे तपश्चर्या केली. मस्तक व बाहू वर करून आणि वेदाध्ययनमग्न होऊन आणखी पाच हजार वर्षे धर्मात्मा बिभीषणाने सूर्याची तपश्चर्या केली त्याच्या तपश्चर्येने प्रसन्न होऊन ब्रह्मदेव म्हणाला–

'परितुष्टोऽस्मि धर्मात्मन्वरं वरय सुव्रत' ।– २८

'तुझ्यावर मी संतुष्ट झालो आहे. हे सदाचरणसंपन्न धर्मनिष्ठा, तू वर माग.' तेव्हा बिभीषण हात जोडून म्हणाला, प्रत्यक्ष जगदीश मजवर प्रसन्न झाल्याने मी कृतार्थ झालो आहे–

प्रीतेन यदि दातव्यो वरो मे श्रृणु सुव्रत ।
परमापद्गतस्यापि धर्मे मम मतिर्भवेत् ।। ३०
अशिक्षितं च ब्रह्मास्त्रं भगवन्प्रतिभातु मे ।
या या मे जायते बुद्धिर्येषु येष्वाश्रमेषु च ।। ३१

सा सा भवतु धर्मिष्ठा तं तं धर्मं च पालये।
एष मे परमोदारो वरः परमको मतः॥ ३२

'आपण प्रसन्न होऊन जर मला वर देतच असाल तर हे सुव्रत, माझे ऐका. पराकाष्ठेच्या विपत्तीत जरी मी सापडलो, तरी धर्माकडेच माझी मती असावी. भगवन्, उपदेशावाचून ब्रह्मास्त्राची मला स्फूर्ती व्हावी आणि जी जी बुद्धी ज्या ज्या आश्रमामध्ये मला होईल ती ती धर्माला अनुसरून असावी व त्या त्या धर्माचे मी परिपालन करावे. हे परम उदार, हा वर मला अतिशय प्रिय आहे.'

धर्मनिष्ठांना जगात काही दुर्लभ नसते, हे जाणणाऱ्या बिभीषणाचे भाषण ऐकून ब्रह्मदेव म्हणाला–

यस्माद्राक्षसयोनौ ते जातस्यामित्रनाशन ।।–३४
नाधर्मे जायते बुद्धिरमरत्वं ददामि ते।– ३५

'राक्षस योनीमध्ये जन्म झाला असूनही ज्या अर्थी तुझी मती अधर्माकडे जात नाही, त्या अर्थी मी तुला अमरत्व देतो.'

प्रसन्न होऊन ब्रह्मदेवाने वर मागण्यास बिभीषणाला सांगितल्याने त्याने मागितलेला वर याचित नाही. तथापि तपश्चर्येने प्रसन्न केले असल्याने वराची इच्छा असावी, असे मानले तरी ब्रह्मदेवाने अमरत्वाचा वर त्याने न मागता आपणहून दिला असल्याने हा वर अयाचित आहे.

## ५६. ब्रह्मदेव < कुंभकर्ण उत्तरकाण्ड/१०

रावण आणि त्याचे भ्राते यांची तपश्चर्या व वरप्राप्ती याविषयी अगस्त्य मुनी रामाला सांगत आहे.

रावण आणि बिभीषण यांच्या तपश्चर्येने संतुष्ट होऊन ब्रह्मदेवाने त्यांना वर दिल्यानंतर तो जेव्हा कुंभकर्णाला वर देऊ लागला तेव्हा सर्व देव हात जोडून त्याला म्हणाले– 'आपण कुंभकर्णाला तरी असा वर देऊ नका, हा दुर्बुद्धी लोकांना कसा त्रास देत आहे हे तुम्ही जाणताच.

सात अप्सरा, महेंद्राचे दहा सेवक, अनेक मानव आणि ऋषी याने भक्षण केले आहेत. वर प्राप्त झाला नसताही जर हा असा वागतो, तर वर प्राप्तीनंतर हा त्रैलोक्यही भक्षण करील. आपण वराच्या मिषाने त्याला मोह उत्पन्न करा, म्हणजे लोकांचे कल्याण होईल, आणि ह्याच्या प्रार्थनेलाही मान दिल्यासारखे होईल. देवांची विनंती ऐकून ब्रह्मदेवाने सरस्वतीचे चिंतन केले असता ती त्याच्या सन्निध येऊन उभी राहिली. 'आपले कोणते कार्य करावे', अशी तिने पृच्छा केली असता ब्रह्मदेवाने तिला देवांच्या इच्छेनुसार कुंभकर्णाचे ठिकाणी वर्तन करण्यास सांगितले. तिनें अनुमती दिली. तेव्हा ब्रह्मदेव कुंभकर्णाला म्हणाला–

**कुंभकर्ण महाबाहो वरं वरय यो मतः ।– ४४**

'हे महापराक्रमी कुंभकर्णा, इच्छेस येईल तो वर माग.' हे शब्द ऐकून कुंभकर्ण म्हणाला–

**स्वप्तुं वर्षाण्यनेकानि देवदेव ममेप्सितम् ।– ४५**

'देवाधिदेवा, अनेक वर्षे लोटेपर्यंत निद्रा घेत पडणे हे मला इष्ट आहे.' 'तथास्तु' म्हणून ब्रह्मदेव गेला आणि कुंभकर्णाच्या तोंडून देवांना प्रिय असे शब्द वदवून घेऊन सरस्वतीही कुंभकर्णाला सोडून गेली. कुंभकर्ण नंतर शुद्धीवर आला आणि विचित्र वर मागितल्याबद्दल दुःखी झाला.

हा अयाचित वर आहे.

## ५७. शंकर < रावण — उत्तरकाण्ड/१६

दशाननाला रावण हे नाव कसे प्राप्त झाले आणि शंकराने त्याला दिलेला वर यासंबंधी अगस्त्य मुनी रामाला सांगत आहे.

शंकराविषयी अत्यंत पूज्य भाव असलेल्या नंदीसमोर रावणाने जे उद्धट वर्तन केले आणि उमंट शब्द उच्चारले, त्यास्तव त्याने त्यास शाप दिला. परंतु त्याच्या शब्दांकडे दुर्लक्ष करून रावण जेव्हा शंकर–पार्वती यांची क्रीडा चालू असलेल्या पर्वतावर जाण्याचा चंग बांधू

लागला, तेव्हा पुष्पक विमानाची गती कुंठित झाली. चिडून तो पर्वतच उपटण्याचा प्रयत्न करू लागला असता शंकराने पायाच्या अंगठ्याने तो पर्वत दाबला व त्याखाली रावणाचे हात दडपले गेले. तो संतप्त होऊन गर्जना करू लागला. त्याच्या अमात्यांनीही त्याला महादेवाला संतुष्ट करण्याची विनंती केली. तेव्हा रावणाने विविध प्रकारे त्याची स्तुती केली व तो त्याला शरण गेला. एक हजार वर्षांपर्यंत हात चेपलेल्या स्थितीत त्याने शंकराला संतुष्ट करण्याचा प्रयत्न केला असता, त्याचे हात मोकळे करून शंकराने आपली संतुष्टता प्रकट केली. पर्वताखाली दडपून गेल्याने त्याने जो अतिभयंकर आक्रोश केला त्यायोगे सारे त्रैलोक्य रावित (नादित) झाले, म्हणून ' रावण ' या नावाने तू ख्यात पावशील, असे शंकराने सांगितले. आणि त्याला परत जाण्यास अनुज्ञा दिली. तेव्हा रावण शंकराला म्हणाला–

**प्रीतो यदि महादेव वरं मे देहि याचतः ।। ४०**

' हे महादेवा, तू जर प्रसन्न झाला असशील तर मज याचकाला एक वर दे. ' देव, गन्धर्व, दानव, राक्षस, गुह्यक, नाग व इतरही बलाढ्य प्राणी ह्यांपासून मला अवध्यत्व प्राप्त झाले आहे. हे देवा, मनुष्याची मी गणनाच करीत नाही. मी त्यांना क्षुद्र समजतो. दीर्घायुष्यही मला ब्रह्मदेवापासून प्राप्त झाले आहे. परंतु–

**वाञ्छितं चायुषः शेषं शस्त्रं त्वं च प्रयच्छ मे । –४३**

अवशिष्ट राहिलेल्या आयुष्याचा पूर्ण उपभोग घेता यावा म्हणजे शापादिकांमुळे ते कमी होऊ नये, अशी माझी इच्छा आहे. यास्तव अवशिष्ट आयुष्य आणि शस्त्र मला द्या.

रावणाच्या याचनेप्रमाणे शंकराने त्याला चंद्रहास नावाचे अति देदीप्यमान खड्ग आणि अवशिष्ट आयुष्य दिले, आणि तो म्हणाला, ' ह्या शस्त्राची अवज्ञा करू नको. तुझ्या हातून जर त्याची अवज्ञा झाली तर हे शस्त्र माझ्याकडेच येईल, यात संशय नाही. '

हा याचित वर असून चंद्रहास खड्गाची प्राप्ती अनुग्रहासारखी आहे.

## ५८. इंद्र < मयूर उत्तरकाण्ड/१८

अगस्त्य मुनी रामाला मरुत्त राजाच्या यागाविषयी सांगत आहे.

उशीरबीज नावाच्या देशात मरुत्त राजा देवांसह याग करीत होता. बृहस्पतीचा भ्राता धर्मवेत्ता संवर्त त्याचा पुरोहित होता. रावणाने हा याग पाहिला असल्याचे लक्षात येताच, त्याचा हल्ला होणार असे समजून भयग्रस्त झालेल्या देवांनी तिर्यग् योनीमध्ये प्रवेश केला. इंद्र मयूर झाला, धर्मराज यम काक पक्षी बनला आणि वरुणाने हंसाचे रूप स्वीकारले. धनाध्यक्ष कुबेराने सरडयाचे रूप धारण केले. इतर देवांनीही अन्य पशुपक्ष्यांची रूपे धारण केली. त्या वेळी रावणाने यज्ञमंडपात प्रवेश केला आणि त्याने मरुत्त राजाला युद्धार्थ आव्हान दिले. मरुत्ताने न घाबरता त्याला, तू कोण असा प्रतिप्रश्न केला. रावणाने मोठ्या फुशारकीने आपले सामर्थ्य वर्णिले. तेव्हा मरुत्त संतापून युद्ध-सज्ज झाला, परंतु त्याच्या पुरोहिताने त्याचा मार्ग रोखला. ‘ तुला प्रहार करणे योग्य नाही. हे माहेश्वर सत्र समाप्त झाल्याशिवाय दीक्षा घेतलेल्यास युद्धाचा अधिकार नाही, अन्यथा तुझे कुल दग्ध होईल. खेरीज युद्धात जय होईलच ही खात्री नाही, कारण हा राक्षस अजिक्य आहे. ’ मरुत्ताने पुरोहिताच्या उपदेशानुसार युद्धाचा विचार सोडून दिला. रावणाचा जय झाल्याची घोषणा शुकाने केली. यज्ञार्थ आलेल्या महर्षींना भक्षण करून रावण पुनरपी पृथ्वीवर संचार करू लागला. तो गेल्यावर देवांनी आपापली रूपे धारण केली व त्यांनी त्या त्या प्राण्यांना व पक्ष्यांना वरदान दिले.

हर्षात्तदाब्रवीदिन्द्रो मयूरं नीलबर्हिणम् ।
प्रीतोऽस्मि तव धर्मज्ञ भुजङ्गाद्धि न ते भयम् ।। २२

इदं नेत्रसहस्रं तु यत्तद् बर्हे भविष्यति ।
वर्षमाणे मयि मुदं प्राप्स्यसे प्रीतिलक्षणाम् ।। २३

एवमिन्द्रो वरं प्रादान्मयूरस्य सुरेश्वरः ।। २४

नीलवर्ण पिसाऱ्याने युक्त असलेल्या मयूर पक्ष्याला इंद्र आनंदाने म्हणाला– ‘ हे धर्मवेत्त्या, मी तुझ्यावर प्रसन्न झालो आहे. तुला सर्पाचे

भय राहणार नाही. हे जे माझे हजार नेत्र आहेत, ते तुझ्या पिसाऱ्यावर राहतील आणि मी वृष्टी करू लागलो असता प्रेमसूचक आनंद तुला प्राप्त होईल.' ह्याप्रमाणे देवराज इंद्राने मयूर पक्ष्याला वर दिला.

पूर्वी मोराची पिसे केवळ नीलवर्णाचीं होती. या वरदानामुळे ती नेत्रयुक्त झाली.

हा अयाचित वर होय.

### ५९. यम < काक उत्तरकाण्ड/१८

अगस्त्य मुनी रामाला मरुत्त राजाच्या यागाविषयी सांगत आहे.

पहा : वर– इंद्र < मयूर पृ. २०२

**धर्मराजोऽब्रवीद्राम प्राग्वंशे वायसं प्रति ।**
**पक्षिस्तवास्मि सुप्रीतः प्रीतस्य वचनं श्रृणु ।। २६**

**यथान्ये विविधै रोगैः पीडयन्ते प्राणिनो मया ।**
**ते न ते प्रभविष्यन्ति मयि प्रीते न संशयः ।। २७**

**मृत्युतस्ते भयं नास्ति वरान्मम विहंगम ।**
**यावत्त्वां न वधिष्यन्ति नरास्तावद्भविष्यसि ।। २८**

**ये च मद्विषयस्था वै मानवाः क्षुधयार्दिताः ।**
**त्वयि भुक्ते सुतृप्तास्ते भविष्यन्ति सबान्धवाः ।। २९**

प्राग्वंशावर बसलेल्या काक पक्ष्याला धर्मराज यम म्हणाला– "हे पक्ष्या, मी तुझ्यावर प्रसन्न झालो आहे. ह्यास्तव प्रसन्न झालेल्या माझे भाषण तू श्रवण कर. इतर प्राण्यांना ज्याप्रमाणे मी नाना प्रकारच्या रोगांनी पीडा देत असतो, त्याप्रमाणे मी तुझ्यावर प्रसन्न झालो असल्यामुळे माझ्या हातून तुला रोगाची पीडा होणार नाही. जोपर्यंत मनुष्यादी इतर प्राणी वध करणार नाहीत, तोपर्यंत तू कायम राहशील. माझ्या प्रदेशात राहणारे जे क्षुधेने पीडित झाले असतील, ते तुझे भोजन झाले असता बांधवांसहवर्तमान अत्यंत तृप्त होतील."

हा अयाचित वर होय.

## ६०. वरुण < हंस उत्तरकाण्ड/१८

अगस्त्य मुनी रामाला मरुत्त राजाच्या यागाविषयी सांगत आहे.

पहा : वर – इंद्र < मयूर पृ. २०२

वरुणस्त्वब्रवीद्धंसं गङ्गातोयविचारिणम् ।
श्रूयतां प्रीतिसंयुक्तं वचः पत्ररथेश्वर ।। ३०

वर्णो मनोरमः सौम्यश्चन्द्रमण्डलसंनिभः ।
भविष्यति तवोदग्रः शुद्धफेनसमप्रभः ।। ३१

मच्छरीरं समासाद्य कान्तो नित्यं भविष्यसि ।
प्राप्स्यसे चातुलां प्रीतिमेतन्मे प्रीतिलक्षणम् ।। ३२

गंगोदकात संचार करणाऱ्या पक्षिराज हंसाला वरुण म्हणाला– "माझे सप्रेम भाषण तू श्रवण कर. शुद्ध फेनाप्रमाणे ज्याची कांती आहे आणि चंद्रमंडलाप्रमाणे ज्याचे तेज आहे असा मनोहर, सौम्य व उत्कृष्ट वर्ण तुला प्राप्त होईल. मद्देहरूप जलाच्या आश्रयाने तू नेहमी मनोहर राहशील आणि माझ्या प्रेमाचे लक्षण म्हणून तुला अतुल आनंद प्राप्त होईल."

पूर्वी हंसांचा वर्ण पांढरा नव्हता. त्यांच्या पंखांची टोके नीलवर्ण असत आणि वक्षस्थले कोमल तृणाप्रमाणे श्यामवर्ण असत.

हा अयाचित वर होय.

## ६१. वैश्रवण < कृकलास ( सरडा ) उत्तरकाण्ड/१८

अगस्त्य मुनी रामाला मरुत्त राजाच्या यागासंबंधी सांगत आहे.

पहाः वर – इंद्र < मयूर पृ. २०२

अथाब्रवीद्वैश्रवणः कृकलासं गिरौ स्थितम् ।
हैरण्यं सम्प्रयच्छामि वर्णं प्रीतस्तवाप्यहम् ।। ३४

सद्रव्यं च शिरो नित्यं भविष्यति तवाक्षयम् ।
एष काञ्चनको वर्णो मत्प्रीत्या ते भविष्यति ।। ३५

पर्वतावर स्थिर असलेल्या सरड्याला वैश्रवण म्हणाला– " मी तुझ्यावर प्रसन्न झालो आहे. ह्यास्तव मी तुलाही सुवर्णतुल्य वर्ण देतो. तुझे मस्तक नेहमी सुवर्णवर्ण राहील. सारांश माझ्या प्रेमामुळे हा सुवर्णवर्ण तुला प्राप्त होईल. "

हा अयाचित वर होय.

## ६२. ब्रह्मदेव < निवातकवच उत्तरकाण्ड/२३

अगस्त्य मुनी रामाला रावणाचा पराक्रम कथन करीत आहे.

यमाला जिंकल्यानंतर मारीच प्रभृती अमात्यांसह रावण पुष्पक विमानातून सागरात प्रविष्ट होऊन रसातळाला गेला. वासुकीने परिपालन केलेल्या भोगवती नगरीमध्ये जाऊन नागांना त्याने पादाक्रांत केले. नंतर तो मणिमयी नगरीला गेला.

निवातकवचास्तत्र दैत्या लब्धवरा वसन् ।– ६

' त्या ठिकाणी ब्रह्मदेवापासून वर प्राप्त झालेले निवातकवच दैत्य रहात होते. '

त्यांना युद्धार्थ आव्हान दिले. एक वर्षभर त्यांचे युद्ध चालू होते, परंतु कोणत्याच पक्षाचा जय होईना. तेव्हा विमानारूढ ब्रह्मदेव तेथे आला आणि म्हणाला– ' देव-दैत्यांच्या हातूनही ह्या रावणाचा युद्धामध्ये पराजय होणे शक्य नाही आणि देव-दानवांच्या हातूनही तुमचा नाश होणे कठीण आहे. ' तेव्हा रावणाशी सख्य करण्याचा त्याने उपदेश केला. ब्रह्मदेवाच्या इच्छेप्रमाणे निवातकवच व रावण यांचे सख्य झाले.

वराचे स्वरूप स्पष्ट नाही. केवळ वर मिळाल्याचा उल्लेख आहे.

## ६३, रुद्र < मांधाता उत्तरकाण्ड/प्रक्षिप्त/३

अगस्त्य मुनी रामाला रावण-मांधाता यांच्या युद्धाचे वृत्त कथन करीत आहे.

अनेक प्रदेश पादाक्रांत करीत रावण सोमलोकी आला असता त्याला तेथे विलासी पुण्यजन दिसले. पर्वत मुनीने त्याला त्यांची माहिती करून दिली. ते युद्धेच्छू नव्हते, स्वर्गेच्छू होते. रावणाने युद्धेच्छू कोण आहे अशी पृच्छा केली असता मुनीने राजा मांधाता याचे नाव उच्चारले. युद्धात त्याला जिंकण्याची इच्छा धरून रावण निघणार, एवढ्यात सप्त-द्वीप व समुद्र यांसह पृथ्वी जिंकून राजा मांधाता तेथे प्राप्त झाला. रावणाने त्याला युद्धार्थ आव्हान दिले असता 'तुला जर जीवित नको असेल तर माझ्याशी युद्ध कर,' असे राजाने प्रत्युत्तर दिले. उभयतांचे घनघोर युद्ध जुंपले. विविध प्रकारच्या शस्त्रांचा उपयोग उभयतांनी केला. सर्व प्राण्यांना भय उत्पादन करील, असे दिव्य व प्रचंड पाशुपतास्त्र मनात आणून मांधात्याने जपले असता त्या घोर अस्त्राच्या अवलोकनाने चराचर प्राणी त्रस्त झाले.

> वरदानात्तु रुद्रस्य तपसाराधितम् महत् ।
> ततः संकम्पते सर्व त्रैलोक्यं सचराचरम् ।। ५४
>
> देवाः संकम्पिताः सर्वे लयं नागाश्च संगताः ।–५५

तपश्चर्या करून रुद्राचा वर प्राप्त झाल्यामुळे मांधात्याला प्राप्त झालेल्या त्या प्रचंड अस्त्राच्या योगाने चराचर प्राण्यासहवर्तमान सर्व त्रैलोक्य कंपित होऊ लागले आणि नागही लयाला जाऊ लागले.

पुलस्त्य व गालव या श्रेष्ठ मुनींनी समाधियोगाने सारा प्रकार जाणून त्या राजाचे निवारण केले आणि निंदापूर्वक नाना प्रकारची भाषणे करून राक्षसश्रेष्ठ रावणालाही युद्धापासून परावृत्त केले.

वरप्राप्तीचा केवळ उल्लेख असून रुद्राने वर काय दिला होता, हे येथे स्पष्ट दिलेले नाही. तप-सामर्थ्याने याने वरप्राप्ती करून घेतली असल्याने हा याचित वर असावा.

हा सर्ग गीताप्रेस, गोरखपूर प्रतीत नाही. सर्ग २३ व २४ च्या मध्ये आलेल्या पाच प्रक्षिप्त सर्गांचा अनुवाद कै. काशिनाथशास्त्री लेले यांनी दिला आहे.

## ६५ महेश्वर < मेघनाद (इंद्रजित) उत्तरकाण्ड/२५

अगस्त्य मुनी रामाला महेश्वराने मेघनादाला दिलेल्या वरांविषयीचे वृत्त कथन करीत आहे.

लंकेजवळ निकुंभिला नावाचे एक उत्कृष्ट उपवन आहे. तेथे एकदा रावण अनुयायांसह गेला असता त्याला मोठा यज्ञ चाललेला दिसला. कृष्णाजिन धारण करून कमंडलू व दंड यांनी युक्त असलेला त्याचा पुत्र मेघनाद त्याच्या दृष्टीस पडला. त्याच्याजवळ जाऊन रावणाने त्यास आलिंगन दिले आणि म्हणाला– 'वत्सा, तू हे काय करीत आहेस, ते मला खरे खरे सांग.'

तेव्हा मेघनादाचा यज्ञ सफल व्हावा, म्हणून द्विजश्रेष्ठ उशना तपस्वी रावणाला म्हणाला– 'राजा, मी तुला सारे सांगतो. तू ऐक. अग्निष्टोम, अश्वमेध, बहुसुवर्णक यज्ञ, राजसूय, गोमेध, वैष्णव व माहेश्वर असे सात यज्ञ तुझ्या पुत्राने केले आहेत.

माहेश्वरे प्रवृत्ते तु यज्ञे पुम्भिः सुदुर्लभे ।
वरांस्ते लब्धवान्पुत्रः साक्षात्पशुपतेरिह ।। ९

कामगं स्यन्दनं दिव्यमन्तरिक्षचरं ध्रुवम् ।
मायां च तामसीं नाम यया सम्पद्यते तमः ।। १०

एतया किल सङ्ग्रामे मायया राक्षसेश्वर ।
प्रयुक्तया गतिः शक्या नहि ज्ञातुं सुरासुरैः ।। ११

अक्षयाविषुधी बाणैश्चापं चापि सुदुर्जयम् ।
अस्त्रं च बलवद्राजञ्छत्रुविध्वंसनं रणे ।। १२

एतान्सर्वान्वराँल्लब्ध्वा पुत्रस्तेऽयं दशानन ।
अद्य यज्ञसमाप्तौ च त्वां दिदृक्षन्स्थितो ह्यहम् ॥ १३

पुरुषांच्या हातून होण्यास फारच कठीण असा माहेश्वर यज्ञ सुरू झाला असता साक्षात् पशुपतीपासून तुझ्या पुत्रास वर प्राप्त झाले आहेत. इच्छेप्रमाणे गमन करणारा व अंतरिक्षातून संचार करणारा अक्षय दिव्य रथ आणि जिच्या योगाने तम उत्पन्न होते, अशी तामसी माया ही दान देऊन पशुपती त्याला म्हणाला– हे राक्षसाधिपते, संग्रामामध्ये या मायेचा प्रयोग केला असता देव-दैत्यांनाही आपली गती समजणे शक्य नाही. बाणांनी भरलेले अक्षय भाते, पराजित होण्यास अत्यंत दुर्घट असे धनुष्य, आणि संग्रामामध्ये शत्रूचा विध्वंस करणारे एक प्रचंड अस्त्र हे सर्व वर प्राप्त झाल्यानंतर हा तुझा पुत्र आज यज्ञ-समाप्ती झाली असता तुझ्या दर्शनाची वाट पहात आहे आणि माझाही उद्देश तोच आहे.

रावणाला मेघनादाचे करणे योग्य वाटले नाही. कारण यज्ञात द्रव्यरूपाने इंद्रप्रभृती शत्रूंचे पूजनच झाले. परंतु जे झाले ते ठीकच होय, असे मानून त्याने स्वताचे समाधान केले.

वरप्राप्तीसाठीच यज्ञकर्म आरंभिले असल्याने हे वर याचित होत. अक्षय दिव्य रथ, बाणांनी भरलेले अक्षय भाते, धनुष्य इत्यादींची प्राप्ती हे वस्तुतः वर नसून अनुग्रह होत. परंतु वाल्मीकीने ते वर असल्याचे स्पष्ट म्हटले आहे.

## ६५ ब्रह्मदेव < मेघनाद ( इंद्रजित ) उत्तरकाण्ड/३०

मेघनादाला ‘ इंद्रजित ’ या नावाची प्राप्ती कशी झाली आणि इंद्राची मुक्तता करून घेण्यासाठी त्याला ब्रह्मदेवाने कोणता वर देऊ केला, याविषयी अगस्त्य मुनी रामाला कथन करीत आहे.

युद्धात इंद्राचा पूर्ण पराभव करून मेघनाद त्यास लंकेस घेऊन

गेला. त्या वेळी इंद्राला सोडवून आणण्यासाठी ब्रह्मदेवाला पुढे करून सर्व देव लंकेला गेले. पुत्र आणि बंधुगणांसह असलेल्या रावणाला पाहून ब्रह्मदेव सौम्य शब्दांत त्याला म्हणाला – वत्सा रावणा, संग्रामातील तुझ्या पुत्राच्या अतुल शौर्याने मी संतुष्ट झालो आहे. हा तुझी बरोबरी करणारा आहे. स्वबलाने सर्व त्रैलोक्य जिंकून तू आपली प्रतिज्ञा सफल केली आहेस. पुत्रासहवर्तमान तुझ्यावर मी प्रसन्न झालो आहे.

अयं च पुत्रोऽतिबलस्तव रावण वीर्यवान् ।
जगतीन्द्रजिदित्येव परिख्यातो भविष्यति ।। ५

" हा तुझा वीर्यवान व अतिबलाढ्य पुत्र जगतामध्ये 'इंद्रजित' ह्याच नावाने प्रसिद्ध होईल. " ज्याच्या आश्रयाने रावणाने देव पादाक्रांत करून टाकले, तो राक्षस अजिक्य होईल, असे सांगून त्याने महेंद्राला मुक्त करण्याची त्यास विनंती केली. इतकेच नव्हे तर महेंद्राच्या सुटके-साठी त्याला काय हवे, अशी स्पष्ट पृच्छा केली. तेव्हा मेघनाद ब्रह्म-देवाला म्हणाला–

अमरत्वमहं देव वृणे यद्येष मुच्यते ।।– ८

'हे देवा, याला जर सोडावयाचे असेल तर अमरत्व प्राप्त होण्याचा वर मी मागत आहे.' तेव्हा ब्रह्मदेव म्हणाला–

नास्ति सर्वामरत्वं हि कस्यचित्प्राणिनो भुवि ।।– ९

'भूतलावरील कोणत्याही प्राण्याला (पक्षी, चतुष्पाद आणि इतरही महातेजस्वी भूते) संपूर्ण अमरत्व प्राप्त होत नाही.' तेव्हा ब्रह्मदेवाचे भाषण ऐकून मेघनाद म्हणाला–

श्रूयतां वा भवेत्सिद्धिः शतक्रतुविमोक्षणे ।।– ११

ममेष्टं नित्यशो हव्यैर्मन्त्रैः सम्पूज्य पावकम् ।
सङ्ग्राममवततुं च शत्रुनिर्जयकाङ्क्षिणः ।। १२

अश्वयुक्तो रथो मह्यमुत्तिष्ठेत्तु विभावसोः ।
तत्स्थस्यामरता स्यान्मे एष मे निश्चितो वरः ।। १३

तस्मिन्यद्यसमाप्ते च जप्यहोमे विभावसौ ।
युध्येयं देव सङ्ग्रामे तदा मे स्याद्विनाशनम् ।। १४

'असे होत नसेल तर इंद्राची मुक्तता करावयाची असल्यास दुसरा कोणता वर मला हवा आहे, तो ऐका– शत्रु-पराजयाची इच्छा धरणाऱ्या मला समंत्रक हवनीय द्रव्यांनी अग्नीचे नित्य पूजन करून संग्रामामध्ये जाणे इष्ट आहे. ह्यास्तव संग्रामास जाते वेळी अग्नीचा अश्वयुक्त रथ माझ्याकरिता तयार असावा आणि त्या रथावर मी असताना अमर असावे– हा वर मी ठरविला आहे. अग्निसंबंधी जप व होम समाप्त न होता जेव्हा मी देव-संग्रामामध्ये युद्ध करीन, तेव्हा माझा नाश व्हावा, हे मला संमत आहे.' तो पुढे असेही म्हणाला–

सर्वो हि तपसा देव वृणोत्यमरतां पुमान् ।
विक्रमेण मया त्वेतदमरत्वं प्रवर्तितम् ।। १५

'हे देवा, कोणताही पुरुष झाला तरी तपश्चर्येच्या योगाने तो अमरत्वाचा वर मागून घेत असतो. परंतु मी हे अमरत्व पराक्रमाने संपादन करीत आहे.'

ब्रह्मदेवाने 'तथास्तु' म्हटल्यावर मेघनादाने इंद्राची मुक्तता केली व देव स्वर्गाला गेले.

## युद्धकाण्ड/४४

वानर आणि राक्षस यांचे घनघोर युद्ध चालले असता अंगदाने इंद्रजिताला अगदी जेरीस आणले. त्याने त्याचा सारथी आणि अश्व यांचा वध केला. तेव्हा इंद्रजित संतप्त झाला. या संदर्भात त्याला ब्रह्मदेवाने दिलेल्या वराचा उल्लेख पुढीलप्रमाणे आहे–

सोऽन्तर्धानगतः पापो रावणी रणकर्शितः ।
ब्रह्मदत्तवरो वीरो रावणिः क्रोधमूर्च्छितः ।। ३४

'रणामध्ये जेरीस आल्यामुळे क्रोधाने व्याप्त झालेला व ब्रह्मदेवापासून वर मिळविलेला तो पापी इंद्रजित गुप्त झाला.

मायेचा आश्रय घेऊन इतरांच्या दृष्टीस न पडता नागपाशाने अभिमंत्रित केलेल्या शरबंधाने त्याने राम-लक्ष्मणांना बांधून टाकले.

### युद्धकाण्ड/५१

ज्या नागपाशाने इंद्रजिताने राम-लक्ष्मणांना बद्ध केले होते, तो गरुडाने तोडून टाकून त्यांची मुक्तता केली. तेव्हा वानरांनी प्रचंड गर्जना करून आपला आनंद व्यक्त केला. वानरांच्या गर्जना ऐकून रावण मात्र चिंतातुर झाला. आपली भीती व्यक्त करताना इंद्रजिताला प्राप्त झालेल्या वराविषयी त्याने पुढीलप्रमाणे उल्लेख केला आहे.

**घोरैर्दत्तवरैर्बद्धौ शरैराशीविषोपमैः।**
**अमोघैः सूर्यसंकाशैः प्रमथ्येन्द्रजिता युधि ।। १५**

'चिरकाल दुर्घट तपश्चर्या करून वर म्हणून (इंद्रजिताला) मेघनादाला प्राप्त झालेले जे सर्पांसारखे (विषयुक्त) उज्ज्वल घोर बाण ह्यांच्या योगाने त्यांना जर्जर करून बांधले होते.' ते माझे शत्रू सुटले असल्याने माझ्या सैन्याची आता धडगत दिसत नाही.

हा वर कोणी दिला याचा येथे स्पष्ट उल्लेख नाही. ब्रह्मदेवापाशी इंद्रजिताने मागितलेल्या वरात रथाचा उल्लेख असला तरी बाणांचा नाही. माहेश्वरी यज्ञाच्या समाप्तीनंतर त्याला धनुष्य, बाण वर म्हणून मिळाल्याचा उल्लेख युद्धकाण्ड सर्ग ७ मध्ये आहे.

पहा : वर– ? ८ मेघनाद, पृ. १७९–१८०

### युद्धकाण्ड/७२

लक्ष्मणाने अतिकायाचा वध केल्यानंतर शोकाकुल व उद्विग्न झालेल्या रावणाने असेच उद्गार काढले आहेत.

**तौ भ्रातरौ तदा बद्धौ घोरैर्दत्तवरैः शरैः।**
**यन्न शक्यं सुरैः सर्वैरसुरैर्वा महाबलैः ।। ६**

'बल व वीर्य ह्याविषयी प्रख्यात असलेला जो माझा पुत्र

इंद्रजित, त्याने वर म्हणून प्राप्त झालेल्या घोर बाणांनी त्या भ्रात्यांना बद्ध केलें होते आणि देव, महाबलाढ्य असुर (यक्ष, गंधर्व, पन्नग) ह्यांनाही ते घोर बंधन सोडता येणे शक्य नव्हते.' (परंतु जे राम–लक्ष्मण बाणबंधापासून मुक्त झाले, ते प्रभावानें, मायेने अथवा मोहनानें, हे मला काहीच कळत नाही.)

युद्धकाण्ड/७३

इंद्रजिताला प्राप्त झालेल्या ब्रह्मास्त्राची भीती रामानेही लक्ष्मणापाशी व्यक्त केली आहे.

इंद्रजिताने रावणासमोर 'राम-लक्ष्मणांना आपल्या बाणांनी आज छिन्नभिन्न करून टाकीन', अशी घोर प्रतिज्ञा केली. इंद्रजिताच्या बाणांनी वानर जर्जर झाले. त्यानें अनेक श्रेष्ठ वानरांचा वेध घेतला.

सुग्रीवमृषभं चैव सोऽङ्गदं द्विविदं तथा ।।– ४८
घोरैर्दत्तवरैस्तीक्ष्णैर्निष्प्राणानकरोत्तदा ।– ४९

'सुग्रीव, ऋषभ, अंगद आणि द्विविद ह्यांनाही वर म्हणून प्राप्त झालेल्या तीक्ष्ण घोर बाणांच्या योगानें त्याने जर्जर करून टाकले. राम-लक्ष्मणांवरही त्याने बाण-वृष्टी केली. तेव्हा राम लक्ष्मणाला म्हणाला–

स्वयम्भुवा दत्तवरो महात्मा समाहितोऽन्तर्हितभीमकायः ।
कथं नु शक्यो युधि नष्टदेहो निहन्तुमद्येन्द्रजिदुद्युतास्त्रः ।।६९

पुन्हा हा राक्षसाधिपती व देवराज-शत्रू मोठ्या ब्रह्मास्त्राच्या योगाने वानर सैन्याचा निःपात करून तीक्ष्ण बाणांनी आम्हाला पीडा देत आहे. 'ब्रह्मदेवाने ह्या महात्म्याला वर दिला आहे. आपले प्रचंड शरीर गुप्त करून हा सावधपणाने युद्ध करीत आहे. ह्यास्तव अस्त्र-प्रयोग करण्यास उद्युक्त झालेल्या आणि अदृश्य झालेल्या ह्या इंद्र-जिताचा संग्रामामध्ये आज कसा बरे वध करता येईल ?'

युद्धकाण्ड/८०

राम-लक्ष्मणांच्या वधाची प्रतिज्ञा केलेल्या इंद्रजिताने त्यांच्यावर

पाषाण-वृष्टीप्रमाणे शर-वृष्टी केली. या संदर्भात पुढील उल्लेख आहे.

**स रामं सूर्यसंकाशैः शरैर्दत्तवरैर्भृशम् ।**
**विव्याध सभरे क्रुद्धः सर्वगात्रेषु रावणिः ।। २८**

'क्रुद्ध झालेल्या त्या रावण-पुत्राने वर म्हणून प्राप्त झालेल्या सूर्यतुल्य तेजस्वी बाणांनी सर्व अवयवांचे ठिकाणी रामाला अतिशय वेध केला.'

### युद्धकाण्ड/८५

'इंद्रजिताने सीतेचा वध केला', हे हनुमानाच्या सांगण्यावरून ऐकता क्षणीच रामाला मूर्च्छा आली. लक्ष्मणाचा ह्या बातमीवर विश्वास बसत नव्हता. वानरांच्या पराक्रमाला अडथळा आणण्याच्या हेतूने इंद्रजिताने मायेचा अवलंब केला असावा, असे त्याला वाटत होते. लक्ष्मण व बिभीषणाने रामाला अनेक प्रकारे धीर दिला. निकुंभिला देवालयात होम करण्यासाठी गेलेल्या इंद्रजितावर लक्ष्मणाला सत्वर धाडण्याची बिभीषणाने रामाला विनंती केली. कारण जर इंद्रजिताचा होम पूर्ण झाला तर तो सर्वांचाच वध करील, अशी त्यास सार्थ भीती वाटत होती. ब्रह्मदेवाकडून इंद्रजिताला ब्रह्मास्त्र व यथेष्ट गमन करणारे अश्व प्राप्त झाले आहेत, हे बिभीषणाला माहीत होते. म्हणून तो इंद्रजिताला प्राप्त झालेल्या त्या वराबाबत रामाला म्हणाला—

**निकुम्भिलामसम्प्राप्तमकृताग्निं च यो रिपुः ।**
**त्वामाततायिनं हन्यादिन्द्रशत्रो स ते वधः ।। १४**

**वरो दत्तो महाबाहो सर्वलोकेश्वरेण वै ।**
**इत्येवं विहितो राजन्वधस्तस्यैष धीमतः ।। १५**

'इंद्रजिता, निकुंभिलेमध्ये जाऊन तू हवन करण्यापूर्वी जो शत्रू तुज शस्त्र धारण करणाऱ्याशी युद्ध करील, त्याच्या हातून तुझा वध होईल.' असा सर्वलोकाधिपती ब्रह्मदेवाने त्याला वर दिला आहे. त्या बुद्धिमान इंद्रजिताचा अशा रीतीनेच वध व्हावा, असे ब्रह्मदेवाने ठरविले आहे.

वध हा वराचा विषय होऊ शकत नाही. आपला वध व्हावा अशी कोणीही वर-याचना करणार नाही आणि प्रसन्न झालेली देवता 'तुझा अमुक अमुक प्रकारे वध होईल' अशी अभद्र वाणी उच्चारणार नाही. तेव्हा ह्या वराची संगती कशी लावावयाची, असा प्रश्न पडणे स्वाभाविक आहे. या वराचा अर्थ, एका विशिष्ट परिस्थितीत, मर्यादितच वध होईल एरवी होऊ शकणार नाही, एक विशिष्ट बाण सोडल्यास अन्यथा अमरत्व-' असा घ्यायला हवा. ब्रह्मदेवाने अशाच प्रकारचा एक वर सुंदोपसुंदांना दिला आहे.

ह्या वराच्या संदर्भात याचित-अयाचित हे शब्द गैरलागू ठरतात. ब्रह्मदेव आणि मेघनाद यांच्यातील इंद्राच्या मुक्ततेबाबतची भाषा शुद्ध व्यावहारिक, देवाण-घेवाणीची आहे. स्वता ब्रह्मदेवानेच आपणहून मेघनादाला इंद्राच्या मुक्ततेच्या मोबदल्यात तुला काय हवे, ते सांग अशी मुक्त मुभा दिली आहे. त्यानुसार मेघनादाने संपूर्ण अमरत्वाची मागणी केली. परंतु भूतलावर वास्तव्य करणाऱ्या कोणत्याही प्राण्याला संपूर्ण अमरत्व मिळू शकत नाही, असे समजताच मेघनादाने मर्यादित अवस्थेत आणि विशिष्ट परिस्थितीतच मृत्यू यावा, अन्यथा अमरत्व मिळावे, अशी दुसरी मागणी (वर) पुढे केली. ब्रह्मदेवाला कोंडीत पकडून त्याने आपला इच्छित वर पदरी पाडून घेतला आहे.

तपश्चर्येने देवतांना प्रसन्न करून वर-याचनेचा धोपटमार्ग मेघनादाला रुचत नाही. स्वपराक्रमाने वर-प्राप्ती करून घेत असल्याचा जाज्वल्य अहंकार त्याचे ठायी आहे. येथें 'मदायत्तं तु पौरुषम्' या कर्णाच्या उद्गाराची आठवण होते.

## ६६. सूर्य < मेरू

उत्तरकाण्ड/३५

अगस्त्य मुनी रामाला त्याच्या पृच्छेवरून हनुमानाच्या बालपणीचा वृत्तान्त सांगत आहे.

रामाच्या दृष्टीने हनुमानाचे सामर्थ्य, रावण आणि वाली यांच्या-

हूनही अधिक होते. खेरीज त्याचे ठायी अनेक गुणांचा मिलाफ झालेला होता. शौर्य, दक्षता, बल, धैर्य, बुद्धिमत्ता, राजनीती, राजकीय कृत्य तडीस नेण्याचे कौशल्य, पराक्रम, प्रभाव इत्यादी अनेक गुण त्याच्या आश्रयाने होते. त्याच्याविषयी त्याला विलक्षण आदर असल्याने तो त्याचे बालपण जाणून घेण्यास उत्सुक होता.

अगस्त्य मुनी रामाला म्हणतो– हे रघुवंशज श्रेष्ठा, बल, गती आणि मती यांमध्ये हनुमानाची बरोबरी करू शकेल, असा दुसरा कोणीही नाही. हनुमान बलाढ्य असूनही, आपल्या बलाची शक्ती समजू शकणार नाही– असा त्याला शाप होता. त्याचा बालपणीचा पराक्रम अतुलनीय आहे.

सूर्यदत्तवरस्वर्णः सुमेरुर्नाम पर्वतः ।– १९

'सूर्याने वर दिल्यामुळे सुवर्णरूप झालेला जो सुमेरू पर्वत', त्या ठिकाणी हनुमानाचा पिता केसरी अंजनी नावाच्या भार्येसह वास करीत असे. एकदा अंजनी फळे आणण्यासाठी वनात गेली असता, क्षुधेने व्याकुळ झालेल्या हनुमानाने उदयाचलावरील सूर्य हे फळ समजून ते प्राप्त करून घेण्यासाठी आकाशात उड्डाण केले. त्याचा वेग पाहून देवही आश्चर्यचकित झाले ....

सूर्याने मेरूला का वर दिला होता, हे स्पष्ट नाही. वरप्राप्तीचा केवळ उल्लेख आहे.

## ६७. इंद्र < हनुमान उत्तरकाण्ड/३६

अनेक देवतांकडून हनुमानाला जे विविध वर प्राप्त झाले, त्यांविषयी अगस्त्य मुनी रामाला कथन करीत आहे.

अतिवेगाने आकाशात उड्डाण करीत हनुमान सूर्याजवळ आलेला पाहून राहू क्रुद्ध झाला. इंद्राकडे जाऊन तो म्हणाला– 'सूर्यचंद्र हे क्षुधा दूर करण्याचे साधन तू मला दिले असून तेच तू दुसऱ्यालाही द्यावेस

याचा अर्थ काय ? मी आज अमावस्येच्या दिवशी सूर्याला ग्रस्त करण्याच्या उद्देशाने आलो असता दुसराच राहू तेथे आला व त्यानेंच एकाएकी सूर्याला ग्रस्त केले.' राहूचे बोलणे ऐकून इंद्र गोंधळला व त्याला बरोबर घेऊन सूर्याकडे निघाला. राहू दिसताच हनुमानाने सूर्याला सोडून त्याचाच पाठलाग केला. तेव्हा भयभीत झालेल्या राहूने इंद्राचे साहाय्य मागितले. क्रुद्ध झालेल्या इंद्राने हनुमानावर वज्र सोडले असता त्याची हनू मोडून तो पर्वतावर निश्चेष्ट होऊन पडला. वज्र-प्रहाराने विव्हळ झालेल्या आपल्या पुत्राला पाहून वायू इंद्रावर रागावला. त्याने जगतातील आपला संचार बंद केला व पुत्राला घेऊन तो एका गुहेत जाऊन बसला. वायूच्या क्रोधामुळे सर्व जगतातील भूतांचा श्वासोच्छ्वास बंद झाला व त्यांना जगणे अशक्य झाले. तेव्हा गंधर्व, देव, असुर व मानव ब्रह्मदेवाकडे आले आणि त्यांनी आपली दयनीय अवस्था सांगून संकट निवारण्याची विनंती केली. ब्रह्मदेवाने सारा प्रकार जाणला व त्यांच्यासह वायूकडे गमन केले. निश्चेष्ट पुत्राला मांडीवर घेऊन बसलेल्या वायूला पाहून सर्वांनाच त्याची दया आली. ब्रह्मदेवाचे दर्शन होताच वायूने साष्टांग प्रणिपात केला. ब्रह्मदेवाने हनुमानाच्या अंगावरून हात फिरवताच तो सावध झाला. वायूने आपल्या निरोधाचा त्याग केला. सारी प्रजा आनंदित झाली.

वायूचे प्रिय करण्याकरिता ब्रह्मदेव देवांना म्हणाला—'हे इंद्राग्निवरुण हो, हे शिवकुबेरप्रभृती देव हो, तुम्ही सर्व काही जाणता. तथापि मी तुम्हाला हिताची गोष्ट सांगतो. ह्या बालकाच्या हातून तुम्हाला आपले कार्य करून घ्यावयाचे आहे. ह्यास्तव हा वायू संतुष्ट होण्याकरिता तुम्ही सर्व हनुमानाला वर द्या.'

**ततः सहस्रनयनः प्रीतियुक्तः शुभाननः ।**
**कुशेशयमयीं मालामुत्क्षेप्येदं वचोऽब्रवीत् ।। १०**

**मत्करोत्सृष्टवज्रेण हनुरस्य यथा हतः ।**
**नाम्ना वै कपिशार्दूलो भविता हनुमानिति ।। ११**

अहमस्य प्रदास्यामि परमं वरमद्भुतम् ।
इतःप्रभृति वज्रस्य ममावध्यो भविष्यति ।। १२

हे ऐकून आनंदित झालेला व शुभ मुखाने युक्त असलेला सहस्रनयन इंद्र आपली सुवर्णकमलांची माला त्याला काढून देऊन म्हणाला– " माझ्या हातातून सुटलेल्या वज्राने ज्या अर्थी ह्याची हनू भग्न झाली आहे, त्या अर्थी हा कपिश्रेष्ठ हनुमान या नावाने विख्यात होईल. मी ह्याला अत्यंत अद्भुत वर देतो. आजपासून माझ्या वज्राने ह्याचा वध होणार नाही. "

हा अयाचित वर आहे.

## ६८. सूर्य < हनुमान उत्तरकाण्ड/३६

अनेक देवतांकडून हनुमानाला जे विविध वर प्राप्त झाले, त्यांविषयी अगस्त्य मुनी रामाला कथन करीत आहे.

पहा : वर– इंद्र < हनुमान पृ. २१५ ते २१७

मार्तण्डस्त्वब्रवीत्तत्र भगवांस्तिमिरापहः ।
तेजसोऽस्य मदीयस्य ददामि शतिकां कलाम् ।। १३
यदा च शास्त्राण्यध्येतुं शक्तिरस्य भविष्यति ।
तदास्य शास्त्रं दास्यामि येन वाग्मी भविष्यति ।।
न चास्य भविता कश्चित्सदृशः शास्त्रदर्शने ।। १४

भगवान सूर्य त्याला म्हणाला– मी ह्या आपल्या तेजाचा शंभरावा अंश ह्याला देतो. शिवाय शास्त्राध्ययन करण्यास जेव्हा हा समर्थ होईल, तेव्हा मी त्याला शास्त्र देईन आणि त्याच्या योगाने हा मोठा वक्ता होईल. शास्त्र–ज्ञानामध्ये कोणीही ह्याची बरोबरी करू शकणार नाही.

हा अयाचित वर आहे.

## ६९. वरुण < हनुमान उत्तरकाण्ड/३६

अनेक देवतांकडून हनुमानाला जे विविध वर प्राप्त झाले, त्यांविषयी अगस्त्य मुनी रामाला कथन करीत आहे.

पहा: वर – इंद्र<हनुमान पृ. २१५ ते २१७

**वरुणश्च वरं प्रादान्नास्य मृत्युर्भविष्यति ।**
**वर्षायुतशतेनापि मत्पाशादुदकादपि ।। १५**

वरुण म्हणाला– ‘ दहा दहा हजार वर्षे शेकडो वेळा निघून गेली तरी माझ्या पाशापासून अथवा उदकापासून ह्याला मृत्यू प्राप्त होणार नाही. ’

हा अयाचित वर आहे.

## ७०. यम < हनुमान उत्तरकाण्ड/३६

अनेक देवतांकडून हनुमानाला जे विविध वर प्राप्त झाले, त्यांविषयी अगस्त्य मुनी रामाला कथन करीत आहे.

पहा: वर – इंद्र<हनुमान पृ. २१५ ते २१७

**यमो दण्डादवध्यत्वमरोगत्वं च दत्तवान् ।**
**वरं ददामि सन्तुष्ट अविषादं च संयुगे ।। १६**

यमाने त्याला आरोग्य व आपल्या दंडापासून अवध्यत्व दिले आणि मी संतुष्ट होऊन वर देत आहे, असे सांगून, ‘ संग्रामामध्ये ह्याला थकवा येणार नाही ’, असे म्हटले.

हा अयाचित वर आहे.

## ७१. कुबेर < हनुमान उत्तरकाण्ड/३६

अनेक देवतांकडून हनुमानाला जे विविध वर प्राप्त झाले,

त्यांविषयी अगस्त्य मुनी रामाला कथन करीत आहे.

पहाः वर – इंद्र < हनुमान पृ. २१५ ते २१७

**गदेयं मामिका नैनं संयुगेषु वधिष्यति।**
**इत्येवं धनदः प्राह तदा ह्येकाक्षिपिङ्गलः ।। १७**

'ह्या माझ्या गदेने संग्रामामध्ये ह्याचा वध होणार नाही' असा एकाक्षपिंगली कुबेरानेही त्याला वर दिला.

हा अयाचित वर आहे.

## ७२. शंकर < हनुमान उत्तरकाण्ड/३६

अनेक देवतांकडून हनुमानाला जे विविध वर प्राप्त झाले, त्यांविषयी अगस्त्य रामाला कथन करीत आहे.

पहाः वर – इंद्र < हनुमान पृ. २१५ ते २१७

**मत्तो मदायुधानां च अवध्योऽयं भविष्यति।**
**इत्येवं शंकरेणापि दत्तोऽस्य परमो वरः ।। १८**

'माझ्यापासून अथवा माझ्या आयुधांपासून ह्याचा वध होणार नाही', असा शंकरानेही त्याला उत्कृष्ट वर दिला.

हा अयाचित वर आहे.

## ७३. विश्वकर्मा < हनुमान उत्तरकाण्ड/३६

अगस्त्य मुनी रामाला हनुमानाला अनेक देवतांकडून प्राप्त झालेल्या वरांविषयी सांगत आहे.

पहाः वर – इंद्र < हनुमान पृ. २१५ ते २१७

**विश्वकर्मा च दृष्ट्वैनं बालसूर्योपमं शिशुम्।**

शिल्पिनां प्रवरः प्रादाद्वरमस्य महामतिः ।। १९
मत्कृतानि च शस्त्राणि यानि दिव्यानि तानि च ।
तैरवध्यत्वमापन्नश्चिरजीवी भविष्यति ।। २०

बालसूर्याप्रमाणे अरुण कांती असलेल्या त्या बाळाला अवलोकन करून शिल्पींमध्ये श्रेष्ठ अशा त्या महामती विश्वकर्म्यानें 'मी जी काही दिव्य शस्त्रे केली आहेत, त्यांच्या योगानेही त्याचा वध न होता हा चिरंजीवी होईल' असा त्याला वर दिला.

हा अयाचित वर आहे.

## ७४. ब्रह्मदेव < हनुमान उत्तरकाण्ड/३६

अनेक देवतांकडून हनुमानाला जे विविध वर प्राप्त झाले, त्यांविषयी अगस्त्य मुनी रामाला कथन करीत आहे.

पहाः वर – इंद्र < हनुमान पृ. २१५ ते २१७

दीर्घायुश्च महात्मा च ब्रह्मा तं प्राब्रवीद्वचः ।
सर्वेषां ब्रह्मदण्डानामवध्योऽयं भविष्यति ॥ २१

दीर्घायू व महातमा ब्रह्मदेव म्हणाला– 'कोणत्याही ब्रह्मदंडाने याचा वध होणार नाही.'

देवांच्या वरांनी संपन्न झालेल्या बालहनुमानाला पाहून ब्रह्मदेव संतुष्ट झाला आणि वायूला म्हणाला– 'हा तुझा पुत्र अजिक्य, शत्रूंना भय उत्पन्न करणारा, मित्रांचे भय दूर करणारा, यथेष्ट रूप धारण करणारा, स्वेच्छेने वागणारा, वाटेल तिकडे जाणारा व कीर्तिमान होईल. ह्या तुझ्या वानरश्रेष्ठ पुत्राची गती कोठेही कुंठित होणार नाही आणि संग्रामामध्ये रावणाचा उच्छेद व रामाला आनंद ज्यांच्या योगाने होईल अशी शरीरावर रोमांच उठविणारी कर्मे हा करील.' ब्रह्मदेवाचे हे बोलणे आशीर्वादात्मक आहे.

हा अयाचित वर आहे.

## ७५. राम < सीता उत्तरकाण्ड/४६

सीतेला डोहाळे लागले असता एकदा राम तिला म्हणाला– ‘ वैदेही, तुला अपत्य–लाभ होण्याचा समय आता जवळ येत चालला आहे, तरी तुझी काही इच्छा असेल ती सांग. ’ तेव्हा आनंदित होऊन सीता म्हणाली– ‘ राघवा, पवित्र तपोवने अवलोकन करण्याची आणि फळे व मुळे भक्षण करून गंगातीरी वास्तव्य करीत असलेल्या महातेजस्वी ऋषींच्या चरणांसमीप राहण्याची माझी इच्छा आहे. फळे व मुळे भक्षण करणाऱ्या ऋषींच्या तपोवनामध्ये एक रात्र तरी वास्तव्य करावे, असे मला वाटते. ’ रामाने तिला आश्वासन दिले, ‘ स्वस्थ रहा. तू उद्या निःसंशय तेथे जाशील. ’

जनापवाद ऐकून सीतेचा त्याग करण्याचे रामाने मनात निश्चित ठरविले होते आणि त्याने आपला निर्धार भावांपाशी स्पष्ट केला होता. सीतेला वनात सोडून येण्याचे अवघड कार्य लक्ष्मणाकडे सोपविण्यात आले, आणि केवळ राजाची आज्ञा म्हणूनच मोठ्या कष्टाने त्याला ते स्वीकारावे लागले होते. सुमंत्राने रथ सिद्ध केल्यावर लक्ष्मण राजवाड्यात सीतेसन्निध जाऊन म्हणाला–

**त्वया किलैष नृपतिर्वरं वै याचितः प्रभुः ।**
**नृपेण च प्रतिज्ञातमाज्ञप्तश्चाश्रमं प्रति ।। ७**
**गङ्गातीरे मया देवि ऋषीणामाश्रमाञ्शुभान् ।**
**शीघ्रं गत्वा तु वैदेहि शासनात्पार्थिवस्य नः ।। ८**

‘ तू राजापाशी आश्रमाला जाण्यासंबंधाने एक वर मागितला होतास व त्यानेही तो देण्याचे कबूल करून मला आज्ञा केली आहे. देवी वैदेही, आमच्या राजाच्या आज्ञेने गंगातीरी ऋषींच्या शुभ आश्रमांमध्ये सत्वर जाऊन मुनींनी आश्रित अशा अरण्यामध्ये मी तुला पोहोचविणार आहे. ’

रामाने सांगितले म्हणून सीतेने आपली इच्छा प्रकट केली असल्याने हा अयाचित वर आहे.

येथे ' वर ' शब्द योजिला असला तरी तिच्या इच्छेची क्रूर थट्टाच झाली आहे. तिची फसवणूकही झाली आहे. तिच्या दृष्टीने हा वर नसून शापच आहे.

## ७६. देव < निमिराजा — उत्तरकाण्ड/५७

राम निमिराजाची कथा लक्ष्मणाला सांगत आहे.

पहा : शाप – वसिष्ठ < निमिराजा पृ. ७१ ते ७२

निमिराजा वसिष्ठाच्या शापामुळे अचेतन झाल्यावर त्याने घेतलेली धर्म–दीक्षा संभाळून तेथे आलेल्या ऋषींनी तो याग तसाच पुढे चालू ठेवला व राजाच्या मृत देहाचे रक्षण केले. यज्ञ समाप्तीनंतर भृगू मुनी म्हणाला–

आनयिष्यामि ते चेतस्तुष्टोऽस्मि तव पार्थिव ।। १२

' राजा, मी तुजवर संतुष्ट झालो आहे. यास्तव मी तुझ्या देहात चेतना आणीन. '

सुप्रीताश्च सुराः सर्वे निमेश्चेतस्तदाब्रुवन् ।
वरं वरय राजर्षे क्व ते चेतो निरूप्यताम् ।। १३

एवमुक्तः सुरैः सर्वैर्निमेश्चेतस्तदाब्रवीत् ।
नेत्रेषु सर्वभूतानां वसेयं सुरसत्तमाः ।। १४

त्वत्कृते च निमिष्यन्ति चक्षूंषि पृथिवीपते ।
वायुभूतेन चरता विश्रामार्थं मुहुर्मुहुः ।। १६

ह्यानंतर सर्व देव सुप्रसन्न झाले व निमीच्या देहात जीव आणण्यासंबंधाने ते म्हणाले– ' हे राजर्षे, वर माग आणि तुझा प्रत्यगात्मा कोठे राहील ते सांग. ' सर्व देवांनी असे विचारले असता निमीचा जीवात्मा म्हणाला, ' श्रेष्ठ हो, सर्व प्राण्यांच्या नेत्रांच्या ठिकाणी मी वास्तव्य करीन ', ह्यावर देव म्हणाले– ' सर्व भूतांच्या नेत्रांमध्ये तू

वायुरूप होऊन संचार करशील. असा वायुरूप होऊन संचार करीत असताना तुला वारंवार विश्रांती मिळावी, एतदर्थ सर्व प्राण्यांचे नेत्र तुझ्याकरिता उघडझाप करू लागतील.'

एवढे बोलून देव आल्यामार्गाने परत गेले. निमीला पुत्र व्हावा म्हणून ऋषींनी त्याचा देहच अरणी म्हणून तेथे आणला व समंत्रक होमपूर्वक स्वसामर्थ्याने त्या अरणीचे मंथन केले. अरणीचे मंथन चालू असता तेथे एक महापुरुष उत्पन्न झाला. मंथनातून त्याचा उद्भव झाल्याने त्याला मिथी हे नाव पडले.

हा अयाचित वर असून ह्याचे वैशिष्टय म्हणजे देहत्याग केलेल्या जीवात्म्याला हा वर प्राप्त झाला आहे.

## ७७. रुद्र < मधुदैत्य उत्तरकाण्ड/६१

रामाने च्यवन-भार्गवादी ऋषींचे अत्यादराने स्वागत केले व त्यांच्या आगमनाचा उद्देश विचारला. तेव्हा त्याने रामाला लवणासुरापासून होणारा त्रास व त्याची कारणे सांगून त्याच्या भयापासून ऋषींचे रक्षण करण्याची विनंती केली.

कृतयुगात दितिकुलोत्पन्न मधू नावाचा एका महादैत्य होऊन गेला. तो ब्राह्मणभक्त व दयाळू असल्याने देवांशी त्याची मैत्री जमली.

स मधुर्वीर्यसम्पन्नो धर्मं च सुसमाहितः ।
बहुमानाच्च रुद्रेण दत्तस्तस्याद्‌भुतो वरः ॥ ५
शूलं शूलाद्विनिष्कृष्य महावीर्यं महाप्रभम् ।
ददौ महात्मा सुप्रीतो वाक्यं चैतदुवाच ह ॥ ६
त्वयायमतुलो धर्मो मत्प्रसादकरः कृतः ।
प्रीत्या परमया युक्तो ददाम्यायुधमुत्तमम् ॥ ७
यावत्सुरैश्च विप्रैश्च न विरुध्येर्महासुर ।
तावच्छूलं तवेदं स्यादन्यथा नाशमेष्यति ॥ ८

यश्च त्वामभियुञ्जीत युद्धाय विगतज्वरः ।
तं शूलो भस्मसात्कृत्वा पुनरेष्यति ते करम् ।। ९

तो वीर्यवान्, महाविचारी व धर्मनिष्ठ असल्यामुळे रुद्राने बहुमानार्थ त्याला अद्भुत वर दिला. आपल्या शूलापासून एक प्रचंड शक्तिमान व महातेजस्वी शूल बाहेर काढून महात्म्या रुद्राने त्याला अर्पण केला, आणि अतिशय संतुष्ट झालेला तो रुद्र त्याला म्हणाला– ज्या अर्थी मी प्रसन्न होण्यासारखे तू हे उत्कृष्ट व अनुपम कृत्य केले आहेस त्या अर्थी मी अतिशय आनंदित झालो असून हे उत्कृष्ट आयुध तुला देत आहे. परन्तु हे महासुरा, जोपर्यंत तू देवां-ब्राह्मणांशी विरोध धरला नाहीस तोपर्यंतच हा शूल तुझ्यापाशी राहील आणि तू त्यांच्याशी विरोध धरल्यास तो नाहीसा होईल. त्याचप्रमाणे जो निःशंकपणे तुला युद्धात आव्हान करील, त्याला हा शूल दग्ध करून पुन्हा तुझ्या हाती येईल.

एवं रुद्राद्वरं लब्ध्वा भूय एव महासुरः ।
प्रणिपत्य महादेवं वाक्यमेतदुवाच ह ।। १०

भगवन्मम वंशस्य शूलमेतदनुत्तमम् ।
भवेत्तु सततं देव सुराणामीश्वरो ह्यसि ।। ११

ह्याप्रमाणे रुद्रापासून वर प्राप्त झाला असता तो महादैत्य महादेवाला पुन्हा प्रणाम करून म्हणाला, 'भगवन्, आपण सुराधिपती आहात, ह्यास्तव हा अनुपम शूल माझ्या वंशात नेहमी असावा.'

प्रत्युवाच महादेवो नैतदेवं भविष्यति ।।–१२
मा भूत्ते विफला वाणी मत्प्रसादकृता शुभा ।
भवतः पुत्रमेकं तु शूलमेतद्भविष्यति ।। १३
यावत्करस्थः शूलोऽयं भविष्यति सुतस्य ते ।
अवध्यः सर्वभतानां शूलहस्तो भविष्यति ।। १४

सुरश्रेष्ठ शंकर त्याला म्हणाला– 'असे होणार नाही. तथापि मी प्रसन्न झाल्यामुळे तू जी ही शुभ विनंती केली आहेस, तीही व्यर्थ जाणार नाही. तुझ्या एका पुत्राजवळ हा शूल राहील आणि जोपर्यंत तुझ्या

पुत्राच्या हातात हा शूल राहील, तोपर्यंत तुझा शूलपाणी पुत्र सर्व प्राण्यांत अवध्य होईल.'

इहलोक सोडून वरुण लोकी जाताना मधुदैत्याने आपला शूल लवण नावाच्या आपल्या पुत्राला दिला आणि त्या शूलाच्या अद्‌भुत प्रभावाने तो त्रैलोक्याला व विशेषतः तापसांना त्रस्त करू लागला. शत्रुघ्नाने लवणासुराचा वध केल्यानंतर तो शूल रुद्राकडे परत आला.

हा अयाचित वर आहे. मधुदैत्याला मिळालेला शूल हा रुद्राचा अनुग्रह आहे. परंतु वाल्मीकीने त्यासाठी 'वर' शब्द योजिला आहे. लवणाला केवळ वडिलांच्या पुण्याईने शूल-प्राप्ती झाली, परंतु त्याच्या दुष्ट स्वभावाने तो टिकविता आला नाही. तेव्हा लवणाचे बाबतीत हा वर ठरत नाही, केवळ वडिलांचा वारसा त्याला मिळाला इतकेच.

## ७८. वसिष्ठ < कल्माषपाद (सौदास) उत्तरकाण्ड/६५

रामाने शत्रुघ्नाला अभिषेक करून लवण-वधार्थ धाडले असता वाटेत त्याने वाल्मीकी मुनीच्या आश्रमात एक रात्र वास्तव्य केले. जवळच यज्ञसामुग्री दिसली असता शत्रुघ्नाने पृच्छा केली. तेव्हा मुनीने त्याला सौदास राजाची कथा सांगितली.

पहा : शाप – वसिष्ठ < सौदास, पृ. ८१–८२

शाप – सौदास < वसिष्ठ, पृ. ८२–८३

सौदास राजा कल्माषपाद झाल्यानंतर पत्नीसह त्याने वसिष्ठाला वारंवार वंदन करून, ब्राह्मणरूप धारण केलेल्या मायावी राक्षसाने जे सांगितले होते, ते निवेदन केले. तेव्हा वसिष्ठ मुनीला मायावी राक्षसाने घडवून आणलेला अनर्थ लक्षात आला व तो राजाला म्हणाला–

**मया रोषपरीतेन यदिदं व्याहृतं वचः ।**
**नैतच्छक्यं वृथा कर्तुं प्रदास्यामि च ते वरम् ॥ ३५**

**कालो द्वादशवर्षाणि शापस्यान्तो भविष्यति ।**

**मत्प्रसादाच्च राजेन्द्र अतीतं न स्मरिष्यसि ॥ ३६**

'मी क्रुद्ध होऊन जे हे भाषण केले आहे, ते व्यर्थ होणे शक्य नाही. तथापि मी तुला वर देतो. बारा वर्षे लोटली असता ह्या शापाची समाप्ती होईल आणि हे राजेन्द्रा, माझ्या प्रसादामुळे तुला पूर्वीचे स्मरण राहणार नाही.'

शाप भोगल्यानंतर राजाला पुन्हा राज्य प्राप्त झाले व त्याने प्रजेचेही पालन यथायोग्य केले. यज्ञसामुग्री त्या सौदास राजाची होती.

हा वर इतर वरांहून वेगळा आहे. शाप-विमोचनासाठी वर दिला आहे. कल्माषपादाच्या वारंवार प्रार्थनेमुळे हा वर मिळाला असल्याने याचित वर आहे.

## ७९. देव < शत्रुघ्न उत्तरकाण्ड/७०

शत्रुघ्नाने लवणासुराचा वध केल्यानें त्रैलोक्याचे भय नाहीसे झाले. देव, ऋषी, गंधर्व, पन्नग, अप्सरा यांनी त्याचा जयजयकार केला. इंद्राग्नी प्रभृती देव शत्रुघ्नाला म्हणाले– 'वत्सा तुझा जय झाला आणि लवणासुराचा तुझ्या हातून वध झाला ही सुदैवी घटना आहे. हे सदाचार-संपन्न पुरुषश्रेष्ठा, वर माग. तुझ्या विजयाची इच्छा मनात बाळगून आम्ही येथे आलो आहोत. आमचे दर्शन व्यर्थ होणार नाही.'

देवांचे बोलणे ऐकून शत्रुघ्न हात जोडून म्हणाला–

**इयं मधुपुरी रम्या मधुरा देवनिर्मिता ।**

**निवेशं प्राप्नुयाच्छीघ्रमेष मेऽस्तु वरः परः ॥ ५**

'मधु दैत्याची मधुरा नामक ही नगरी देवांनी निर्माण केली असून मनोहर आहे. ही सत्वर निवासस्थानस्वरूप राजधानी होवो, हा मुख्य वर मला मिळावा.'

देवांनी ' ही नगरी रमणीय होऊन शूर सेनेचे तिथे वास्तव्य होईल ' असा वर दिला.

देवांनी सांगितल्यामुळे वर मागितला असल्याने हा अयाचित वर होय.

## ८०. शंबूकाची वर-याचना उत्तरकाण्ड/७५-७६

नारद मुनी रामाला, त्याने पृच्छा केली असता, त्याच्या राज्यातील एका ब्राह्मणाच्या मुलाच्या अकाली निधनाचे कारण सांगत आहे.

एकदा कोणी एक धार्मिक वृत्तीचा ब्राह्मण आपल्या अकाली निधन पावलेल्या मुलाचा मृत देह घेऊन रामाकडे आला. त्यानें किंवा त्याच्या मुलाने कोणताही अपराध केला नसता किंवा कधी अनृत भाषण, हिंसाचार केला नसताही त्याच्यावर हे संकट कोसळल्याने तो अत्यंत शोकाकुल झाला. राजाच्या हातून काही दोष घडल्यामुळे त्याच्या राज्यात असा अनर्थ होत असावा, अशी त्याची समजूत होती आणि त्याने ती रामापाशी स्पष्टपणें बोलून दाखविली. मृत बालक जिवंत व्हावा म्हणून हट्ट धरला आणि तो जिवंत न झाल्यास एखाद्या अनाथाप्रमाणे राजद्वारी पत्नीसह मृत्यूला कवटाळण्याचा आपला निर्धार त्याने व्यक्त केला. ब्राह्मणाचे बोलणे ऐकून राम अत्यंत दुःखी झाला. वसिष्ठासह अष्ट मुनींची सभा बोलावून त्या बालकाच्या मृत्यूचे कारण काय असावे अशी त्याने पृच्छा केली व त्यांना त्यांचा अभिप्राय सांगण्याची विनंती केली. तेव्हा त्या ऋषींसमक्ष नारद मुनी रामाला म्हणाला– ' तपश्चर्या हा शूद्राचा परम अधर्म होय. परंतु राजा, तुझ्या राज्यात एक दुर्बुद्धी शूद्र महातपस्वी होऊन तप करीत आहे. त्यामुळे हा बालघात झाला आहे. जो अविचारी पुरुष राजाच्या देशात वा नगरात पातक अथवा अकार्य करतो, त्याचे ते पातक नाशाला कारणीभूत होत असते आणि त्यामुळे तो राजाही नरकाला जातो. धर्माने परिपालन करणाऱ्या राजाला इतरांनी केलेल्या वेदाध्ययनाचे, तपश्चर्येचे व चांगल्या आचरलेल्या कर्माचे एक षष्ठांश फल प्राप्त होत असते. राजा हा प्रजेच्या

षष्ठांश फलाचा भागीदार असल्याने प्रजा-परिपालन हे त्याचे कर्तव्य होय. हे पुरुषश्रेष्ठा, तू राज्यात चौकशी केल्यास दुष्कर्माचा तुला शोध लागेल. त्याचे निराकरण कर, म्हणजे धर्माची व मनुष्यांच्या आयुष्याची वृद्धी होऊन ह्या बालकालाही जीवित प्राप्त होईल.' हे भाषण ऐकून रामाने लक्ष्मणाला तो मृत देह तेलाच्या कुंडीत नीट जतन करून ठेवण्यास सांगितले. त्याचा नाश होऊ नये, यास्तव योग्य ती काळजी घेण्यास सांगून राज्यातील दुष्कृत्याचा शोध घेण्यासाठी तो स्वता शस्त्र बरोबर घेऊन पुष्पक विमानातून पाहणी करण्यास निघाला. पूर्व, पश्चिम व उत्तर दिशेला पाहणीत असे आढळून आले की सारी प्रजा आनंदी असून सदाचरणी होती. दक्षिण दिशेने गमन करीत असता एका सरोवराच्या काठी एका वृक्षाला लोंबकळून अधोमुख असलेला एक तपस्वी त्याच्या दृष्टीस पडला. तेव्हा त्याच्याजवळ जाऊन रामाने त्याची विचारपूस केली. तू कोणत्या योनीमध्ये उत्पन्न झाला असून तू ही तपश्चर्या कशासाठी करीत आहेस ? तू ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य, शूद्र यांपैकी कोण आहेस, ते खरे खरे सांग, अशी त्याने त्याला विनंती केली.

**कोऽर्थो मनीषितस्तुभ्यं स्वर्गलाभोऽपरोऽथवा ।**
**वराश्रयो यदर्थं त्वं तपस्यन्यैः सुदुश्चरम् ।। ७५–१७**

'इतरांच्या हातून होण्यास अत्यंत दुर्घट असे तप ज्या अर्थी तू करीत आहेस, त्या अर्थी स्वर्ग-प्राप्ती अथवा दुसरा कोणता वर तुझ्या मनामध्ये प्राप्त करून घ्यावयाचा आहे ?' असे रामाने त्यास स्पष्ट विचारले.

तेव्हा तो म्हणाला– 'मी शूद्र योनीत उत्पन्न झालो असून उग्र तपश्चर्या करीत आहे आणि ह्या शरीरासह देवत्व प्राप्त करून घेण्याची माझी इच्छा आहे. मी मिथ्या भाषण करीत नाही. देवलोक संपादन करण्याच्या इच्छेनेच मी तपश्चर्या करीत आहे. मी शूद्र असून शंबूक या नावाने प्रसिद्ध आहें.'

रामाने आपल्या खड्गाने शंबूकाचा शिरच्छेद केला आणि त्याच क्षणी तो मृत बालक पुन्हा जिवंत झाला.

शंबूकाने विशिष्ट हेतू मनात धरून तपश्चर्या केली असली, वर-याचना केली असली तरी प्रत्यक्षात त्याला वर प्राप्त झालेला नाही. उलट त्याचा वध झाला. हा अप्राप्त वर आहे.

## ८१. देव < राम उत्तरकाण्ड/७६

रामराज्यात सर्व प्रजा आनंदित होती व सर्वांना यथोचित न्याय मिळत असे. एकदा एक वृद्ध ब्राह्मण आपल्या चौदा वर्षांच्या मुलाचा मृत देह घेऊन राजद्वारी आला. तो अत्यंत शोकाकुल झाला होता. त्याचा विलाप ऐकणाऱ्याच्या हृदयाला पीळ पाडीत होता. त्या ब्राह्मणाने कधीही हिंसा केली नव्हती किंवा तो अनृत बोलला नव्हता. कुणालाही त्याने दुःख दिले नव्हते. त्यामुळे त्याला आपल्या पुत्राचा अकाली मृत्यू व्हावा याचे आश्चर्य वाटत होते. कुणाच्या तरी पातकाने त्याला मृत्यू आला असावा, अशी त्याची भावना होती. ज्या अर्थी रामाच्या राज्यात राहणाऱ्या बालकाला अकाली व अकारण मृत्यू आला, त्या अर्थी राजाच्याच हातून काही पातक घडले असावे, असे त्याला वाटले व त्याने रामाला आपल्या पुत्राला जिवंत करण्याची विनंती केली व तो जिवंत न झाल्यास राजद्वारी अनाथाप्रमाणे मृत्यूला कवटाळण्याचा आपला निर्धार त्याने बोलून दाखविला. ब्राह्मणाचे शब्द ऐकून राम अत्यंत शोकाकुल झाला. त्याने वसिष्ठासह मार्कंडेय, मौद्गल्य, वामदेवादी आठ ब्राह्मणांना बोलावून त्या बालकाच्या मृत्यूचे कारण विचारले. तेव्हा नारदाने 'तुझ्या राज्यात एक शूद्र, अधिकार नसता तपस्या करीत असल्याचे' सांगितले. शंबूक नावाचा एक शूद्र तपश्चर्या करीत आहे, असे समजताच रामाने त्याचा आपल्या खड्गाने शिरच्छेद केला. तेव्हा देवांनी रामावर पुष्पवृष्टी केली व प्रसन्न होऊन ते म्हणाले,

सुरकार्यमिदं देव सुकृतं ते महामते ।।– ७

गृहाण च वरं सौम्य यं त्वमिच्छस्यरिन्दम ।
स्वर्गभाङ् नहि शूद्रोऽयं त्वत्कृते रघुनन्दन ।। ८

' हे महामति राजा, तू हे देवकार्य चांगल्या रीतीने पार पाडले आहेस. कारण हे रघुनंदना, स्वर्ग-प्राप्तीला अयोग्य असलेला हा शूद्र तुझ्यामुळे स्वर्गाला येण्याचे टळले. ह्यास्तव हे शत्रुदमना, इच्छेस येईल तो वर तू मागून घे. '

रामाने विनयपूर्वक हात जोडले आणि तो इंद्राला म्हणाला–

यदि देवाः प्रसन्ना मे द्विजपुत्रः स जीवतु ।
दिशन्तु वरमेतं मे ईप्सितं परमं मम ।। १०
ममापचाराद्बालोऽसौ ब्राह्मणस्यैकपुत्रकः ।
अप्राप्तकालः कालेन नीतो वैवस्वतक्षयम् ।। ११
तं जीवयत भद्रं वो नानृतं कर्तुमर्हथ ।
द्विजस्य संश्रुतोऽर्थो मे जीवयिष्यामि ते सुतम् ।। १२

' देव जर माझ्यावर प्रसन्न झाले असतील, तर तो ब्राह्मणपुत्र जिवंत होवो. हा अत्यंत इष्ट असलेला वर देवांनी मला द्यावा. कारण माझ्या अपराधामुळे त्या ब्राह्मणाच्या एकुलत्या एक पुत्राला अकाली मृत्यू आला आहे. ह्यास्तव आपण त्याला जिवंत करा. तुझा पुत्र मी जिवंत करीन, अशी जी प्रतिज्ञा मी ब्राह्मणापाशी केली आहे, ती आपण खरी करा. '

रामाचे भाषण ऐकून इंद्रादी देव संतुष्ट झाले आणि म्हणाले–

निर्वृतो भव काकुत्स्थ सोऽस्मिन्नहनि बालकः ।
जीवितं प्राप्तवान्भूयः समेतश्चापि बन्धुभिः ।। १४
यस्मिन्मुहूर्ते काकुत्स्थ शूद्रोऽयं विनिपातितः ।
तस्मिन्मुहूर्ते बालोऽसौ जीवेन समयुज्यत ।। १५
स्वस्ति प्राप्नुहि भद्रं ते साधु याम नरर्षभ ।– १६

‘ रामा, तू स्वस्थ हो. तो बालक आज जिवंत झाला आहे आणि त्याची पुन्हा आपल्या बांधवांशी भेट झाली आहे. रामा, ह्या शूद्राचा वध होता क्षणीच तो बालक जिवंत झाला आहे. हे पुरुषश्रेष्ठा, तुझे भले होवो. तुझे कल्याण होवो. ’

देवांनी प्रसन्न होऊन वर मागण्यास सांगितले, म्हणून रामाने वर मागितला असल्याने हा अयाचित वर आहे.

## ८२. देव < ब्रह्महत्या उत्तरकाण्ड/८६

लक्ष्मण रामाला वृत्रासुर-वधाचा वृत्तान्त कथन करीत आहे.

तपश्चर्येच्या योगाने वृत्रासुराने सर्व लोक आपल्या स्वाधीन केल्याने इंद्रादी देव अत्यंत दुःखी झाले. ते विष्णूकडे गेले आणि वृत्रासुराचा घात करून देवांचे रक्षण करण्यासाठी त्यांनी त्याला विनविले. परंतु विष्णूचे व वृत्रासुराचें प्रेम पूर्वीपासून असल्याने देवांचे प्रिय करण्यासाठी असुराचा वध करण्यास त्याने नकार दिला. मात्र इंद्रानें त्याचा वध करण्याचे योजिल्यास आपले एक तृतीयांश तेज त्यास देण्यास अनुमती दिली. तेव्हा इंद्राने आपले वज्र वृत्राच्या मस्तकावर फेकले. वज्रप्रहाराने वृत्रासुराचे मस्तक पतन पावू लागलें असता सर्व जग त्रस्त झाले. वृत्रवध अनुचित झाला, असे वाटून इंद्र सर्व त्रैलोक्य हिंडला. तो जिकडे जाईल तिकडे ब्रह्महत्याही जाऊ लागली व शेवटी त्याच्या अंगावर आदळली. इंद्र अत्यंत दुःखी झाला. देव पुन्हा विष्णूकडे गेले आणि म्हणाले– ‘ आपणच आपला अंश देऊन इंद्राकरवी वृत्राचा वध करविला व आमचे रक्षण केले. परंतु ब्रह्महत्या मात्र इंद्राचे मागे लागून त्यास त्रस्त करीत आहे. तरी तिच्यापासून त्याची सुटका व्हावी, असा उपाय सांगा. ’ विष्णूनें इंद्राकडून विष्णुयाग करविण्यास सांगितला व त्यामुळे त्याची ब्रह्महत्येपासून मुक्तता होईल, असे आश्वासन दिले.

इंद्राने विष्णुयाग–विष्णूला उद्देशून अश्वमेध केला. यज्ञसमाप्तीनंतर ब्रह्महत्या देवांकडे जाऊन म्हणाली– ‘ तुम्ही मला जागा कोठे

देणार ?' तेव्हा देवांनी तिला आपले चार हिश्शांत विभाजन करण्यास सांगितले. जिचे वास्तव्य क्लेशकारक आहे, अशा त्या ब्रह्महत्येने इंद्राशिवाय अन्यत्र वसतिस्थान मागून घेतले आणि ती देवांना म्हणाली—

एकेनांशेन वत्स्यामि पूर्णोदासु नदीषु वै ।
चतुरो वार्षिकान्मासान्दर्पघ्नी कामचारिणी ।। १३

भूम्यामहं सर्वकालमेकेनांशेन सर्वदा ।
वसिष्यामि न सन्देहः सत्येनैतद्ब्रवीमि वः ।। १४

यो ऽ यमंशस्तृतीयो मे स्त्रीषु यौवनशालिषु ।
त्रिरात्रं दर्पपूर्णासु वसिष्ये दर्पघातिनी ।। १५

हन्तारो ब्राह्मणान्ये तु मृषापूर्वमदूषकान् ।
तांश्चतुर्थेन भागेन संश्रयिष्ये सुरर्षभाः ।। १६

प्रत्यूचुस्तां ततो देवा यथा वदसि दुर्वसे ।
तथा भवतु तत्सर्वं साधयस्व यदीप्सितम् ।। १७

' वर्षा ऋतूतील चार महिने ज्यांना उदकाची समृद्धी असते अशा नद्यांचे ठिकाणी मी पाप्यांचा गर्व नाहीसा करणारी व स्वेच्छेने चालणारी ब्रह्महत्या तेथेच चार महिनेपर्यंत वास्तव्य करीन. एका अंशाने मी सर्वकाल भूमीचे ठिकाणी ऊषररूपाने वास्तव्य करीन. हे मी तुम्हाला सत्य सांगत आहे. माझा जो तिसरा अंश आहे, त्याने मी विषयवासनेने भरलेल्या तरुण स्त्रियांचे ठिकाणी (महिन्यातून) तीन दिवसपर्यंत वास्तव्य करीन आणि तितका काल लोटेपर्यंत मी त्यांच्या समागम-सुखाचा विघात करीन. त्याचप्रमाणे हे सुरश्रेष्ठ हो, निरपराधी ब्राह्मणांवर मिथ्या आरोप करून जे त्यांच्या वधाला कारण होतील, त्यांच्या ठिकाणी मी चौथ्या अंशाने राहीन.'

' हे दुर्वसे, तुझ्या म्हणण्याप्रमाणे होवो. तू सर्व आपल्या इच्छे-

प्रमाणे शेवटास ने ', असे देवांनी तिला सांगितले. इंद्र पापरहित झाल्याने ते निश्चित झाले.

'वर' असा शब्द योजिलेला नसला, तरी हा याचित वर आहे.

## ८३. शंकर, पार्वती < इल उत्तरकाण्ड/८७

राम इल राजाचे वृत्त लक्ष्मणाला सांगत आहे.

कर्दम प्रजापतीचा अत्यंत धार्मिक वृत्तीचा इल नावाचा पुत्र वाह्लीक देशाचा राजा होता. तो अत्यंत शूर होता व त्याने सर्व पृथ्वी पादाक्रांत केली होती. तो आपल्या राज्यावर पुत्रवत् प्रेम करी. एकदा वाहने, सैन्य, सेवक यांसह मृगयेसाठी तो एका उपवनात गेला. दहा हजार मृगांचा वध झाला तरी त्याची तृप्ती होईना. कार्तिकेयाची जेथे उत्पत्ती झाली, त्या भागात तो जाऊ लागला असता तेथे त्याला शंकर पार्वतीला रमवीत असलेला दिसला. त्या उपवनाचे हे खास वैशिष्ट्य होते की प्राणी, वृक्ष इत्यादी पुंलिंगी जीव स्त्रीरूप होत. पार्वतीचे प्रिय करणाऱ्या शंकरानेही स्त्री-रूप धारण केले होते. इल राजा तेथे येताच सैन्य, सेवकांसह त्याला स्त्री-रूप प्राप्त झाले. स्वताचे स्त्री-रूप पाहून राजा इल अतिशय दुःखी झाला आणि हा सारा शंकराचा प्रभाव आहे, हे समजताच भयभीत झाला. सैन्य, वाहन, सेवकांसह तो शंकराला शरण गेला. तेव्हा देवी पार्वतीसह तो महेश्वर त्याला वर देण्यास उद्युक्त झाला आणि त्याला हास्यपूर्वक म्हणाला—

पुरुषत्वमृते सौम्य वरं वरय सुव्रत ।– २०

'हे सौम्य, हे सदाचरणसंपन्न, पुरुषत्वाशिवाय तुला जो वर हवा असेल तो तू मागून घे.' त्याला हवे असलेले पुरुषत्वच देण्यास शंकराने नकार दिल्याने तो शोकाकुल झाला व त्याचेकडून अन्य कोणताही वर मागणे त्याला रुचले नाही. त्याने शंकराकडे वर मागितला नाही. नंतर तो देवी पार्वतीला शरण गेला आणि म्हणाला—

**ईशे वराणां वरदे लोकानामसि भामिनी ।।– २२**
**अमोघदर्शने देवि भज सौम्येन चक्षुषा ।– २३**

'हे वराधिष्ठात्री, हे वरदे, त्रैलोक्यामध्ये स्त्री म्हणून तूच आहेस. हे देवी, तुझे दर्शन व्यर्थ जाणार नाही. ह्यास्तव तू माझ्यावर कृपादृष्टी कर.' पार्वतीने राजाचे हृद्गत जाणले. ती त्याला म्हणाली–

**अर्धस्य देवो वरदो वरार्धस्य तव ह्यहम् ।।– २४**
**तस्मादर्धं गृहाण त्वं स्त्रीपुंसोर्यावदिच्छसि ।– २५**

'तुला अर्धा वर देणारा देव असून अर्धा वर देणारी मी आहे. तस्मात् आम्हा स्त्री-पुरुषांपासून तू आपल्या इच्छेप्रमाणे अर्धा अर्धा वर मागून घे.'

देवीचा हा अनुपम व अद्भुत वर ऐकून इल राजा आनंदित झाला व तो म्हणाला–

**यदि देवि प्रसन्ना मे रूपेणाप्रतिमा भुवि ।।– २६**
**मासं स्त्रीत्वमुपासित्वा मासं स्यां पुरुषः पुनः ।– २७**

'हे देवी, जर तू माझ्यावर प्रसन्न झाली आहेस आणि पृथ्वीमध्ये जर तू रूपाने अप्रतिम आहेस, तर एक महिना मी तुझ्याप्रमाणे स्त्री होऊन पुनरपि एक महिना पुरुष व्हावे'– असा मला वर दे.

राजा इलाची इच्छा जाणून पार्वती म्हणाली–

**प्रत्युवाच शुभं वाक्यमेवमेव भविष्यति ।**
**राजन्पुरुषभूतस्त्वं स्त्रीभावं न स्मरिष्यसि ।। २८**
**स्त्रीभूतश्च परं मासं न स्मरिष्यसि पौरुषम् ।– २९**

'तुझ्या म्हणण्याप्रमाणेच होईल. राजा, तू पुरुष झाल्यावर तुला स्त्रीत्व स्मरणार नाही व स्त्री झाल्यावर दुसरा महिना लोटेपर्यंत तुला पुरुषत्वाची आठवण राहणार नाही.'

ह्याप्रमाणे कर्दम-पुत्र इल राजा एक महिना पुरुष आणि नंतर एक महिना 'इला' म्हणून त्रैलोक्य-सुंदरी अशी स्त्री होत असे.

उत्तरकाण्ड/९०

इलाला प्राप्त झालेली दु:स्थिती शंकरावाचून अन्य कोणीही निवारू शकणार नाही अशी कर्दमाची खात्री होती. त्याला प्रिय असा अश्वमेध केल्यास ब्रह्महत्येचे पातकही दूर सारता येते. तेव्हा राजासाठी अश्वमेध करावा, असे कर्दमाने सांगताच संवर्ताचा प्रमुख राजर्षी शिष्य मरुत्त याने राजासाठी रुद्राची आराधना करण्याकरिता अश्वमेध यज्ञ केला. यज्ञ-समाप्तीनंतर संतुष्ट झालेला उमापती शंकर म्हणाला– ‘ तुमच्या भक्तियुक्त यज्ञाने मी प्रसन्न झालो आहे. तरी राजाला प्रिय अशी कोणती गोष्ट मी करू ?’ तेव्हा यज्ञासाठी जमलेल्या सर्व द्विजांनी ‘ इल राजाला पुरुषत्व प्राप्त व्हावे ’, अशा आशयाची शंकराला प्रार्थना केली.

महादेवानें प्रसन्न होऊन इलाला पुन्हा पुरुषत्व दिलें.

इतर वरांपेक्षा हा वर वेगळा आणि वैशिष्टयपूर्ण आहे. पार्वतीने राजा इलाला दिलेला वर हा रामायणातील एकमेव अर्धा वर आहे.

शंकराने इलाला देऊ केलेला वर अयाचित व अस्वीकृत असून पार्वतीने दिलेला वर याचित असला तरी त्यातील विस्मरणाचा भाग अयाचित आहे. स्त्रीत्व प्राप्त झाले असता पुरुषत्वाची व पुरुषत्व प्राप्त झाले असता स्त्रीत्वाची विस्मृती व्हावी, अशी इच्छा व्यक्त केलेली नसताही पार्वतीनें ती स्वताहून दिली आहे.

## ८४. राम < प्रजाजन

उत्तरकाण्ड/१०७

लक्ष्मणाचा त्याग केल्यावर राम अत्यंत दु:खी व शोकाकुल झाला. पुरोहित, मंत्री आणि पौरजनांना उद्देशून तो म्हणाला– ‘ धर्मवत्सल वीर भरताला मी आज अयोध्यापती म्हणून राज्याभिषेक करीन आणि नंतर वनात जाईन. ’ लक्ष्मणानें स्वीकारलेल्या मार्गाचेच मी अवलंबन करीन. रामाचा निर्णय ऐकून सारी प्रजा दु:खीकष्टी झाली. गतप्राण

झाल्यासारखे प्रजानन निश्चेष्ट झाले, भरतही अत्यंत अस्वस्थ झाला. तो रामाला म्हणाला– ' मला राज्यसुखाची किंवा स्वर्गसुखाची इच्छा नाही. कुश-लवांना राज्याभिषेक करा आणि शत्रुघ्नाला दूतांकरवी आपल्या गमनाची वार्ता सत्वर कळवा. ' वसिष्ठ मुनीही अधोमुख होऊन म्हणाला– ' वत्सा रामा, भूमीवर पडलेल्या ह्या प्रजाजनांकडे लक्ष दे. त्यांना कोणते कार्य इष्ट आहे ते समजून घेऊन त्याप्रमाणे कर. ह्यांच्या इच्छेचा विघात करू नको. ' वसिष्ठ मुनीचे भाषण ऐकून रामाने ' मी काय करू ? ' असा प्रश्न प्रजाजनांना केला. तेव्हा ते प्रजाजन म्हणाले–

गच्छन्तमनुगच्छामो यत्र राम गमिष्यसि ।।– १२
पौरेषु यदि ते प्रीतिर्यदि स्नेहो ह्यनुत्तमः ।
सपुत्रदाराः काकुत्स्थ समं गच्छाम सत्पथम् ।। १३
तपोवनं वा दुर्गं वा नदीमम्भोनिधिं तथा ।
वयं ते यदि न त्याज्याः सर्वान्नो नय ईश्वर ।। १४
एषा नः परमा प्रीतिरेष नः परमो वरः ।
हृद्गता नः सदा प्रीतिस्तवानुगमने नृप ।। १५

' रामा, तू जिकडे जाशील, तिकडे तुझ्या मागोमाग आम्ही येऊ. प्रजाजनांवर जर तुझी प्रीती असेल, त्यांच्यावर जर तुझे अनुपम प्रेम असेल आणि आमचा जर तुला त्याग करावयाचा नसेल तर पुत्र व भार्या यांसहवर्तमान आम्ही स्वर्ग, तपोवन, दुर्गम अरण्य, नदी आणि सागर ह्यांपैकी जिकडे तू जाशील तिकडे तुझ्याबरोबर येऊ. हे ईश्वरा, तू आम्हा सर्वांना घेऊन चल. ह्यात आम्हाला पराकाष्ठेचा आनंद होणार असून हाच आमचा मुख्य वर आहे. तुझ्याबरोबर येण्याविषयी सर्वदा आमच्या मनाला आनंद वाटत आहे. '

प्रजेची इच्छा लक्षात घेऊन रामाने कुश-लवांना त्याच दिवशी राज्याभिषेक केला आणि शत्रुघ्नाकडे दूत रवाना केले.

कौसल्येने मोठ्या कष्टाने रामाला वनवासात जाण्याची अनुज्ञा दिल्यानंतर रामाला उद्देशून त्याचे कल्याण व्हावे, या भावनेने ती या प्रमाणे मंगलकारक आशीर्वादात्मक बोलली-' हे रघुवंशराजश्रेष्ठा, ज्या धर्माचे तू प्रेमाने व निश्चयाने पालन करीत आहेस, तो धर्म तुझे सर्व प्रकारे रक्षण करो. हे पुत्रा, देवालयामध्ये तू ज्यांना प्रणाम करीत असतोस, ते देव महर्षींसहवर्तमान वनामध्ये तुझे रक्षण करोत. विचारी विश्वामित्र मुनींनी तुला जी अस्त्रे दिली आहेत, ती सर्वदा गुणसंपन्न असलेल्या तुझे रक्षण करोत. हे पराक्रमी पुत्रा, पितृसेवा, मातृसेवा आणि सत्य ही रक्षण करीत असताना तू चिरकाल रहा. हे नरोत्तमा, समिधा कुश, दर्भ, वेदी, देवालये, विप्रांची स्थाने, पर्वत, वृक्ष, आखूड फांद्यांची झाडे, सरोवरे, पक्षी, सर्प आणि सिंह तुझे रक्षण करोत. इंद्रप्रभृती सर्व लोकपाल, सहा ऋतू, सर्व महिने, संवत्सर, रात्री, दिवस, मुहूर्त हे तुझे रक्षण करोत. हे पुत्रा, श्रुती, स्मृती व धर्म तुझे सर्व बाजूंनी रक्षण करोत. पर्वत, सर्व समुद्र, राजा वरुण, स्वर्ग, अंतरिक्ष, भूमी, चराचरांसहवर्तमान वायू, सर्व नक्षत्रे, अधिदेवता व प्रत्यधिदेवता यांसहवर्तमान सर्व ग्रह, दिवस व रात्री आणि दोन्ही संध्या वनाच्या आश्रयाने राहिलेल्या तुझे रक्षण करोत... तू विचारी मुनिवेष धारण करून महावनामध्ये संचार करीत असतांना देव आणि दैत्य नेहमी तुला सुखदायक होवोत. हे पुत्रा, घोर व क्रूरकर्मी राक्षस आणि पिशाच व सर्व प्रकारचे मासभक्षक प्राणी ह्यांपासून तुला भय न होवो... नरमास-भक्षण करणाऱ्या ज्या काही म्हणून सर्व जाती आहेत, त्यांचे मी येथे पूजन केले आहे, ह्यास्तव त्या तुझी हिंसा न करोत.

आगमास्ते शिवाः सन्तु सिद्ध्यन्तु च पराक्रमाः।
सर्वसम्पत्तयो राम स्वस्तिमान्गच्छ पुत्रक ॥ २१

स्वस्ति तेऽस्त्वान्तरिक्षेभ्यः पार्थिवेभ्यः पुनः पुनः।
सर्वेभ्यश्चैव देवेभ्यो ये च ते परिपन्थिनः ॥ २२

शुक्रः सोमश्च सूर्यश्च धनदोऽथ यमस्तथा ।
पान्तु त्वामर्चिता राम दण्डकारण्यवासिनम् ।। २३

अग्निर्वायुस्तथा धूमो मन्त्राश्चर्षिमुखच्युताः ।
उपस्पर्शनकाले तु पान्तु त्वां रघुनन्दन ।। २४

सर्वलोकप्रभुर्ब्रह्मा भूतकर्तृ तथर्षयः ।
ये च शेषाः सुरास्ते तु रक्षन्तु वनवासिनम् ।। २५

'तुला मार्ग कल्याणकारक होवोत. तुझे पराक्रम सफल होवोत. सर्व प्रकारच्या अपेक्षित समृद्धी वनामध्ये तुला प्राप्त होवोत आणि तू कल्याणसंपन्न राहून तुझे गमन होवो. आकाश आणि पृथ्वी ह्यांत वास्तव्य करणारे प्राणी व सर्व देवता ह्यांपासून आणि तुझे जे कोणी शत्रू असतील त्यांपासून तुझे कल्याण होवो. रामा, शुक्र, चंद्र, सूर्य, कुबेर आणि यम ह्यांचे मी पूजन केले आहे, करिता तू दंडकारण्यामध्ये वास्तव्य करीत असताना तुझे हे रक्षण करोत. हे रघुनंदना, अग्नी, वायू, धूम आणि ऋषींच्या मुखापासून निघालेले मंत्र स्नान-समयी तुझे रक्षण करोत. सर्वलोकाधिपती ब्रह्मा, जगत्कारण ब्रह्म आणि बाकीचे देव वनात वास्तव्य करणाऱ्या तुझे रक्षण करोत.'

नंतर कौसल्येने देवगणांचे पूजन केले. ब्राह्मणांकडून यथाविधी हवन करविले. रामाला आरोग्य लाभावे, यास्तव उपाध्यायाकडून होम करविला. अवशिष्ट हविर्द्रव्याचा शेष लोकपालादिकांना बली दिला आणि रामाला वनात मंगल असावे, म्हणून पुण्याहवाचन करविले. ब्राह्मणांना दक्षणा दिली.

यन्मङ्गलं सहस्राक्षे सर्वदेवनमस्कृते ।
वृत्रनाशे समभवत्तत्ते भवतु मङ्गलम् ।। ३२

यन्मङ्गलं सुपर्णस्य विनताकल्पयत्पुरा ।
अमृतं प्रार्थयानस्य तत्ते भवतु मङ्गलम् ।। ३३

अमृतोत्पादने दैत्यान्घ्नतो वज्रधरस्य यत् ।
अदितिर्मङ्गलं प्रादात्तत्ते भवतु मङ्गलम् ।। ३४

त्रिविक्रमान्प्रक्रमतो विष्णोरतुलतेजसः ।
यदासीन्मङ्गलं राम तत्ते भवतु मङ्गलम् ।। ३५
ऋषयः सागरा द्वीपा वेदा लोका दिशश्च ते ।
मङ्गलानि महाबाहो दिशन्तु शुभमङ्गलम् ।। ३६

सर्व देवांना मान्य अशा इंद्राला वृत्र-वध-समयी जे मंगल झाले, ते तुला होवो. अमृत आणण्याकरिता निघालेल्या गरुडाला विनतेने पूर्वी जे मंगल केले, ते तुला होवो. अमृतोत्पादन समयी दैत्यांचा घात करणाऱ्या वज्रपाणी इंद्राला अदितीने जे मंगल केले, ते मंगल तुला होवो. तीन पावले टाकताना अतुल तेजस्वी विष्णूला जे मंगल झाले, ते तुला होवो. हे महापराक्रमी रामा, ऋषी, सागर, द्वीपे, वेद, लोक आणि दिशा तुला नुसती मंगले करोत. इतकेच नव्हे तर मंगलाचेही मंगल तुला त्यांच्यापासून प्राप्त होवो.

कौसल्येने रामाला वनवासाला इष्टकार्यार्थ जाण्यास सांगितले. वनात मंगलसंपन्न राहून परत आल्यावर स्वताचे व सुनेचे उद्देश सफल कर, अशी इच्छा प्रकट करून ती म्हणाली—

मयार्चिता देवगणाः शिवादयो
महर्षयो भूतगणाः सुरोरगाः ।
अभिप्रयातस्य वनं चिराय ते
हितानि काङ्क्षन्तु दिशश्च राघव ।। ४५

हे राघवा, मी पूजिलेले शिवादी देवगण, महर्षी, भूतगण, इतर देव, पन्नग व दिशा वनात निघालेल्या तुझ्या हिताची चिरकाल इच्छा धरोत.

## २. सुमित्रेचा आशीर्वाद अयोध्याकाण्ड/४०

रामावरोबर वनवासाला जाण्याला सिद्ध झालेला लक्ष्मण सुमित्रेला वंदन करण्यास गेला असता तिने त्याच्या मस्तकाचे अवघ्राण केले आणि ती रडत रडत त्याला म्हणाली—

सृष्टस्त्वं वनवासाय स्वनुरक्तः सुहृज्जने
रामे प्रमादं मा कार्षीः पुत्र भ्रातरि गच्छति ।। ५

व्यसनी वा समृद्धो वा गतिरेष तवानघ ।
एष लोके सतां धर्मो यज्ज्येष्ठवशगो भवेत् ।। ६

इदं हि वृत्तमुचितं कुलस्यास्य सनातनम् ।
दानं दीक्षा च यज्ञेषु तनुत्यागो मृधेषु हि ।। ७

लक्ष्मणं त्वेवमुक्त्वासौ संसिद्धं प्रियराघवम् ।
सुमित्रा गच्छ गच्छेति पुनः पुनरुवाच तम् ।। ८

रामं दशरथं विद्धि मां विद्धि जनकात्मजाम् ।
अयोध्यामटवीं विद्धि गच्छ तात यथासुखम् ।। ९

"हे पुत्रा, तुझे सुहृज्जन रामावर अत्यंत प्रेम आहे; म्हणून मी तुला वनवासाला जाण्याची अनुमती देत आहे. यास्तव तुझा भ्राता राम वनात (अन्यत्र) जाऊ लागला म्हणजे तू कधीही गैरसावध राहू नकोस. हे निष्पाप, संकटात सापडलेला असो वा समृद्ध असो, हा रामच तुझी गती आहे; आणि ज्येष्ठ भ्रात्याला अनुसरून वागणे, हाच जगतामध्ये सज्जनांचा धर्म आहे. ज्येष्ठाला अनुसरून वागणे हे आचरण ह्या कुलाला उचित असून ते परंपरागत चालत आलेले आहे. ज्ञान, यज्ञदीक्षा आणि युद्धात देहत्याग हे धर्मही क्षत्रिय कुलाला उचित आहेत... 'जा, जा' असे पुन्हा पुन्हा सांगून सुमित्रा लक्ष्मणाला म्हणाली– बा लक्ष्मणा, राम हा दशरथ, मी ही जनककन्या आणि अरण्य ही अयोध्या असे समजून तू खुशाल जा."

## ३. श्रावणाला पित्याचा आशीर्वाद अयोध्याकाण्ड/६४

श्रावणाच्या मृत्यूची दुःसह वार्ता ऐकून अत्यंत शोकाकुल झालेल्या त्याच्या पित्याने पुत्राला संस्कारपूर्वक जलांजली देण्यापूर्वी पुढीलप्रमाणे आशीर्वाद दिला आहे.

अपापोऽसि यथा पुत्र निहतः पापकर्मणा ।

तेन सत्येन गच्छाशु ये लोकास्त्वस्त्रयोधिनाम् ।। ४०

यां हि शूरा गतिं यान्ति संग्रामेष्वनिर्वातिनः ।
हतास्त्वभिमुखाः पुत्र गतिं तां परमां व्रज ।। ४१

यां गतिं सगरः शैब्यो दिलीपो जनमेजयः ।
नहुषो धुन्धुमारश्च प्राप्तास्तां गच्छ पुत्रक ।। ४२

या गतिः सर्वभूतानां स्वाध्यायात्तपसश्च या ।
भूमिदस्याहिताग्नेश्च एकपत्नीव्रतस्य च ।। ४३

गोसहस्रप्रदात्ऋृणां गुरुसेवाभृतामपि ।
देहन्यासकृतां या च तां गतिं गच्छ पुत्रक ।। ४४

न हि त्वस्मिन्कुले जातो गच्छत्यकुशलां गतिम् ।–४५

'तू निरपराधी असतानाही पापकर्म करणाऱ्याने तुझा वध केला आहे. हे जर खरे असेल, तर अस्त्रयुद्धांमध्ये पडणाऱ्यांना जे लोक प्राप्त होत असतात त्या लोकांना तू सत्वर जा. संग्रामापासून परावृत्त न होता संमुख युद्ध करता करता वध पावलेल्या शूरांना जी गती प्राप्त होत असते, त्या उत्कृष्ट गतीला तू जा. सगर, शैब्य, दिलीप, जनमेजय, नहुष, धुंधुमार यांना जी गती प्राप्त झाली, ती गती तुला प्राप्त होवो. प्राणिमात्रांचा आश्रय जे ब्रह्म, ते तुला प्राप्त होवो. वेदाध्ययन, तप व पृथ्वीदान करणारे, अहिताग्नी, एकपत्नीव्रताने वागणारे, हजारो गाई देणारे, गुरुसेवा करणारे आणि महाप्रस्थानादी साधनांनी परलोकप्राप्ती करिता देहत्याग करणारे ह्यांना जी गती प्राप्त होत असते, ती गती तुला प्राप्त होवो. आमच्या कुलामध्ये उत्पन्न झालेल्या तुला वाईट गती प्राप्त होणार नाही.'

## ४. स्वर्गस्थ दशरथाचे आशीर्वाद युद्धकाण्ड/११९

महेश्वराने स्वर्गस्थ दशरथाचे रामाला दर्शन घडविले असता दशरथ अत्यंत आनंदित झाला. कहोल ब्राह्मणाच्या पुत्राने त्याचा जसा उद्धार केला, तसा 'तू महात्मा सत्पुत्राने माझा उद्धार केला आहेस', असे

संतोषाचे उद्गार काढले. कैकेयीची दुष्ट भाषणे व तिच्यामुळे राम, लक्ष्मण, सीतेला भोगावा लागलेला वनवास व त्यात सोसाव्या लागलेल्या हाल-अपेष्टा त्याला व्यथित करीत होत्या. त्या रामापाशी त्याने बोलून दाखविल्या व त्याला आशीर्वाद दिला.

निवृत्तवनवासोऽसि प्रतिज्ञा पूरिता त्वया ।
रावणं च रणे हत्वा देवताः परितोषिताः ।। २३

कृतं कर्म यशः श्लाघ्यं प्राप्तं ते शत्रुसूदन ।
भ्रातृभिः सह राज्यस्थो दीर्घमायुरवाप्नुहि ।। २४

'आता तुझा वनवास पूर्ण झाला आहे. तू आपली प्रतिज्ञा शेवटास नेली आहेस आणि संग्रामामध्ये रावणाचा वध करून तू देवताही संतुष्ट केल्या आहेस. हे शत्रुनाशका, प्रशंसनीय कर्म केल्यामुळे तू कीर्ती संपादन केली आहेस. राज्यारूढ झालेल्या तुला भ्रात्यांसहवर्तमान दीर्घायुष्य लाभो.' रामाने दशरथाला कैकेयी व भरत ह्यांचेवर कृपा करण्याची विनंती केली असता दशरथाने ती मान्य केली. लक्ष्मणाला रामाची शुश्रूषा करण्याचा उपदेश करून पुढील आशीर्वाद दिला–

धर्मं प्राप्स्यसि धर्मज्ञ यशश्च विपुलं भुवि ।
रामे प्रसन्ने स्वर्गं च महिमानं तथोत्तमम् ।। २९

'हे धर्मज्ञ, तुला धर्म प्राप्त होईल, भूतलावर तुझी मोठी कीर्ती होईल आणि राम प्रसन्न झाला असता तुला स्वर्गप्राप्ती होऊन तुझी उत्कृष्ट कीर्ती होईल. हे सुमित्रानंदना, तुझे कल्याण असो.' नंतर सीतेला उपदेशवजा आशीर्वाद देत तो म्हणाला.

कर्तव्यो न तु वैदेहि मन्युस्त्यागमिमं प्रति ।
रामेणेदं विशुद्ध्यर्थं कृतं वै त्वद्धितैषिणा ।। ३५

सुदुष्करमिदं पुत्रि तव चारित्रलक्षणम्।
कृतं यत्तेऽन्यनारीणां यशो ह्यभिभविष्यति ।। ३६

न त्वं कामं समाधेया भर्तृशुश्रूषणं प्रति।
अवश्यं तु मया वाच्यमेष ते दैवतं परम् ।। ३७

' हे वैदेही रामाने जो तुझा पूर्वी त्याग केला होता, त्या संबंधाने तू त्याच्यावर क्रोध करू नको. तुझे हित इच्छिणाऱ्या रामाने तुझ्या शुद्धीकरिता हे केले आहे. बाळे, तू केलेले हे आचरण फार दुर्घट आहे. ह्या तुझ्या आचरणामुळे इतर पतिव्रता स्त्रियांची कीर्ती मागे पडेल. पतिशुश्रूषेसंबंधी खरोखर तुला सांगण्याचें कारण नाही. तथापि हा रामच तुझे मुख्य दैवत होय, हे मला अवश्य सांगितले पाहिजे. '

## ५. रामाचा पुष्पक विमानाला आशीर्वाद उत्तरकाण्ड/४१

कुबेराच्या आज्ञेप्रमाणे पुष्पक विमान रामाकडें आले आणि त्याच्या विनंतीनुसार रामाने त्याचा स्वागतपूर्वक स्वीकार केला. लाह्या, फुले, सुगंधी द्रव्ये इत्यादींनी त्याची पूजा करून राम त्याला म्हणाला–

गम्यतामिति त्योवाच आगच्छ त्वं स्मरे यदा।
सिद्धानां च गतौ सौम्य मा विषादेन योजय ।। १४
प्रतिघातश्च ते मा भूद्यथेष्टं गच्छतो दिशः। –१५

' जा आणि मी जेंव्हा स्मरण करीन तेव्हा ये. हे सौम्य विमाना, आकाशमार्गामध्ये तू सुखाने रहा. तू इच्छेस येईल, त्या दिशेने जात असताना तुला कोठेही अडथळा न होवो.'

## ६. गंगेला नवस अयोध्याकाण्ड/५२

गुहाचा निरोप घेऊन राम, लक्ष्मण, सीता गंगा नदी पार करण्यासाठी नौकारूढ झाले. स्वताच्या कल्याणासाठी त्या वेळी योग्य

अशा मंत्राचा रामाने जप केला. आचमनादी करून सर्वांनी गंगेला नमस्कार केला असता नावाड्यांनी नौका वल्हवली. नौका भागीरथीच्या मध्यभागी आल्यानंतर सीता हात जोडून गंगेला म्हणाली–

पुत्रो दशरथस्यायं महाराजस्य धीमतः ।
निदेशं पालयत्वेनं गङ्गे त्वदभिरक्षितः ।। ८३

चतुर्दश हि वर्षाणि समग्राण्युष्य कानने ।
भ्रात्रा सह मया चैव पुनः प्रत्यागमिष्यति ।। ८४

ततस्त्वां देवि सुभगे क्षेमेण पुनरागता ।
यक्ष्ये प्रमुदिता गङ्गे सर्वकामसमृद्धिनी ।। ८५

त्वं हि त्रिपथगे देवि ब्रह्मलोकं समक्षसे ।।
भार्या चोदधिराजस्य लोकेऽस्मिन्सम्प्रदृश्यसे ।। ८६

सा त्वां देवि नमस्यामि प्रशंसामि च शोभने ।
प्राप्तराज्ये नरव्याघ्रे शिवेन पुनरागते ।। ८७

गवां शतसहस्रं च वस्त्राण्यन्नं च पेशलम् ।
ब्राह्मणेभ्यः प्रदास्यामि तव प्रियचिकीर्षया ।। ८८

सुराघटसहस्रेण मांसभूतौदनेन च ।
यक्ष्ये त्वां प्रीयतां देवि पुरीं पुनरुपागता ।। ८९

यानि त्वत्तीरवासीनि दैवतानि च सन्ति हि ।
तानि सर्वाणि यक्ष्यामि तीर्थान्यायतनानि च ।। ९०

पुनरेव महाबाहुर्मया भ्रात्रा च संगतः ।
अयोध्यां वनवासात्तु प्रविशत्वनघोऽनघे ।। ९१

'हे गंगे, हा विचारी दशरथ महाराजाचा पुत्र तू संरक्षण करीत असताना आपल्या पित्याची ही आज्ञा शेवटास नेवो. हे देवी, हे भाग्य-शाली गंगे, संपूर्ण चौदा वर्षे वनामध्ये वास्तव्य करून भ्राता व मी यांसहवर्तमान तो पुनरपि परत येईल, तेव्हा सर्व मनोरथ परिपूर्ण होऊन

मी सुखरूप परत आलें, म्हणजे तुझे मोठ्या आनंदाने पूजन करीन. हे त्रैलोक्य-गामिनी देवी, तू ब्रह्मलोक व्याप्त करीत आहेस आणि महा-सागराची भार्या असून ह्या लोकामध्ये दृष्टोत्पत्तीस येत आहेस. हे देवी कल्याणी, माझा पुरुषश्रेष्ठ भर्ता वनातून सुखरूप परतून राज्य करू लागला म्हणजे मी तुला नमस्कार करीन आणि तुला संतुष्ट करण्या-करिता लक्ष गोप्रदाने, वस्त्रे आणि उत्तम अन्न ब्राह्मणांना देईन. इतकेच नव्हे तर मी अयोध्या नगरीला आले, म्हणजे सहस्रघट मद्य आणि मास-मिश्र ओदन यांचा तुला बळी देईन. गंगे, तू मजवर प्रसन्न हो. तुझ्या तीराचे ठिकाणी ज्या काही देवता आहेत, तीर्थे आणि पुण्यस्थाने आहेत, त्या सर्वांचे मी पूजन करीन. परंतु हे निष्पाप गंगे, मी आणि भ्राता लक्ष्मण यांसहवर्तमान माझा निष्पाप भर्ता वनवासातून परत येऊन अयोध्येत प्रविष्ट होवो.'

## ७. यमुनेला नवस अयोध्याकाण्ड/५५

भरद्वाज मुनीच्या आश्रमात एक रात्र व्यतीत केल्यानंतर चित्रकूट पर्वताकडे जाण्याचा मार्ग मुनीने रामाला सांगितला. आशीर्वादात्मक बोलून त्यांनी तिघांचा निरोप घेतला. यमुना नदी पार करून जाण्यास नौका नव्हती. तेव्हा काष्ठे एकत्र बांधून त्यांनी एक पेटा तयार केला. त्यात झाडांची पाने पसरून बसण्यास योग्य अशी जागा केली. सीतेला त्यात प्रथम बसवून राम-लक्ष्मण पेटयात स्थानापन्न झाले. पेटा जेव्हा यमुनेच्या मध्यभागी आला तेव्हा सीता यमुनेला वंदन करून म्हणाली–

स्वस्ति देवि तरामि त्वां पारयेन्मे पतिर्व्रतम् ।।–१९

यक्ष्ये त्वां गोसहस्रेण सुराघटशतेन च ।
स्वस्ति प्रत्यागते रामे पुरीमिक्ष्वाकुपालिताम् ।। २०

'हे देवी, मी तुझ्यातून तरून जात आहे, तसेच माझ्या पतीने स्वीकारलेले व्रत पार पडावे. इक्ष्वाकुवंशजांनी रक्षण केलेल्या अयोध्या नगरीला राम सुखरूप परत आल्यावर सहस्र गाई व शंभर मद्य घट ह्यांच्या योगाने मी तुझे पूजन करीन.'

# व्यक्ति-विशेष

## १ अगस्त्य

वसिष्ठाप्रमाणे मित्रावरुणांचा पुत्र. उर्वशीने समागमास नकार दिल्यामुळे तिला उद्देशून वरुणाने त्याचे तेज (वीर्य) एका कुंभात टाकले. मित्राला हे कळल्यानंतर त्याने उर्वशीला शाप देऊन आपले तेज कुंभात विसर्जित केले. त्या कुंभातून दोन तेजस्वी श्रेष्ठ ब्रह्मर्षी उत्पन्न झाले. त्यांतील पहिला अगस्त्य व दुसरा वसिष्ठ. 'मी तुझ्या एकटयाचा पुत्र नाही', असे अगस्त्याने मित्राला सांगितले. उर्वशीला पाहून मित्रावरुणांचे रेत कमळात पडले व त्यापासून वसिष्ठ व अगस्त्य जन्मले, अशीही समजूत आहे. लोपामुद्रा ही याची पत्नी राजकन्या होती. तिचा ऐश्वर्याकडे अधिक ओढा होता. तो विरक्त असूनही बायकोला संतुष्ट करण्यासाठी त्याने इल्वलाची संपत्ती मिळवली. समुद्रात राहणाऱ्या कालकेयांनी लोकांना त्रास देण्यास प्रारंभ केला असता याने समुद्र पिऊन टाकला. नहुषाने त्याला आपले वाहक केले असता त्याच्या जटेत बसलेल्या भृगूच्या शापाने तो दहा हजार वर्षे साप होऊन पडला. अगस्त्याने रामाला सोने व हिरे यांनी सुशोभित असे धनुष्य, अमोघ बाण व कधीही न संपणाऱ्या बाणांचा भाता दिला. मरुतांकरिता आणलेला पशू इंद्राने पळविला असता, मरुत इंद्राला मारण्यास उद्युक्त झाले. अगस्त्याने मरुतांना शांत करून त्यांचे व इंद्राचे सख्य घडवून आणले. दशवार्षिक सत्र आरंभून पशु-हिंसा न करता याने इंद्राला पाऊस पाडण्यास भाग पाडले. अगस्त्याचा संबंध दक्षिण दिशेला जास्त येत असल्याने त्याला 'दक्षिणेचा स्वामी' समजले जाते. लोपामुद्रेला याच्यापासून इध्मवाह (दृढस्यू) नावाचा पुत्र झाला. इध्मवाह व दृढस्यू ही कदाचित दोन पुत्रांची नावे असावीत. अगस्त्य नावाचा एक तारा भाद्रपद महिन्यात दक्षिणेकडे उगवलेला दिसतो व तो उगवला म्हणजे पाणी निर्दोष होते, असा जो समज आहे, त्याचा संबंध अगस्त्याकडे जोडला जातो. याच्या नावावर बरीच ग्रंथरचना आहे. याच्या नावाचे गोत्र आहे.

## २ अंगद

वालीला तारेपासून झालेला पुत्र. वालीचा अतिशय लाडका आणि त्याच्यासारखाच पराक्रमी. मरणोन्मुख वालीने त्याला सुग्रीवाच्या स्वाधीन करून स्वताच्या मुलाप्रमाणे प्रतिपालन करण्यास व अंगदाला सुग्रीवाच्या कलाने वागण्यास सांगितले.

तरीही अंगदाच्या मनात सुग्रीवाविषयी शंका होतीच. रामाला साहाय्य करण्यासाठी बृहस्पती अंशस्वरूपात अंगद म्हणून जन्माला आला असल्याने तो बुद्धिमान होता. वालीच्या वधानंतर रामाने सुग्रीवाला किष्किंधेचा राजा केले. त्याच वेळी अंगदास त्याचेकडून यौवराज्याभिषेक करविला. सीतेच्या शोधार्थ दक्षिण दिशेला गेलेल्या वानरांचा तो नायक होता. एका असुराला त्याने रक्त ओकायला लावले. ठराविक मुदतीत सीतेचा शोध न लागल्याने सुग्रीवाच्या भीतीने त्याच्याकडे परत न जाता सर्व वानरांनी प्रायोपवेशन करण्याचे ठरविले. परंतु संपातीने सीतेचा पत्ता सांगितल्यावर समुद्रोल्लंघन कोण, कसे करणार, अशी चिंता उत्पन्न झाली असता एका उड्डाणात शंभर योजने जाण्याची अंगदाने उभारी धरली. रावणाशी युद्ध टाळण्याकरता सामोपचाराने बोलण्यासाठी रामाने अंगदाची वकील म्हणून योजना केली. इंद्रजिताशी युद्ध करून त्याने त्याला जर्जर केले. नरांतक, महापार्श्व, वज्रदंष्ट्रासारख्या बलाढ्य राक्षसांचा त्याने वध केला. कुंभकर्णाचे विशाल शरीर पाहून भयभीत झालेल्या वानरवीरांना ह्याने प्रोत्साहित केले. त्याच्या अतुलनीय पराक्रमाने राम त्याच्यावर संतुष्ट झाला होता. राज्याभिषेकाचे वेळी बाहुभूषणे देऊन रामाने त्याचा सन्मान केला. अंगदाला आपल्या अंकापाशी घेऊन राम सुग्रीवाला म्हणाला, 'हा अंगद, तुझा सत्पुत्र आहे. सल्लामसलतीत निपुण असून माझ्या हिताविषयी अत्यंत दक्ष आहे.' सुग्रीवानेही त्याला राज्याभिषेक करवून किष्किंधेचे राज्य दिले.

## ३ अंजना

ही अंजनी या नावानेही ओळखली जाते. पुंजिकस्थला नावाची अप्सरा ऋषीच्या शापाने कुंजर नावाच्या वानराची कन्या झाली. शिवशतरुद्रसंहितेत ही गौतम ऋषीची कन्या आहे, असे म्हटले आहे. ही केसरी वानराची पत्नी. वायूच्या प्रसादाने हिला हनुमान नावाचा पुत्र झाला. असे स्कंद पुराणात दिले आहे. मतंग ऋषीच्या सांगण्यावरून अंजनीने पतीसह वेंकटाचलावर जाऊन; पुष्करणी तीर्थावर स्नान केले. वराह व वेंकटेश यांना नमस्कार केला. आकाशगंगा तीर्थावर वायूची आराधना केली. एक हजार वर्षे तपश्चर्या पूर्ण झाल्यावर प्रसन्न होऊन वायूने वर मागण्यास सांगितले. तिने पुत्र मागितला. तो हनुमान. ही कामरूपधरा होती व हिला मार्जरा नामक सवत होती.

## ४ अतिकाय

रावण आणि धान्यमालिनी यांचा पुत्र. त्याचे शरीर अतिशय स्थूल होते. ब्रह्मदेवाला संतुष्ट करून अस्त्रे, कवच, दिव्य रथ आणि सुरासुरांपासून अवध्यत्व

इत्यादी वर त्याने मिळवले. त्याने इंद्राचा व वरुणाचा पराभव केला होता. कुंभकर्णाच्या वधानंतर तो युद्धार्थ रणांगणात आला. त्याच्या केवळ गर्जनेने भयभीत होऊन वानर रामाच्या आश्रयाला गेले. अतुलनीय सामर्थ्य, अस्त्रज्ञानी, वृद्धसेवी, गजारोहण, अश्वारोहण, खड्ग व धनुष्य-बाणांच्या वापर करण्यात अत्यंत निपुण, सामदामादी राजनीतीत मर्मज्ञ असा बिभीषणाने रामाला त्याचा परिचय करून दिला. 'कोणाही यःकश्चित पुरुषाशी मी लढणार नाही, ज्याचे सामर्थ्य असेल त्याने माझ्याशी युद्ध करावे ', असे तो रामाला म्हणाला होता. लक्ष्मणाशी लढत असताना त्याने त्या राक्षसाचा वध केला.

## ५ अदिती

प्राचेतस दक्ष आणि असिक्नी यांची कन्या, कश्यपाची भार्या आणि मित्रा-वरुणांची आई. हिला अत्यंत बलवान अशी आठ मुले होती. वेदांत हिचा उल्लेख विष्णुपत्नी असा आहे. द्यौ व पृथ्वी यांच्याशी तिला एकरूप कल्पिले आहे. मैनाक पर्वताच्या माथ्यावरील विनशन तीर्थावर तिने चरू शिजवला होता. पुत्रप्राप्तीसाठी एका पायावर उभे राहून हिने तपश्चर्या केली व त्यामुळे हिच्या पोटी विष्णू जन्मला. हिला बारा पुत्र असल्याचाही एक उल्लेख आढळतो. तैत्तिरीय संहितेत मात्र आठच पुत्र असल्याचे म्हटले आहे. हिला केवळ सातच पुत्र हवे होते. म्हणून आठवा गर्भ हिने फोडला असता त्यातून मार्तंड अथवा विवस्वान जन्माला आला. नरकासुराने हिची कुंडले हरण केली होती, परंतु कृष्णाने त्याला जिंकून तिला ती परत आणून दिली, असे महाभारताच्या उद्योगपर्वात दिले आहे.

ही एक वैदिक देवता असून बारा आदित्यांची माता. ऋग्वेदात हिला विश्वाची माता म्हणून संबोधले आहे. ही आदित्यांची माता असल्याने हिच्या तेजाचा गौरव केला आहे.

## ६ अनरण्य

इक्ष्वाकुकुलातील एक राजा. हा बाणाचा पुत्र व पृथूचा पिता होता, असे वाल्मीकीने (बाल ७०।२३-२४) सांगितले आहे, तर हा त्रसदस्यूचा पुत्र होता, असे भागवतात दिले आहे. हा संभूताचा पुत्र होता, असे काही पुराणांचे मत आहे. तो अयोध्येत राज्य करीत असता रावणाने त्याच्याशी युद्ध करून त्याचे सर्व सैन्य नष्ट केले. वास्तविक तो शूर व पराक्रमी होता. त्याने मारीच, सारण, शुक, प्रहस्तादी रावणाच्या अमात्यांचा पराभव केला होता. परंतु रावणाने त्याच्या मस्तकावर हस्ततलाचा तडाखा दिल्याने तो रथातून जमिनीवर कोसळला. मुमुर्षू अवस्थेत त्याने रावणाला शाप दिला.

ह्या युद्ध सोडून तप करीत असता रावणाने याचा वध केला व मृत्यूपूर्वी याने शाप दिला, असा एक उल्लेख आढळतो. परंतु वाल्मीकी रामायणात त्याला आधार सापडत नाही. उलट तो म्हणतो, 'हे राक्षसा, मी कधी युद्ध-पराङ्मुख झालो नाही. युद्ध करीत असतानाच तू माझा वध केला आहेस.' (उत्तरकाण्ड १९।२८)

## ७ अनसूया

कर्दम आणि देवहूतीची कन्या व स्वायंभुव आणि वैवस्वत मन्वंतरातील ब्रह्मा-मानसपुत्र अत्रिमुनीची भार्या. पौराणिक वाङ्मयात हिचा पतिव्रता म्हणून उल्लेख केला आहे. काहीही न खाता हिने तीन शे वर्षे तपश्चर्या करून शंकराची कृपा संपादन केली. त्यामुळे हिच्या पोटी दत्तात्रेय, दुर्वास आणि चंद्र असे तीन पुत्र जन्माला आले. चित्रकूटावरील गंगा हिने प्रवृत्त केली. मांडव्य ऋषीस शूलावर चढविले असता त्या शूलास अंधारात एका ऋषिपत्नीचा धक्का लागला, म्हणून मांडव्याने 'सूर्योदय होताच तू विधवा होशील' असा तिला शाप दिला. अनसूया तिची मैत्रीण असल्याने अनसूयेने सूर्योदय होऊच दिला नाही. त्यामुळे सर्व व्यवहार बंद पडले. तिचे वैधव्य टाळून अनसूयेने सूर्योदय होऊ दिला. ती दक्षकन्या असल्या-चाही उल्लेख आढळतो.

अत्रिमुनीने–पतीने–अनसूयेविषयी गौरवोद्‌गार काढले आहेत. तो रामाला सांगतो– 'दहा वर्षे पर्जन्य न पडल्यामुळे लोक एकसारखे दग्ध होऊ लागले असता ह्या अनसूयेने फळे-मुळे उत्पन्न करून ह्या आश्रमात गंगा आणली. ही उग्र तपश्चर्या करणारी असून नियमांनीही भूषित झालेली आहे हिने दहा हजार वर्षे मोठे उग्र तप केले आहे. ह्या अनसूयेच्याच व्रतांच्या योगाने ऋषींच्या तपाला येणारी विघ्ने नाहीशी झाली आहेत. देवकार्यासाठी झटत असताना जिने त्वरा करून दहा रात्रींची एक रात्र केली, ती ही अनसूया तुला मातेप्रमाणे आहे.'

'हिच्या सतीत्वाबद्दल मत्सर वाटून उमा, लक्ष्मी, सावित्री यांनी आपापल्या पतींना तिचे पातिव्रत्य नष्ट करण्याकरिता पाठविले. ब्रह्मा, विष्णू, महेश या तिन्ही देवांनी अनसूयेकडे येऊन तिच्याकडे नग्न अवस्थेत भिक्षा मागितली. अनसूयेने पतीचे चरणतीर्थ त्या तिन्ही देवांवर प्रोक्षिले असता त्यांचे लहान बाळांत रूपांतर झाले. तिने विवस्त्र होऊन त्यांना स्तनपान दिले. त्या तिन्ही देवांच्या अंशानी पुढे तिला दत्तात्रेय, दुर्वास व चंद्र असे तीन पुत्र झाले', अशीही माहिती आढळते.

## ८ अंबरीष

त्रिशंकूच्या दोन पुत्रांपैकी धाकटा. याला श्रीमती नावाची एक कन्या होती. आणि ती नारद व पर्वत यांच्या वादात विष्णूने मिळवली– असा उल्लेख अद्भुत

रामायणात आहे. एकदा कार्तिक महिन्यातील एकादशीचे व्रत असता द्वादशीला दुर्वास ऋषी अतिथी म्हणून आला. नदीवर स्नानास जाऊन आह्निक आटोपेपर्यंत द्वादशी संपून जाऊ लागल्यामुळे नैवेद्य अर्पण करून तीर्थ घेऊन पारणा केली. हे जाणून दुर्वासाने जटेतील केसांपासून कृत्या उत्पन्न करून अंबरीषावर सोडली. विष्णूच्या सुदर्शनाने तिचा नाश केला व ते दुर्वासाच्या मागे लागले. विष्णूने त्याचे संरक्षण करण्याचे नाकारून त्याला अंबरीषाकडे जाण्यास सांगितले. अंबरीषाकडे येण्यास त्याला एक वर्ष लागले, तोपर्यंत अंबरीष उपाशी होता. दुर्वासाचे त्याने स्वागत केले, चक्राची स्तुती करून ते परत फिरवले आणि ऋषीला उत्तम भोजन दिले. अशी कथा भागवतात आहे. याने पक्षवर्धनी एकादशीचे व्रत केले होते आणि द्वादशी योग्य वेळी सोडल्यामुळे तो विष्णूला प्रिय झाला, असे पद्म पुराणात दिले आहे. त्याला मोक्ष प्राप्त झाला. स्वर्गास गेला असता सुदेव नावाचा सेनापती त्याला तेथे दिसला. रणांगणात मृत्यू पावल्याने त्याला स्वर्ग प्राप्त झाल्याचे इंद्राने सांगितले. याला तीन पुत्र होते.

पहा : ऋचीक, पृ. २६१

## ९ अरजा

उशनस शुक्राची कन्या. हिच्या लावण्याने काममोहित होऊन दंड राजाने हिच्याशी बलात्काराने समागम केला. हे वृत्त भार्गवाला समजताच त्याने दंड राजा व दंडकारण्य यांना शाप दिला आणि तो कन्येला म्हणाला, ‘ तू सावधानपूर्वक येथेच आश्रमात रहा. तू निर्भय होऊन औरस चौरस एक योजन असलेल्या ह्या सरोवरचा उपभोग घे. तू ह्या ठिकाणी कालप्रतीक्षा करीत रहा. ज्या रात्री धूलिवृष्टी होणार आहे, त्या रात्री जे प्राणी तुझ्या समीप वास्तव्य करतील त्यांचा धूलिवृष्टीने वध होणार नाही. ’ असे सांगून तिचा त्याग करून मुनी अन्यत्र गेला. शुक्र भार्गवाची आज्ञा ऐकून ती अतिशय दुःखी झाली.

## १० अलर्क

काशीच्या दिवोदास राजाचा प्रपौत्र. याने काशी येथे सहासष्ट हजार वर्षे राज्य केले. लोपामुद्रेच्या कृपेने याला दीर्घायुष्य प्राप्त झाले होते. हा चिरतरुण होता. निकुंभाच्या शापाने निर्मानुष झालेली वाराणसी याने क्षेमकाला मारून पुन्हा वसवली. धनुर्बलाने सर्व पृथ्वी जिंकली आणि नंतर त्याचे मन सूक्ष्म ब्रह्माकडे वळले. याला सतती नावाचा एक मुलगा होता. आईच्या इच्छेनुसार याने राज्य-त्याग केला, इत्यादी माहिती [illegible] पुराणांत मिळते.

## ११ असमंज

सगराला केशिनीपासून झालेला पुत्र. हा आपल्या सावत्र भावांना सरयू नदीच्या पाण्यात फेकून देई व ते बुडू लागले म्हणजे हसत असे. हा पूर्वजन्मी योगी असून कुसंगतीमुळे योगभ्रष्ट झाला होता. राजाने ह्याला हाकलून दिले असता हा वनात निघून गेला. जाताना याने बुडविलेली सर्व मुले योग–सामर्थ्याने जिवंत केली. हा शिवभक्त होता. अंशुमान हा ह्याचा पुत्र.

## १२ अहल्या

ही ब्रह्मदेवाची मानसकन्या. हिच्या पित्याचे नाव भागवतात 'मुद्‌गल' आणि हरिवंशात 'वध्र्यश्व' असे आढळते. हिच्या ठायी हल्य (विरूपता) यत्किंचितही नसल्याने ब्रह्मदेवाने तिचे नाव 'अहल्या' असे ठेवले. ती अतिशय सुंदर होती. ब्रह्मदेवाने ठेव म्हणून शरद्वत गौतमाजवळ तिला बालपणी ठेवली होती. ती वयात येताच गौतमाने तिला ब्रह्मदेवाकडे परत धाडले. तेव्हा त्याचे जितेंद्रियत्व व सिद्धी पाहून त्याने तिचा भार्या म्हणून स्वीकार करावा, असे त्याला वाटले. पृथ्वी-प्रदक्षिणा करून प्रथम येणाऱ्याशी तिचा विवाह करण्याचे त्याने योजिले. देव, दानव, राक्षसादींनाही तिच्या सौंदर्याची प्राप्ती व्हावी, अशी इच्छा होती. अन्य देवांसह इंद्र पृथ्वी-प्रदक्षिणा करू लागला. अर्धप्रसूत गाय ही पृथ्वीतुल्य आहे, असे मानले जात असल्याने अशा गाईला प्रदक्षिणा घालून गौतमाने ब्रह्मदेवाची अट पूर्ण केली व अहल्येशी विवाहबद्ध झाला. पृथ्वी-प्रदक्षिणा करून आलेल्या देवांना अहल्या-गौतमाच्या विवाहाची वार्ता कळताच ते अतिशय दुःखी झाले. इंद्र तर अतिशय कष्टी झाला, कारण त्याला तिची अभिलाषा होती. एकदा गौतम घरात नाही असे पाहून इंद्र गौतमाचा वेष घेऊन अहल्येकडे आला व त्याने समागमाची इच्छा व्यक्त केली. वा. रा. बालकांडाप्रमाणे अहल्येला इंद्र गौतमाचा वेष धारण करून आला असल्याचे समजले होते. तिलाही याच्याशी रत होण्याची इच्छा होती. समागमा-नंतर कृतार्थ झाल्याची कबूली देऊन तिने त्याला लवकर जायला सांगितले. गौतमापासून उभयतांचे रक्षण करण्याची तिने विनंती केली. उत्तरकांडात मात्र तिने त्याला ओळखले नसल्याने तिच्या हातून प्रमाद घडला, असे म्हटले आहे. इंद्र अहल्येकडे बरेच दिवस लागोपाठ येत होता. असे ब्रह्म पुराणात म्हटले आहे. गौत-माच्या अनुपस्थितीत इंद्र अहल्येकडे येत असल्याचे त्याच्या शिष्यांनी निदर्शनास आणून दिले असता सारा प्रकार गौतमाला कळून आला. त्याने अहल्या व इंद्र या दोघांनाही शाप दिले. अहल्येला दिलेल्या शापाचे स्वरूप निरनिराळ्या ग्रंथांत वेगवेगळे दिले आहे. 'तू कोणालाही दिसू शकणार नाहीस, केवळ वायू भक्षण करून राहशील, तुझे रूप विभागले जाईल', असा शाप वाल्मीकी रामायणात

आढळतो. आनंद-रामायण-सार, स्कंद पुराण व गणेश पुराण या ग्रंथांनुसार, तू शिला होशील, असा शाप दिलेला दिसतो. तुझ्या देहावर केवळ अस्थिचर्म राहील, सजीव प्राण्यांप्रमाणे अंगावर मास व नखे तुझ्या शरीरात उत्पन्न होणार नाहीत व तुझ्या या रूपाने स्त्रियांना पापकर्माची दहशत बसेल, असे या शापाचे स्वरूप पद्म पुराणात वर्णिले आहे. उःशापातही फरक आढळतो. ' दशरथपुत्र दुर्धर्ष राम जेव्हा या घोर वनामध्ये येईल, तेव्हा लोभ-मोहरहित अशी बनलेली तू त्याच्या आदरातिथ्याने शुद्ध होशील आणि शुद्ध झाल्यावर स्वताचे रूप धारण करून आनंदाने माझ्यासमीप राहशील ', असे वाल्मीकीने सांगितले आहे. तर स्कंद पुराणात ' गौतमाने हिच्या मुक्तीसाठी कोटी तीर्थावर तप केले, तेव्हा ही मुक्त झाली व तेथे अहल्या सरोवर निर्माण झाले ', असा उल्लेख आढळतो.

तपश्चर्येने शुद्ध झाल्यानंतर तिचे गौतमाशी पुनर्मीलन झाले. ब्रह्म पुराणात तिचा गौतमी असा उल्लेख आहे. इंद्राशी संबंध येण्यापूर्वीच तिला गौतमापासून शतानंद नावाचा मुलगा झाला होता. गौतमाचा शिष्य उत्तंक यास हिने सौदास राजाच्या पत्नीची कुंडले गुरुदक्षिणा म्हणून देण्यास सांगितले होते.

## १३ आदित्य (सूर्य)

हे वैवस्वत मन्वंतरातील देवता-समूहाचे नाव. ऋग्वेदात याच्याकरिता सहा सूक्ते आहेत. आदित्यांची संख्या बारा असून ते बारा महिन्यांचे निदर्शक आहेत इंद्र हा अदितीचा पुत्र असल्याने तो आदित्यांपैकीच एक आहे. परंतु बारा आदित्यांहून निराळा आहे. आदित्यांचे वर्णन बहुतेक सर्व देवतांच्या सामान्य वर्णनाशी जुळत असले तरी आदित्यांपैकी प्रमुख अशा मित्रावरुणांशी मात्र जमत नाही. सर्वाधार, सर्वपालक, मनातले विचार जाणणारे, पापी जनांना शिक्षा करणारे व रोग नाहीसे करून दीर्घायुष्य देणारे, असे त्यांचे वर्णन आढळते. आपल्या पोटी साध्य देव यावेत म्हणून अदितीने ब्रह्माला उद्देशून भात शिजवला. आहुती देऊन शिल्लक राहिलेला भात खाल्ल्याने अदितीला धाता व अर्यमा अशी दोन जुळी मुले झाली. दुसऱ्या खेपेस मित्र व वरुण, तिसऱ्या खेपेस अंश व भग, चवथ्या वेळी इंद्र व विवस्वान अशी अपत्ये झाली. अदितीचे बारा मुलगे म्हणजेच द्वादशादित्य अथवा साध्य नामक देव होत.

## १४ इंद्र

इंद्र ही एक पदवी आहे. शंभर यज्ञ करून ती मिळवता येते. प्रजा-संरक्षण हे त्याचे प्रमुख कार्य असते. विभिन्न मन्वंतरांत इंद्र वेगळे असले तरी त्यांचे गुण व कार्य एकच असते. सप्तर्षी हे त्याचे सल्लागार असतात. गंधर्व, अप्सरा हे त्यांचे

ऐश्वर्य होय. ते वज्रपाणी, सहस्राक्ष, पुरंदर व मघवान असतात. नहुष, हिरण्यकशिपू, बली, प्रल्हाद हेही काही काळ इंद्र झाले होते. इंद्र हा पावसाचा देव होय.

रामायण, महाभारतादी प्राचीन ग्रंथांतून ज्या इंद्राचा उल्लेख येतो तो अदितीपुत्र शक्र होय. हा देवांचा राजा असून इंद्राणी शची ही ह्याची भार्या. शंभर यज्ञ केल्याने इंद्रपद मिळत असल्याने ते पूर्ण होण्यापूर्वीच अश्वमेधाचा घोडा पळवून हा विघ्न उत्पन्न करीत असे. त्याचप्रमाणे कोणी उग्र तपश्चर्या करू लागला की अप्सरांना तपोभंग करण्यास पाठवत असे. विश्वामित्राची तपश्चर्या भंग करण्याकरिता त्याने रंभेची योजना केली होती. यमाच्या तपोभंगाचे काम गणिका नावाच्या अप्सरेकडे सोपविले होते. गौतम वेषाने याने अहल्येचा उपभोग घेतला आणि गौतमाच्या शापाने वृषणहीन झाला. गौतमाचे तप हरण करण्याचे देवकार्य म्हणून हे कृत्य केल्याने आपल्याला वृषण-प्राप्ती व्हावी, अशी इच्छा प्रकट केली असता पितृदेवांनी ह्याला ' मेषवृषण ' केले. अहल्येप्रमाणेच रुक्मांगद राजावर मोहित झालेल्या वाचक्नवी मुनीच्या मुकुंदा नावाच्या स्त्रीचा याने रुक्मांगदाच्या वेषाने उपभोग घेतला. हिरण्याक्ष व हिरण्यकशिपू यांचा इंद्राने वध करविल्यामुळे दितीने कश्यपाकडून इंद्रघातकी पुत्र मागून घेतला. कश्यपाने तिला एक विशिष्ट अट घातली होती. तिचे यथायोग्य पालन तिच्याकडून न झाल्याने इंद्राने तिच्या उदरात शिरून गर्भाचे सात तुकडे केले. दुर्वास ऋषीने एक माला त्याला दिली होती. परंतु तिचा अनादर केल्याने त्याने इंद्राला शाप दिला. विश्वामित्राच्या साहाय्याने स्वर्गात आलेल्या त्रिशंकूला याने पुन्हा पृथ्वीवर खाली डोके वर पाय अशा अवस्थेत खाली ढकलून दिले. शरभंग ऋषीला ब्रह्मलोकी नेण्यासाठी तो स्वता आला होता. त्याचप्रमाणे राम-रावण-युद्धात रामाला साहाय्य म्हणून याने आपला रथ सारथी मातलीसह दिला होता. युद्धात कुंभकर्णाने इंद्राचा पराभव केला होता आणि मेघनादाने तर त्याला जिंकून लंकेस नेले होते. त्याची मुक्तता करण्यासाठी ब्रह्मदेवाने त्याला मर्यादित अवध्यत्वाचा वर आणि अग्नीचा अश्वयुक्त रथ दिला. ब्रह्मदेवाने सांगितल्यावरून ह्याने वैष्णवयाग केला. त्याच्या वज्रप्रहाराने वायुपुत्राची हनू भग्न झाली आणि त्याला ' हनुमान ' असे नाव प्राप्त झाले. विष्णूच्या आज्ञेवरून ह्याने अश्वमेध केला.

ब्रह्मदेवाच्या विनंतीवरून निद्रेला बरोबर घेऊन हा लंकेस गेला. सीतेची भेट घेऊन तिला अन्नोदकाशिवाय जगणे सहज शक्य व्हावे, यास्तव हविष्यान्न दिले. त्वष्ट्याचा पुत्र वृत्र याचा वध केल्याने ब्रह्महत्या याच्या मागे लागली होती. रामाला साहाय्य प्राप्त व्हावे म्हणून याने मैनाक पर्वताला वर देऊन समुद्रात ठेवले होते. लंकेच्या प्रवासात हनुमानाला विश्रांती मिळावी हा त्याचा उद्देश होता कबंध राक्षस चाल करून आला असता वज्राच्या आघाताने इंद्राने त्याची दुर्दशा केली. परंतु त्याच्या विनंतीवरून उदरनिर्वाहासाठी लांब बाहू दिले. शुनःशेपाचे स्तुतीने

संतुष्ट होऊन इंद्राने त्याला दीर्घायुष्य दिले.

इंद्राच्या शरीराचा मल आणि क्षुधा त्याने ज्या भूमीत टाकली व त्याला शुद्ध होण्याच्या कामी साहाय्य केले, त्या प्रदेशांना मलद व करुष अशी नावे देऊन वराने समृद्ध केले. विष्णूला अदितीच्या पोटी जन्म घेण्याची विनंती कश्यपाने केली असता ती मान्य करून विष्णूने वामनावतार घेतला व बलीचे निर्दालन करून इंद्राला पुन्हा त्रैलोक्याची प्राप्ती करून दिली. ऋक्षपत्नी विरजेला ह्याच्यापासून वाली नावाचा पुत्र झाला.

## १५ इल, इला

हा कर्दम प्रजापतीचा पुत्र व बाह्लीक देशाचा राजा. शिव-पार्वतीच्या वरामुळे ह्याला एक महिना स्त्रीत्व व एक महिना पुरुषत्व मिळत असे. ह्याचा पुत्र पुरूरवा. हा वैवस्तव मनू (श्राद्धदेव) व श्रद्धा यांचा पुत्र. त्यांनी पुत्र-प्राप्तीसाठी मित्रावरुणांना उद्देशून पुत्रकामेष्टी यज्ञ वसिष्ठाकडून करविला. त्यांना 'इला' नावाची कन्या झाली, परंतु मनूच्या इच्छेस्तव वसिष्ठाने तिला पुरुष केले. शंकराचा शाप असलेल्या शरवनात एकदा मृगयेसाठी इल राजा गेला असता परिवारासह त्याला स्त्रीरूप प्राप्त झाले. वसिष्ठाच्या कृपेने एक महिना स्त्रीत्व व एक महिना पुरुषत्व आळीपाळीने मिळू लागले, असे मत्स्य व पद्म पुराणांत दिले आहे.

कायम पुरुषत्व मिळावे म्हणून मरुत्ताने शंकराला प्रिय असणारा अश्वमेध यज्ञ केला आणि प्रसन्न होऊन शंकराने त्यास कायमचे पुरुषत्व पुन्हा प्राप्त करून दिले, असे रामायणात दिले आहे (उत्तर. ९०). स्कंद पुराणानुसार अरुणाचलेश्वराच्या उपासनेने ते लाभले, तर ब्रह्म पुराणात गौतमीत स्नान केल्याने पुरुषत्व लाभले, असे उल्लेख आहेत.

स्त्री असताना बुधापासून पुरूरवा नावाचा पुत्र झाला. ह्याखेरीज याला आणखी तीन अपत्ये होती.

## १६ उमा

उमा ही हिमालय व मैना यांची दुसरी कन्या व रुद्राची पत्नी. पार्वतीचे एक सौम्य रूप ही एक शक्तिदेवता आहे. हिचा मूळचा गौरवर्ण निशादेवीच्या स्पर्शामुळे काळा पडला. तेव्हा ती पतीला आवडेनाशी झाली त्या दोघांत वितुष्ट आले. पुनश्च गौरवर्ण प्राप्त करून घेण्यासाठी तिने तप केले व तिला गौरवर्ण प्राप्त झाला. हिला रुद्रापासून अपत्य झाले नाही. आकाशगंगेच्या ठिकाणी शिवाकडून होणारा पुत्र गंगा व उमा या दोघींना मान्य होईल, असे ब्रह्मदेवाने सांगितले.

## १७ उर्वशी

उर्वशीचा उल्लेख ऋग्वेदात अनेक ठिकाणी आला आहे. ही एक अत्यंत लावण्यवती अप्सरा होती. बदरिकाश्रमात नरनारायण तप करीत असता इंद्राला आपल्या पदाची भीती वाटू लागली, म्हणून त्याने त्यांचे मन विचलित करण्याकरिता रंभा, मेनका, तिलोत्तमादी सोळा हजार पन्नास अप्सरा धाडल्या, परंतु त्याला यश तर आले नाहीच, उलट नारायणाच्या मांडीतून सोळा हजार एकावन अप्सरा उत्पन्न झाल्या व त्यांत उर्वशी ही एक श्रेष्ठ लावण्यसंपन्न अप्सरा होती. उरूपासून निर्माण झाल्याने 'उर्वशी' असे नाव पडले. नरनारायणांनी तिला इंद्राकडे नजराणा म्हणून पाठवून दिले. अशी कथा पद्म पुराणात आढळते.

सूर्याराधनेस जात असता हिने मित्र आदित्यास वरण्याचे आश्वासन दिले. पुढे वरुण भेटल्यावर त्याने तिला वरण्याची मागणी घातली असता, तिने मित्राला पूर्वीच वरल्याचे सांगितले, मात्र आपले प्रेम दिले. वरुणाने हिला उद्देशून आपले तेज (वीर्य) एका कुंभात टाकले. ही गोष्ट मित्राला कळताच तो क्रुद्ध झाला व त्याने 'मृत्युलोकी पुरूरव्याची स्त्री हो' असा उर्वशीला शाप दिला आणि आपले वीर्य एका कुंभात टाकले. ह्या दोन कुंभांतून अगस्त्य व वसिष्ठ उत्पन्न झाले. उर्वशी दृष्टीस पडताच मित्राचे रेतस्खलन झाले. ते शाप-भीतीने त्याने पायाखाली दाबले. तेव्हा वसिष्ठाचा जन्म झाला, असे विष्णुपुराणात सांगितले आहे.

नारदाच्या स्तुतीवरून ही पुरूरव्याकडे आकर्षित झाली. त्यामुळे लक्ष्मीस्वयंवर प्रबंध करताना हिचे हावभाव चुकले. म्हणून भरतमुनीच्या शापामुळे ती पंचवीस वर्षे लता झाली. शाप-मुक्तीनंतर पुरूरव्याकडे जात असता केशी दैत्याने तिला पळवून नेण्याचा असफल प्रयत्न केला. पुरूरव्यानेच तिची त्याच्यापासून सुटका केली. उर्वशीने पुरूरव्याजवळ तीन अटी घालून राहण्यास मान्यता दिली. एखाद्या अटीचे पालन न झाल्यास सोडून जाईन, असे सांगितले. त्या अटी अशा– (१) ती दोन मेंढ्यांना पुत्रवत् पाळीत असे, त्यांचे संरक्षण करणे, (२) ती सदा घृताहारच करून राहील व (३) मैथुनाखेरीज कधीही नग्न स्थितीत पुरूरव्याने तिला दिसता कामा नये. तिन्ही अटींचे यथायोग्य पालन करीत पुरूरव्याने तिचा ६१००० वर्षे उपभोग घेतला. परंतु एकदा पुरूरव्याचे हातून तिसऱ्या अटीचा भंग झाल्याने ती देवलोकी परत गेली.

महाभारतातही उर्वशीचा उल्लेख अनेकदा आला आहे. ही सदा कुबेराच्या सेवेत असे. अर्जुनाचे जन्माचे वेळी गायन करणाऱ्या अकरा अप्सरांत ही एक होती. अर्जुन इंद्रलोकी शिक्षणासाठी गेला असता तिच्याकडे पूज्य बुद्धीने पहात असताही इंद्राला तो तिच्याकडे कामुक नजरेने पहात आहे, असे वाटले. चित्रसेन गंधर्वाकरवी त्याने उर्वशीस निरोप धाडून साज-शृंगार करून अर्जुनाकडे जाण्यास सांगितले. ती

अर्जुनाकडे गेली असता अर्जुनाने तिच्याकडे पाहण्याचा त्याचा दृष्टिकोन स्पष्ट केला. परंतु मनोभंग झाल्याने 'तू वर्षभर षंढ होशील' असा तिने अर्जुनाला शाप दिला. उर्वशीतीर्थ नावाचे एक पवित्र तीर्थ प्रसिद्ध आहे.

## १८ ऋचीक

भार्गव कुलोत्पन्न एक प्रख्यात ऋषी. ब्रह्मांड पुराणाच्या मते हा और्वाचा पुत्र मांडी फोडून बाहेर आला. लहानपणापासूनच वेदानुष्ठान व तप यांकडे याचे लक्ष असे. एकदा तीर्थ-यात्रा करीत असता विश्वामित्री नदीच्या तीरी स्नान करीत असलेली गाधीकन्या सत्यवती दृष्टीस पडली. तिच्या सौंदर्याने मोहित होऊन त्याने गाधीकडे तिच्यासाठी मागणी घातली. गाधीने एक सहस्र श्यामकर्ण अश्व शुल्क म्हणून देण्याची अट घातली असता वरुणाची स्तुती करून त्याने अश्व मिळविले व सत्यवतीची प्राप्ती करून घेतली. सत्यवतीने पुत्रप्राप्तीच्या इच्छेने स्वतासाठी व आपल्या मातेसाठी वर मागून घेतला असता, ह्याने दोन अभिमंत्रित चरू तिच्या स्वाधीन केले व कोणता चरू कोणी भक्षण करावयाचा व कोणकोणते नियम पाळावयाचे याबाबत सूचना दिल्या. परंतु प्रत्यक्षात चरूंची अदलाबदल होऊन ते भक्षण केले गेले. त्यामुळे सत्यवतीला जमदग्नी प्रभृती शंभर पुत्र झाले, तर गाधीला विश्वामित्र झाला. पृथ्वी निःक्षत्रिय करणारा परशुराम हा ह्याचा नातू. एकदा अंबरीष राजाने ह्याला भृगुतुंग पर्वतावर पाहिले असता एक लक्ष गाईंच्या मोबदल्यात एक मुलगा नरबली देण्यासाठी मागणी केली होती. पण याने तिला नकार दिला.

## १९ ऐरावत

इरावानाचा पुत्र. पुराण वाङ्मयात याला 'इंद्राचा हत्ती' असे म्हटले आहे. हा समुद्रमंथनातून उत्पन्न झाला व इंद्राचे वाहन बनला. हा शुभ्रवर्णी असून ह्याला चार सुळे आहेत. इंद्राने ह्याला पूर्व दिशेचे अधिपती नेमले होते. इंद्र-कृष्ण यांच्या युद्धात गरुडाने याचा पराभव केला.

## २० कंडू

हा सत्यवादी तपोधन महर्षी अत्यंत रागीट व नियमांचे पालन करण्यात कुणालाही हार न जाणारा होता. हा ब्रह्मर्षी होता. याच्या तपाचा नाश करण्यासाठी इंद्राने प्रम्लोचा नावाची एक अप्सरा पाठवली होती. कौसल्येचे सांत्वन करताना पित्याच्या वचनाचे पालन करणे हे पुत्र-कर्तव्य कसे आहे, हे पटवून देण्यासाठी कंडूचे उदाहरण दिले आहे. वडिलांच्या आज्ञेचे पालन करण्यासाठी कंडूने

गोवधही केला होता. ‘ऋषिणा च पितुर्वाक्यं कुर्वता वनचारिणा । गौर्हता जानता धर्मं कण्डुना च विपश्चिता ॥’ (अयोध्या. २१।३१). याचा दहा वर्षांचा मुलगा ज्या वनात मरण पावला, ते वन आपल्या शापाने कंडूने वृक्षोदकरहित केले.

## २१ कबंध

दंडकारण्यातील एक राक्षस. इंद्राच्या वज्रप्रहारामुळे याच्या मांड्या व मस्तक याच्या उदरात घुसल्याने हा शिरविरहित झाला. म्हणून त्यास कबंध असे नाव पडले. याच्या उदरनिर्वाहासाठी योजन लांबीचे हात प्राप्त झाले होते. आसमंतात संचार करणाऱ्या प्राण्यांना पकडून तो खात असे. रामाच्या हातून मृत्यू झाल्यानंतर पुन्हा पूर्वीचे रूप प्राप्त होईल, असे इंद्राने त्याला सांगितले होते. तेव्हा भक्ष्य शोधता शोधता एक दिवस राम हाती येईल, असा त्याला विश्वास होता. राम-लक्ष्मण हाती आल्यावर तो सुखावला. रामाने त्याचा डावा व लक्ष्मणाने उजवा हात तोडला, तेव्हा त्याच्या शरीरातून देदीप्यमान पुरुष निघून आकाशात गेला. रामाच्या पृच्छेवरून त्याने आपण विश्वावसू गंधर्व असल्याचे सांगितले. ब्राह्मणाच्या शापाने त्याला राक्षस योनी प्राप्त झाली होती. कबंधाला दिव्य ज्ञान नसल्याने सीतेला कोणी नेले, हे तो सांगू शकला नाही. परंतु मरणोत्तर त्याला साहाय्य करण्याचे त्याने अभिवचन दिले. त्याला सुग्रीवाकडे जाण्यास सांगून त्याचे साहाय्य घ्यावे, असे त्याने सुचविले. सुग्रीवाकडे जाण्याचा मार्ग रामाला सांगून तो पुण्यलोकाप्रत गेला.

## २२ कश्यप

कर्दमाची कन्या व मरीची-पत्नी कला हिला कश्यप व पूर्णिमा असे दोन पुत्र झाले. कश्यप हा ज्येष्ठ पुत्र. तार्क्ष्य व अरिष्टनेमी अशी त्याची नामांतरे आढळतात. हा सप्तर्षींपैकी एक असून प्रजापतीही होता. वायु-पुराणात याला सहा सावत्र भाऊ होते, असे म्हटले आहे. हा ब्रह्माचा मानसपुत्र. परशुरामाने एकवीस वेळा पृथ्वी निःक्षत्रिय केल्यावर सरस्वतीच्या तीरावरील रामतीर्थी जो यज्ञ केला त्याचा अध्वर्यू कश्यप होता. दक्षिणा म्हणून कश्यपास पृथ्वीचे दान मिळाले. अवशिष्ट क्षत्रियांचा नाश होऊ नये, म्हणून कश्यपाने परशुरामाला आपल्या हद्दीच्या बाहेर राहण्यास सांगितले. त्याप्रमाणे परशुराम समुद्राने उत्पन्न केलेल्या शूर्पारक (कोकण) देशात जाऊन राहिला. पृथ्वी ब्राह्मणांचे स्वाधीन करून कश्यपाने वनाचा आश्रय घेतला. पुत्र-प्राप्तीसाठी यज्ञ करीत असता देव, ऋषी, गंधर्वादींनी त्याला साहाय्य केले. इंद्राने वालखिल्यांचा उपमर्द केल्याने ते संतापले. त्यांच्या संतापापासून आपले संरक्षण करून घेण्यासाठी इंद्र कश्यपाला शरण गेला. कश्यपाने मोठ्या युक्तीने वालखिल्यांना खूष केले. त्यांच्या कृपेने यास गरुड व अरुण असे

दोन पुत्र झाले. नवीन इंद्रासाठी केलेल्या तपाचे फळ वालखिल्यांनी यांस दिल्याने इंद्र निर्भय झाला.

कश्यपाने अर्बुद पर्वतावर मोठी तपश्चर्या केली. शंकराकडून गंगा मिळवली. गरुडाला नारायण-माहात्म्य सांगितले. कपिला, इरा, कद्रू, अदिती, विनता अशा अनेक स्त्रिया कश्यपास होत्या. त्याला मुलेही भरपूर होती. ह्याच्या नावाचे 'काश्यप' गोत्र आहे. ज्यांना गोत्राचे स्मरण नाही किंवा गोत्रच नाही, त्यांचे गोत्र काश्यप समजले जाते. देव आणि दैत्य यांची उत्पत्ती याचेपासून झाली.

## २३ कार्तिकेय (स्कंद)

शंकराचे तेज पृथ्वीने धारण केले. त्यात अग्नीने प्रवेश केल्यानंतर त्या श्वेत-पर्वतरूप तेजातून कार्तिकेय जन्माला आला. कृत्तिकांनी त्यास दुग्धपान देऊन वाढविले, म्हणून कार्तिकेय हे नाव प्राप्त झाले. कृत्तिका सहा होत्या व त्यांनी त्याला पुत्र मानले म्हणून षण्मुख, षण्मातुर, षडानन अशीही नावे त्याला मिळाली. दानवांना याने स्कंदिले (ठार केले) किंवा स्कन्न वीर्यापासून याचा जन्म झाल्याने हा स्कंद म्हणूनही ओळखला जातो. आपल्या वीर्याने याने दानवांना जिंकल्यामुळे देवांनी त्याला आपला सेनापती केले. सप्तर्षी यज्ञ करीत असता अरुंधतीखेरीज अन्य सहा ऋषीपत्नींविषयी अग्नी कामासक्त झाला. अग्नीची अप्रिय पत्नी स्वाहा हिला प्रिय होण्यास ही संधी उत्कृष्ट वाटली, म्हणून तिने सहा ऋषी-पत्नींच्या रूपाने संभोग करून वीर्य एका कुंडात साठवून ठेवले व त्यापासून स्कंदाची उत्पत्ती झाली, अशी एक कथा महाभारतातील वनपर्वात आहे. त्याचा जन्म अमावस्येला झाला. विश्वामित्राने ह्याचे उपनयन केले. विष्णूने ह्याला गरुड, मयूर व कुक्कुट ही वाहने, वायूने पताका, सरस्वतीने वीणा, ब्रह्मदेवाने बोकड व शंभूने मेंढा इत्यादी दिले. स्त्रिया ह्याच्या दर्शनास जात नाहीत, परंतु ह्याला पुराणात आधार नाही. शिवलीलामृतात ह्याने आपल्या दर्शनास येणाऱ्या स्त्रियांना सात जन्म वैधव्य येईल, अशा शाप दिल्याचा उल्लेख आहे. लहान मुलांच्या आरोग्यासाठी ह्याची व सप्तमातांची पूजा करण्याची चाल आहे. तारकासुराच्या वधासाठी ह्याचा जन्म होईल, असा ब्रह्मदेवाने वर दिला होता. जन्मापासून सात दिवसाच्या आत त्याने तारकासुराला ठार केले, असे पद्म व मत्स्य पुराणांत दिले आहे.

## २४ काल

दीर्घकाल राज्य करणाऱ्या रामाला तपस्वी वेषाने भेटावयास येऊन ह्याने 'फक्त तुझ्याशीच बोलावयाचे आहे', असे सांगितले. रामाने त्याचे स्वागत करून

त्याची एकांतात भेट घेतली. तो रामाला म्हणाला, 'मी ब्रह्मदेवाचा दूत आहे. विष्णुरूपातील तुझा पुत्र काल आहे. तुझी पृथ्वीवरील कालमर्यादा संपली असल्याचे सांगण्याकरिता मी आलो आहे.'

## २५ कालकेय

वैश्वानर दानवाची कन्या आणि कश्यप प्रजापतीची भार्या कालका हिला कालकेय (कालखंड) नामक जे असंख्य पुत्र झाले, ते कालकेय होत.

## २६ कालिंदी

असित राजाच्या दोन भार्यांपैकी एकीचे नाव कालिंदी. त्या दोघीही गर्भवती असताना राजाचे निधन झाले. सवतीने हिला विषयुक्त अन्न दिले, तेव्हा ती हिमालयावर वास्तव्य करणाऱ्या च्यवनभार्गवाकडे गेली. त्याला वंदन करून उत्कृष्ट पुत्रप्राप्ती व्हावी, अशी इच्छा तिने प्रकट केली. 'विषासह असलेल्या उत्कृष्ट पुत्राची तुला प्राप्त होईल', असा त्याने तिला आशीर्वाद दिला. तिच्या पोटी जन्मलेला पुत्र सगर हा होय.

## २७ कुंभकर्ण

पुलस्त्यपुत्र विश्रवा ऋषीस कैकसी भार्येपासून झालेल्या चार मुलांतील दुसरा. भागवत पुराणानुसार याच्या आईचे नाव केशिनी आहे. हा रावणाचा धाकटा भाऊ. याने जन्म झाल्याबरोबर हजारो लोक भक्षण केले. तेव्हा लोकांनी इंद्राकडे तक्रार केली असता इंद्राने क्रुद्ध होऊन त्याच्या अंगावर वज्र फेकले. कुंभकर्ण संतप्त झाला व लोकांना अधिकच त्रास देऊ लागला. ऐरावताचा एक दात उपटून त्याने इंद्रावर फेकून त्यास रक्तबंबाळ केले. ब्रह्मदेवाने त्यास सदोदित निद्रिस्त राहशील, असा शाप दिला. परंतु रावणाच्या विनंतीवरून उःशाप देऊन सहा महिन्यांनी एक दिवस जागृत अवस्थेत राहण्याची मुभा दिली. कुबेराशी स्पर्धा करण्याच्या हेतूने त्याने दहा हजार वर्षे तपश्चर्या केली. ब्रह्मदेव वर देऊ लागला असता देवांनी त्यास विरोध केला, कारण ह्याने नंदनवनात सात अप्सरा, इंद्राचे दहा सेवक आणि अनेक लोक व ऋषी यांचे भक्षण केले होते. देवांचे म्हणणे सिद्धीस जाण्यासाठी त्याने सरस्वतीला कुंभकर्णाच्या मुखाने योग्य ते बोलावयास लावले. ह्याने दीर्घकाल निद्रा मागून घेतली व ब्रह्मदेवाने त्यास मान्यता दिली. कुंभकर्णास निद्रा मागून घेतल्यास्तव नंतर पश्चाताप झाला. रावणाने कुबेराची लंका बळकावल्यावर त्याचेबरोबर हाही लंकेत गेला. विरोचनपुत्र बलीची नात वज्रज्वाला हिच्याशी

ह्याचे लग्न लागले. हा जागा होई तेव्हा रावणाच्या सभेस हजर राही. सीता-हरणाबद्दल त्याने रावणास दोष दिला, परंतु त्याला सर्व प्रकारे साहाय्य करण्याचे वचन दिले. रामाने रावणाचा अनेक योद्धे मारून पराभव केला असता कुंभकर्णाला जागे करण्याचे खूप प्रयत्न केले. शेवटी जागा होताच तो युद्धसज्ज झाला. रावणाला त्याने उपदेशपर गोष्टी सांगितल्या. महोदराने रामवधाची आवई उठवून सीतेला ताब्यात घेण्याचे सुचविले. कुंभकर्णाने त्याचा तिरस्कार केला व तो युद्धास ठाकला. त्याच्या केवळ दर्शनानेच वानर घाबरून पळू लागले. अंगदाने त्यांना धीर देऊन एकत्र केले. कुंभकर्णाने हनुमानाला जखमी केले. ऋषभ, शरभ, नील, गवाक्ष यांना रक्त ओकायला लावले. कुंभकर्णाने फेकलेला शूल अंगदाने युक्तीने चुकवून त्याच्या छातीवर तडाखा देऊन त्यास मूर्च्छित केले. शुद्धीवर आल्यावर कुंभकर्णाने अंगदाला बेशुद्ध केले. सुग्रीवाला घेऊन कुंभकर्ण लंकेस जात असता सुग्रीवाने त्याचे नाक-कान कापले. रामाने त्यांचे पाय बाणाने तोडले, तेव्हा तो जमिनीवर कोसळला. तरीही तो रामाकडे सरकत येण्याचा प्रयत्न करीत होता. तेव्हा रामाने ऐन्द्रबाणाने त्याचे मस्तक तोडून त्याला ठार केले. याला कुंभ व निकुंभ नावाचे दोन बलाढ्य पुत्र होते. बिभीषण आणि शूर्पणखा यांनी त्याच्या पराक्रमाची वर्णने केली आहेत.

## २८ कुबेर (वैश्रवण)

विश्रवस् मुनी आणि देववर्णिनी यांचा पुत्र. ह्याचे रूप राक्षसासारखे व बल असुरांसारखे होते. ह्यास तीन पाय, मोठे शरीर, अवजड डोके, महाहनू, आठ दात भुरके केस, शंकूसारखे कर्ण, तांबूस जाड बाहू होते. हा पिंगट, भयानक, वैवर्त ज्ञान-संपन्न व जन्मापासून ज्ञानी होता. ह्याचे शरीर वाईट असल्याने ह्याला 'कुबेर' म्हणत, असे ब्रह्मांड पुराणात दिले आहे. तर वाल्मीकीने तो अगदी बापासारखा दिसत असल्यामुळे पितामह पुलस्त्याने त्याचे नाव 'वैश्रवण' असे ठेवले आणि तो धनाध्यक्ष होईल, असे भाकीत केले, असे सांगितले आहे. याच्या आईची नावे निरनिराळ्या ग्रंथांत वेगवेगळी दिली आहेत. तपश्चर्या करून याने ब्रह्मदेवाला प्रसन्न केले व त्याचेकडून यक्षांचे आधिपत्य, राजराजत्व, धनेशत्व, अमरत्व, रुद्राची मैत्री आणि पुत्र नलकूबर इत्यादींचा लाभ ह्याने करून घेतला. रावणाने लंका मागितली असता वडिलांच्या सल्ल्यानुसार ह्याने देऊन टाकली व पुष्पक विमान त्याला जिंकून रावणाने हरण केले. पार्वतीकडे डाव्या डोळ्याने कटाक्ष टाकला असता तो जळून खाक झाला आणि उजवा डोळा पिंगट झाला, म्हणून 'एकाक्ष पिंगल' हे नाव त्यास प्राप्त झाले. ह्याची कुबेर-सभा असून याला शंभराहून अधिक बायका होत्या. ह्यांच्या नगरीचे नाव अलकावती. हा गंधमादन पर्वताच्या शिखरा-वर वास्तव्य करीत असे. ह्याच्या वनाचे नाव सौगंधिक. महाभारतात ह्याचा अनेक

ठिकाणी उल्लेख आला आहे. ह्याने गंधमादन नावाचा वानर उत्पन्न केला. रावणाला दूताकरवी सदुपदेश करण्याचा प्रयत्न केला. परंतु त्यास तो मानवला नाही. ह्याने तुंबरूला शाप आणि उःशाप दिला होता. सीतेच्या अग्निदिव्याचे वेळी ह्याने रामाला समजाविले. आपली अवध्य अशी गदा ह्याने हनुमानाला दिली. पहा : तुंबरू पृ. २७३

## २९ कुशनाभ, कुशकन्या

कुशनाभ हा ब्रह्मपुत्र. कुशराजाला वैदर्भी राजकन्येपासून झालेला चौथा मुलगा. घृताची अप्सरेपासून त्याला शंभर कन्या झाल्या. त्या अतिशय सुंदर होत्या. त्यांच्या रूपाने काम-मोहित होऊन वायूने त्यांना मागणी घातली, परंतु त्यांनी त्याची विनंती धुडकावून लावली. त्यामुळे संतप्त झालेल्या वायूने त्यांच्या गात्रांत प्रविष्ट होऊन त्यांचा अंगभंग केला. त्याचे सौंदर्य नष्ट होऊन त्या कुबड्या झाल्या तरीही कुशनाभाने त्यांचा विवाह सोमदा गंधर्वीचा मुलगा ब्रह्मदत्त याच्याशी करून दिला. पतीच्या पहिल्याच हस्तस्पर्शाने त्यांचे कुबड नाहीसे होऊन त्यांना पूर्ववत सौंदर्याचा लाभ झाला. परंतु त्या देशास 'कान्यकुब्ज' असे नाव पडले. कुशनाभाने महोदय नावाची नगरी स्थापिली.

## ३० कुश–लव

रामाने लोकापवादास्तव सीतेचा त्याग केला. लक्ष्मणाने तिला रामाच्या आज्ञेनुसार तमसा नदीच्या तीरावरील एका आश्रमाशेजारी सोडून दिले. वाल्मीकीला शिष्यांकडून हे वृत्त समजताच त्याने तिची आश्रमात व्यवस्था केली. तेथेच ती प्रसूत होऊन तिला जी जुळी मुले झाली, ती म्हणजे कुश आणि लव. ह्यांच्या जन्मदिवशी शत्रुघ्न वाल्मीकीच्या आश्रमातच होता. दर्भ आणि लव्हाळी यांनी ह्यांच्या अंगावर पाणी शिंपडल्याने ह्यांना कुश-लव ही नावे प्राप्त झाली. वाल्मीकीने ह्या बालकांवर संस्कार करून त्यांना वेद, धनुर्वेद, क्षात्रविद्या यांत निष्णात केले. वेदांच्या दृढीकरणार्थ रामायण शिकविले. वाल्मीकी रामायणात ह्यांची व रामाची भेट रामायण-गायनाच्या निमित्ताने झाल्याचे दिले आहे. रामाने केलेल्या अश्वमेधाचे वेळी वाल्मीकी या दोघांना घेऊन अयोध्येस गेला होता. धनाची कोणतीही अपेक्षा मनी न बाळगता तालासुरांत रामायण महाकाव्याचे वीस सर्ग ही मुले रोज गाऊन दाखवीत. ते स्वताला वाल्मीकि-पुत्र म्हणवून घेत. रामाने ते आपलेच पुत्र आहेत, हे ओळखले. लवाला कोसल देशाचे आणि कुशाला उत्तर कोसल देशाचे राज्य दिले. सुमती व कंजानना अशा लवाच्या दोन भार्या होत्या. कुशाच्या भार्येचे नाव चंपका.

रामाच्या अश्वमेध यज्ञातील पृथ्वीपर्यटन करणारा अश्व कुश-लवांनी धरला. त्याच्या प्राप्तीसाठी शत्रुघ्न, लक्ष्मण, भरत, हनुमान आणि स्वता रामही ह्यांच्याशी युद्ध करू लागले असता राम सोडून सर्वांचा ह्यांनी पराभव केला. ते आपलेच पुत्र आहेत, हे कळताच रामाच्या हातातून धनुष्य गळून पडले. सर्वांना जिंकून ते सीतेकडे आले असता तिने सर्वांना सोडून देण्यास सांगितले. कुश-लव अश्वसंरक्षक बनले व रामाचा यज्ञ पार पडला. अशी कथा अन्य ग्रंथांत आढळत असली तरी वाल्मीकी रामायणात ती नाही.

## ३१ कृशाश्व

एक ऋषी व प्रजापती. प्राचेतस दक्षाने आपल्या साठ कन्यांपैकी दोन ह्याला दिल्या होत्या. सर्व अस्त्रे ही कृशाश्वाचे पुत्र होत. ताटकावधानंतर सर्व देवांनी संतुष्ट होऊन कृशाश्व प्रजापतीची मुले–म्हणजेच अस्त्रे–रामाला देऊन टाकण्यास विश्वामित्राला सांगितले व त्याप्रमाणे विश्वामित्राने ती रामाला दिली.

## ३२ केकय

केकय देशाचा राजा. अश्वपती हे उपनाव असावे. ह्याला युधाजित व कैकेयी अशी दोन अपत्ये होती. ह्याची भार्या मोठी साहसी आणि कशाचीही पर्वा न करणारी होती.

## ३३ केशिनी

विदर्भ-राजकन्या आणि सगराची ज्येष्ठ पत्नी. हिला असमंज नावाचा एक पुत्र होता.

## ३४ केसरी

एक वानर प्रमुख. अंजनीचा पती. सुमेरू नावाच्या सुवर्ण पर्वतावर ह्याचे वास्तव्य असे. ऋषींना त्रास देणाऱ्या बलाढ्य अशा शंबसादन असुराचा ह्याने ऋषींच्या आज्ञेने वध केला. त्यामुळे संतुष्ट झालेल्या ऋषींनी 'तुला सुस्वभावी, भगवद्भक्त व बलशाली पुत्र होईल', असा ह्याला आशीर्वाद दिला. हाच त्याचा पुत्र हनुमान. इंद्रजिताने ह्याच्यावर आघात करून ह्यास पाडले. युद्ध-समाप्तीनंतर रामाने अनेक वानरवीरांसह ह्याचा सत्कार केला.

## ३५ कैकसी

सुमाली राक्षसाची कन्या आणि विश्रवाची भार्या. हिला कुणी मागणी घातली की काही तरी कारण सांगून सुमाली नकार देत असे. त्यामुळे पुढे तिला कुणी मागणी घालीनासे झाले. तिचे वाढते वय लक्षात घेऊन सुमालीने तिला आपणहून विश्रवाला वरण्यास सांगितले. वेळेचा विचार न करता पित्राज्ञेने ती भर तिन्हीसांजा विश्रव्यापुढे जाऊन उभी राहिली. त्याचे अग्निहोत्र चालू असल्यामुळे ती वेळ दारुण होती. मुनीने तिचे मनोगत ओळखले. परंतु वेळ क्रूर असल्याने दारुण स्वभावाचे व भयंकर रूप असलेले राक्षस तिच्या पोटी जन्माला येतील, असे हिला सांगितले. हिने अशी मुले होऊ नयेत, अशी करुणा भाकली. तेव्हा शेवटचा मुलगा स्वताच्या कुलाला साजेसा व धर्मात्मा होईल, असे त्याने सांगितले–तो बिभीषण. रावण, कुंभकर्ण, शूर्पणखा ही पहिली तीन अपत्ये. पित्याला भेटण्यासाठी पुष्पक विमानात आलेल्या वैश्रवणाचे तेज पाहून 'त्याच्यासारखा हो' असा हिने दशग्रीवाला उपदेश केला. केशिनी हे हिचेच नाव असावें.

## ३६ कैकेयी

केकय देशाच्या अश्वपती राजाची कन्या व दशरथ राजाची एक भार्या. दशरथ आणि कैकेयी यांच्या वयात बरेच अंतर होते. हिच्या पित्याने हिच्याच मुलाला राज्य मिळावे, अशी विवाहपूर्व अट दशरथ राजाला घातली होती व ती दशरथाने मान्य केली होती. परंतु कैकेयीला याबाबत काही माहिती नसावी. देव दानवांच्या युद्धात दशरथ राजा देवांच्या बाजूने लढत असता त्याच्या रथाचा आस मोडला तेव्हा आसाच्या जागी आपला हात घालून हिने दशरथाला वाचविण्याची यशस्वी पराकाष्ठा केली. यामुळे संतुष्ट झालेल्या दशरथाने हिला त्या वेळी दोन वर देऊ केले. परंतु त्यांचा स्वीकार न करता योग्य वाटेल त्या वेळी ते मागून घेण्याची हिने इच्छा प्रकट केली व दशरथाने त्यास मान्यता दिली. रामाला यौवराज्याभिषेक होण्याची वार्ता समजताच हिच्या दासीने– मंथरेने हिचा मत्सर जागृत केला आणि भरताला यौवराज्याभिषेक आणि रामाला चौदा वर्षे वनवास असे दोन वर दशरथाकडून मागून घ्यावयास लावले. राम वनवासात गेल्यानंतर हिची व भरताची प्रथम भेट होताच कैकेयीने मोठ्या आनंदाने त्याला राज्याभिषेक होणार असल्याची वार्ता सांगितली. इतकेच नव्हे तर राजाची उत्तरक्रिया कर आणि स्वताला राज्याभिषेक करून घे, अशी उतावीळपणे आज्ञा केली. भरत अत्यंत दुःखी झाला आणि कठोर शब्दांत त्याने आपल्या मातेची निर्भर्त्सना केली. कैकेयी आत्मकामा, सदाचंडी, क्रोधी व स्वताला अत्यंत शहाणी समजणारी आहे, असे तिचे वर्णन भरताने केले आहे. वनवासात भरद्वाजाच्या आश्रमात असताना शोकमग्न राम लक्ष्मणाला

अयोध्येला परत जाऊन आपल्या मातांचे रक्षण करण्यास सांगतो, त्या वेळी त्याने आपली भीती 'ऐश्वर्य मदाने मोहित झालेली कैकेयी, कौसल्या-सुमित्रा यांना पीडा देईल, ती क्षुद्रपणे वागणारी असल्याने द्वेषाने ती त्यांच्यावर अन्यायही करील, एखादे वेळी ती त्यांना विषही घालील', अशा शब्दांत व्यक्त केली आहे. कौसल्येलाही तिच्याविषयी अशीच भीती वाटत होती. 'भस्मात दडलेल्या अग्नीसारख्या ह्या स्त्रीच्या कपटाने मी फसलो गेलो आहे', अशी आपल्या मनाची व्यथा दशरथाने रामापाशी बोलून दाखवली आहे. 'माझ्या अंगाला स्पर्श करू नकोस, विधवा होऊन राज्य कर', असे दशरथाने कैकेयीला स्पष्टपणे सांगितले होते. पति-घातिनी, कुल-घातिनी, अशा विशेषणांनी सुमंत्राने तिला संबोधले आहे. शत्रुघ्नाने अत्यंत कठोर शब्दांत तिची निर्भर्त्सना केली आहे. लोकनिंदेस पात्र झालेल्या कैकेयीने भरद्वाज मुनीचे पाय धरले असता भरत हिचा परिचय 'जिच्यामुळे राम-लक्ष्मणांच्या आयुष्याचा नाश झाला, राजा पुत्रविहीन होऊन स्वर्गाला गेला, अशी क्रोधी, अविचारी, गर्विष्ठ, ऐश्वर्याचा लोभ धरणारी, आर्यरूपात अनार्या अशी ही माझी माता' अशा शब्दांत करून देतो.

## ३७ कौसल्या

कोसल देशातील भानुमान राजाची कन्या व दशरथ राजाची पट्टराणी. हिला माहेरून हजार गावे स्त्रीधन म्हणून मिळाली होती. पायसाचा अर्धा भाग दशरथाने हिला दिला. आपला पुत्र रामचंद्र यास यौवराज्याभिषेक होणार असल्याची वार्ता ऐकून ही जितकी आनंदित झाली, तितकीच तो वनवासाला जाणार हे समजताच कष्टी होऊन कोसळली. हिला पतिसुख फारसे मिळाले नाही. आपण पुत्रसुखालाही वंचित होणार, ही कल्पनाच तिला सहन होईना. रामाने वनवासाला जाऊ नये आणि गेलाच तर स्वताला बरोबर घेऊन जावे, म्हणून हिने परोपरीने सांगितले, प्राणत्याग करण्याची धमकीही दिली. परंतु रामाने तिची समजूत घालून तिला अयोध्येतच राहण्यास सांगितले. कैकेयी हिला सतत टोचून बोलत असे; परंतु हिने तिला बहिणीसारखे वागवले. भरताबद्दल हिच्या मनात संशय आला होता. परंतु त्याने आपल्या वागण्याने तो दूर केला. आपण नसताना कौसल्येला त्रास होईल, याची जाणीव रामास होती. पित्याचा निग्रह करून राज्य बळकावण्याचा लक्ष्मणाने रामाला जो सल्ला दिला, त्याला पुत्रप्रेमाने कौसल्येने प्रच्छन्न रीतीने संमती दिली होती. राम वनवासाला गेल्यानंतर ही दशरथाला टोचून बोलू लागली. तेव्हा दशरथाने अत्यंत केविलवाणे होऊन हात जोडले. कौसल्येलाही आपली चूक उमगली व अतीव पुत्र-शोकाने आपल्या हातून असे घडले, अशी हिने कबुली दिली. हिचा स्वभाव मृदू होता, परंतु ही अत्यंत उदासीन होती.

## ३८ गालव

विश्वामित्राचा एक शिष्य. गुरूची अत्यंत उत्कृष्ट सेवा करून त्याच्या कृपेस पात्र झाला. त्याच्या आग्रहास्तव विश्वामित्राने त्याला आठ शे श्यामकर्ण अश्व गुरुदक्षिणा म्हणून देण्यास सांगितले. एवढी गुरुदक्षिणा देण्यास तो समर्थ नसल्याने ह्याने विष्णूची आराधना केली. त्याच्या भक्तीने संतुष्ट होऊन विष्णूने गरुडाला त्याची इच्छा पूर्ण करण्यास सांगितले. गरुडाने त्यास ययातीकडे नेले. परंतु त्या वेळी ययातीलाही त्याला आठ शे श्यामकर्ण अश्व देणे शक्य नव्हते. तरीही ययातीने आपली कन्या माधवी–तिच्या पुत्रावर हक्क ठेवून दिली व तिच्या जोरावर गालवाने आपली गुरुदक्षिणा पूर्ण केली.

विश्वामित्राच्या एका मुलाचे ही नाव गालव आहे. दुष्काळ पडला असताना बायको आणि मुले यांच्या उदर-निर्वाहाचा विचार न करता विश्वामित्र तपश्चर्या करण्यास गेला. अत्यंत खडतर परिस्थितीत त्याच्या बायकोने मुलांना जगवण्याचा प्रयत्न केला. परंतु निर्वाहास काहीच न मिळू शकल्याने मुले भुकेने तळमळू लागली. तेव्हा तिने त्यांना विकण्याच्या विचार केला. सत्यव्रताने तिची विचारपूस करून विश्वामित्र परत येईपर्यंत निर्वाहाची थोडीफार व्यवस्था केली.

## ३९ गौतम

बृहस्पतीच्या शापाने जन्मांध असलेल्या आंगिरस-कुलोत्पन्न दीर्घतमा आणि प्रद्वेषी यांचा पुत्र. वैवस्वत मन्वंतरातील सप्तर्षींपैकी एक. ब्रह्मदेवाची मानसकन्या अहल्या त्याची भार्या असून तिच्यापासून झालेला पुत्र शतानंद हा जनक राजाचा पुरोहित होता. त्याचा उत्तंक नावाचा एक शिष्य होता व त्यालाच त्याने आपला जावई केले. मिथिलेजवळच्या वनात पारियात्र पर्वताच्या सान्निध्यात याचा आश्रम होता व तेथे त्याने साठ हजार वर्षे तपश्चर्या केली, असे सांगितले जाते. तपश्चर्येने शंकराला संतुष्ट केले असता त्याने त्याला गंगा दिली व तीच गौतमी या नावाने प्रख्यात आहे. दुष्काळाचे वेळी भोजन देऊन त्याने ऋषींना वाचविले. हा एक धर्मशास्त्रकार होता. गौतमस्मृती हा त्याचा ग्रंथ प्रसिद्ध आहे. खेरीज आस्तिकसूत्र, पितृमेधसूत्र, दानचंद्रिका, गौतमी शिक्षा, न्यायसूत्र इत्यादी अनेक ग्रंथांचा हा कर्ता आहे.

## ४० ग्रामणी, देववती

ऋषभ पर्वतावरील चंदनवनाचे संरक्षण करणाऱ्या पाच गंधर्वांपैकी एक. त्याची कन्या देववती ही सुकेश राक्षसाची भार्या. हिच्या पोटी माल्यवान, सुमाली व माली जन्मास आले.

## ४१ घृताची

कश्यपाची पत्नी प्राधा. हिच्या पोटी जन्माला आलेल्या अप्सरांपैकी एक. हिला पाहून भरद्वाजाचे रेतस्खलन झाले असता त्यापासून द्रोणाचार्याचा जन्म झाला. हिच्यामुळेच व्यासाला शुक झाला. प्रमतिऋषीला हिच्यापासूनच रुरू झाला. हिला दहा पुत्र झाले. विश्वामित्रही हिच्या ठिकाणी आसक्त झाला होता. त्याला हिच्या सहवासात दहा वर्षे एक दिवसासारखी वाटली, असा उल्लेख किष्किंधाकांडात आहे (३५।७).

विश्वकर्म्याचा हिच्याशी संबंध आला असता त्याने हिला 'पृथ्वीवर शूद्रघरी जन्माला येशील' असा शाप दिला. याप्रमाणे ही गोपाच्या घरी जन्माला आली. पूर्वजन्माचे स्मरण असल्याने हिने विवाह केला नाही. विश्वकर्म्यालाही ब्रह्मदेवाच्या कृपेने ब्राह्मणाच्या घरी जन्म प्राप्त झाला. त्या दोघांची प्रयागला गंगेवर भेट झाली. पूर्वस्मरण असल्याने दोघांच्यापासून माळी, कासार, शिंपी, शिंपल्यांचे काम करणारे, कुंभार, सोनार, सुतार, पाथरवट वगैरे लोक निर्माण झाले, असे ब्रह्मवैवर्त पुराणात दिले आहे.

## ४२ चूली

हा ब्रह्मर्षी होता. सोमदा गंधर्वीने याची तपश्चर्येच्या वेळी उत्कृष्ट सेवा केली. म्हणून प्रसन्न होऊन त्याने तिला एक मानसपुत्र दिला. त्याचे नाव ब्रह्मदत्त.

## ४३ च्यवन भार्गव

भृगू ऋषीची भार्या पुलोमा. तिच्या उदरी भृगुवीर्यापासून गर्भसंभव झाला. ऋषी जलाशयावर स्नानास गेला असता ह्याच्या आश्रमात पुलोम नावाचा एक राक्षस आला. पुलोमाचे लावण्य पाहून तो मोहित झाला व त्याने तिला पळवून नेले. राक्षसाच्या भीतीने ती वाटेतच प्रसूत झाली. म्हणून त्या बालकाला 'च्यवन' असे नाव प्राप्त झाले. ह्या च्यवनाच्या तेजाने तो राक्षस जळून गेला आणि पुलोमा त्याला घेऊन आश्रमात परत आली. च्यवन वेदवेदांगांत अतिशय निष्णात होता. ह्याने उग्र तपश्चर्या केली. अंगावर वारूळ वाढले, तरी तपश्चर्येत मग्न असल्याने ह्याला त्याचा पत्ताच नव्हता. त्याच रानात शर्याती-वैवस्वत मनूचा पुत्र हा आपल्या परिवारासह क्रीडा करण्यासाठी आला असता त्याची सुकन्या नावाची रूपवती मुलगी आपल्या सख्यांसह वारुळापाशी आली. आत काही तरी चकाकत असल्याचे तिला दिसले. तेव्हा कुतूहलाने तो चकाकणारा पदार्थ काय आहे हे जाणून घेण्याच्या हेतूने तिने आत काटा टोचला. त्यामुळे ऋषीचे डोळे फुटले. तेव्हा

संतापून ऋषीने सैन्यासह राजाचा मलमूत्रावरोध केला. राजा त्याला शरण गेला. च्यवनाने त्याच्या मुलीची भार्या म्हणून मागणी केली असता तो वृद्ध असूनही सुकन्येचा त्याच्याशी विवाह लावून दिला. एकदा ती अश्विनीकुमारांच्या नजरेस पडली असता त्यांनी तिला बरोबर येण्यास सांगितले. तिने त्यांना आपल्या पातिव्र-त्याने दिपवले व पतीला तारुण्य प्राप्त करून दिले. उपकाराची फेड म्हणून च्यवनाने श्वशुरगृही जाऊन यज्ञ केला व अश्विनीकुमारांना हा हविर्भाग देऊ लागला. परंतु इंद्राला ही गोष्ट आवडली नाही. ह्याला ठार करण्यासाठी वज्र उगारताच मद नावाचा एक राक्षस च्यवनाने उत्पन्न केला. त्याला पाहून इंद्र घाबरला आणि अश्विनीकुमारांना हविर्भाग देण्यास त्याने प्रतिकार केला नाही. प्रयागक्षेत्री रात्रंदिवस पाण्यात राहून च्यवनाने उदवास नावाचे व्रत केले. एकदा कोळयांनी लावलेल्या जाळयात माशांबरोबर ऋषीही आलेला पाहून कोळी घाबरले. राजा नहुषाकडे जाऊन त्यांनी घडलेली हकिगत सांगितली. नहुष राजाने च्यवनाची षोडषोपचारे पूजा केली आणि इच्छेला येईल ते मागण्यास सांगितले. तेव्हा स्वताच्या योग्य किमतीइतकी रक्कम कोळयांना देण्यास च्यवनाने सांगितले. नहुषाने आपले संपूर्ण राज्य देऊ केले तरी योग्य किमत होईना. तेव्हा एका ऋषीने गोधन देण्यास सांगितले. त्यामुळे त्याची योग्य किमत झाली. च्यवनाला भविष्य-काळात आपल्या कुळाला भिन्न-जातित्वाचा दोष लागेल व त्याला कारण कुशिक होईल हे कळले होते. म्हणून कुशिकाचा नाश करण्यासाठी त्याचा खूप छळ करण्यात आला, परंतु त्यात यश तर आले नाहीच, उलट ह्याच्या सेवेने तो संतुष्टच झाला. तुझ्या कुळात ब्राह्मण उत्पन्न होईल, असा त्याला वर देऊन त्यास स्वर्गसुख दाखविले. मनुपुत्री आरुषीपासून ह्याला और्व नावाचा पुत्र झाला. तो उत्कृष्ट वक्ता होता, मंत्रकार होता. त्याची सप्तर्षींत गणना होते.

## ४४ जया, सुप्रभा

जया आणि सुप्रभा या दक्षप्रजापतीच्या कन्या. वर प्राप्तीमुळे जयेने राक्षस संहारासाठी अदृश्य व रूपरहित अशा पन्नास पुत्रांना जन्म दिला. ही कृशाश्व प्रजापतीची मुलगी असून पार्वतीची दासी होती, असे स्कंद पुराणात दिले आहे. वामन आणि पद्म पुराणात ही पार्वतीची मैत्रीण होती, असे उल्लेख आहेत. सुप्रभेने पन्नास शस्त्रास्त्रांना जन्म दिला.

## ४५ जाम्बवान

ह्याचा जन्म ब्रह्मदेवाच्या जांभईपासून झाला, असे वाल्मीकीने म्हटले आहे. तर ब्रह्मांड पुराणाप्रमाणे हा प्रजापती व रक्षा ह्यांचा पुत्र होय. भार्या व्याघ्री व

तिच्यापासून झालेली कन्या जांबवती. हा ऋक्षांचा (अस्वलांचा) राजा होता. सीतेचा शोध घेण्याच्या कामात त्याने रामाला साहाय्य केले. रावणवधानंतर रामाला प्राप्त झालेला विजय नगारे वाजवून त्याने लोकांना कळविला. वृद्धावस्थेतही नव्वद योजने उल्लंघून जाण्याची त्याची हिंमत होती. हनुमानाला त्याच्या सामर्थ्याची जाणीव करून देऊन उड्डाण घेण्यास हा प्रवृत्त करतो. बिभीषणाबद्दल साशंक राहण्याचा सावधगिरीचा सल्ला देण्यास हा विसरत नाही. देवासुर-युद्धात इंद्राला आणि राम-रावण-युद्धात रामाला साहाय्य केले. राज्याभिषेकाच्या वेळी शंभर नद्यांचे व समुद्राचे पाणी आणून दिले. राजसूय यज्ञाचे वेळी शत्रुघ्नाबरोबर अश्व-रक्षण करीत होता. रामाने बहुमोल भूषणे देऊन याचा सत्कार केला.

## ४६ ताटका

सुकेतू यक्षाची कन्या व जंभपुत्र सुंदाची पत्नी. सुकेतूला ब्रह्मदेवाने दिलेल्या वरामुळे हिचा जन्म झाला. हिच्या अंगी हजार हत्तींचे बळ होते व हिला इच्छे-नुरूप वेगवेगळी रूपे घेता येत असत. हिला मारीच आणि सुबाहू असे दोन पुत्र झाले. अगस्त्याने सुंदाला ठार केल्यावर ही मुलांसह त्याच्या अंगावर धावून गेल्याने त्याने मुलांना व हिला शाप दिला. त्यामुळे ही विद्रूप राक्षसी झाली. शाप प्राप्त झाल्यापासून ही मलद व करुष या प्रदेशांत येऊन राहिली. तो प्रदेश उजाड होऊन ताटकावन म्हणून ओळखला जाऊ लागला. विश्वामित्राचा आश्रम या वनाजवळच होता व त्याच्या यज्ञात हिची मुले विघ्ने आणत असत, म्हणून यज्ञ-रक्षणार्थ विश्वामित्र राम-लक्ष्मणांना अयोध्येहून घेऊन आला होता. विश्वामित्राच्या सांगण्यावरून रामाने तिचे अवयव तोडून टाकून हिचा वध केला.

## ४७ तार

बृहस्पतीने उत्पन्न केलेला एक वानर-पुत्र. हा अत्यंत बुद्धिमान असून सर्व वानरांचा प्रमुख होता. सुग्रीवाची भार्या रुमा ही त्याची कन्या. पाच कोटी वानर घेऊन हा सुग्रीव-सैन्यात दाखल झाला. सीतेच्या शोधासाठी जाम्बवानाबरोबर दक्षिणेकडे गेला. इतरांच्या बरोबर ऋक्ष-बिळात त्याने प्रवेश केला. वालीच्या सामर्थ्याबाबत त्याने रावणाला रोखठोक उत्तर दिले होते.

## ४८ तुंबरू

कश्यप व प्राधा यांच्या मुलांपैकी एक. हा चैत्र महिन्यातील धाता नामक सूर्याबरोबर असतो. ह्याची रंभा नामक भार्या होती. नारदासह ब्रह्मसभेत गायन

करून भगवंताचे हा गुणगान करीत असे. रंभेवर आसक्त असल्याने कुबेराने त्यास शाप देऊन विराध राक्षस बनविले. यावरून रंभा त्याची पत्नी नसावी, असे दिसते. भरतसत्कारार्थ भरद्वाजाने त्याला पाचारण केले होते.

## ४९ तृणबिंदू

एक राजर्षी. भागवत व वायुपुराणाच्या मते हा बंधू राजाचा पुत्र असून त्यास विशाल, शून्यबंधू, धूम्रकेतू व इडविडा अशी चार अपत्ये होती. रामायण आणि विष्णुपुराणानुसार हा बुध राजाचा पुत्र व ह्याची पत्नी अलंबुषा. ह्यास विशाल व इलविला अशी दोनच अपत्ये होती. इलविलाचा विवाह पुलस्त्याशी झाला. पुलस्त्य मुनीच्या शापाची कल्पना नसल्याने त्याची कन्या तो तपश्चर्या करीत होता तेथे गेली असता तिला त्याच्या शापाप्रमाणे गर्भधारणा झाली. तिने सारी हकिगत तृणबिंदूला कथन केली असता ध्यानस्थ होऊन त्याने सारा प्रकार जाणला आणि पुलस्त्याकडे जाऊन त्याला आपल्या कन्येचा स्वीकार करण्याची विनंती केली. त्याच्या कन्येचे गो असेही नाव आढळते.

## ५० त्रिशंकू

ह्याचे मूळ नाव सत्यव्रत, परंतु शापामुळे त्रिशंकू नाव पडले. वडिलांचे नाव निबंधन, परंतु काही ग्रंथांत बापाचे नाव त्रय्यारुण किंवा अरुण आढळते. त्रिशंकू पौराणिक नसावा. तो स्वताला ब्रह्मज्ञ, सर्वज्ञ म्हणवीत असे. दुर्वर्तनी असल्याने त्याच्याबद्दल कुणाचे फारसे चांगले मत नव्हते. ह्याने एका ब्राह्मण स्त्रीचा अपहार केल्याने ह्याच्या बापाने ह्याला आपल्या देशातून हद्दपार केले होते. तेव्हा तो विश्वामित्राच्या आश्रमाजवळ राहात असे. एकदा उपजीविकेस मांसाहार न मिळाल्याने ह्याने वसिष्ठ ऋषींची गाय–कामधेनू–मारली. गोवध, स्त्री-अपहरण आणि पित्याचा क्रोध यामुळे तुझ्या डोक्यावर तीन शंकू उठतील व तू पिशाच होशील, असा शाप वसिष्ठाने ह्याला दिला. पुढे देवीच्या कृपेने ह्याचे पिशाचत्व नष्ट झाले आणि पित्यानेही ह्याला गादीवर बसविले. विश्वामित्राने ह्याच्याकडून यज्ञ करवून सदेह स्वर्गाला जाण्याची ह्याची इच्छा पूर्ण केली. विश्वामित्र ह्याच्या यज्ञाचा अध्वर्यू होता. देवतांना आवाहन करूनही त्या आल्या नाहीत. तेव्हा विश्वामित्राने आपले तप:सामर्थ्य खर्ची घालून त्याला स्वर्गाप्रत पोहोचविले. परंतु इंद्राने त्याला पुन्हा खाली ढकलले. 'त्राहि, त्राहि' करीत खाली डोके, वर पाय अशा अवस्थेत हा पडत असता विश्वामित्र ऋषी संतापला व 'थांब, थांब' म्हणून ओरडला. आपली प्रतिज्ञा खोटी ठरू नये, म्हणून विश्वामित्राने नक्षत्रे,

देवता यांसह प्रतिसृष्टी निर्माण करण्यास प्रारंभ केला. त्याने त्याचा स्वर्ग इंद्रविरहित किंवा दुसऱ्या इंद्रासह निर्माण करण्याचे योजिले, तेव्हा देवांत खळबळ उडाली. त्रिशंकू गुरुशापाने दग्ध झाला असल्याने सदेह स्वर्ग-गमनास योग्य नसताही देवांनी मान्यता दिली.

स्कंद पुराणात ही कथा वेगळी आहे. हरिवंशात ह्याच्या पत्नीचे नाव सत्यरथा दिले आहे. तिच्यापासून ह्याला सुप्रसिद्ध हरिश्चंद्र नावाचा मुलगा झाला. विश्वामित्राने ह्याच्या धार्मिक वृत्तीचे कौतुक केले आहे वनवासात असताना ह्याचे वर्तन चांगले होते. ह्याने शंभर यज्ञ केले. विश्वामित्राच्या मुलांबाळांचे रक्षण केले.

सदेह स्वर्गाला जाण्याची त्रिशंकूची इच्छा विचित्र असली, तरी अशक्य कोटीतील नव्हती. वसिष्ठ–विश्वामित्रादि ऋषी सदेह स्वर्गाला जाऊन येत असत. महाभारतात अर्जुन इंद्राचा पाहुणचार घेऊन आल्याचे सर्वविश्रुत आहे. विश्वामित्राच्या आग्रहाने नक्षत्रांत त्रिशंकू अधोमुख होऊन झळकत राहील, असे देवांनी आश्वासन दिले.

## ५१ त्रिशिरा

रावण-पुत्र. ह्याने कुंभकर्णाच्या वधामुळे अत्यंत शोकाकुल झालेल्या रावणाचे सांत्वन करून रामाचे पारिपत्य करण्याची प्रतिज्ञा केली. होती तीक्ष्ण शूल घेऊन पांढऱ्या वृषभावर आरूढ होऊन हा रणात उतरला. ह्याने तीन किरीट धारण केले होते. नरांतकाचा वध झाल्यानतर हा आक्रोश करू लागला. त्याने अंगद व हनुमानाबरोबर युद्ध केले व हनुमानाच्या हातून ह्याचा वध झाला.

दुसरा एक जनस्थानवासी त्रिशिरा नावाचा राक्षस होता व तो खराचा सेनापती होता. त्याचा वध रामाने केला.

## ५२ दनू

दक्षाची एक कन्या आणि कश्यपाची भार्या हिने अश्वग्रीवाला जन्म दिला. हिच्यापासूनच दानवांची उत्पत्ती झाली. वृत्र हाही हिचाच पुत्र.

## ५३ दंडक

इक्ष्वाकूच्या शंभर पुत्रांपैकी सर्वात धाकटा. हा शूर व विद्वान होता. पण घोर नावाचा दोष याचे ठायी असल्यामुळे तो मूढ, विद्याहीन व उन्मत्त होता. दूरचे विंध्य व शैवल पर्वतांमधील राज्य इक्ष्वाकूने ह्यास विचारपूर्वक दिले होते. विंध्य

पर्वताच्या दोन शिखरांमध्ये ह्याने मधुमत्त अथवा मधुमंत नावाची नगरी वसवली. उशनस् शुक्र ह्याचा पुरोहित होता. गुरुकन्या अरजा हिच्याशी ह्याने बळजबरीने समागम केला, म्हणून भार्गवाने (शुक्र) ह्याला व ह्याच्या प्रदेशाला–दण्डकारण्याला–शाप दिला. ह्याचे दंडक असेही नाव आढळते.

पहा : शाप – भार्गव < दंड आणि भार्गव < दंडकारण्य, पृ. ८३–८५

## ५४ दशरथ

दशरथ हा इक्ष्वाकु-कुलोत्पन्न अज राजाचा मुलगा. अयोध्येचा राजा होता. पद्म पुराणात ह्याच्या पित्याचे नाव प्रजापाल दिले आहे. हा वेदवेत्ता, सर्वसंग्रही, दीर्घदृष्टीचा, लोकप्रिय, पराक्रमी, ऋषींसारखी ख्याती असलेला, जितेंद्रिय, धनधान्याचा विपुल संग्रह करणारा आणि मनूप्रमाणे सर्व बाजूंनी लोकरक्षण करणारा होता. ह्याच्या राज्यात चारी वर्ण एकमेकांना सांभाळून नांदत होते. गुणी अमात्यांच्या सहकार्याने व हेरांच्या साहाय्याने मनु-निर्मित अयोध्या नगरीचे वैभव ह्याने वृद्धिंगत केले. कौसल्या, सुमित्रा व कैकेयी ही त्याच्या राण्यांची नावे सर्वपरिचित आहेत. परंतु पद्म पुराणात कैकेयीचा उल्लेख नसून सुरूपा व सुवेषा अशी आणखी दोन नावे दिली असून प्रत्येकीला एकेकच पुत्र झाल्याचे दिले आहे. हा अत्यंत विषयलंपट होता आणि म्हणूनच वृद्धापकाळी ह्याने कैकेयीशी तिच्या पित्याची तिच्या पुत्राला राज्य देण्याची अट मान्य करून विवाह केला. ह्या विवाहानंतर ह्याने अश्वमेध यज्ञ केला. बरेच दिवस अपत्य-प्राप्ती न झाल्याने पुत्रकामेष्टी यज्ञ केला. त्यासाठी ऋष्यशृंगाचे साहाय्य आवश्यक होते. त्याला ह्याने आपली कन्या शांता भार्या म्हणून दिली.

रामाला यौवराज्याभिषेक करण्याचे ह्याचे स्वप्न कैकेयीला पूर्वी देऊ केलेल्या वरामुळे भंग पावले. रामावर ह्याचे निरतिशय प्रेम होते. रामाला यौवराज्याभिषेक करताना भरतामुळे अडचण येईल अशी ह्यास शंका होती. म्हणून तो मातुलगृही असतानाच दशरथाला घाई झाली होती. परंतु ह्याचा बेत कैकेयीच्या वर-याचनेने उधळला गेला. श्रावणाच्या शापाची टांगती तलवार ह्यास सतत त्रस्त करीत होती व ती वरामुळे खरी ठरली. वर ऐकण्यापूर्वी ह्याने कैकेयीला ते पाळण्याचे वचन दिले असल्याने तो कितीही कटू असला तरी पूर्ण करणे त्याला भाग होते. तो अगतिक झाला होता. ह्याने कैकेयीची अनेक प्रकारे समजूत घातली. विनवण्या केल्या, धमकी दिली, तिच्या पायावर लोटांगण घातले. परंतु तिने आपला हेका सोडला नाही. रामानेही पित्राज्ञेचें यथातथ्य पालन करण्याचा निर्धार व्यक्त केल्याने ह्याला पुत्र-वियोग अटळ होता. विरहावस्था सहन करण्याची ताकद नसल्याने ह्याला मृत्यू आला. भरत अयोध्येला परत येईपर्यंत ह्याचे शव

तेलाच्या डोणीत ठेवण्यात आले होते. वसिष्ठाच्या सांगण्यावरून भरताने ह्याचे और्ध्वदेहिक केले. कैकेयीला वर दिल्याचा ह्याला पश्चाताप झाला व ह्याने तिच्याशी असलेले सर्व धर्मसंबंध तोडून टाकले.

सीतेचे अग्निदिव्य झाल्यानंतर महेश्वराच्या कृपेने स्वर्गस्थ दशरथाने भूतलावर येऊन रामाला दर्शन दिले व 'तू माझा उद्धार केलास', असे धन्योद्‌गार काढले. रामाच्या विनंतीनुसार कैकयी व भरत यांचेवर पूर्ववत प्रेम ठेवण्यास ह्याने अनुमती दिली आणि सीतेला आशीर्वाद देऊन उपदेश केला. राम सीतेचा त्याग करणार, हे भविष्य पूर्वीच दुर्वासाने दशरथाला सांगितले होते.

## ५५ दिती

दिती ही प्राचेतस दक्ष प्रजापती आणि असिक्नी यांची कन्या व कश्यपाची एक भार्या. हिची मुले दैत्य,–देवांचे (अदितीच्या मुलांचे) शत्रू. ऋग्वेदात दोन स्थळी हिचा अदितीबरोबर आणि एकदा अग्नी, सविता व भग यांच्या बरोबर उल्लेख आला आहे. अथर्ववेदात हिच्या मुलांची नावे दिली आहेत. दिती ही अदितीला विरोधी म्हणून आली असावी.

## ५६ दुंदुभी

मयासुर व अप्सरा हेमा यांचा दुसरा मुलगा. दीर्घ तपश्चर्या करून ह्याने हजारो हत्तींचे बल प्राप्त करून घेतले. ह्याला आपल्या सामर्थ्याचा गर्व होता. वालीने ह्याला ठार करून दूर फेकले असता ह्याचे रक्त मतंग मुनीच्या आश्रमात जाऊन पडले. रामाचे सुग्रीवाशी सख्य झाले असता आपले सामर्थ्य दाखविण्याकरिता रामाने पायाच्या अंगठ्याने दुंदुभीच्या शरीराचा सापळा दहा योजने लांब उडविला. दुंदुभीने सोळा हजार स्त्रिया बंदीत ठेवल्या होत्या. एक लक्ष स्त्रियांशी एकदम विवाह करण्याचा त्याचा विचार होता. मायावी हा दुंदुभीचा मुलगा.

## ५७ दुर्वास

अत्रिऋषीला अनसूयेपासून झालेला पुत्र. शिव-शतरुद्रसंहिता आणि महाभारत-अनुशासन पर्व यांतील ह्याच्या जन्मकथा वेगवेगळ्या आहेत. अत्रीच्या मस्तकातून निघालेल्या तेजस्वी ज्वालेपासून ह्याची उत्पत्ती झाली, असे पहिल्या ग्रंथात दिले आहे, तर शंकराने सोडलेला त्रिपुरांचा नाश करणारा बाण पुन्हा लहान बालकाचे रूप घेऊन शंकराच्या मांडीवर येऊन बसला. ते बालक म्हणजेच दुर्वास, असे महाभारतात वर्णिले आहे. ह्याला शिवाचा अवतार समजले जाते. हा अत्यंत

तामसी होता. हा पृथ्वीवरील सर्वांत उंच मानव होता. हा सतत इतरांना त्रास देत असे. ह्याच्या क्रोधाच्या अनेक कथा पुराणांत आढळतात. इंद्राला दिलेली माला ऐरावताच्या पायाखाली तुडवली गेल्याने संतप्त होऊन दुर्वासाने इंद्रास 'तुझी सर्व संपत्ती नष्ट होईल', असा शाप दिला. इंद्राने उःशापाची याचना करूनही ह्याने तो दिला नाही. अंबरीषाला ह्याने निष्कारण छळले, परंतु ते त्याला एवढे भोवले की विष्णुचक्रापासून आपली सुटका करून घेण्यासाठी ह्याला अंबरीषाचेच पाय धरण्याची वेळ आली. पद्म पुराणानुसार रामाच्या अश्वमेध यज्ञातील अश्व हा दुर्वासाने शाप दिलेला एक दांभिक ब्राह्मण होता.

एकदा ह्याने एक हजार वर्षे उपवास केला व तो सोडण्यासाठी रामाकडे गेला. त्या वेळी काल रामाबरोबर एकांतात बोलत होता, म्हणून रामाच्या आज्ञेनुसार लक्ष्मणाने रामाची तात्काळ भेट नाकारली व काही काल थांबण्यास सांगितले. परंतु संतप्त झालेल्या दुर्वासाने तात्काळ रामाची भेट न झाल्यास सर्वांना शाप देण्याची धमकी दिली. लक्ष्मणाने ह्याची व रामाची भेट घडवून आणली व रामाने ह्यास इच्छित भोजन देऊन तृप्त केले. मुद्गलाचे सत्त्वपरीक्षण करून त्याला 'सदेह स्वर्गाला जाशील' असा ह्याने वर दिला. ह्याने श्रीकृष्णाला वर व रुक्मिणीला शाप दिला असल्याचा उल्लेख स्कंद पुराणात आहे. ह्याने शिवाराधना करून पुष्कळ तप केले, तरीही शंकर प्रसन्न होईना, म्हणून हा त्यालाही शाप देऊ लागला. और्व ऋषिकन्या कंदली ही ह्याची भार्या. संतापाच्या भरात ह्याने तिला शापून भस्मसात केले. ह्याच्या नावावर अनेक ग्रंथ आहेत.

दुर्वासाने कुंतीला देवहूती नावाची विद्या दिली होती व तिच्यामुळेच इंद्र, वरुण, यम, अश्विनीकुमार व सूर्य यांच्यापासून तिला पुत्र झाले. श्री. म. रं. शिरवाडकर यांच्या मते दुर्वास हाच पांडव-पिता होय.

(पहा – महाभारतातील चमत्कार–हस्तिनापूर, पृ. १९–२७)

## ५८ देवयानी

दैत्यगुरू शुक्राचार्यांची कन्या. देवगुरू बृहस्पतीचा मुलगा कच संजीवनी विद्येच्या प्राप्तीसाठी शुक्राचार्यांकडे आला असता ती त्याच्यावर अनुरक्त झाली. तिने विवाहाची इच्छा व्यक्त केली, परंतु ती गुरुकन्या असल्याने ती कचाने अमान्य केली. तेव्हा तुला विद्या फलद्रूप होणार नाही, असा हिने त्याला शाप दिला. तिचे शर्मिष्ठेचे भांडण झाले असता शर्मिष्ठेने हिला एका कूपात ढकलून दिले. ययातीने हिला विहिरीतून वर काढले. तिने आपली ओळख ययातीला करून दिली. ययातीने हिचा पत्नी म्हणून स्वीकार केला. शुक्राचार्यांच्या क्रोधाच्या भीतीने व ज्ञातीच्या कल्याणासाठी शर्मिष्ठा देवयानीची दासी होते व तिच्या बरोबरच ययातीकडे जाते.

ययातीपासून देवयानीला यदू व तुर्वसू असे दोन पुत्र झाले. रामायणात फक्त यदूचाच उल्लेख आहे. शर्मिष्ठेला शयन कामासाठी कधीही बोलावू नको असे शुक्राचार्याने बजावले असताही तिला ययातीपासून मूल झाल्याचे देवयानीकडून समजताच शुक्राचार्य ययातीला वार्धक्याचा शाप देतो.

## ५९ देवांतक

रावण-पुत्र. कुंभकर्णाच्या वधाने हा अत्यंत शोकग्रस्त झाला. त्रिशिराच्या स्फूर्तिदायक भाषणाने नरांतकाप्रमाणे हाही युद्धास सज्ज झाला. नरांतकाचा वध झालेला पाहून हा अत्यंत संतप्त होऊन अंगदावर धावून गेला. हनुमानाने ह्याचा वध केला.

## ६० द्विविद

सुषेण वानराचा पुत्र. सुग्रीवाला अभिषेक करण्यात ह्याचा भाग होता. पुढे त्याचा प्रधान झाला. हा मैंदाचा भाऊ होता. हा सत्तर योजने उडून जाऊ शकत असे. इतरांबरोबर ऋक्षबिळात ह्याने प्रवेश केला होता. ब्रह्मदेवाकडून ह्याला अवध्यत्वाचा वर प्राप्त झाला होता. युद्धात ह्याची बरोबरी करू शकेल असा कोणीही नाही, असे ह्याच्या पराक्रमाचे वर्णन शुकाने रावणापाशी केले होते. अशनिप्रभ व समप्रभ राक्षसांचा ह्याने वध केला. ह्याने कुंभकर्णाकर पर्वत फेकला असता अनेक राक्षस, घोडे, रथ यांचा चक्काचूर झाला. अतिकाय राक्षसावरील ह्याचा हल्ला अयशस्वी झाला. शोणिताक्ष राक्षस ह्याचे हातून वध पावला. कलि-युग असेपर्यंत जिवंत राहण्यास रामाने ह्याला सांगितले होते.

हा किष्किंधेचा राजा झाला. राजसूय यज्ञाचे वेळी ह्याने सहदेवास करभार दिल्याचा महाभारतात उल्लेख आहे. बलरामाशी युद्ध करीत असता ह्याचे हातून त्यास मृत्यू आला.

## ६१ नंदीश्वर

नंदीश्वर हा शालंकायनाचा नातू व शिलाद याचा पुत्र. शिलाद निपुत्रिक असल्याने पुत्रप्राप्तीसाठी त्याने तप केले. शंकराने प्रसन्न होऊन इच्छापूर्ती करणारा वर दिला. एकदा यज्ञासाठी जमीन नांगरत असता शिलादाला एक तीन डोळयांचा; चार हातांचा व जटामुकुटधारी असा शंकररूप मुलगा सापडला. त्याला घरी आणले असता तो इतर मुलांसारखा झाला. नंदीश्वर आठ वर्षांचा झाला असता मित्रावरुणांकडून अल्पायुषी असल्याचे ह्याला कळले. अपमृत्यू टाळण्यासाठी ह्याने उपासना करून शंकराला प्रसन्न केले व अमरत्व मिळवले. इतकेच नव्हे तर शंकराने

ह्याला पुत्रवत् मानून पार्षदगणात स्थान दिले. ह्याचा विवाह मरुत्-कन्या सुयशा हिच्याशी झाला. दक्षयज्ञ-विध्वंसाचे वेळी ह्याने भग ऋत्विजास बद्ध केले आणि दक्षाला शाप दिला. रामाच्या अश्वमेध प्रसंगी ह्याचे मारुतीबरोबर युद्ध झाले, असा उल्लेख पद्म पुराणाच्या पातालखंडात आहे. ह्याने रावणाला शाप दिला होता.

## ६२ नरांतक

रावणपुत्र. हा अग्नीप्रमाणे तेजस्वी व पर्वत-शिखरांनी लढणारा असा राक्षसवीर असल्याचे बिभीषण रामाला सांगतो. कुंभकर्णाच्या वधानंतर संतप्त होऊन रावणाची आज्ञा घेऊन हा रणांगणावर गेला. त्रिशिराच्या भाषणाने ह्यास स्फूर्ती आली. वानरसैन्यात शिरून ह्याने वानरांचा संहार केला. अंगदाशी युद्ध करीत असता त्याच्याकडून हा मारला गेला.

## ६३ नल वानर

विश्वकर्म्याला घृताची अप्सरेपासून झालेला पुत्र. ऋतुध्वज मुनीच्या शापामुळे ह्याला वानररूप प्राप्त झाले होते. रामाच्या सैन्यातील हा एक प्रमुख वानर. 'हवी ती वस्तू निर्माण करता येईल', असा ह्याच्या पित्याने ह्याला वर दिला होता. रामाच्या आज्ञेने ह्याने सेतु बांधला. लंकेच्या प्राकाराला खिंडार पाडण्यात ह्याचा वाटा होता. एका ब्राह्मणाने 'तुझ्या हातून दगड तरतील', असा वर ह्यास दिल्याने हा सेतू बांधू शकला. ह्याने प्रतपन, अकंपन, प्रहस्त यांच्याशी युद्ध करताना पराक्रम गाजवला. अश्वमेध यज्ञाचे वेळी अश्व-रक्षणार्थ हा शत्रुघ्नाबरोबर गेला होता. इंद्रजिताने ह्याला बाणांनी विद्ध केले. राज्याभिषेकाचे वेळी रामाने ह्याचा सत्कार केला. कुश-लवांनी त्याला जिंकले होते.

## ६४ नलकूबर

वैश्रवणाचा मुलगा आणि मणिग्रीवाचा धाकटा भाऊ. एकदा कैलास पर्वताच्या उपवनात गंगेत स्त्रियांसह दारूच्या नशेत हे दोघे बंधू क्रीडा करीत होते. सारेच विवस्त्र होते. नारदाने त्यांना तशा अवस्थेत पाहिले असता शापाच्या भीतीने स्त्रियांनी वस्त्रे परिधान केली. परंतु मद्याच्या बेहोषीमुळे हे दोघेही नग्नच राहिले. नारदाने ह्यांना वठणीवर आणण्यासाठी शंभर वर्षे दिव्य वृक्ष होण्याचा शाप दिला. मात्र त्या अवस्थेतही ह्यांना नारदाचे कृपेने पूर्वस्मरण राहिले. कृष्णाच्या सान्निध्याने ह्यांची शापमुक्ती झाली व ते कृष्णभक्त बनले, अशी कथा महाभारताच्या सभापर्वात आढळते.

वाल्मीकी रामायणात ह्याचे रंभेवर व रंभेचे ह्याच्यावर अतिशय प्रेम होते, असा उल्लेख असून रंभेने रावणाला तो धर्माने ब्राह्मणासारखा, वीर्याने क्षत्रियासारखा, क्रोधाने अग्नीसमान आणि पृथ्वीप्रमाणे क्षमाशील असल्याचे सांगितले आहे. ती संकेतानुसार नलकूबराकडे साज-शृंगार करून जात असता रावणाने तिच्या इच्छेविरुद्ध तिच्यावर बलात्कार करून उपभोग घेतला. ही गोष्ट तिने नलकूबराला सांगताच तो अतिशय संतप्त झाला व त्याने हातात उदक घेऊन रावणाला शाप दिला.

## ६५ नहुष

पुरूरव्याचा नातू, आयूचा पुत्र व ययातीचा पिता. निरनिराळ्या पुराणांत ह्याच्या आईची नावे वेगवेगळी आढळतात. ह्याच्या जन्मापूर्वी ह्याच्या आईने गरोदरावस्थेत, पोटी जन्माला येणारा मुलगा पितृघातक होईल, असे भविष्य ऐकल्याने जन्मतःच ह्याच्यावर संकट कोसळले, परंतु वसिष्ठाला दिव्य दृष्टीने सर्व प्रकार कळल्याने ह्याला संरक्षण मिळाले. वसिष्ठाने ह्याचा व्रतबंध करून ह्याला वेद व धनुर्विद्या शिकवली. ह्याने कोळ्यांच्या जाळ्यात अडकलेल्या च्यवनाची सुटका कोळ्यांना गाई देऊन केली. त्वष्ट्याच्या सन्मानार्थ गवालंभन केले. ब्रह्महत्येचे पातक घडल्याने इंद्राच्या हातून त्याचे इंद्रपद गेले असता देवांनी आणि ऋषींनी आपल्या तपाचे बल ह्याला देऊन इंद्रपदी बसविले आणि 'तू ज्याच्याकडे पाहशील त्याचे तेज हरण करशील', असा वर दिला. काही काळ हा धर्माने राज्य करीत होता, परंतु नंतर ह्यास गर्व झाला. ह्याची बुद्धी चळली आणि हा विषयलंपट बनला. एकदा इंद्राणी त्याच्या दृष्टीस पडली असता तिच्या सौंदर्याने हा कामोत्सुक झाला व ह्याने देवांना तिला आणण्यास सांगितले. तेव्हा इंद्राशी विचार-विनिमय करून तिने नहुषाला, सप्तर्षींनी वाहून आणलेल्या पालखीत बसून आल्यास स्वीकार करीन, असा निरोप धाडला. नहुषाला ही गोष्ट सहज शक्य वाटली. सप्तर्षींना पालखी वाहावयास लावून तो हिच्याकडे निघाला. तेव्हा त्याचा पाय अगस्त्याच्या मस्तकाला लागला असता त्याने दिलेल्या शापामुळे हा पृथ्वीवर सर्प होऊन पडला. अगस्त्याचे तेज नहुषाने मिळालेल्या वरामुळे त्याच्याकडे दृष्टी टाकून मिळवले असले, तरी वस्तुतः त्यांचे तेज नष्ट झाले नव्हते. कारण त्याच्या जटेत भृगू बसला होता व तो नहुषास दिसला नव्हता. म्हणूनच ह्यास शाप मिळाला. युधिष्ठिराने ह्याची शापापासून मुक्तता केली.

ह्याच्या पुत्रांची संख्या निरनिराळ्या ग्रंथांतून भिन्न भिन्न आढळते. यती, ययाती, संयाती व अयाती ही नावे अनेक ग्रंथांत आढळतात.

## ६६ निमिराजा

अयोध्यापती इक्ष्वाकूचा बारावा पुत्र. निमी स्त्रियांशी द्यूत खेळत असता वसिष्ठ एकाएकी तेथे आला. राजाने त्याला यथोचित उत्थापनादी न दिल्याने वसिष्ठाने संतप्त होऊन शाप दिला व निमीने प्रतिशाप दिला, असे पद्म पुराणात दिले आहे. वसिष्ठाच्या शापाने अचेतन झाल्यावर सुगंधी तेलांच्या योगाने ह्याचा देह उत्तम स्थितीत ठेवण्यात आला होता. यज्ञार्थ आलेल्या ऋषींनी यज्ञ चालू ठेवून शेवटी हविर्भाग ग्रहण करण्यास आलेल्या देवांना यजमानास आशीर्वाद देण्याची विनंती केली. 'शरीर व प्राण यांचा वियोग होण्यासारखी दुःखद गोष्ट कोणतीही नाही, म्हणून मी शरीर ग्रहण करू इच्छित नाही. मी सर्व लोकांच्या डोळ्यांत राहू इच्छितो', असे निमीने सांगितल्यामुळे देवांनी ह्याची डोळ्यांत स्थापना केली. त्यामुळे लोकांना डोळ्यांची उघड-झाप करता येते, अशी माहिती काही ग्रंथांत मिळते. डोळ्यांच्या उघड-झापीच्या काळाला निमिष असे नाव याच्या वरूनच पडले, कारण ब्रह्मदेवाने ह्याला डोळ्यांच्या पापण्यांवर राहण्यास सांगितले होते, असे मस्त्य पुराणात दिले आहे.

याला पुत्र नव्हता. याचा देह अरणी केला व त्याचे समंत्रक होम करून मंथन करण्यात आले. त्यातून जो तेजस्वी पुरुष निर्माण झाला तो मिथी. त्याचा जन्म आईशिवाय केवळ बापापासून झाल्याने निमीला 'निमि जनक' आणि (देहरहित) विदेह निमी राजापासून झाल्याने मिथीला 'वैदेह' 'म्हणू लागले, असे वाल्मीकीने उत्तरकाण्डात सांगितले आहे (सर्ग ५७).

अधिक माहितीसाठी पहा :

शाप – वसिष्ठ < निमिराजा आणि निमिराजा < वसिष्ठ, पृ. ७१–७३
वर – देव < निमिराजा, पृ. २२२–२२३.

## ६७ निवातकवच

हा एक राक्षसांचा संच आहे. प्रल्हादाच्या भावाच्या–संह्‌रादाच्या–मुलाचे हे नाव आहे. हे राक्षस रावणाचे मित्र असून इंद्रालाही अजिंक्य होते. ह्यांची संख्या साठ किंवा चौऱ्याहत्तर हजार असावी. ह्यांना ब्रह्मदेवासून वर प्राप्त झाला होता. हे पाताळात मणिमय नगरीत राहत असत.

## ६८ निशाकर

विंध्य पर्वतावरी एका आश्रमात राहणारा एक ऋषी. संपाती आणि जटायू यांनी ह्याची बरीच सेवा केली. सूर्य-किरणांनी दग्ध होऊन आश्रमापाशी पडलेल्या

संपातीला ' तुला पंख फुटतील. डोळे, प्राण इ. नव्याने प्राप्त होतील ', असा ह्याने वर दिला आणि सीता-हरणाबाबत भविष्य कथन करून काळाची वाट पाहण्यास सांगितले. नंतर महाप्रस्थान करून हा ऋषी स्वर्गाला गेला.

## ६९ निषाद

' निषद्यते ग्रामशेषसीमायाम् ' – जो गावशिवेवर राहतो तो निषाद, अशी या शब्दाची व्युत्पत्ती आहे. ' चत्वारो वर्णाः पञ्चमो निषादः ' या वचनावरून पंचजनांनी बनलेल्या भारतीय समाजाचा चातुर्वर्ण्यबाह्य सर्व भाग निषाद या नावाने ओळखला जात असावा. बौद्धायन आणि महाभारत यांच्या मतानुसार ब्राह्मण पुरुष व शूद्र स्त्री यांच्या संबंधातून निषाद जाती निर्माण झाली. निषाद हे क्रूरकर्मे असून ते चोरीवर आपली उपजीविका करीत असत, असे ऐतरेय ब्राह्मणाचे म्हणणे आहे. निषादांना आपल्या समाजव्यवस्थेत निम्नतम स्थान दिलेले असूनही त्यांना काही धार्मिक अधिकार होते. निषाद समाज मृगया आणि मासेमारी यावर उपजीविका करीत असे. प्राचीन काळी निषाद हे जलवाहतुकीचा व्यवसायही करीत असावेत. वनवासासाठी निघालेल्या रामाला गंगा पार करणारा गुहक हा एक निषादच होता.

शापप्राप्त निषादाच्या नावाचा वाल्मीकी रामायणात ' मा निषाद ' श्लोकानंतर (बालकाण्ड २/१५) पुढे कोठेही उल्लेख नाही. मृगया हे निषादांच्या उपजीविकेचे साधन असल्याने त्यांच्या दृष्टीने क्रौंच पक्ष्याचा वेध घेणे हे पापकर्म होऊ शकत नाही. क्रौंच-मिथुन विषयोपभोग घेत असता त्यांच्यावर बाण मारणे मात्र योग्य नव्हे. ते निंद्य कर्म असल्याने त्यामुळे त्या निषादाला शाप मिळाला.

पहा : शाप– वाल्मीकी < निषाद, तळटीप पृ. ३ व ४

## ७० नील

अग्नीने उत्पन्न केलेला एक वानर-प्रमुख. हा बुद्धिमान असून नित्य कार्यमग्न असे. सुग्रीवाच्या विनंतीनुसार हा दहा कोटी वानरसेना घेऊन आला. हा वानर सैन्याचा सेनापती होता व ह्याने सर्व सेना समुद्रापलीकडे व्यवस्थितपणे उतरवली. रामाच्या आज्ञेप्रमाणे प्रहस्ताचा समाचार घेण्यासाठी हा पूर्व द्वारावर अनेक वानरांसह होता. निकुंभाने तीक्ष्ण शरांनी युद्धात ह्यास विद्ध केले असता ह्याने त्याच्या सारथ्याचे मस्तक धडावेगळे केले. इंद्रजिताचा शोध घेत असता त्याच्या बाणांनी हा खाली पडला. प्रहस्ताशी युद्ध करून ह्याने त्याला यमसदनी धाडले, त्यामुळे राम अतिशय आनंदित झाला. रावणाने आग्नेयास्त्राचा प्रयोग करून

ह्याला खाली पाडले, तरी हा मृत झाला नाही. सेनेची उत्कृष्ट रचना करून ह्याने कुंभकर्णावर पर्वत शिखर फेकले. कुंभकर्णानेही त्याच्यावर गुडघ्याने प्रहार केला. राक्षसांनी घेरलेल्या अंगदाच्या साहाय्यार्थ हा गेला. महोदराशी युद्ध करून ह्याने त्याचा वध केला. अतिकायाने मात्र ह्याचा पराभव केला. युद्ध-समाप्तीनंतर रामाने ह्याचा सत्कार केला. रामाच्या अश्वमेध यज्ञाचे वेळी शत्रुघ्नाबरोबर हा अश्व-रक्षणार्थ गेला होता.

## ७१ नृग

पुष्कर तीर्थक्षेत्रात नृगाने कोटचवधी सवत्स गाई ब्राह्मणांना दान दिल्या. एका अहिताग्नी ब्राह्मणाची गाय दान दिलेल्या गाईंच्या कळपाबरोबर चुकून गेली. ब्राह्मणाने तिचा खूप शोध केला असता त्याला ती दुसऱ्या एका ब्राह्मणाजवळ दिसली. त्या दोन ब्राह्मणांत गाईच्या संबंधाने वाद सुरू झाला असता दोघेही न्यायासाठी नृगराजाकडे गेले. राजद्वारी अनेक दिवस बसूनही राजाने ह्यांची दखल न घेतल्याने ह्यांनी नृगराजाला 'सरड होशील' असा शाप आणि 'कलियुगात शापापासून मुक्त होशील,' असा उःशापही दिला. तेव्हा वसू नावाच्या आपल्या पुत्रास राज्याभिषेक करून तो एका बिळात जाऊन शाप भोगत राहिला. ह्याने उःशाप मागितला असता 'कृष्णाच्या हस्ते तुझा उद्धार होईल' असा उःशाप ह्याला मिळाला, असा उल्लेख अन्यत्र आढळतो.

## ७२ पर्वत

एक देवर्षी. 'राजा मांधाता तुझी युद्धाची खुमखुमी जिरवील' असे ह्याने रावणाला सांगितले होते.

## ७३ पुंजिकस्थला

एक श्रेष्ठ अप्सरा. तिचे रूप अप्रतिम होते. एका अनामिक ऋषीच्या शापामुळे हिला वानरीचा जन्म प्राप्त झाला व ही केसरी वानराची पत्नी झाली. वानर-जन्म प्राप्त झाला असतानाही हिला स्वेच्छेने मनुष्यरूप धारण करण्याचे सामर्थ्य उःशापामुळे प्राप्त झाले होते. वायू हिच्या रूपाने मोहित झाला. हिला आलिंगन देऊन केवळ मनानेच त्याने हिच्याशी संग केला असल्याने हिने भिण्याचे कारण नाही, असे हिला त्याने आश्वासन दिले आणि 'तुझ्या उदरी एक बुद्धिमान पुत्र जन्मास येईल' असे सांगितले. तो पुत्र म्हणजे हनुमान.

## ७४ पुरूरवा

बुधास इलेपासून झालेला पुत्र. सोमवंशाचा मूळ पुरुष. मत्स्य पुराणानुसार याची प्रतिष्ठानपुरी राजधानी होती व ह्याने शंभर अश्वमेध यज्ञ केले. मित्रावरुणांच्या शापामुळे पृथ्वीवर आलेली अप्सरा–उर्वशी – पुरूरव्याच्या गुणांवर लुब्ध झाली, कारण ह्याने तिला पळवून नेणाऱ्या केशीपासून तिची सुटका केली. तिच्या सौंदर्याने मोहित होऊन पुरूरव्याने तिला मागणी घातली, तेव्हा तिने तीन अटी घातल्या व त्या अटींचे पालन होईपर्यंत ह्याची पत्नी म्हणून राहण्यास अनुमती दिली होती. परंतु एक अट मोडली गेली असता ती ह्याला सोडून गेली. उर्वशीपासून ह्याला सहा पुत्र झाले. एकदा धर्म, अर्थ, काम मनुष्यरूप धारण करून ह्याची परीक्षा पाहण्यास आले असता ह्याने धर्माला सर्वाधिक मान दिला म्हणून अर्थ व काम ह्यांनी 'लोभामुळे तुझा नाश होईल' असा ह्याला शाप दिला. तुंबरूनेही ह्याला शाप दिल्याचा उल्लेख स्कंद पुराणात आहे. हा क्षत्रिय असूनही मंत्रकार होता. वायू आणि कश्यपाबरोबर चातुर्वर्ण्याबाबत ह्याने विवाद केला होता.

पहा : उर्वशी, पृष्ठ २६०–२६१

## ७५ पुलस्त्य

हा कर्दमापासून अकरावा प्रजापती. ब्रह्मदेवाचा मानसपुत्र, साक्षात ब्रह्मदेवासारखाच. सर्व देवांना व लोकांना प्रिय. विश्रवा हा ह्याचा मानसपुत्र. ह्याला देववर्णिनीच्या पोटी जो मुलगा झाला तो धनाध्यक्ष होईल, असे ह्याने त्याच्या लक्षणांवरून भाकित केले होते, आणि म्हणून त्याचे नाव 'वैश्रवण' असे ठेवले. मांधाता व रावण या दोन श्रेष्ठ वीरांची मैत्री ह्याने गालव मुनीच्या साहाय्याने घडवून आणली.

ब्रह्माण्ड पुराणानुसार हा ब्रह्मदेवाच्या उदानापासून उत्पन्न झाला. स्वायंभुव दक्षाचा जावई आणि शंकराचा साडू. दक्षाने अपमान केल्यामुळे शंकराने ह्याला जाळून मारले. दक्षकन्या प्रीती याची पत्नी, तिच्यापासून ह्याला दानाग्नी नावाचा पुत्र झाला. याखेरीज देवबाहू आणि अत्री हे दोन पुत्र व सद्वती नावाची एक कन्या झाली. महाभारत, वायुपुराण आणि मत्स्य पुराणांच्या मते हा ब्रह्मदेवाचा मानसपुत्र त्याच्या कानापासून झाला. ब्रह्मदेवाने निर्माण केलेल्या प्रजापतींपैकी एक. कर्दमाची कन्या हविर्भुवा ह्याची पत्नी आणि तिच्यापासून ह्याला अगस्त्य व विश्रवा हे दोन पुत्र झाले. विष्णुपुराणात अगस्त्य प्रीतीचा पुत्र असल्याचे नमूद केले आहे. महादेवाच्या शापाने ब्रह्मदेवाचे जे मानसपुत्र मृत झाले, त्यांत हा एक होता.

मृत झालेले मानसपुत्र वैवस्वत मन्वंतरात ब्रह्मदेवाने पुन्हा उत्पन्न केले. त्यांत हा अग्नीच्या पिंगट केसापासून उत्पन्न झाल्याचे सांगितले आहे. तपश्चर्येत न कळत का होईना विघ्न आणणाऱ्या कन्यांना दृष्टीस पडताच गर्भधारणा होईल, असा ह्याने शाप दिला असल्याने तृणबिंदूची कन्या गरोदर झाली. तृणबिंदूच्या विनंतीनुसार ह्याने तिचा पत्नी म्हणून स्वीकार केला व तिच्यापासून ह्याला विश्रवा नावाचा पुत्र झाला, अशी माहिती वाल्मीकी रामायणाच्या उत्तरकांडात दिली आहे. पद्म पुराणानुसार ब्रह्मदेवाच्या पुष्कर तीर्थावरील यज्ञात हा अध्वर्यू होता. याज्ञवल्क्याने ह्याचा स्मृतिकार म्हणून गौरव केला आहे. पौलस्त्य स्मृती इ. सनाच्या चवथ्या व सातव्या शतकाच्या दरम्यान लिहिली गेली असावी.

## ७६ प्रहस्त

सुमाली राक्षस आणि केतुमती यांचा मुलगा. हा रावणाचा मामा आणि त्याचा एक मंत्री. हा अतिशय पराक्रमी होता. त्यामुळे रावणाच्या सेनेचे आधिपत्य ह्याच्याकडे होते. कैलास पर्वतावर ह्याने मणिभद्राचा पराभव केला होता. राम–रावण-युद्धातही ह्याने पराक्रम गाजवला. हनुमानाने ह्याच्या घरास आग लावली तेव्हा ह्याने पृथ्वी निर्वानर करण्याची प्रतिज्ञा केली होती. रामाशी सख्य करण्याची बिभीषणाची सूचना ह्याने फेटाळून लावली. कुबेर लंकापती असताना ती मिळावी, म्हणून रावणाने प्रहस्ताला दूत म्हणून धाडले होते.

नरांतकाचा वध झाल्यावर हा नील वानरावर चाल करून गेला. परंतु त्याने ह्यास ठार केले.

## ७७ बली

प्रल्हादपुत्र विरोचनाला देवी नावाच्या भार्येपासून झालेला पुत्र. हा दैत्यांचा राजा होता. हा अत्यंत बलाढ्य होता. ह्याच्या एका पत्नीचे नाव विंध्यावली. दुसरी अशना. हिच्यापासून बाणप्रभृती शंभर पुत्र झाले. हा विष्णूचा भक्त होता. शुक्राचार्यांच्या सांगण्यावरून हा स्वर्गावर चाल करून गेला. तेव्हा आपली रूपे पालटून देव परागंदा झाले. प्रल्हादाने बळीला 'धर्माने राज्य' करण्याचा उपदेश केला आणि देवांना ह्याने त्रास दिल्याने 'तुझा लवकर नाश होईल' असा शाप दिला बळीने बराच कालपर्यंत राज्य केले. देव-दानवांच्या युद्धात इंद्राने वज्र फेकून ह्यास ठार केले. शुक्राचार्यांच्या स्पर्शाने व मंत्राने हा पुन्हा जिवंत झाला. शुक्राचार्यांने त्याचेकडून विश्वजित यज्ञ करविला, तेव्हा यज्ञनारायणाने प्रसन्न होऊन इंद्राच्यासारखा दिव्य रथ, सुवर्ण, धनुष्य, अक्षय भाते, दिव्य कवच इ. ह्यास दिले.

प्रल्हादाने न सुकणारी माळ, शुक्राचार्याने दिव्य शंख आणि ब्रह्मदेवानेही एक माळ दिली. ह्याने पुन्हा स्वर्ग जिंकला व शंभर अश्वमेध केले.

नर्मदेच्या उत्तर तीरावर भृगुकच्छ प्रदेशात याचा शेवटचा अश्वमेध चालू असता वामनरूप घेऊन विष्णू ह्याच्याकडे आला आणि ह्याच्याजवळ तीन पावले जमीन त्याने मागितली. शुक्राने त्याला नकार देण्यास सांगितले, कारण तो परमेश्वर आहे, हे त्याने ओळखले होते. परंतु अतिथीला विन्मुख न धाडण्याचे ह्याचे व्रत असल्याने ह्याने शुक्राचार्यांचा सल्ला स्वीकारला नाही. तेव्हा संतप्त शुक्राचार्यांने त्यास शाप दिला. वामनाने मोठे स्वरूप धारण करून दोन पावलांनी सारे ब्रह्माण्ड व्यापले व तिसरे पाऊल बलीच्या मस्तकावर ठेवून त्यास पाताळात लोटले. हरिवंश आणि मत्स्य पुराणात ह्याला ब्रह्मदेवाने अनेक वर दिल्याचा उल्लेख आहे. ह्याच्या राज्यात देव, ब्राह्मण, भूमी यांना विलक्षण त्रास होऊ लागल्याने देव विष्णूला शरण गेले. विष्णूने बलीच्या निर्दलनासाठी वामनावतार घेतला.

## ७८ बाणासुर

एक असुर. शंकराने ह्याला अनेक वर दिले होते. 'पार्वतीने पुत्रत्वाने ग्रहण करावे', असाही एक वर याने शंकरापासून मागून घेतला होता. कार्तिकेय ज्या ठिकाणी उत्पन्न झाला तेथील आधिपत्य ह्यास कायमचे प्राप्त झाले. हा अत्यंत प्रबल होता व ह्याला युद्ध करण्याची विलक्षण खुमखुमी होती. देवांना हा ठेवील त्या स्थितीत मुकाट्याने राहण्याखेरीज गत्यंतर नव्हते. ह्याला एक हजार बाहू होते. त्यांतील दोन शिल्लक ठेवून बाकीचे कृष्णाने छेदून टाकले. अनिरुद्धाला ह्याने बंदिस्त केल्याने कृष्ण ह्याला ठारच करणार होता. परंतु पूर्वी त्याने प्रल्हादाला त्याच्या वंशातील कुणाचाही वध करणार नाही, असे वरदान दिले होते. ह्याने आपली सुस्वरूप कन्या उषा हिचा अनिरुद्धाशी विवाह लावून दिला. हा शंकराचा एक प्रमुख सेवक होता. उषा-अनिरुद्धाच्या मुलाला ह्याने आपले राज्य दिले. यावरून ह्यास पुत्र नसावा असे दिसते, परंतु ब्रह्मांड पुराणाच्या मते ह्याला लोहिनी नामक स्त्रीपासून इंद्रध्वनन् नावाचा पुत्र झाला होता.

## ७९ बिभीषण

विश्रवस व कैकसी यांचा पुत्र. वनपर्वात ह्याच्या आईचे नाव मालिनी दिले असून भागवतात केशिनी दिल्याचे आढळते हा अत्यंत सुस्वभावी होता. उग्र तपश्चर्या करून ह्याने ब्रह्मदेवास संतुष्ट केले आणि त्याच्यापासून 'माझी बुद्धी नेहमी सद्धर्मी असावी' असा वर मागून घेतला. खेरीज ब्रह्मदेवाने ह्याला अमरत्व व ब्रह्मास्त्र दिले. शैलूष गंधर्वाची कन्या सरमा याची भार्या. पद्म पुराणात ह्याच्या

पत्नीचे नाव महामूर्ती असे दिले आहे.

बिभीषण हा लंकेतच राहात असला तरी ह्याचे रावणाशी पटत नव्हते. सीतापहरण ह्याला मान्य नव्हते. सीता रामाला परत करून त्याच्याशी सख्य करण्याबाबत ह्याने अनेकदा रावणाला सांगितले, पण त्याला पटले नाही. ह्याने रावणाला वेळोवेळी उपदेश व सल्ला देऊन दूताविषयीची वागणूक, नीती समजावून सांगण्याचा प्रयत्न केला. ' रामाच्या बलापुढे वल्गना करणारे राक्षस टिकणार नाहीत आणि रामाच्याही हातून तुझी सुटका होणार नाही ', असे भर राजसभेत अत्यंत स्पष्टपणे सांगितले. रावणाने ह्याचा उपदेश मानला तर नाहीच, उलट ह्याचा धिक्कार व तिरस्कार केला. तेव्हा रावणाला सोडून जाण्याचा ह्याने निर्धार केला. इंद्रजिताने पकडून आणलेल्या हनुमानाला रावण ठार करू पाहात असता बिभीषणाने त्याला वाचवले. रामाबरोबर युद्धाचा प्रसंग टाळून लंकेचे रक्षण करण्याची ह्याने रावणाला वारंवार विनंती केली. परंतु रावणाने ती धुडकावून लावली. तेव्हा बिभीषण रामाला शरण गेला. राम-रावण-युद्धात ह्याने चांगला पराक्रम गाजवला. धूम्राक्ष, प्रहस्तादी राक्षसांना ठार केले. आपले अमात्य गुप्त रीतीने लंकेत ठेवून रामाला आवश्यक ती माहिती पुरवली. इंद्रजिताचा यज्ञ पूर्ण होण्यापूर्वीच त्याचा वध करण्याचा लक्ष्मणाला सल्ला दिला व त्यानुसार लक्ष्मणाने त्याचा वध केला. रामाच्या हातून रावणाचा वध झाल्यानंतर मात्र जेष्ठ भ्रात्याच्या मृत्यूने तो शोकाकुल झाला. रामाच्या सांगण्यावरून ह्याने रावणाचे और्ध्वदेहिक केले. रामाने लक्ष्मणाकरवी बिभीषणाला राज्याभिषेक करविला; रावणानंतर हाच लंकाधिपती झाला. रामाबरोबर पुष्पक विमानातून हा अयोध्येला गेला. राज्यासनाधिष्ठित रामावर हा चवरी ढाळत होता. रामाने रत्नादी देऊन ह्याचा सत्कार केला. रामाला साहाय्य केल्यास्तव भरताने ह्यास धन्यवाद दिले.

बिभीषण अत्यंत धर्मपरायण, जितेंद्रिय, स्वाध्याय-रत व मिताहारी होता. राक्षस कुलात जन्म आला असताही अधर्माकडे ह्याची वृत्ती नसल्याने ब्रह्मदेवाने ह्यास अमरत्व दिल्याने ह्याची सप्त चिरंजीवांत गणना झाली. अश्वमेधाच्या वेळी रामाने ह्याला राक्षसांसह येण्याचे आमंत्रण दिले होते. रामाच्या आज्ञांचे ह्याने यथातथ्य पालन केले.

## ८० बुध

बृहस्पतिपत्नी तारा हिला चंद्रापासून झालेला हा पुत्र, चंद्रवंशोत्पादक व बृहस्पतिपत्नीचा पुत्र म्हणून समजला जातो. भविष्य पुराणाच्या मते चंद्र व रोहिणी यांचा पुत्र. बृहस्पतीने याचे जातकर्मादी संस्कार केले. हा महाविद्वान असून हस्ति-शास्त्रात निपुण होता. हा ग्रहमालेत शुक्राच्या वर दोन लक्ष योजने

आहे. हा प्रायः शुभ ग्रह आहे, पण तो जेव्हा सूर्याचे उल्लंघन करतो, तेव्हा अनावृष्ट्यादींचे भय सूचित होते. हा सरोवरात राहून तीव्र तपश्चर्या करीत असे. इला नावाच्या सुंदर स्त्रीवर तो लुब्ध झाला व त्याला तिच्यापासून पुरूरवा नावाचा पुत्र झाला. हा पद्म पुराणाच्या मते सोमवंशाचा मूळ पुरुष होय.

## ८१ ब्रह्मदत्त

ऊर्मिला गंधर्वीची कन्या सोमदा हिला चूली महर्षीच्या कृपेने झालला पुत्र—ब्रह्मदत्त. सोमदेच्या सेवेने संतुष्ट होऊन चूलीने तिला हा मानसपुत्र दिला. हा कांपिल्य नगरीचा राजा होता. वायूच्या क्रोधाने कुबड्या झालेल्या कुशनाभाच्या शंभर कन्यांशी ह्याचा विवाह झाला. ह्याच्या पहिल्या स्पर्शानेच त्यांचे कुबड नाहीसे होऊन त्या पूर्ववत सुंदर झाल्या.

## ८२ ब्रह्मदेव

ब्रह्मन् हे सृष्टीचे आदितत्त्व मानले आहे. हा सर्व सृष्टीच्या आधी उत्पन्न झाला. भगवंताने पृथ्वीरूप कमल निर्माण केले, त्यात ब्रह्मा उत्पन्न झाला असे मत्स्य पुराणात दिले आहे; तर विष्णू सृष्टीचा विचार करीत असता जो अहंकार उत्पन्न झाला त्यापासून ब्रह्माची उत्पत्ती झाली, असे महाभारतात दिले आहे. स्कंद पुराणाप्रमाणे एक अंडे उत्पन्न झाले व त्यापासून हा झाला. विश्वाची शक्ती म्हणजेच भगवान व तोच ब्रह्मा. ह्याने प्रथम तमोगुणी, नंतर रजोगुणी आणि त्यानंतर सत्त्वगुणी प्रजा निर्माण केली. हा सर्व वेदांचा अधिष्ठाता असून याजपासूनच गायत्री झाली. हे जोडपे साक्षात् किंवा अमूर्त कसेही असते. गायत्री ह्यास सोडून कधीही राहात नाही. हा वेदराशी असून त्यात सावित्री बसली आहे, म्हणून यास सावित्रीगमनाचा दोष नाही, असे मत्स्य पुराणाचे मत आहे.

हा मूलतः एक मुखाचा असला तरी ह्याचे वर्णन नेहमी चतुर्मुख असे केले जाते. कारण ह्याने आपल्या अंगापासून शतरूपा नावाची एक अत्यंत रूपवती स्त्री निर्माण केली. ती ह्यास प्रदक्षिणा घालू लागली असता भोवती मानसपुत्र बसले असल्याने तिच्याकडे वळून पाहण्याची ह्यास लाज उत्पन्न झाली. परंतु तिला पाहण्याची याची इच्छा अनावर झाल्याने याने चारी दिशेला चार तोंडे निर्माण केली व ती वर जाऊ लागली असता त्यावर पाचवे शिर उत्पन्न झाले. ते पुढे शंकराने तोडले. शतरूपेकडे पाहण्यामुळे ह्याने पुत्रप्राप्त्यर्थ केलेल्या तपाचा नाश झाला. रुद्राने आपली मुलगी संध्या हिच्या करवी ब्रह्मास मोहित करून ह्याच्या मुलांदेखत ह्याची फजिती करविली. तेव्हा ह्याने शंकरास मोहित करणारी सती उत्पन्न करून दक्षाकरवी त्याचा अपमान करविला.

ब्रह्मदेव वर देण्याबाबत अतिशय उदार आहे. वाल्मीकी रामायणात याने बीस वर दिल्याचे आढळते. ब्रह्मदेवाच्या वरामुळेच वाल्मीकी रामायण लिहिण्यास प्रवृत्त झाला. विश्वामित्राने एक हजार वर्षे तपश्चर्या केल्याने संतुष्ट होऊन प्रथम राजर्षी आणि नंतर क्रमाने प्रत्येकी एक हजार वर्षे तपश्चर्या पूर्ण झाल्यावर ऋषी, महर्षी आणि शेवटी ब्रह्मर्षी–अशी पदे ह्याने दिली. रावण, कुंभकर्ण, मेघनाद, माली, सुमाली, माल्यवान, सुकेतू, ताटका, विराध, मारीच, मय, निवातकवचादी अनेक राक्षसांना ह्याने वरदान दिले. भगीरथाला पितरांना स्वर्गप्राप्ती करून देणे केवळ ब्रह्मदेवाच्या वरामुळेच शक्य झाले. हनुमानाचा देवकार्यासाठी उपयोग होणार आहे, हे लक्षात घेऊन ह्याने वर तर दिलेच, परंतु अन्य देवतांनाही त्याला वर देण्यास प्रवृत्त केले. कुंभकर्णाला प्रदीर्घ निद्रेचा आणि रावणाला मर्यादित अवध्यत्वाचा वर दिला. मेघनादाने इंद्राला जिंकून आणल्यावर त्याच्या मुक्ततेसाठी ब्रह्मदेव त्याला वाटेल ते वर देण्यास तयार झाला. पृथ्वीवरील कुणालाही संपूर्ण अवध्यत्व मिळत नसल्याने ते सोडून मेघनादाने जे मागितले ते वर दिले. ' होम पूर्ण करण्यापूर्वी निकुंभिलेत येऊन जो शस्त्रधारी पुरुष तुझ्याशी युद्ध करील त्याचेकडून तुझा वध होईल ' अशा शापासारखा भासणारा वर ह्याने मेघनादाला दिला. मैंद, द्विविद या वानरांना ही ब्रह्मदेवाच्या वरांचा लाभ झाला. ब्रह्मदेवाने वरांप्रमाणे शापही दिले आहेत. परंतु ते फक्त रावण व कुंभकर्ण या दोघांनाच. वराने प्राप्त झालेल्या सामर्थ्याचा दुरुपयोग करून उन्मत्त झालेला रावण प्रजेला त्रास देऊ लागला, स्त्रियांवर बलात्कार करू लागला. तेव्हा त्याला शाप देणे भाग पडले. कुंभकर्णाच्या अचाट सामर्थ्याला आळा घालण्यासाठी घोर निद्रेचा शाप ह्याला द्यावा लागला. दिलेले वर असत्य ठरू नयेत, यास्तव ब्रह्मदेव अत्यंत जागरूक आहे. रावण-यमाच्या युद्धात यमाने त्याच्या वधासाठी कालदंड उगारताच, त्यास ब्रह्मदेवाने आपला वर असत्य ठरू नये म्हणून कालदंड मागे घेण्यास लावले. रावण आणि निवातकवच ह्या दोघांनाही दिलेल्या वरांमुळे एकमेकांचा वध करणे शक्य नव्हते, त्यासाठी ह्याने त्या दोघांचे सख्य घडवून आणले.

विश्वकर्म्याने तयार केलेले पुष्पक विमान ह्याने कुबेराला देऊन टाकले. इंद्राला वैष्णव याग करावयास लावले. चंद्राला पीडा देणाऱ्या रावणाला एक मंत्र देऊन त्याने गप्प बसविले. देवकार्य सिद्धीस जाण्यासाठी विष्णूला मानवावतार घेण्यास देवांकडून प्रार्थना करविली आणि अन्नत्याग करू पाहणाऱ्या सीतेला जगवण्यासाठी हविष्यान्न घेऊन इंद्राची लंकेला रवानगी केली. महाप्रस्थानानंतर विष्णूच्या तेजात विलीन होणाऱ्या रामाचे ह्याने स्वागत केले.

## ८३ ब्रह्महत्या

ब्रह्मदेवाचे मुंडके भैरवाने उडविले असता शंकराने जी एक स्त्री निर्माण केली ती ब्रह्महत्त्या होय. तिला भैरवाचे मागे जाण्यास सांगितले.

## ८४ भगीरथ

हा दिलीप राजाचा पुत्र. सगराच्या साठ हजार पुत्रांना कपिल मुनीच्या क्रोधामुळे एकदम मृत्यू आला होता. त्यांचे भस्म झाले होते. त्यांच्या उद्धारार्थ कपिल मुनीच्या सांगण्यावरून गंगा आणण्यासाठी अंशुमान व दिलीप यांनी तप केले. परंतु त्यांचा प्रयत्न अर्धवटच राहिला, म्हणून भगीरथाने हिमालयावर जाऊन गंगाप्राप्तीसाठी कडकडीत तपश्चर्या केली. ह्याच्या प्रयत्नांना यश येऊन गंगेने ह्याला दर्शन दिले. तिने स्वर्गातून पृथ्वीवर पडणारा प्रवाह धारण करण्याकरिता शंकराला प्रसन्न करून घेण्यास सांगितले. भगीरथाने शंकराची आराधना करून त्यास संतुष्ट केले व आपल्या जटाभारात गंगाप्रवाह धारण करावयास लावले. ह्याने एक केस तोडून गंगेस वाट करून दिली, म्हणून तिच्या प्रवाहास 'अलकनंदा' म्हणतात.

भगीरथाने गंगेला आपल्या मागून येण्यास सांगून ज्या ठिकाणी कपिल मुनीने दग्ध केलेल्या पितरांची राख पडली होती, त्या ठिकाणी गंगाप्रवाह नेऊन पितरांचा उद्धार केला. भगीरथाने गंगेला पृथ्वीवर आणले, म्हणून तिला 'भागीरथी' असे नाव मिळाले. त्यानंतर भगीरथ पुन्हा पूर्ववत राज्य करू लागला. तो अत्यंत धार्मिक व दानशील होता. ह्याला नाभाग व श्रुत असे दोन पुत्र व हंसी नावाची कन्या होती. ती ह्याने कौत्स नावाच्या एका ब्राह्मणास दान केली. ह्याने गंगेच्या तीरावर घाट बांधले. हजारो सालंकृत कन्या ब्राह्मणांना दान दिल्या. यज्ञ करून हा अपार दक्षिणा देत असे. ह्याच्या यज्ञाला देवही येत असत. महाभारतात ह्याने हजारो गाई दान केल्याचा उल्लेख आढळतो. वाल्मीकी रामायणात भगीरथाच्या मुलाचे नाव 'ककुत्स्थ' असे दिले आहे.

## ८५ भरत

दशरथ व कैकेयी यांचा पुत्र. विष्णूचा चौथा अंश. भरत-शत्रुघ्नांचे एकमेकांवर निरतिशय प्रेम होते. जनक राजाचा कनिष्ठ बंधू कुशध्वज यांची कन्या मांडवी ही ह्याची भार्या. दशरथाने रामाला यौवराज्याभिषेक करण्याचे योजिले. त्या वेळी भरत अयोध्येत नव्हता. शत्रुघ्नासह हा आपल्या मामाकडे गेला होता. राम भरताविषयी कौसल्येला सांगतो की हा धर्मात्मा असून सर्वांशी गोड बोलणारा आहे. वसिष्ठाने सुद्धा 'भरत रामाबरोबर वल्कले नेसून वनवासी होईल' व 'तो पित्याने न दिलेले राज्य करण्याची इच्छा बाळगणार नाही' अशी ग्वाही दिली आहे. अयोध्येला परत येण्याविषयी धाडलेले दूत येऊन पोहोचण्यापूर्वी अशुभ सूचक स्वप्न भरताला पडले होते. अयोध्येला आल्यावर सर्व प्रकार कळताच कैकेयीचा ह्याला विलक्षण राग आला. ह्याने तिची अत्यंत दाहक शब्दांत निर्भर्त्सना केली. 'आईच्या रूपाने तू

माझी वैरीण झालीस. तू नरकात जा. पित्याच्या कुळाचा विध्वंस केलास.' अशा शब्दांत हा तिला बोलला. राज्याची इच्छा नसल्याचे ह्याने अमात्यांना स्पष्टपणे सांगितले. कौसल्या, गुह आणि भरद्वाज यांना भरताविषयी आलेल्या शंका ह्याने आपल्या वर्तनाने, शपथेने दूर केल्या. त्याच्याकडून दशरथाचे और्ध्वदेहिक केल्यानंतर राज्य स्वीकारण्याची केलेली वसिष्ठाची विनंती ह्याने अव्हेरली.

रामाला परत आणण्यासाठी वसिष्ठ व माता यांसह हा निघाला. रामाच्या भेटीने आनंदित झाला. ह्याने रामाला राज्य स्वीकारण्याचा पराकाष्ठेचा आग्रह केला असताही त्याने आपला निश्चय बदलला नाही. भरताला त्याच्या कर्तव्याची जाणीव करून दिली. रामाच्या पादुका घेऊन हा परतला व पादुकांच्या नावाने राज्य करीत सन्यस्त वृत्तीने राहिला. वनवासाची मुदत संपल्यानंतर रामाने परत येण्याचे आश्वासन दिले होते. ते न पाळल्यास अग्निप्रवेश करीन, असे ह्याने रामाला सांगितले. अयोध्येला परत जाताना रामाने प्रथम हनुमानाला भरताच्या भेटीसाठी धाडले. रामाचा अत्यंत उचित रीतीने सन्मान करून भरताने त्याचे राज्य त्याला परत दिले. लक्ष्मणाने यौवराज्यपद स्वीकारण्यास नकार दिल्यामुळेच ह्याला यौवराज्यपद स्वीकारणे भाग पडले. ह्याच्या मनातून लवणासुराला ठार करायचे होते. पण ती कामगिरी शत्रुघ्नाने आपल्याकडे घेतली. ह्याला तक्ष व पुष्कल नावाचे दोन पुत्र होते. त्यांना अनुक्रमे तक्षशिला व पुष्कलावर्त नगरी स्थापून दिल्या. लक्ष्मणाच्या दोन पुत्रांसाठीही दोन नगरे वसवून दिली. रामाने महाप्रस्थान केले, तेव्हा भरतही त्याच्या पाठोपाठ गेला.

## ८६ भरद्वाज

वाल्मीकी ऋषींचा एक शिष्य. वाल्मीकीच्या मुखातून 'मा निषाद...' ही शापवाणी निघाली, तेव्हा तो तेथे होता. हा प्रयागमध्ये राहात असे. दंडकारण्यात जाणाऱ्या रामाने ह्याचे दर्शन घेतले, तेव्हा ह्याने रामाचा यथोचित सत्कार करून आश्रमात राहण्यास सांगितले. परंतु अयोध्या तेथून जवळ असल्याने रामाने दुसरे सुरक्षित स्थळ सुचविण्यास सांगितले. तेव्हा चित्रकूटावर जाऊन राहण्यास सांगितले. रामाला परत आणण्याच्या हेतूने सैन्यासह आलेल्या भरताला पाहून ह्याच्या मनात शंका आली. परंतु साश्रू नयनांनी भरताने ह्याची खात्री पटवून दिली असता ह्याने भरताचे सैन्यासह यथोचित आदरातिथ्य केले आणि रामाच्या वास्तव्याची माहिती सांगून तेथे जाण्याचा मार्ग दाखविला. रामाने अयोध्येला परत जाताना पुन्हा ह्याचे दर्शन घेतले. रामाचे अभिनंदन करून ह्याने रामाला वर दिला. अश्वमेधानंतरही राम पुन्हा ह्याच्या दर्शनासाठी आला होता.

पुलस्त्याचा तपस्वी पुत्र विश्रवा ह्याला त्याने आपली कन्या देववर्णिनी भार्या म्हणून दिली.

८७ भृगू

भृगू नावाच्या अनेक व्यक्ती असून निरनिराळ्या ग्रंथांत त्यांच्याविषयी वेगवेगळी माहिती मिळते. प्रजापतीच्या रेताचे तीन भाग होऊन त्यातून आदित्य, भृगू व अंगिरस हे जन्माला आले, असे ऐतरेय ब्राह्मणात दिले आहे; तर तैत्तिरीय उपनिषदात त्याचा उल्लेख वरुणपुत्र असा असून त्याने वरुणापासून ब्रह्मज्ञान मिळवल्याने त्यास वारुणी भृगू म्हणतात. सृष्टी निर्माण करण्याच्या हेतूने ब्रह्मदेव तपश्चर्या करीत असता त्याच्या अंगातील घाम जमिनीवर पडला. त्यात त्याला त्याचे प्रतिबिंब दिसले व त्याचे तेथे रेतस्खलन झाले. त्या रेताचे दोन भाग झाले. एक भाग शांत, पेय व स्वादू झाला व दुसरा खारट, अपेय व अस्वादू झाला. ह्या दोन भागांतून अनुक्रमे भृगू व अंगिरस हे ऋषी निर्माण झाले—असे गोपथ ब्राह्मणाचे म्हणणे आहे. हा ब्रह्माच्या हृदयापासून झाला व तो स्वायंभुव मनूचा जावई आणि शंकराचा साडू होता. दक्षाच्या यज्ञात शिवाचा जेव्हा अपमान झाला, त्या वेळी शिवाच्या निंदेत भृगूनेही भाग घेतला होता. वीरभद्राने दक्षाच्या यज्ञाचा विध्वंस करताना याची दाढी जाळली होती. शंकराची स्तुती केली असता प्रसन्न होऊन त्याने ह्याला बोकडाची दाढी लावली, असे भागवतात सांगितले आहे. दक्षाने अपमान केल्यामुळे शंकराने ह्याला जाळून टाकले, असाही एक उल्लेख आढळतो. देव-दैत्यांच्या युद्धात देवांपुढे दैत्यांचे काही चालेना, तेव्हा संजीवनी मंत्राच्या प्राप्तीसाठी शुक्र गेला आणि भृगूही तपश्चर्या करू लागला. भृगुपत्नी देवाशी युद्ध करू लागली असता ती स्त्री आहे, हा विचार न करता विष्णूने चक्र फेकून तिला ठार केले, परंतु भृगूने तिला पुन्हा संजीवनी मंत्राने जिवंत केले आणि विष्णूला 'तुला गर्भवासजन्य दुःख भोगावे लागेल आणि पृथ्वीवर अवतार घ्यावा लागेल' असा शाप दिला— असे देवी भागवतावरून समजते. विश्वामित्राने रामाला ताटका-वधाचे वेळी 'विशेष प्रसंगी स्त्रीवध दोषावह नाही' हे समजावून सांगताना वरील कथा सांगितली आहे. भृगूने विष्णूला दिलेल्या शापाची एक वेगळी कथा पद्म पुराणाच्या भूमिखंडात आढळते. भृगूला विष्णूने त्याच्या यज्ञाचे रक्षण करण्याचे कबूल केले होते. परंतु इंद्राच्या बोलावण्यावरून तो वचन मोडून इंद्राकडे गेला. विष्णू नाही असे पाहून दैत्यांनी भृगूच्या यज्ञाचा नाश केला, म्हणून 'मृत्युलोकी तुला दहादा जन्म घ्यावा लागेल' असा भृगूने विष्णूला शाप दिला. ब्रह्मा, विष्णू, महेश यापैकी श्रेष्ठ कोण या वादाचा निकाल लावण्याचे काम भृगूकडे आले असता निद्रिस्त विष्णूच्या छातीवर भृगूने लाथ मारली, तरीही तो न रागावल्याने त्याचे श्रेष्ठत्व भृगूला जाणवले. भृगूच्या लत्ता-प्रहाराने झालेली डागासारखी खूण विष्णूने 'श्रीवत्सलांछन' म्हणून वक्षःस्थलावर धारण केली.

ह्याला दिव्या व पुलोमी अशा दोन भार्या होत्या. दिव्यापासून शुक्र व इतर बारा मुलगे झाले. पुलोमीचा मुलगा च्यवन. भृगुस्मृती, भृगुगीता, भृगुसूत्र इत्यादी

ग्रंथ त्याच्या नावावर आढळतात. वास्तुशास्त्रावरही ह्याने एक ग्रंथ लिहिला आहे.

इक्ष्वाकू कुलाचा पुरोहित वसिष्ठ याच्यानंतर निमी राजाने अत्रि-अंगिरसा-बरोबर भृगूलाही ऋत्विज केले. वसिष्ठाच्या शापाने निमी देहविहीन झाला. पण भृगूने त्याला चेतना देण्याचे अभिवचन दिले, असे वाल्मीकी रामायणाच्या उत्तर-कांडात दिले आहे.

## ८८ मतंग

ऋष्यमूक पर्वताजवळ पंपा नदीच्या पश्चिम तीरावर एक वन होते. ते मतंगवन म्हणून ओळखले जात होते. मतंग मुनीच्या शापामुळे वाली येथे प्रवेश करू शकत नसल्याने सुग्रीव येथे निर्भयपणे रहात असे. मतंग ऋषीचे शिष्य लाक-डाचे भारे आणण्याकरिता गेले असता जमिनीवर जेथे त्यांचे घर्मबिंदू पडले, तेथे त्यांची फुले झाली. ती कधी नष्ट होत नसत. रामाला फळे देणारी शबरी येथेच राहात असे. मतंग तिचा गुरू होता.

ब्राह्मण्य हे जन्मावर अवलंबून असते हे विशद करण्याकरिता महाभारताच्या अनुशासन पर्वात मतंगाची कथा आली आहे. वडिलांच्या यज्ञासाठी समिधा व दर्भ आणण्यासाठी मतंगाने रथाला एक गाढवी व तिचा मुलगा जोडला. मुलगा रथ नीट ओढेना, म्हणून त्याने त्याच्या नाकावर चाबकाचे फटकारे मारले. ते पाहून आईने मुलाची जी समजूत घातली, तिचा आशय मतंगाचे लक्षात आला. ह्याने पृच्छा केल्याने गाढवीने तो चांडाल कसा झाला ते सांगितले. ह्याची आई ब्राह्मण असली तरी बाप न्हावी होता, म्हणून ह्याचे ब्राह्मण्य नष्ट झाले, असे समजल्या-वरून यज्ञाची तयारी करण्याचे काम सोडून देऊन हा तपश्चर्या करू लागला. इंद्र प्रसन्न झाला. परंतु चांडाल योनीत जन्मलेल्याला ब्राह्मण्य मिळणे अशक्य असल्याचे इंद्राने ह्याला सांगितले. तरीही ह्याने एका पायावर उभे राहून शंभर वर्षे तप केले. पुन्हा इंद्राने ह्यास अप्राप्य गोष्टीचा नाद सोडण्यास सांगितले. ब्राह्मण्य सहज प्राप्त होत नसून अनेक जन्मांनंतर प्राप्त होते, असे समजताच ह्याने पुन्हा हजार वर्षे तपश्चर्या केली. तेव्हा इंद्राने ह्याला ब्राह्मण्याखेरीज कामविहारी, कामरूपी, आकाशगामी, अक्षय कीर्तिमान होणे इत्यादी वर दिले. मतंगाने देहत्याग करून वराने दिलेले स्थान प्राप्त केले.

## ८९ मदयंती

सौदास (कल्माषपाद) राजाची पत्नी. पुरोहित वसिष्ठाने राजाला शाप दिला असता त्याला प्रतिशाप देण्यास उत्सुक झालेल्या पतीला तसे करणे अयोग्य असल्याचे हिने पटवून देऊन परावृत्त केले. अश्मक नावाचा हिला एक पुत्र होता.

## ९० मधुच्छंद

विश्वामित्राचा एकावन्नावा मुलगा. पहिल्या पन्नास मुलांनी शुनःशेपाचे ज्येष्ठ भ्रातृत्व मानले नाही. ज्यांनी ते मानले त्यांचा हा प्रमुख. विश्वामित्राने संतुष्ट होऊन ह्यास उत्तम आशीर्वाद दिले. ऋग्वेदाच्या पहिल्या मंडलातील पहिल्या दहा सूक्तांचे कर्तृत्व याचेकडे जाते. हा शर्यातीचा पुरोहित होता.

## ९१ मधुदैत्य

कृतयुगातील दितिपुत्र. रावणाच्या कुंभीनसी नावाच्या मावस बहिणीचे ह्याने अपहरण केले असता ह्याचे पारिपत्य करण्याकरिता रावण ससैन्य सज्ज झाला होता. परंतु कुंभीनसीनेच हा आपला पती आहे, असे सांगून ह्याला रावणाला साहाय्य करण्यास सांगितले. हा ज्ञानी व बुद्धिनिष्ठ असून देवांशी ह्याची मैत्री होती. ह्याला शंकराकडून एक शूल मिळाला होता. जोपर्यंत देव-ब्राह्मणांशी हा वैर करणार नाही तोवरच तो ह्याचेकडे राहणार होता. तो कायम आपल्या वंशात रहावा, अशी ह्याची इच्छा होती व ती ह्याने शंकराजवळ बोलून दाखविली होती. परंतु ती फलद्रूप होणार नाही, असे सांगून फक्त एकाच पुत्राला तो मिळेल व तो हाती असता पुत्र अवध्य राहील असे सांगितले. ह्याचा पुत्र लवण. त्यास हा शूल वारसा हक्काने प्राप्त झाला होता.

## ९२ मय

हा दनुपुत्र दानवांपैकी एक. रामायणात ह्यास दितिपुत्र म्हटले असले तरी ते चूक आहे. ह्याला नमुची नावाचा एक भाऊ होता. ह्याच्या भार्या आणि अपत्ये यांविषयी वेगवेगळ्या ग्रंथांत वेगवेगळी माहिती आढळते. हेमा नावाची अप्सरा ह्याची भार्या होती व तिच्यापासून ह्याला मंदोदरी नावाची कन्या झाली. तिचा विवाह रावणाशी झाला अशी माहिती वाल्मीकी रामायणात आढळते. मंदोदरीबरोबर मायाविन व दुंदुभी या दोन अपत्यांचाही उल्लेख आहे. मत्स्यपुराणात मंदोदरीच्या बरोबर कुहू व उपदानवी ह्या कन्यांची नावे आढळतात. ब्रह्माण्ड पुराणात रंभेपासून याला सहा अपत्ये झाल्याचे समजते. ऋक्ष बिळात कांचनभवन बनविणारा दानवांचा मायावी शिल्पकार. ब्रह्मदेवाच्या वराने उशनसाचे सर्व धन यास मिळाले. वाल्मीकी रामायणात इंद्राने मय हेमाशी लंपट झाल्यामुळे ह्याचा वध केल्याचे स्पष्टपणे सांगितले आहे. तर ब्रह्म पुराणात ह्याचे व इंद्राचे नमुचीच्या वधामुळे निर्माण झालेले वैर संपुष्टात येऊन त्यांचे सख्य झाल्याचे व एकमेकांनी एकमेकांस आपापल्या माया दिल्याचे नमूद केले आहे. वास्तुशास्त्र, शिल्पशास्त्र व ज्योतिषशास्त्रावर ह्याचे ग्रंथ आहेत.

## ९३ मंथरा

कैकेयीच्या माहेरची दासी. पूर्वजन्मी ही दुंदुभी नावाची एक गंधर्वी होती. कृष्णावतारी ती कुब्जा झाली. ही कुबडी होती. कैकेयीचे रामावर निस्सीम प्रेम असताही हिने तिच्या मनात मत्सर जागृत केला. पूर्वी दशरथ राजाने कैकेयीला देऊ केलेले वर दशरथ राजा रामाला यौवराज्याभिषेक करणार होता, त्याच वेळी मागून घेण्यास हिने कैकेयीला उद्युक्त केले आणि भरताला यौवराज्याभिषेक आणि रामाला चौदा वर्षे वनवास घडावा हे तिला पटवून दिले. अत्यंत दुष्ट बुद्धीने हिने कैकेयीला चिथावणी दिली. शत्रुघ्न व भरत बोलत असता दारात नटून थटून उभ्या असलेल्या मंथरेला पाहून शत्रुघ्न अतिशय संतप्त झाला. हिला उग्र शासन करण्यास प्रवृत्त झालेल्या शत्रुघ्नाला भरताने आवर घातला. विलाप करीत कैकेयीकडे गेली असता तिने हिचे सांत्वन केले आणि धीर दिला.

## ९४ मंदोदरी

ही मयासुराची कन्या. रावणाच्या भयाने त्याला अर्पण करून मयाने रावणाचे सख्य मिळवले (वा. रा. युद्धकांड ७/७). सीतेच्या शोधार्थ हिंडत असणाऱ्या हनुमानाला लंकेच्या राजभवनात गोरीपान, अलंकार ल्यालेली रूपवती अंतःपुरस्वामिनी मंदोदरी दृष्टीस पडली (सुंदरकांड १०/५०-५२). रंभा किंवा हेमा अप्सरेपासून मयासुरास झालेली कन्या मंदोदरी, असे स्कंद व ब्रह्माण्ड पुराणांत दिले आहे. सीता हिची कन्या होती, असेही एक मत आहे. मेघनाद (इंद्रजित) हा हिचा मुलगा.

पंचपतिव्रतांत मंदोदरीचा अंतर्भाव होतो– 'अहल्या द्रौपदी सीता तारा मंदोदरी तथा।'

## ९५ मरुत्त

हा राजर्षी संवर्त ऋषीचा शिष्य होता. ऐतरेय ब्राह्मणानुसार हा कामप्राचा वंशज. बृहस्पती ह्याचा पुरोहित होता. इंद्राची व ह्याची नेहमी स्पर्धा चालत असे. इंद्राचे ह्याच्यापुढे काही चालेना, म्हणून त्याने बृहस्पतीला ह्याचे पौरोहित्य सोडावयास लावले. नारदाच्या सांगण्यावरून हा संवर्ताकडे गेला व त्याला यज्ञात ऋत्विजत्व स्वीकारण्याविषयी विनंती केली. संवर्ताने ह्याच्या यज्ञाचे ऋत्विजत्व स्वीकारले. इंद्राने यज्ञात बरीच विघ्ने आणण्याचा प्रयत्न केला. परंतु संवर्ताच्या पूर्ण पाठिंब्यामुळे इंद्राच्या कारवायांना यश आले नाही. ह्याने इंद्र, बृहस्पती आदी देवतांना सन्मानपूर्वक यज्ञाला बोलावून हवन केलेल्या सोमाचा स्वीकार करण्याची विनंती केली. पुढे इंद्राचे व ह्याचे सख्य झाले.

रावणानेही ह्याच्या यज्ञात विघ्न निर्माण केले होते. तेव्हा त्याच्याशी युद्ध करण्यास मरुत्त राजा सिद्ध झाला. परंतु यज्ञदीक्षा घेतलेल्यास युद्ध करता येत नाही, असे सांगून संवर्ताने त्याला परावृत्त केले. आपला जय झाला, असे मानून रावण निघून गेला. मरुत्त राजाचा यज्ञ अभूतपूर्व झाला. सारे मरुद्‌गण संतुष्ट झाले. ह्याने ब्राह्मण, गंधर्वादिकांना अमाप द्रव्य दिले. गुरूच्या आज्ञेनुसार यज्ञ-समाप्ती-नंतर हा राज्य करू लागला. ह्याला दम नावाचा एकुलता एक पुत्र होता.

## ९६ महापार्श्व

विश्रवा ऋषीस पुष्पोत्कटेपासून झालेला पुत्र. ह्याचे 'मत्त' असेही नाव आहे. हा रावणाचा एक अमात्य होता. ह्याच्या घराला हनुमानाने आग लावली. युद्धात रामाने ह्यास पळवून लावले, परंतु ह्याने वानर सेनेचा भयंकर संहार केला, जांबवान–गवाक्षांना जखमी केले. अंगदाने ह्याला ठार केले.

## ९७ मातली

इंद्राचा सारथी. ह्याची पत्नी सुधर्मा. तिच्यापासून दोन अपत्ये झाली. राम-रावणाच्या युद्धात इंद्राच्या सांगण्याप्रमाणे हा रथ, धनुष्य, बाण, कवच यांसह रामाकडे आला. ह्याने रामाचे सारथ्य उत्कृष्टपणे करून रावणाच्या वधाच्या कामी रामाला साहाय्य केले. रावणाच्या वधासाठी ब्रह्मदेवाने दिलेल्या अस्त्राचा उपयोग करण्याचे स्मरण ह्याने रामाला करून दिले. रावणवधानंतर रामाने मातलीचा सत्कार केला. अर्जुनालाही इंद्राच्या आज्ञेवरून मातलीनेच स्वर्गात आणले होते.

## ९८ मांधाता

युवनाश्व राजाचा पुत्र. राज्यात दुष्काळ पडला असता उग्र तपश्चर्या व पद्मा नावाची एकादशी करून ह्याने दुष्काळ-निवारण केले. पापाचरण करणाऱ्या एका श्रमणाला ह्याने घोर शिक्षा केली असल्याचे रामाने वालीला सांगितले. शंभर भार्या असूनही याला पुत्रप्राप्ती होत नव्हती, म्हणून हा कष्टी होता. पुत्रप्राप्ती-साठी ऋषींकडून ह्याने यज्ञ करविला. ऋषींनी राजपत्न्यांना पुत्रप्राप्ती व्हावी म्हणून तयार केलेले जल (पृषदाज्य) तृषार्त होऊन हा प्यायला असता ह्याच्या उदरात गर्भ राहिला. गर्भाची पूर्ण वाढ झाल्यावर ऋषींनी कुक्षीचा भेद करून ह्याच्या उदरातील बालकास बाहेर काढले. इंद्राने आपली करंगळी त्यास चोखा-वयास देऊन ह्याचे पोषण केले. या अतिशय बलवान आणि विद्याप्रवीण झाला. तपःसामर्थ्याने अनेक शस्त्रास्त्रांची ह्यास प्राप्ती झाली. सर्व पृथ्वी पादाक्रांत करून

ह्याने राजसूय, अश्वमेधादी यज्ञ केले. पराक्रमाचा गर्व झाल्याने इंद्राच्या अर्ध्या आसनाची अभिलाषा ह्याला उत्पन्न झाली. इंद्राने ह्याला युद्धार्थ आव्हान दिले असता इंद्राने लवणासुराशी युद्ध करण्यास सांगितले. या युद्धात ह्याचा वध झाला. हा क्षत्रिय असूनही ब्राह्मण झाला होता. ह्याने रावणाचा पराजय केला होता. शशबिंदूची कन्या बिंदुमती हिच्याशी ह्याने विवाह केला व तिच्यापासून ह्याला मुचुकुंद, अंबरीष व पुरुकुत्स असे तीन पुत्र झाले. ह्याला पन्नास कन्या होत्या. एकदा एका ऋषीने त्याच्या एका कन्येची भार्या म्हणून मागणी केली. परंतु तो जख्ख म्हातारा असल्याने त्याला कन्या देण्यास ह्याचे मन धजेना. तेव्हा ह्याने त्याला मुलींच्या अंतर्गृहात जाऊन जी त्यास वरील तिला याची भार्या म्हणून देण्याचे मान्य केले. त्याचे रूप पाहून याला कोणीही वरणार नाही, अशी त्याची खात्री होती. त्याचे कपट ओळखून ऋषीने अत्यंत सुंदर रूप धारण करून अंतर्गृहात प्रवेश केला असता याला पाहून प्रत्येकीने मला हाच पती हवा, असा आग्रह धरला. त्यामुळे त्या सर्वांचा विवाह या ऋषीशी करून देणे मांधात्याला भाग पडले अशी कथा पद्म, विष्णू व गरुड पुराणांत आढळते.

## ९९ मारीच, सुबाहू

मारीच आणि सुबाहू हे ताटका व सुंद यांचे पुत्र. दोघेही अत्यंत पराक्रमी व सुशिक्षित होते, असे विश्वामित्राने म्हटले आहे. मारीच पूर्वी यक्ष होता. परंतु अगस्त्याच्या शापाने तो राक्षस झाला. ‘सीतेला पळवून आणू नको,’ असे ह्याने रावणाला पदोपदी सांगितले होते. कारण ह्याला रामाच्या सामर्थ्याची यथायोग्य कल्पना होती. परंतु रावणाने ह्याला ठार मारण्याची धमकी दिल्याने ‘सुवर्णमृग’ बनून रावणाला सीताहरणाचे कामी ह्याने साहाय्य केले. ह्याच्या अंगात दहा हजार हत्तींचे सामर्थ्य होते. सुमाली राक्षसाच्या चार अमात्यांपैकी हा एक होता. विश्वामित्राच्या यज्ञात दोघेही वारंवार विघ्न आणीत असत. रामाने सुबाहूला ठार केले, तर मारीच बाणाच्या पिसाऱ्याने समुद्रात जाऊन पडला. लंकेत जाऊन रावणाचा आश्रित बनला. सुवर्णमृगाचे रूप धारण केले असता ह्याचा पाठलाग करून रामाने ह्यास ठार केले. ब्रह्मदेवाच्या वरामुळे ह्यास अवध्यत्व प्राप्त झाले होते.

## १०० माली

सुकेश राक्षसाचा देववतीपासून झालेला तिसरा मुलगा. माल्यवान आणि सुमाली या आपल्या भावांबरोबर घोर तपश्चर्या करून ह्याने ब्रह्मदेवास संतुष्ट केले. ब्रह्मदेवाच्या वरामुळे अजिक्यत्व आणि चिरंजीवित्व प्राप्त झाले. भावांबरोबर

देवांना त्रास देऊ लागला असता विष्णूने युद्धात ह्याचा वध केला. वसुदा गंधर्वी त्याची पत्नी असून तिच्यापासून ह्याला अनल, अनिल, हर आणि संपाती असे पुत्र झाले. बिभीषणाने त्यांना अमात्यपद दिले.

## १०१ माल्यवान (माल्यवत्)

सुकेश राक्षसाचा देववतीपासून झालेला ज्येष्ठ पुत्र. पित्याला तपःसामर्थ्याने ऐश्वर्य प्राप्त झाल्याचे ऐकून आपल्या दोन धाकटचा भावांसह ह्याने घोर तपश्चर्या केली. संतुष्ट झालेल्या ब्रह्मदेवाने वर दिला असता सपरिवार लंकानगरीत वास्तव्य करून देवांना हा पीडा देऊ लागला. देवांना विष्णूने अभय देऊन ह्याच्या वधाची प्रतिज्ञा केली. त्याप्रमाणे मालीचा वध केल्याबर भ्यालेला माल्यवान धाकटचा सुमालीला घेऊन पाताळात जाऊन राहिला. हा पुन्हा मर्त्य लोकात आला असता वैश्रवणाचे ऐश्वर्य पाहून स्तिमित झाला. ह्याने आपली कन्या कैकसी विश्रव्याला दिली व तिच्यापासूनच रावणादींचा जन्म झाला. नर्मदा नावाच्या गंधर्वीची ज्येष्ठ कन्या सुंदरी याची पत्नी. तिच्यापासून ह्याला सात पुत्र व एक कन्या झाली. रावणाने केलेले सीतेचे अपहरण ह्यास पसंत नव्हते. सीतेला रामाच्या स्वाधीन करून अधर्माचा त्याग करण्याबाबत ह्याने रावणास उपदेश केला.

## १०२ मित्र

वरुणपदाशी संलग्न अशी एक देवता. द्वादशादित्यांपैकी एक. यास रेवती नामक स्त्रीपासून उत्सर्ग, अरिष्ट व पिप्पल असे तीन पुत्र झाले. हा वरुणपदाचा अधिकार चालवीत असता उर्वशीला मागणी घातली होती व तिने ती मान्यही केली होती. परंतु वरुणाला ती दिसली असता त्याची कामवासना उद्दीपित झाली व त्याने तिची मागणी केली. परंतु तिने पूर्वीच मित्राला अनुमती दिल्याचे सांगितले व देह त्याच्या अधीन असल्याने फक्त प्रेम देऊ केले. वरुणाला कामवासना अनावर झाल्याने तिला उद्देशून त्याने आपले तेज एका कुंभात विसर्जित केले. ही गोष्ट मित्राला कळताच याने संतापून उर्वशीला शाप दिला व आपले तेज त्याच कुंभात विसर्जित केले. त्यातून अगस्त्य व वसिष्ठ जन्माला आले. अगस्त्याने मित्राला 'मी तुझा एकटाच पुत्र नाही' असे सांगून ह्याचा त्याग केला.

## १०३ मेघनाद (इंद्रजित)

रावण आणि मंदोदरी यांचा ज्येष्ठ पुत्र. जन्मतःच मेघासारखी गर्जना केल्याने मेघनाद असे नाव पडले. वयात येताच शुक्राचार्यांच्या साहाय्याने अश्वमेध-

अग्निष्टोम, बहुसुवर्णक, राजसूय, गोमेध, वैष्णव आणि माहेश्वरी असे सप्त यज्ञ ह्याने निकुंभिलेमध्ये केले. शिवापासून याला दिव्य रथ, तामसी माया, शस्त्रे, धनुष्यबाण इत्यादिकांची प्राप्ती झाली, तर ब्रह्मदेवाकडून मर्यादित अवध्यत्वाचा वर मिळाला. हा अत्यंत पराक्रमी होता. ह्याने इंद्राला जिकले होते. इंद्राच्या मुक्ततेसाठी ब्रह्मदेवाने संपूर्ण अमरत्व सोडून वाटेल ते मागण्यास सांगितले. ह्याचा 'इंद्रजित' म्हणून गौरव केला. ह्याच्या पत्नीचे नाव सुलोचना. निकुंभिलेतील मेघनादाचा होम पूर्ण होऊन तो बाहेर आल्यास सर्वांचा वध होईल अशी बिभीषणाला खात्री होती व ती त्याने रामापाशी बोलून दाखवली होती. त्यानुसार लक्ष्मणाने ह्याचा होम पूर्ण होण्यापूर्वीच तो उध्वस्त केला. युद्धात लक्ष्मणाने ह्याचा वध केला. तेव्हा ह्याच्या पत्नीने सहगमन केले.

हा अत्यंत पराक्रमी व अजिक्य होता. रामरावण-युद्धात ह्याने अतुल पराक्रम केला. अनेक वानरवीरांना ह्याने यमसदनी धाडले. हनुमानाच्या मनात भीती उत्पन्न करण्यासाठी 'राम राम' असा आक्रोश करीत असलेली मायावी सीता त्याच्या दृष्टीस पडेल, अशी व्यवस्था केली आणि तिचा वध करीत आहे असे घोषित केले. मायावी सीतेचा खड्ग उपसून वध केला असता सर्व वानर दुःखी होऊन पळू लागले. शत्रूला नामोहरम करण्यासाठी पराक्रमाबरोबर वरप्राप्त शस्त्रास्त्रे, माया इ. चा ह्याने योग्य उपयोग करून घेतला. हनुमानावर ह्याने केलेला ब्रह्मास्त्राचा प्रयोग मात्र अन्य राक्षसांनी इतर बंधनांनी त्याला जखडल्यामुळे पार फसला. ह्याने आपल्या बाणांनी राम-लक्ष्मणालाही निश्चेष्ट केले होते. नागपाशांनी त्यांना बांधून टाकले. अदृश्य होण्याची माया ह्याला अवगत असल्याने युद्धात ह्याला यश प्राप्त होत असे.

## १०४ मैंद

सुषेण वानराचा ज्येष्ठ पुत्र व द्विविद वानराचा ज्येष्ठ बंधू. साठ लक्ष योजने उडून जाण्याचे सामर्थ्य ह्याचे ठायी होते. रामाला ह्याने साहाय्य केले. ह्याने वज्रमुष्टी व यूपाक्ष ह्यांना ठार केले. वाली-वधानंतर सुग्रीवाने सीतेच्या शुद्धीसाठी ज्या वानरांची योजना केली होती, त्यांत हाही होता. ब्रह्मदेवाने ह्याला मर्यादित अवध्यत्वाचा वर दिला होता, त्याचप्रमाणे रामाने 'कलियुग असे पर्यंत जिवंत राहण्यास' सांगितले होते.

## १०५ यदू

ययाती–देवयानी यांचा पुत्र. ययातीचा सर्वांत ज्येष्ठ मुलगा. शर्मिष्ठेचा पुत्र पुरू ययातीचा लाडका असल्यामुळे हा मनात दुखावलेला होता. त्याच्या मनात पुरू-

विषयी मत्सर व ययातीविषयी अढी होती. दैत्यगुरू शुक्राचार्यांच्या शापामुळे प्राप्त झालेली जरा काही काल मुलाने स्वीकारून आपले तारुण्य बापाला द्यावे, अशी ययातीची अपेक्षा होती. यदूला जरा स्वीकारण्याबाबत विचारले असता ह्याने नकार दिला. नकाराची कारणे वेगवेगळी आढळतात. ययाती त्याला धड प्रेमाने वागवत नव्हता. नकाराचे हे एक कारण स्पष्ट आहे. परंतु यदूने एका ब्राह्मणाला काही देण्याचे अभिवचन दिले होते. जरा स्वीकारल्याने त्याला अडचण निर्माण झाली असती. त्याहून महत्त्वाचे कारण म्हणजे स्वताचे तारुण्य स्वीकारून बाप जर आईशी रममाण होऊ लागला, तर मातागमनाचे पाप लागेल अशी भीती यास वाटत होती. कारण काही असले तरी यदूने नकार दिल्याने ययाती संतप्त झाला व त्याने ह्याला शाप दिला– 'तू भयंकर राक्षस व यातुधान उत्पन्न करशील. सोमकुलात उत्पन्न झालेल्या तुझ्या वंशात तुझी दुष्ट संतती राहणार नाही. तुझा वंशही तुझ्याप्रमाणे उद्धट होईल.' ययातीनंतर यदूच ज्येष्ठतेमुळे राज्याचा वारस होता, परंतु याला राज्य देण्यास ययातीने नकार दिला. यदूनेही राज्य व सार्वभौमपदाचा लोभ सोडून दिला व ययातीने दिलेला राज्याचा छोटा भाग स्वीकारला. यदूपासून यादवांची उत्पत्ती झाली आणि मौसल युद्धात त्यांचा संहार झाला.

## १०६ यम

ऋग्वेदात ह्याच्या पित्याचे नाव विवस्वत आणि आईचे नाव सरण्यू असे दिले आहे, तर हरिवंश, मार्कंडेय, पद्म, विष्णू, मत्स्य, वराहादी पुराणांत आईचे नाव संज्ञा दिले आहे. संज्ञेला सूर्याचे तेज सहन होत नसल्याने ती त्याच्या समोर डोळे मिटत असे, म्हणून 'तुझ्या पोटी प्रजासंहारक यम होईल' असा तिला त्याने शाप दिला. यम व यमी ही जुळी भावंडे. त्यांचा संभोग, प्रार्थना, संवाद, यांचा उल्लेख ऋग्वेदात आहे. सापत्न माता छाया हिला ह्याने लाथ मारल्याने 'तुझा उजवा पाय गळून पडेल' असा तिने ह्याला शाप दिला होता. पित्याने ह्याला उःशाप दिला. ह्याने तपश्चर्या केली असता ब्रह्मदेवाने पितरांचे स्वामित्व ह्याला देऊन जगातील पापपुण्यावर नजर ठेवण्याचे काम ह्याच्याकडे सोपविले. मांडव्य ऋषी निरपराध असताही त्याला फाशी देण्यात आले. तेव्हा मृत्यूपूर्वी त्याने यमाला 'तू शूद्र योनीत जन्माला येशील' असा शाप दिला होता. कुंतीने ह्याला उद्देशून मंत्रोच्चार केल्याने तिला जो पुत्र झाला तो युधिष्ठिर. धर्म व ह्याचा संवाद झाला असता धर्माने योग्य उत्तरे दिल्याने सरोवरासमीप मृत झालेल्या पांडवांना ह्याने जिवंत केले. हा धर्मशास्त्रकार होता.

हा दक्षिण दिशेचा स्वामी. कुंभकर्णाच्या हातून ह्याचा पराभव झाला होता.

रावणाला भिऊन हा कावळा झाला होता. रावण निघून गेल्यावर ह्याने कावळ्यांना वर दिला – 'तुम्हाला रोगांचे व स्वाभाविक मृत्यूचे भय नाही. माणसे तुम्हाला मारणार नाहीत तोवर तुम्ही जिवंत राहाल.' यमाचे रावणाशी सात रात्री युद्ध चालले होते. शेवटी ह्याने कालदंडाचा प्रयोग करण्याचे योजिले असता ब्रह्मदेवाने ह्याला तसे करण्यापासून परावृत्त केले कारण त्याने रावणाला दिलेल्या वराच्या ते विरोधी होते. 'माझ्या कालदंडापासून तु अवध्य राहशील, रोगमुक्त राहशील' असा वर ह्याने हनुमानाला दिला होता.

## १०७ ययाती

इक्ष्वाकू कुलातील नहुषाचा पुत्र. दैत्यगुरू शुक्रकन्या देवयानी आणि दैत्यराज वृषपर्व्याची कन्या शर्मिष्ठा या दोघी याच्या भार्या होत्या. शर्मिष्ठा देवयानीची दासी म्हणून विवाहानंतर ययातीकडे आली होती व शुक्राचार्यांने शर्मिष्ठेकडून शयनीय सेवा घेऊ नको, असे सांगितले असताही तिला ह्याचे पासून तीन मुले झाली. देवयानीला दोनच पुत्र होते. तिला अतिशय राग आला. शुक्राचार्याकडे तक्रार केली असता त्याने ययातीला 'जरेने जीर्ण होऊन दुर्बल होशील' असा शाप दिला, मात्र कोणी जरा स्वीकारली तर पुन्हा तारुण्य प्राप्त होईल' असेही सांगितले. ह्याने आपल्या मुलांना जरा स्वीकारण्याची विनंती केली असता पुरूने ती स्वीकारली व इतर सर्वांनी नाकारली. नकार देणाऱ्या पुत्रांना त्याने वेगवेगळे शाप दिले, तर पुरूला राज्यपद दिले. हा अत्यंत कामुक होता. हजारो वर्षे विलासात मग्न राहूनही ह्याची तृप्ती झाली नाही, मात्र हा धर्मनिष्ठ होता. पुरूला दिलेली जरा परत घेऊन त्यास त्याचे यौवन ह्याने परत दिले. स्वर्गात गेल्यावरही ह्याची मानी वृत्ती ह्यास नडली. इंद्राने ह्यास स्वर्गातून पुन्हा पृथ्वीवर ढकलून दिले.

ह्याने अनेक यज्ञयाग केले. राजनीतीस अनुसरून प्रजापालन केले. ब्राह्मणांना हजारो गाई दान दिल्या. हा अत्यंत दानशूर होता. ह्याला देवयानीपासून यदू व तुर्वसू आणि शर्मिष्ठेपासून द्रुह्यू, अनू आणि पुरु असे पुत्र झाले. माधवी आणि सुकन्या नावाच्या दोन कन्या असल्याचा उल्लेख काही ग्रंथांतून आढळतो. परंतु सुकन्या ही ययातीची मुलगी नसून शर्यातीची असावी.

ययातीची कथा निरनिराळ्या ग्रंथांत वेगवेगळ्या स्वरूपात आढळते.

## १०८ रंभा

रंभा ही एक अत्यंत सुंदर अप्सरा होती. ही कश्यप व प्राधा यांची कन्या. कुबेरपुत्र नलकूबराबरोबर ही पत्नीप्रमाणे रहात असे. एकदा सुंदर वस्त्रे परिधान

करून जात असता ही रावणाच्या नजरेस पडली. काममोहित होऊन त्याने हिच्याजवळ रतिसुखाची मागणी केली. 'माझे नलकूबरावर प्रेम आहे व समागमासाठी मी त्याच्याकडे जात आहे. मी तुझी सून आहे', असे हिने सांगितले असताही रावणाने तिच्यावर बलात्कार केला.

श्वेत मुनी व एक राक्षसी यांचे युद्ध झाले असता वायव्यास्त्राने विश्वामित्राच्या शापाने शिळा झालेली रंभा व ती राक्षसी कपितीर्थात उडाल्या. त्यामुळे दोघींचाही उद्धार झाला. महाभारताच्या उद्योगपर्वातील उल्लेखावरून ही तुंबरूची स्त्री होती असे वाटत असले, तरी हिच्याशी संबंध ठेवल्यामुळे शाप लागून तो विराध राक्षस झाला, अशी जी कथा आहे, त्या कथेवरून तो हिचा पती नसावा असे वाटते.

## १०९ राम

अयोध्येचा राजा दशरथ याने पुत्रकामेष्टी यज्ञ केल्याने त्याला यज्ञपुरुषाने जे पायस दिले, ते भक्षण केल्याने त्याच्या तीन भार्यांना चार पुत्र झाल. त्यांतील कौसल्येपासून झालेला राम हा ज्येष्ठ होय. हा विष्णूचा अवतार मानला जातो. ब्रह्मदेवाने रावणाला मर्यादित अवध्यत्वाचा जो वर दिला होता, त्यात मानवाचा उल्लेख नव्हता. म्हणून त्याच्या वधासाठी देवांच्या विनंतीवरून विष्णूने रामावतार घेतला राजपुरोहित वसिष्ठाकडून शस्त्रे व शास्त्रे ह्याचे ज्ञान रामाला झाले, विश्वामित्राने यज्ञसंरक्षणार्थ दशरथाकडे ह्याची मागणी केली. त्याचेकडून अनेक विद्या, अस्त्रे, कथा इत्यादींचा ह्याला लाभ झाला. ह्याने ताटका व सुबाहू यांना ठार केले आणि मारीचाला उडवून दिले. मिथिला नगरीतील जनकाच्या शिवधनुष्याचा भंग केला. त्याची कन्या सीता हिच्याशी रामाचा विवाह झाला. दशरथाने ह्याला यौवराज्याभिषेक करण्याचे योजिले असता कैकेयीने तिला पूर्वी देऊ केलेल्या दोन वरांची मागणी करून रामाला चौदा वर्षे वनवासात धाडले. ह्याच्याबरोबर लक्ष्मण व सीता वनात गेली आणि पुत्रवियोगाने दशरथ मरण पावला. रामाला वनवासात धाडते वेळी भरत अयोध्येत नव्हता. तो आल्यावर जेव्हा त्याला सारा वृत्तान्त कळला तेव्हा तो अत्यंत दुःखी झाला. आपल्या आईच्या अट्टाहासामुळे हे सारे घडल्याने त्याने तिची निर्भर्त्सना केली व तो रामाला परत अयोध्येला आणण्यासाठी गेला. त्याचा प्रयत्न विफल झाला. रामाच्या पादुका घेऊन तो परतला व संन्यस्त वृत्तीने राहून रामाच्या नावाने राज्याचे पालन केले. वनवासात रामाला अनंत अडचणींना तोंड द्यावे लागले. कांचनमृगाचे विलोभन दाखवून रावणाने सीतेला पळवून लंकेला नेले. तिचा भार्या होण्यासाठी अनुनय केला. तिला विलक्षण त्रास दिला, परंतु ती वश झाली नाही. सीतेच्या शोधार्थ रामाने लक्ष्मणाच्या

साहाय्याने खूप श्रम घेतले. सुग्रीवाशी मैत्री राखून वालीचा वध केला आणि हनुमानासारखा निष्ठावंत सखा मिळवला. बिभीषणाला आपल्याकडे वळवून वानरांच्या साहाय्याने लंकेवर स्वारी केली. रावणवध करून सीतेची मुक्तता केली. अग्निदिव्याने तिची शुद्धता पारखून तिचा स्वीकार केला. बिभीषणाला लंकेचे राज्य देऊन अयोध्येला परतला. भरताने संभाळलेल्या राज्याचा स्वीकार केला. लोकापवाद टाळण्यासाठी गरोदर अवस्थेतही सीतेचा ह्याने त्याग केला. तिने वाल्मीकी आश्रमात लव-कुश या दोन जुळ्या पुत्रांना जन्म दिला. अवतारकार्य संपल्याची सूचना रामाला कालाने येऊन दिली आणि ह्याने महाप्रस्थान केले.

राम सत्यवचनी होता. पित्राज्ञेचे पालन करण्यासाठी राज्यावरील हक्क सोडून देऊन ह्याने आनंदाने वनवास पत्करला. सीतेवर ह्याचे निरतिशय प्रेम असूनही, ती शुद्ध आचरणाची आहे ही खात्री असतानाही तिची अग्निदिव्याने परीक्षा करून स्वीकार केला व राजाचे चारित्र्य निष्कलंक असावयास हवे म्हणून लोकपवादासाठी सीतेचा त्याग केला. ह्याने एकपत्नीव्रत अत्यंत काटेकोरपणे पाळले आणि समाजापुढे एक आदर्श निर्माण केला. दुष्टांचा संहार करताना सुष्टांच्या संरक्षणाची जबाबदारी स्वीकारली.

राम जेवढा कर्तव्यदक्ष होता, तितकाच तो कर्तव्यकठोरही होता. ह्याचे लक्ष्मणावरील प्रेम अतुलनीय होते. त्याच्याशिवाय ह्याला क्षणभरही चैन पडत नसे. अतिशय जबाबदारीची व कठोर कामे ह्याने त्याचेवर सोपवली होती. तरीही त्याच्या आज्ञेचे उल्लंघन उदात्त हेतूने लक्ष्मणाने केले असताही त्याचा त्याग केला व पाठोपाठ आपणही महाप्रस्थान केले. ह्याच्या निःस्वार्थीपणाला तोड नाही. शरभंग ऋषीने आपण होऊन स्वसंपादित ब्रह्मलोक व स्वर्गलोक ह्याला देऊ केले असता ते स्वीकारण्यास अत्यंत विनयपूर्वक नकार दिला. भरद्वाज मुनीने वर देऊ केला असता 'अयोध्येच्या मार्गावरील वृक्ष ऋतू अनुकूल नसताही सर्वदा पुष्प, फल, पर्ण यांनी युक्त असे असावे' अशी इच्छा व्यक्त केली. शंबूकाच्या वधाने संतुष्ट झालेल्या देवांना ब्राह्मणपुत्रास जिवंत करण्याची विनंती केली. सीतात्याग आणि वालीचा वध याबाबत रामाच्या हातून जे वर्तन घडले, ते सर्वथैव समर्थनीय वाटत नाही. तीच गोष्ट शंबूकाच्या वधाची.

रामाचे सारे जीवन, वर्तन आदर्श आहे. हा एक अलौकिक मानव, मर्यादापुरुषोत्तम आहे. कर्तव्यपूर्ती ही याची जीवननिष्ठा होती. पुत्र, पती, भ्राता, शास्ता, मित्र ह्या सर्व नात्यांनी आपल्या कर्तव्यकठोर वर्तनाने याने समाजापुढे आदर्श निर्माण केले. याच्या काही निर्णयामुळे क्वचित काही व्यक्तींवर अन्याय झाल्यासारखे भासले, तरी याला समष्टीच्या कल्याणाची सदैव जाणीव होती.

## ११० रावण

पुलस्त्य-पुत्र विश्रवा आणि सुमाली राक्षसाची कन्या कैकसी यांचा मुलगा, कुबेराचा सावत्र भाऊ. आईने कुबेरासारखे होण्यास सांगितल्यावरून गोकर्ण क्षेत्री दहा हजार वर्षे ह्याने उग्र तपश्चर्या केली. एक हजार वर्षे पूर्ण होताच हा एकेक मस्तक अग्नीत हवन करीत असे. अशा रीतीने दहावे मस्तक अर्पण करण्यापूर्वी ब्रह्मदेव प्रसन्न झाला आणि ह्यास मर्यादित अवध्यत्वाचा वर दिला. पद्म पुराणानुसार हा वर शंकराने दिला. ब्रह्मदेवाने आणखी एका वराने हवन केलेली सर्व मस्तके परत करून त्यास 'दशानन', 'दशग्रीव' केले. हा कुबेराची लंका स्वताकडे घेऊन लंकाधीश झाला. मयाची कन्या मंदोदरी ही ह्याची भार्या. तिच्या खेरीज ह्याच्या हजार स्त्रिया होत्या. मंदोदरीपासून झालेला पुत्र मेघनाद. अतिकाय, त्रिशिरा, नरांतक, देवांतक असे आणखीही पुत्र होते. कुंभकर्ण आणि बिभीषण हे दोन बंधू व भगिनी शूर्पणखा प्रहस्त, महोदर, मारीच, शुक, सारण, महापार्श्व, धूम्राक्ष आदी रावणाचे अमात्य होते. हा अतिबलाढ्य होता व वरांमुळे सर्वांना अजिक्य झाला होता. कुबेराशी युद्ध करून ह्याने त्याचे पुष्पक विमान मिळवले. ह्याने अनेक राजांचा पराभव केला. शंकराविषयी अनादराचे उद्गार काढताच नंदीश्वराने ह्याला यथायोग्य जाणीव दिली. पायाच्या अंगठ्याने पर्वत उखडून टाकणाऱ्या रावणाचा हात दाबून शंकराने ह्याचा गर्व हरण केला. यमाबरोबरच्या युद्धात ह्याला मृत्यू आला असता, परंतु ब्रह्मदेवाने मध्यस्थी करून यमाला युद्धपराङ्मुख केले. निवातकवचांवर ह्याला जय मिळू शकला नसता, हे जाणून ब्रह्मदेवाने त्यांच्याशी सख्य घडवून आणले. मरुत्ताने यज्ञदीक्षा घेतली असल्याने युद्ध त्याला वर्ज्य होते, त्यामुळे रावणाचा पराभव टळला. वालीशी युद्ध करण्यास गेला असता त्याने ह्यास बगलेत मारून नेले. त्याचे सामर्थ्य जाणून अग्नीच्या साक्षीने रावणाने त्याच्याशी सख्य केले.

स्त्रियांवर बलात्कार करण्यात हा सराईत होता. अनेक साध्वी स्त्रियांच्या आप्तेष्टांना ठार मारून त्यांचा ह्याने त्यांच्या इच्छेविरुद्ध जबरीने उपभोग घेतला. पुंजिकस्थला व रंभा या अप्सरांवर ह्याने केलेल्या बलात्कारामुळेही रावण ब्रह्मदेवाच्या व नलकूबराच्या शापांना पात्र झाला. वेदवतीशी गैरवर्तन करताच तिने याच्याकडून भ्रष्ट होण्यापेक्षा आत्मदहन करण्याचा मार्ग स्वीकारला आणि ह्याच्या वधासाठी पुन्हा स्त्रीजन्म घेण्याची प्रतिज्ञा केली. वेदवती सीतेचा पूर्वावतार मानली जाते. सीतेच्या स्वयंवराचे वेळी रावण तेथे गेला होता, परंतु त्याला शिवधनुष्य पेलले नाही. मारीचाने रामलक्ष्मणाच्या सामर्थ्याची पूर्वकल्पना रावणाला दिली होती, परंतु ह्याने त्याला सीताहरणाच्या कार्यात साहाय्य करण्यास भाग पाडले. साहाय्य न केल्यास ठार करण्याची धमकी दिली. बिभीषणाने सीता-

हरणाबद्दल रावणाची निर्भर्त्सना केली परंतु ती ह्याने मानली नाही. सीतेच्या अनुनयात आलेले अपयश सहन न होऊन ह्याने तिचा वधही केला असता, परंतु इतरांनी ह्यास त्यापासून परावृत्त केले. रामाचा वध झाल्याचा मायावी देखावा सीतेपुढे उभा करून तिला वश करण्यातही ह्याला दारुण अपयश आले.

अनरण्य, मांधाता ह्या राजांना जिंकून ह्याने आपले सामर्थ्य प्रकट केले. हनुमानाची शेपटी पेटवून देऊन आपल्याच हाताने लंकादहन करविले. मानवाला कस्पटासमान लेखणाऱ्या रावणाला युद्धात रामाला सहज जिंकू असा गर्व होता, परंतु ह्याच्या सैन्यातील अतिरथी, महारथी एकामागून एक ठार होऊ लागल्याने आणि विशेषतः अतिकाय, कुंभकर्ण ह्यांच्या वधाने ह्याचे धैर्य ढासळू लागले. इंद्रजिताच्या वधाने हा फार खचला. काही वेळा युद्धात ह्याची सरशी झाली तरी फार काळ टिकाव धरता येणार नाही, ही जाणीव ह्याला होऊ लागली. मरणोत्तर शत्रुत्व उरत नाही, हे जाणून रामाने त्याचे यथोचित अंत्यसंस्कार करविले. ब्रम्हदेव आणि शंकर यांच्या वरांनी ह्याचा अहंकार, उन्मत्तपणा, बेछूटपणा, क्रूरपणा वाढीस लागला. शंकराकडून चंद्रहास खड्ग आणि ब्रम्हदेवाने दिलेला सिद्धिमंत्र यामुळे हा मनःपूत वागत होता. एरवी कुणालाही न जुमानणारा निर्भय रावण ब्रम्हदेवाच्या शापाने विलक्षण भयभीत झाला होता. महापार्श्वाजवळ ह्याने तशी स्पष्ट कबुलीही दिली आहे. ह्या शापाच्या भीतीनेच हा सीतेला स्पर्श करण्यास कचरत होता.

## १११ रुद्र (महादेव, हर, शिव)

रुद्र ही एक पिंगट रंगाची जटाधारी, शत्रुसंहारक, पराक्रमी देवता असून प्राण्यांचा जीव घेत असल्याने भीतिदायक आहे. औषधाने रोग बरे करण्याचे ज्ञान ह्या देवतेला आहे. धनुष्यबाण व वज्र धारण करणारी देवता असे ऋग्वेदात वर्णन केले आहे. शतपथ ब्राम्हणात अग्नीला रुद्र म्हटले असून शर्व, भव, पशुपती असेही संबोधले आहे. प्रजापतीने दुहितृ-गमन केले असता त्याला शिक्षा करण्यासाठी रुद्र उत्पन्न झाला, असे ब्रम्हपुराण, ऐतरेय व शतपथ ब्राम्हणांत दिले आहे. विष्णुपुराणानुसार ह्याची उत्पत्ती ब्रम्हदेवाच्या भृकुटीपासून झाली असून मत्स्य पुराणात ह्याचे वर्णन अर्धनरनारी देहधारी असे केले आहे. प्रजोत्पादनार्थ चिंतन करीत बसलेल्या ब्रम्हदेवाला अगोदर तांबडा व नंतर निळा असा जो पुत्र झाला तो रुद्र होय असे स्कंद पुराणाचे मत आहे. एकूण अकरा रुद्र असून निरनिराळ्या ग्रंथांतून त्यांची नावे वेगवेगळी आढळतात.

दक्षकन्या सती ही ह्याची पत्नी असून नंतर तीच हिमालय-कन्या म्हणून जन्मलेल्या पार्वती (उमा)शी ह्याने विवाह केला. एकदा ब्रम्हदेवाने निर्माण केलेल्या अप्सरे[illegible] मोहित झाला. परंतु पार्वती [illegible] कडे

वळून पाहता येईना, म्हणून दर्शनसुखार्थ ह्याला चार तोंडे फुटली. पार्वतीला हे नारदाकडून कळले असता तिने त्याचे डोळे झाकले. तेव्हा ह्याला तृतीय नेत्र प्राप्त झाला. वीरभद्राकरवी ह्याने दक्षाच्या यज्ञाचा विध्वंस करविला आणि भैरवाकडून ब्रम्हदेवाच्या पाचव्या मस्तकाचा उच्छेद केल्याने ब्रम्हहत्येचा यास दोष लागला. हा भूतपिशाचांचा अधिपती असून ह्याचे वास्तव्य स्मशानात असे. भूतपिशाचांच्या गणांचे अधिपती वीरभद्रादी ह्याचेच पुत्र होत. अनेक ऋषींच्या वृत्ती तामसी बनविण्याचे श्रेय ह्याचेकडेच जाते. बाण, भस्मासुर, रावण ह्यांच्या बाबतीतील ह्याचा भोळेपणा विख्यात आहे. गंधमादन पर्वतावर पडत असलेल्या गंगेला ह्याने आपल्या मस्तकी जटेत धारण केले. त्यामुळे ती ह्याची पत्नी समजली जाते. ह्याच्या वसति-स्थानाबाबत मतभेद आहेत. मेरुपर्वत, उत्तर ध्रुव, कैलास, हिमालय अशी अनेक स्थाने दिली जातात.

महादेव, हर, शिव, शंकर ही ह्याचीच नावे होत. अपत्यप्राप्तीच्या इच्छेने पार्वतीशी बराच काळ संगत असता देवांना भीती उत्पन्न झाली. त्यांनी रतिक्रीडेत व्यत्यय आणला, म्हणून पार्वतीने (उमेने) देवांना व त्यांना अप्रत्यक्षपणे साहाय्य करणाऱ्या पृथ्वीला निःसंतान होण्याचा शाप दिला. त्यामुळे महादेव पर्वतावर जाऊन तप करू लागला. भगीरथाच्या तपस्येने संतुष्ट झालेल्या शिवाने त्याच्या इच्छेस्तव आकाशातून पडणाऱ्या गंगेला शिरोधार्य मानले. समुद्र-मंथनातून उत्पन्न झालेले विष प्राशन केले आणि हनुमान व मधू दैत्य यांना वर दिले. रामाला अयोध्येचे राज्य करण्यास, अश्वमेध यज्ञ करण्यास आणि इंद्रलोकातून आलेल्या विमानस्थ दशरथ राजाला अभिवादन करण्यास ह्यानेच सांगितले. एकदा पार्वतीसह आकाशमार्गे जात असता सालकटंकटेने परित्यक्त केलेला बालक सुकेश ह्याने अवलोकन केला. त्याची दया येऊन ह्याने त्यास अमरत्व दिले. पार्वतीकडे डोळा मिचकावणाऱ्या कुबेराचा तिच्या शापाने डावा डोळा खाक होऊन उजवा पिंगल झाला. तेव्हा त्याने महादेवाला प्रसन्न करून त्याच्याची सख्य केले. एकदा पार्वतीसह शिव एका पर्वतावर क्रीडा करीत असता नंदीश्वराने प्रवेश नाकारल्याने क्रुद्ध होऊन रावण तो पर्वत उपटून टाकण्यास उद्युक्त झाला. तेव्हा पायाच्या अंगठ्याने हात दाबून ह्याने रावणाचा बेत उधळून लावला. रावणाने तपस्येने ह्याला संतुष्ट केले असता ह्याला चंद्रहास नावाचे दिव्य खड्ग आणि शेष आयुष्य सशर्त दिले. इल राजाला स्त्रीत्व प्राप्त झाले असता कर्दमाने शिवप्रिय अश्वमेध यज्ञ करून प्रसन्न केले आणि इलाला पुन्हा पुरुषत्वाची प्राप्ती झाली.

## ११२ लक्ष्मण

दशरथ आणि सुमित्रा यांचा थोरला मुलगा आणि शत्रुघ्नाचा सख्खा भाऊ.

रामावर विलक्षण प्रेम, भक्ती, आदर. स्वताच्या सुखदुःखाची यत्किंचितही पर्वा न करता आयुष्यभर रामाची निरंतर एकनिष्ठ सेवा केली. रामाबरोबर स्वेच्छेने वनवास पत्करला. ह्याच्या पत्नीचे नाव उर्मिला. ह्याला शस्त्रास्त्रांचे उत्कृष्ट ज्ञान होते. राम-रावण-युद्धात ह्याच्या पराक्रमाचे तेज प्रकट झाले. यज्ञरक्षणार्थ विश्वामित्राने लक्ष्मणालाही रामाबरोबर नेले होते. ताटका, शूर्पणखा आणि अयोमुखी यांचे नाक, कान कापून त्यांना जरब बसवली. अतिकाय, विरूपाक्ष या राक्षसांना यमसदनी धाडले. मेघनाद होम पूर्ण करून निकुंभिलेतून बाहेर येण्यापूर्वीच ह्याने बिभीषणाच्या सांगण्यावरून त्यांचा वध केला. आनंद रामायणानुसार अयोध्या सोडल्यापासून बारा वर्षे लक्ष्मण आहारनिद्रारहित होता, त्यामुळे केवळ लक्ष्मणच ब्रह्मदेवाच्या वराप्रमाणे इंद्रजिताचा वध करण्यास लायक होता. ह्याला अन्याय बिलकुल सहन होत नसे. कैकेयीला संतुष्ट करून निरपराध रामाला वनवासात धाडणाऱ्या दशरथाचा - पित्याचा ह्याला विलक्षण राग आला होता. त्याचा वध करण्यास हा उद्युक्त झाला होता. त्याचप्रमाणे रामाच्या भेटीसाठी येणाऱ्या भरताविषयीही हा साशंक असल्याने कैकेयीसह त्याचा वध करण्याची त्याची इच्छा होती. परंतु रामाने ह्याची समजूत घातली व परावृत्त केले. सुग्रीव जेव्हा दिलेला शब्द पाळण्यात दिरंगाई करू लागला व केवळ सुखोपमग्न झाला तेव्हा अत्यंत दाहक शब्दांत ह्याने त्याला समज दिली. सीतेचे केवळ पायच त्याला ज्ञात होते. तिचे त्याने मुखावलोकन केले नव्हते, इतका तो मर्यादशील होता. परंतु त्याच सीतेने त्याच्या चारित्र्याविषयी शंका घेतली व त्याच्यावर घाणेरडे आरोप केले, तेव्हा तो अत्यंत व्यथित झाला. तरीही पुढे सीताशोधार्थ ह्याने जिवाचे रान केले. वेळोवेळी ह्याने रामाला जो उपदेश केला, त्याचे कोपशमन केले त्यावरून ह्याची बुद्धिमत्ता, शांत वृत्ती दिसून येते. हा चाणाक्ष होता. कांचनमृग हा मायावी राक्षस आहे, हे त्याने हेरले होते व तसे रामाला सांगितलेही होते.

रावणाने ह्याच्यावर शक्तीचा प्रयोग केला असता हा मूर्च्छित झाला, परंतु हनुमानाने आणलेल्या औषधीने शुद्धीवर आला. हा रामाला वेळोवेळी जो सल्ला देई तो पितृतुल्य असे– अशी रामाची समजूत होती. अत्यंत दुर्घट आणि निष्ठुर कार्ये रामाने त्याच्यावर सोपविली असता, स्वताला ती पटली नसूनही केवळ रामाची आज्ञा म्हणून ह्याने अत्यंत निर्धाराने पार पाडली. गरोदर सीतेला वनात सोडून येण्याची अवघड कामगिरी ह्यालाच करावी लागली, तर राम आणि काल यांचा एकांतात संवाद चालू असता दुर्वास ऋषीने रामाची भेट मागितली व ती लवकर करून न दिल्यास शापाची धमकी दिली, त्या वेळी मृत्यूला सामोरे जाऊन ह्याने कुलसंहार टाळला. ह्याचा त्याग अतुलनीय आहे. लक्ष्मण मितभाषी, सौम्य, परंतु प्रसंगी अत्यंत [illegible] होता.

## ११३ लवण

मधू व कुंभीनसी यांचा मुलगा. लहानपणापासून पापाचरणी होता. शंकराच्या वराने मधुदैत्याला एक शूल प्राप्त झाला होता. तो आपल्या वंशात कायम रहावा अशी त्याची इच्छा होती. परंतु शंकराने तो केवळ एकाच पुत्रापाशी राहील व तो हाती असेपर्यंत कोणीही त्याचा वध करू शकणार नाही, असे सांगितले. वारसा-हक्काने तो शूल लवणाला प्राप्त झाला. त्यामुळे हा उन्मत्त झाला. रामाने शत्रुघ्ना-कडे ह्याच्या वधाचे कार्य सोपविले. शत्रुघ्नाने हा शूलविरहित असतानाच ह्याचा वध केला.

## ११४ वरुण

एक मंत्रद्रष्टा. मित्रावरुणांच्या कुंभात स्खलन झालेल्या तेजापासून जन्म. पश्चिम दिशेचा, नागलोकाचा व जलाचा अधिपती. ह्याची भार्या वारुणी–गौरी. गो हा पुत्र व सुनाभ मंत्री. शुक्राचार्यांची कन्या ज्येष्ठा ही दुसरी भार्या. हिच्या-पासून ह्याला बल, सुरा, अधर्म, पुष्कर, बंदिन असे पुत्र झाले. सोमकन्या भद्रा हिच्याशी ह्याचा विवाह व्हावयाचा होता, परंतु तो दुसऱ्याशी झाल्याने ह्याने तिला पळवून नेली. देवांनी ह्याला जलाधिपती म्हणून अभिषेक केला. रावणाच्या घरून सोडवून आणलेली सीता निर्दोष असल्याबाबत ह्याने रामाची खात्री करून दिली. रुद्राच्या यज्ञातून निर्माण झालेल्या अंगिरसाचा पुत्र म्हणून ह्याने स्वीकार केला. ह्याची मानसोत्तर पर्वतामागे निम्लोचनी नावाची नगरी होती. एक आदित्य देवता.

पहा : शाप – मित्र < उर्वशी, पृ. ७३–७४

## ११५ वसिष्ठ

प्राचीन ग्रंथातून ‘ वसिष्ठ ’ या नावाचे जे उल्लेख आढळतात, ते सारे एकाच व्यक्तीचे नसावेत. ह्या नावाच्या एकाहून अधिक व्यक्ती असाव्यात. वसिष्ठ हा ऋग्वेदाच्या सातव्या मंडलाचा द्रष्टा असून ह्याने सूक्त केल्याचा मंत्रांत निर्देश आढळतो. उर्वशीमुळे मित्रावरुणांच्या तेजाने कुंभ अथवा कमल यातून हा जन्मास आला. वसिष्ठ–विश्वामित्राचे भांडण ऋग्वेदातही आढळते. हा सुदासाचा पुरोहित होता व त्यामुळेच ह्या दोघांत वैमनस्य उत्पन्न झाले. स्वायंभुव मन्वंतरातील ब्रह्म-देवाच्या दश मानसपुत्रांतील एकाचे नाव वसिष्ठ आहे. कर्दम प्रजापतीची कन्या अरुंधती आणि दक्ष-कन्या उर्जा या याच्या दोन भार्या होत्या. ह्याची उत्पत्ती ब्रह्मदेवाच्या प्राणवायूपासून झाली. कामधेनूच्या साहाय्याने वसिष्ठाने विश्वा-

मित्राचे आपल्या आश्रमात उत्तम स्वागत केले. तेव्हा विश्वामित्राने ह्याचेजवळ कामधेनूची मागणी केली. ती नाकारली असता जेव्हा विश्वामित्र कामधेनूला बलात्काराने नेण्याचा प्रयत्न करू लागला तेव्हा तिच्या शरीरातून शक, पल्लवादी म्लेच्छ उत्पन्न झाले व त्यांनी विश्वामित्राचा पराभव केला. तेव्हापासून ब्राम्हतेज हे क्षात्रतेजापेक्षा श्रेष्ठ असल्याची विश्वामित्राची खात्री झाली आणि ते मिळवण्याचा त्याने प्रयत्न केला. इतकेच नव्हे तर त्याला प्राप्त झालेल्या 'ब्रम्हर्षी' पदास त्याने वसिष्ठाची अनुमती मिळवली. वसिष्ठ स्मृती, वसिष्ठ तंत्र, वसिष्ठ पुराण इत्यादी अनेक ग्रंथ ह्याच्या नावावर आढळतात.

इक्ष्वाकुकुलाचा पुरोहित. मारीच आणि सुबाहू या राक्षसांचा विश्वामित्राच्या यज्ञाला होणारा उपद्रव टाळण्यासाठी ह्याने रामाला विश्वामित्राबरोबर पाठविण्याचा सल्ला दशरथाला दिला. सदेह स्वर्गाला जाऊ इच्छिणाऱ्या त्रिशंकूच्या यज्ञाला जाण्याचे नाकारले. रामाला यौवराज्याभिषेकाची अभिषेकपूर्व व्रतदीक्षा ह्याने दिली. दशरथाच्या मृत्यूनंतर भरताला बोलावून आणून त्याकडून उत्तरक्रिया करविली. सीतेने वनात जाताना वल्कले नेसण्याबाबत कैकेयीने आग्रह धरताच वसिष्ठाने तिची कानउघाडणी केली आणि तिने मागितलेल्या वरात सीतेचा वनवास मागितलेला नाही, असे स्पष्ट बजाविले. भरताबरोबर रामदर्शनासाठी वसिष्ठही गेला होता. निमी आणि सौदास राजांना वसिष्ठाने शाप दिले असून निमीचा प्रतिशाप त्यास भोवला आहे. दुर्वास ऋषी वसिष्ठाच्या आश्रमात एक संवत्सर राहिला होता. दशरथाच्या घरातील सर्व धार्मिक विधी वसिष्ठाने केले. रामाच्या महाप्रस्थानाचे वेळीही ह्याने धार्मिक विधी केला.

वसिष्ठाचे महोदयादी शंभर पुत्र होते. यज्ञाचे आमंत्रण नाकारल्यास्तव विश्वामित्राने त्यांना शाप दिला होता.

## ११६ वसिष्ठपुत्र महोदय

वसिष्ठपुत्र शंभर होते. ते महातपस्वी होते. विश्वामित्राने त्यांना शाप दिला होता. त्यांपैकी एक महोदय.

पहा : शाप – विश्वामित्र ८ वसिष्ठपुत्र महोदय, पृ. २१ ते २३

## ११७ वायू

वायूने अंजनेच्या ठिकाणी हनुमानाची उत्पत्ती केली. कुशनाभाच्या शंभर कन्यांवर अनुरक्त होऊन त्यांना भार्या होण्याची ह्याने विनंती केली, परंतु त्यांनी तिचा अव्हेर करताच वायूने त्यांचा अंगभंग करून त्यांना कुब्जा बनवले. इंद्राच्या वज्राने हनुमानाची हनू [illegible] ह्याने

त्रैलोक्यातील संचार बंद केला, त्यामुळे सर्व प्राणिमात्रांना श्वासोच्छ्वास करणे अशक्य झाले. देवांनी ही गोष्ट ब्रह्मदेवाच्या निदर्शनाला आणली असता ह्याने वायूची समजूत घातली, जखमी हनुमानाच्या अंगावरून हात फिरवून त्यास पूर्ववत केले, इतकेच नव्हे तर स्वता आणि अन्य देवांकडून हनुमानाला अनेक वर देववून त्यास बलशाली केले. असे झाले असता वायूने आपला संचार नेहमीप्रमाणे चालू केला.

## ११८ वाली

ऋक्षपत्नी विरजेला इंद्रापासून झालेला पुत्र. ह्याची जन्मकथा विचित्र आहे. ऋक्षरजस वानराला तहान लागली असता तो एका सरोवरावर आला. पाण्यातील स्वताचे प्रतिबिंब शत्रू समजून त्याने पाण्यात उडी टाकली. तो बाहेर आला तेव्हा पूर्वीचा वानर न राहता स्त्री झाला. अंतरीक्षात संचार करणाऱ्या इंद्र व सूर्य ह्यांनी ही स्त्री पाहिली तेव्हा ते कामविव्हल झाले. कामविकाराच्या उत्कटतेमुळे इंद्राचे वीर्य त्या स्त्रीच्या मस्तकावर तर सूर्याचे मानेवर पडले. केसांवर (बालांवर) वीर्य पडल्याने वाली व ग्रीवेवर पडल्यामुळे सुग्रीव जन्माला आले. ती रात्र संपताच त्या स्त्रीला पुन्हा पूर्वीचे वानररूप प्राप्त झाले. आनंद रामायणात रामाने वालीला मारण्याबाबतची वाली व साप यांनी एकमेकाला दिलेल्या शापांची कथा आहे. पंचमेढू राक्षसाने वालीला गिळले असता वीरभद्राने राक्षसाला उभा चिरून वालीची सुटका केली. वालीने आपल्या सामर्थ्याने रावणाला चकित केले व त्याच्याशी सख्य केले. याचा अमात्य तार, त्याची कन्या तारा ही वालीची पत्नी. दुंदुभीचा पुत्र मायावी व वाली यांचे एका स्त्रीमुळे वैर निर्माण झाले व वालीने त्याला ठार केले. राक्षसाला ठार मारण्यासाठी वाली एका गुहेत गेला असता द्वाररक्षणाचे काम सुग्रीव करीत होता. वाली बरेच दिवस परत न आल्याने व गुहेतून रक्ताचा लोट बाहेर आलेला पाहून वालीला राक्षसाने ठार मारले असावे, अशी सुग्रीवाची कल्पना झाली. एका शिळेने गुहेचे तोंड बंद करून वालीचे उत्तरकार्य करून सुग्रीव किष्किंधेला गेला. मंत्र्यांच्या आग्रहावरून स्वताच्या इच्छेविरुद्ध त्याला राज्याभिषेक करवून घ्यावा लागला. पुढे राक्षसाला ठार करून वाली परत आला. सुग्रीवाला प्राप्त झालेले राज्यपद वालीला रुचले नाही. तो संतप्त झाला. सुग्रीवाने त्याची समजूत घालण्याचा भरपूर प्रयत्न केला, परंतु त्याचा काही उपयोग झाला नाही. वालीने त्याची पत्नी रुमा हिचे अपहरण करून सुग्रीवाला हाकून लावले. तेव्हा सुग्रीव ऋष्यमूक पर्वतावर जाऊन राहिला. रामाची व सुग्रीवाची मैत्री झाल्यावर वालीवधासाठी राम सज्ज झाला. सुग्रीवाला रामाचे पाठबळ असल्याने त्याच्याशी युद्ध करू नये, असे तारेने वालीला

परोपरीने सांगितले; परंतु वालीने ते मानले नाही. रामाने ह्याच्या वक्ष:स्थलावर शराघात करून निश्चेष्ट स्थितीत भूमीवर पाडले. रामाने अधर्माने त्याला मारले, अशी वालीने त्याची निंदा केली. परंतु रामाने स्वताचे वागणे धर्माला कसे धरून आहे, हे ह्याला पटवून दिले. तेव्हा ह्याने रामाची क्षमा मागितली. अंगदाचे रक्षण करण्याविषयी प्रार्थना केली. सुग्रीवाने ही अंगदाचा औरस पुत्राप्रमाणे प्रतिपाळ केला व वालीची अंतीम इच्छा पूर्ण केली.

## ११९ वाल्मीकी

संस्कृत भाषेचा आदिकवी. ह्याच्या चरित्राची प्रामाणिक माहिती उपलब्ध झालेली नाही. प्राचीन वाङ्मयात भार्गव वाल्मीकी, दस्यू वाल्मीकी आणि कवी वाल्मीकी अशा तीन वाल्मीकींचे उल्लेख आढळतात. त्यांच्या विषयीच्या कथांमध्येही बरीच विविधता आहे.

एक ब्रह्मर्षी. सुमती नावाच्या एका ब्राह्मणाचा पुत्र. हा लहान असतानाच ह्याचे आई-बाप ह्याला एका किराताजवळ पालन करण्यास ठेवून तप करण्यास निघून गेले. पुढे हा किराताच्या संगतीने आपले ब्राह्मण्य विसरून चोरी करू लागला. त्याचप्रमाणे इतर लोकही त्याला कोळी म्हणू लागले. एकदा काही महर्षी त्याच्या स्थानावरून जात असता त्यांना ह्याने लुटावयास आरंभ केला. परंतु त्या ऋषींनी ह्याला उपदेश केला. तेव्हापासून त्याला उपरती झाली व त्याने त्या ऋषींनी दिलेल्या राममंत्राचा जप सुरू केला. बराच कालपर्यंत एकाच जागी तप केल्यामुळे ह्याच्या अंगावर वारूळ वाढले. नंतर त्याच महर्षींनी त्याला बाहेर काढले व ‘ वाल्मीकी ’ असे त्याचे नाव ठेवले. अशी कथा स्कंद पुराणात आहे.

वाल्मीकीसंबंधी दुसरीही एक कथा स्कंद पुराणात आढळते. ‘ पूर्वी एक कणू नामक ब्राह्मण होता. त्याने बरीच वर्षे तप केले. तप पूर्ण झाल्यावर त्याला आपल्या स्त्रीचे स्मरण झाले व त्यामुळे त्याचे वीर्य स्खलन झाले. ते एका वनचरीने गिळले. त्यामुळे तिला एक पुत्र झाला. त्या पुत्रावर महर्षींचा प्रसाद होऊन त्याला ब्राह्मण्य लाभले व तो पुढे वाल्मीकी म्हणून प्रसिद्धीस आला. ’ तमसेच्या तीरावर आश्रम स्थापून तो अध्यापन करू लागला. त्याचा शिष्य-परिवार मोठा होता. त्यांत भरद्वाज प्रमुख शिष्य होता. रामाने सीतेचा त्याग केल्यावर ह्यानेच तिचा सांभाळ केला. त्या वेळी ती गरोदर होती. ह्या ऋषीच्या आश्रमातच ती यथाकाल प्रसूत झाली आणि तिने लव व कुश अशा दोन पुत्रांना जन्म दिला. त्यांचे संगोपन करून त्यांचा विद्याभ्यास ह्याच मुनीने करून घेतला. त्यांच्याकडून स्वरचित रामायण पढविले. एका ऋषीबरोबर पाखंडवाद केल्यामुळे ह्याला ब्रह्महत्येचा दोष लागला होता. परंतु महादेवाच्या उपासनेने त्याचे निरसन झाले.

'वाल्मीकी ऋषी हा जातीने शूद्र असून पुढे ऋषि-प्रसादाने त्यास ब्राह्मणत्व प्राप्त झाले. त्याचे पूर्वीचे नाव वाल्या कोळी होते.' या प्रचलित दंतकथेला कोठेच आधार सापडत नाही. वाल्मीकी रामायणात जेथे जेथे त्याचा उल्लेख येतो तेथे तो विद्वान ब्राह्मण असल्याचेच नमूद केलेले आढळते. 'प्राचेतसोऽहं दशमः पुत्रो राघवनंदन' (उत्तरकाण्ड ९६–१८) या श्लोकात खुद्द वाल्मीकीनेच आपली जन्मकथा सांगितली आहे. वाल्मीकीस ब्रह्मदेवाच्या वरामुळे रामाच्या जन्मापूर्वीच रामचरित्र लिहिता आले, ही प्रचलित समजूत निराधार आहे. वाल्मीकी हा रामाचा समकालीन किंवा त्याच्या नंतरच्या काळातील असावा.

'हे महर्षे, वर्तमानकाली या भूलोकावर बहुगुणसंपन्न असा कोण आहे? अर्थात् वीर्यवान, धर्मरहस्यवेत्ता, कृतज्ञ, सत्यवचनी, धर्माकरिता स्वीकारलेल्या व्रतांचा आपत्कालीही त्याग न करणारा, सदाचारसंपन्न, प्राणिमात्रांच्या हिताविषयी तत्पर, तत्त्ववेत्ता, समर्थ, दर्शन झाले असता लोकांना आनंद देणारा, मनोनिग्रही क्रोधादिकांचे संयमन करणारा, तेजस्वी, परोत्कर्षाविषयी मत्सर न धरणारा आणि युद्धकाळी क्रुद्ध झाला असता देवांनाही भीती उत्पन्न करणारा असा कोण आहे?' असा प्रश्न नारद ऋषीला वाल्मीकीने केला असता त्याने संक्षिप्त रूपाने रामकथा सांगितली. 'नारदापासून श्रवण केल्याप्रमाणे तू त्या बुद्धिप्रेरक रामाचे वृत्त कथन कर', अशी आज्ञा ब्रह्मदेवाने वाल्मीकीला केल्याचा स्पष्ट उल्लेख वाल्मीकी रामायणात आहे.

इसवी सनपूर्व पहिल्या शतकापासून वाल्मीकीला दाशरथी रामाचा घटनेशी समकालीन मानले गेले आहे. उत्तरकाण्डाच्या रचना-कालात अयोध्येच्या राजवंशाशी घनिष्ठ संबंध स्थापित केला गेला. तो दशरथाचा मित्र ठरला. रामाच्या-अश्वमेध प्रसंगी वाल्मीकीने सीतेच्या सतीत्वाची ग्वाही दिली. विष्णु-पुराणासारख्या पुराणात तो विष्णूचा अवतार व सव्वीसावा वेदव्यास मानला गेला आहे.

## १२० विद्युत्केश

हेती राक्षस व कालकन्या भया यांचा पुत्र. सालकटंकटा ह्याची भार्या. सुकेश पुत्र. सालकटंकटेने ह्याच्यापासून राहिलेला गर्भ मंदर पर्वतावर टाकून दिल्याने शंकराने त्याचे पालन केले.

## १२१ विराध

विराध हा जव व शतह्रदा यांचा पुत्र क्रौंचावट वनातील राक्षस. ब्रह्मदेवाच्या वरदानाने त्याला मर्यादित अवध्यत्व, अच्छेद्यत्व व अभेद्यत्व प्राप्त झाले होते.

त्यामुळे राम-लक्ष्मणांनी ह्या राक्षसाचे हात-पाय तोडून ह्याला खड्ड्यात पुरून टाकले. विराधाने पूर्वजन्मी मिळालेल्या शापाचा उल्लेख आपल्या पूर्ववृत्त-कथनात केला आहे. पूर्वजन्मी हा तुंबरू होता.

## १२२ विरोचन

प्रल्हादाचा पुत्र आणि बलीचा पिता. केशिनी नावाच्या राजकन्येने विरोचन आणि अंगिरसाचा पुत्र सुधन्वा यांपैकी जो श्रेष्ठ असेल, त्याला वरण्याचे ठरविले. श्रेष्ठत्व ठरविण्यासाठी ते प्रल्हादाकडे व कश्यपाकडे गेले. कश्यपाने सुधन्वा श्रेष्ठ असल्याचा निर्णय दिला व तो विरोचनाच्या प्राणाचा स्वामी झाला. परंतु प्रल्हादाच्या निःस्पृहतेमुळे त्याने आपले स्वामित्व सोडून दिले. हा सत्यलोकात आत्मज्ञानाच्या प्राप्तीसाठी गेला असता इंद्रही तेथे त्याच उद्देशाने आला होता. इंद्राला आत्मसाक्षात्कार झाला. परंतु ह्यास झाला नाही. ह्याने निराळा सिद्धान्त बांधून तशी शिकवण आपल्या अनुयायांना दिली.

सूर्याची आराधना करून याने एक मुकुट मिळविला. परंतु तो देताना सूर्याने बजावले की तो मुकुट दुसऱ्याच्या हाती जाता कामा नये, गेल्यास नाश ओढवेल. ह्याने देवांना त्रास देण्यास प्रारंभ केला असता विष्णूने स्त्रीरूप धारण करून ह्यास मोहित केले व त्याचा मुकुट हस्तगत करून त्याचा नाश केला, अशी कथा गणेशपुराणात आहे. हा इंद्राच्या नाशास उद्युक्त झाला असता इंद्राने तारकामय युद्धात ह्याचा नाश केला. कुंभ आणि निकुंभ हे त्याचे धाकटे भाऊ होत.

## १२३ विश्रवा (विश्रवस्)

ब्रह्मदेवाचा मानसपुत्र असा जो चौथा प्रजापती पुलस्त्य, त्याचा हा मानसपुत्र (सुन्दरकाण्ड २३/६-७). तृणबिंदू राजाच्या कन्येला पुलस्त्यापासून झालेला पुत्र. पुलस्त्य वेदाध्ययन करीत असता याच्या मातेने वेद श्रवण केला व त्या वेळी तिच्या गर्भात हा उत्पन्न झाला, म्हणून त्याचे नाव 'विश्रवा' असे ठेवण्यात आले (उत्तरकाण्ड २/३१-३२). हा श्रुतिमान, समदर्शी, व्रती मुनी होता. भरद्वाजाची कन्या देववर्णिनी ह्याची भार्या. तिच्यापासून सर्वगुणसंपन्न असा जो धर्मज्ञ पुत्र ह्याला झाला तो वैश्रवण. सुमाली राक्षसाची कन्या कैकसी हिने मनाने ह्यास वरले. सायंकाळी हा अग्नीत हवन करीत असता त्या क्रूर वेळी तिने संभोगाची इच्छा प्रकट केल्याने तिला रावण, कुंभकर्ण, शूर्पणखा अशी क्रूर अपत्ये आली. मात्र तिच्या विनंतीवरून शेवटचा पुत्र (बिभीषण) धर्मात्मा झाला. रावणाने कुबेराकडे लंकेची मागणी केली असता ह्याने त्याला लंका देऊन टाकून कैलास पर्वतावर वास्तव्य करण्यास सांगितले.

## १२४ विश्वकर्मा

प्रभास वसू व वरस्त्री (भुवना) यांचा पुत्र. ह्याने देवांची विमाने, शहरे निर्माण केली. घृताची अप्सरेशी ह्याचा संबंध आला व तिने नल वानराला जन्म दिला. हा सूक्त-द्रष्टा असून ह्याने विश्वजित याग केला. ह्याची कन्या संज्ञा ही विवस्वताची भार्या, परंतु तिला ह्याचे तेज सहन होईना. तेव्हा आपल्या जागी छायेची योजना करून ती पित्याकडे आश्रयास आली. विवस्वत ह्याचेकडे आला असता तिला सहन होईना इतकेच त्याचे तेज ठेवून बाकी काढून घेतले व ती तपश्चर्येला गेल्याचे सांगितले. त्या तेजाची ह्याने आयुधे तयार केली. विष्णूचे सुदर्शन, शंकराचा त्रिशूल, इंद्राचे वज्र ह्याने याच तेजापासून बनविले. इंद्रप्रस्थ, द्वारका, लंका, वृंदावन ही ह्याचीच निर्मिती होय. वास्तुशास्त्रावर ह्याने एक ग्रंथ लिहिला. माळी, कासार, शिंपल्याचे काम करणारे शिल्पी, शिंपी, सुतार, सोनार, पाथरवट यांची निर्मिती घृताची व विश्वकर्मा यांचेपासून झाली, असे ब्रम्हवैवर्त पुराणात दिले आहे. चक्रवान पर्वतावर सहस्र आरा असलेले चक्र विश्वकर्म्याने निर्माण केले असल्याचे सीता-शोधार्थ निघालेल्या वानरांना सुग्रीवाने सांगितले.

## १२५ विश्वामित्र

कुशिकाने इंद्रासारखा मुलगा व्हावा म्हणून तप केले असता आपल्यासारखा दुसरा कोणी होऊ नये, या इच्छेने इंद्रानेच त्याचा पुत्र होण्याचे ठरविले. त्याप्रमाणे त्याला गाधिन् (गाधी) नावाचा पुत्र झाला. त्याचा मुलगा विश्वामित्र. स्वभावाने अत्यंत तापट असला तरी करारी व उग्र तपश्चर्या करून आपले ईप्सित पूर्ण करून घेणारा होता. प्रतिसृष्टी निर्माण करण्याचे सामर्थ्य ह्याचे ठायी होते. वसिष्ठाशी ह्याचे भांडण होते. एकदा त्याच्या आश्रमात गेला असता वसिष्ठाने कामधेनूच्या साहाय्याने ह्याचे उत्कृष्ट स्वागत केले. ह्याने कामधेनूची केलेली मागणी वसिष्ठाने नाकारताच तिला बलात्काराने ओढून नेण्याचा प्रयत्न करीत असता तिच्या पोटातून शक, बर्बरादींचे सैन्य बाहेर पडले व त्यांनी विश्वामित्राचा पराभव केला. तेव्हा क्षात्रतेजापेक्षा ब्रम्हतेज श्रेष्ठ असल्याचे ह्याला कळले व ह्याच्या प्राप्तीसाठी उग्र तपश्चर्या केली. ब्रम्हर्षी पदाची प्राप्ती करून त्यास वसिष्ठाची अनुमती व मान्यता मिळवली. वसिष्ठाच्या व स्वताच्याही पुत्रांना शाप दिले. त्रिशंकूला सदेह स्वर्गप्राप्तीची इच्छा होती व ती पूर्ण करण्यासाठी ह्याने यज्ञ केला व त्याची स्वर्गात रवानगी केली. परंतु तेथून त्याला खाली ढकलण्यात आले. विश्वामित्राचा प्रयत्न असफल झाला. अंबरीषाने यज्ञपशू म्हणून शुनःशेपाला विकत घेतले. त्याला घेऊन जात असता त्याने विश्वामित्राला त्याच्या मामाला सोडविण्याची गळ घातली

तेव्हा स्वताच्या एका मुलाचा बळी देऊन शुन:शेपाला वाचवण्याचा ह्याचा प्रयत्न मुलांनी नकार दिल्याने साध्य होऊ शकला नाही. तेव्हा विश्वामित्राने त्याला दोन गाथा शिकवून त्याचे प्राण वाचवले. इंद्राने ह्याचा तपोभंग करण्यासाठी रंभेला नियुक्त केले असता ह्याने तिला शाप दिला.

मारीच आणि सुबाहू हे राक्षस ह्याच्या तपश्चर्येत विघ्ने आणीत. तपक्षय होऊ नये, यास्तव अंगी सामर्थ्य असूनही ह्याने त्यांना शाप दिली नाही. त्याचे निर्दालन करण्यासाठी दशरथाकडे रामाची मागणी केली. दशरथाने प्रथम कबुली देऊनही काही कारणे पुढे करून टाळाटाळ सुरू केली. तेव्हा वसिष्ठाने मध्यस्थी केल्यावर रामाला बरोबर घेऊन गेला. विश्वामित्राने रामाला अनेक कथा सांगितल्या. त्यांच्या पराक्रमाने आणि ताटकेच्या वधामुळे प्रसन्न होऊन बला व अतिबला ह्या विद्या आणि अनेक प्रभावी अस्त्रे त्यांना दिली. जनकाच्या यज्ञासाठी मिथिलेला घेऊन गेला. त्याचा पुरोहित शतानंद याने विश्वामित्रासारखा पालक लाभल्याबद्दल रामाचे अभिनंदन केले. रामलक्ष्मणादिकांचे विवाह ठरविण्यात ह्याचा मोठा भाग होता.

'विश्वामित्राचा आश्रम ताटकावनाजवळ होता. त्याचे नाव सिद्धाश्रम ह्याला शंभर पुत्र होते. त्यांपैकी मधुच्छंद हा मधला. ऋग्वेदाचे तिसरे मंडळ ह्याने व ह्याच्या कुलातील लोकांनी केले असून ते कुशिक ह्या नावाने ओळखले जाते.

## १२६ विश्वामित्र पुत्र

विश्वामित्राच्या मुलांची संख्या निरनिराळ्या ग्रंथांत वेगवेगळी दिली आहे. त्याला १०१ पुत्र होते, त्यापैकी मधुच्छंदस् हा मधला होता. ह्याने शुन:शेपाला हरिश्चंद्राच्या यज्ञातून सोडविले आणि त्याचे नाव 'देवरात' असे ठेवले. शुन:-शेपाला ज्येष्ठपणाचा मान द्यावयास सांगितले असता आपल्या मुलांपैकी पन्नास मुलांनी तसे करण्याचे नाकारले म्हणून त्यांना म्लेछ होण्याचा शाप दिला व धाकट्या पन्नासांनी त्याला योग्य मान देण्याचे मान्य केले, म्हणून त्यांना विश्वामित्राने आशीर्वाद दिला. थोरल्यांचे गोत्र विश्वामित्र असून धाकट्यांना कुशिक म्हणू लागले,' असे भागवतात दिले आहे. विश्वामित्राने त्याच्या इच्छेविरुद्ध वागणाऱ्या मुलांना अश्व, पुण्ड्र शबर, पुलिन्द, मूतिब बनविले, असे ऐतरेय ब्राम्हणात म्हटले आहे वाल्मीकी रामायणात केवळ दृढनेत्र, मधुष्पंद, महारथ व हविस्पंद एवढीच नावे आढळतात. (बाल. ५७–४)

## १२७ विष्णू

विष्णू हे अनादी व अनंत अशा परमेश्वराचे नाव आहे. हा सर्वांचा उत्पादक व आधार असून ह्याचे प्रमुख कार्य दुष्टांचा संहार व सुष्टांचे पालन, रक्षण हे

होय. शंख, चक्र, गदा, पद्म ही ह्याची आयुधे असून पीतांबर, वनमाला, किरीट कुंडले आणि श्रीवत्स ही ह्याची भूषणे होत. हा इंद्राचा संबंधी आहे. 'परित्राणाय साधूनां विनाशाय च दुष्कृताम्' हे ब्रीद सत्य करण्यासाठी हा वारंवार अवतार घेतो. ह्याचे दशावतार प्रसिद्ध असून रामावतार हा त्यांतील सातवा होय.

रावणाच्या अमर्याद बेछूट वर्तनाने त्रस्त व भयभीत झालेल्या लोकांचे संकट दूर करण्यासाठी विष्णूने मानवावतार घेतला. कारण ब्रह्मदेवाच्या वरामुळे मनुष्य सोडून इतरांना रावण अवध्य होता. दशरथ पिता होण्यास योग्य होय असे मानून ह्याने त्याच्या पुत्ररूपाने जन्म घेतला. अगस्त्याने रामाला दिलेले धनुष्य विष्णूचे होते. रावणाने इंद्रावर आक्रमण केले असता, 'विष्णूने योग्य काळी त्याचा संहार मीच करीन' असे आश्वासन दिले होते. देव-दैत्यांच्या युद्धात भृगूच्या पत्नीने दैत्यांना आश्रय दिल्याने विष्णूने तिचा शिरच्छद केला. त्यामुळे हा भृगूच्या शापास पात्र झाला. परंतु ह्याला प्राप्त झालेला शाप लोकांच्या दृष्टीने वरभूत ठरला. वृत्रासुराच्या वधासाठी आपला एक अंश इंद्र, एक अंश वज्र आणि एक अंश भूतल–यांना दिला आणि इंद्राकडून त्याचा वध करविला. त्यामुळे इंद्राच्या मागे लागलेल्या ब्रह्महत्येपासून मुक्त होण्यासाठी त्याला विष्णुयाग करण्यास सांगितले. रामाने सशरीर वैष्णव तेजात प्रवेश केला.

लक्ष्मी ही ह्याची भार्या होय.

## १२८ वेदवती

कुशध्वज जनकास मालावतीपासून झालेली ही कन्या. हिने जन्मतःच वेदध्वनी उच्चारला म्हणून हिला वेदवती असे नाव पडले. कुशध्वजाने तिचा विवाह विष्णूशी करण्याचे ठरविले व तो इतरांना नकार देऊ लागला. शंभू नावाच्या राक्षसाला नकार दिला असता संतप्त होऊन त्याने कुशध्वजाचा वध केला. हिच्या आईने सहगमन केले. तेव्हा पुष्कर तीर्थी वेदवती तप करू लागली. पुढील जन्मी विष्णू हिचा पती होईल, असे तिला आकाशवाणीने कळले. रावणाने हिला त्याची भार्या होण्याची विनंती केली असता हिने नकार दिला. तेव्हा त्याने हिचे केस ओढले. ते तोडून टाकून हिने अग्निप्रवेश केला. तपाचा व्यय होऊ नये म्हणून अग्निप्रवेश करण्यापूर्वी रावणाला शाप दिला नसला तरी हिचे उद्गार शापतुल्य आहेत.

## १२९ शतानंद

शतानंद हा गौतम आणि अहल्या यांचा ज्येष्ठ पुत्र. ह्याने विश्वमित्राला 'राम-लक्ष्मणांना आपल्या माता-पित्याविषयी सर्व वृत्त सांगितले ना? त्यांचे

पुनर्मिलन झाले ना ?' इत्यादी अनेक प्रश्न विचारले. रामाला विश्वामित्राच्या तपाचे व सामर्थ्याचे सविस्तर वर्णन सांगितले. हा जनक राजाचा पुरोहित होता. सीतेच्या शपथ-ग्रहण समयी हा त्या सभेत होता. रामाच्या लग्नातही ह्याने पौरोहित्य केले होते.

## १३० शत्रुघ्न

दशरथ व सुमित्रा यांचा पुत्र. भरतावर ह्याचे प्राणाहून अधिक प्रेम होते. व हा सदैव त्याच्या सन्निध असे. भरताच्या आजोळाहून परत आल्यावर, रामाला वनवासाला धाडण्याचे मूळ कारण मंथरा आहे हे कळताच क्रोधाने संतप्त होऊन ह्याने तिला फराफरा ओढले. तिला हा ठार करणार होता, पण भरताच्या मध्यस्थीने ती वाचली. बायकोच्या नादाने मुलाला वनवासात धाडणाऱ्या दशरथाला-पित्याला व तो तसे करीत असता स्वस्थ बसणाऱ्या लक्ष्मणाला ह्याने दोष दिला. लवणासुराचे पारिपत्य करून ह्याने मधुपुरी (मधुरा—मथुरा)हीच आपली राजधानी केली. त्या प्रदेशाची बारा वर्षात व्यवस्था लावून हा रामाच्या भेटीस आला ह्याला रामाजवळच राहावयाचे होते, परंतु रामाने ह्याची समजूत घालून पुन्हा शूरसेन प्रांतातच धाडले रामाने केलेल्या अश्वमेधाचे वेळी अश्व-रक्षणार्थ हा गेला होता. त्या वेळी ह्याने अनेक प्रदेश पादाक्रांत केले. आपले दिवस संपत आले असे समजताच रामाने ज्याप्रमाणे आपले राज्य कुशलवांना दिले, तद्वत शत्रुघ्नानेही आपले राज्य आपल्या दोन मुलांना विभागून दिले आणि रामाबरोबर सरयूतीरी ग्रोप्रतार तीर्थावर आपला देह ठेवला.

## १३१ शबरी

पंपा सरोवराच्या पश्चिम तीरावरील मतंग वनातील एका आश्रमात शबरी राहत असे. ही रामभक्त होती. वन्य फळांनी हिने रामाचे स्वागत केले. रामाला वनप्रदेश दाखविला. अग्नीत स्वताचे हवन करून ही स्वर्गाला गेली.

## १३२ शंबर

तिमिध्वज हा शंबर नावाने प्रसिद्ध होता. दण्डकारण्यातील वैजयंत नगरीचा राजा. देवासुरांच्या युद्धात हा असुरांना मिळाला व इंद्राशी युद्ध करू लागला. इंद्राने आपल्या साहाय्यार्थ दशरथ राजाला बोलाविले असता युद्धात दशरथ जखमी झाला. कैकेयीने—त्याच्या पत्नीने—चातुर्याने सारथ्य करून आपल्या पतीच्या प्राणाचे रक्षण केले.

## १३३ शंबुक (शंबूक)

हा शूद्र असल्याने त्याला तपश्चर्या करण्याचा अधिकार नव्हता. तरी सुद्धा सदेह स्वर्गाला जाण्याच्या इच्छेने ह्याने तपश्चर्या केल्याने एका ब्राह्मणाच्या मुलाला अकाली मृत्यू आला. त्या मुलाच्या पित्याने राजकर्तव्यातील हेळसांडीमुळे आपल्या मुलाला मृत्यू आला, असे मानून रामाला दोष दिला. रामाने त्याचा स्वीकार करून आपली कोणची चूक त्या मुलाच्या मृत्यूला कारणीभूत झाली, ह्याचा विचार केला. आकाशवाणीमुळे शंबूकाच्या तपश्चर्येबाबत त्याला माहिती मिळाली. अनधिकाराने तपश्चर्या करणाऱ्या शंबूकाचा रामाने वध करताच ब्राह्मणाचा मृत मुलगा जिवंत झाला.

## १३४ शरभंग

दण्डकारण्यात तपश्चर्या करणारा गौतम कुलातील एक ब्रह्मर्षी. विराधाचा वध केल्यानंतर त्याच्याच सांगण्यावरून राम ऋषीच्या आश्रमाकडे जात असता प्रत्यक्ष इंद्र तेथे आल्याचे ह्याला दिसले. रथ आणि अश्व यावरून त्याच्या खुणा पटल्याचे ह्याने लक्ष्मण व सीतेला सांगितले. इंद्र गेल्यावर ऋषीला रामाने त्याच्या आगमनाचा हेतू विचारला असता हा म्हणाला–तपस्येने संपादन केलेल्या ब्रह्म-लोकाला मला घेऊन जाण्यासाठी तो आला होता. परंतु तुझ्यासारख्याचे आतिथ्य न करता मला जाण्याची इच्छा नव्हती. स्वता संपादन केलेले लोक रामाला देण्याची ह्याने इच्छा प्रकट केली असता रामाने विनयपूर्वक नकार दिला. स्वताच्या तपाने ते मिळवण्याची आपली इच्छा बोलून दाखवली. रामाच्या देखतच शरभंगाने आपला देह अग्नीस अर्पण केला आणि हा ब्रह्मलोकाला गेला.

## १३५ शर्मिष्ठा

दैत्यांचा राजा वृषपर्वा. त्याची ही कन्या आणि दैत्यगुरु शुक्राचार्यांची कन्या देवयानी हिची सवत. हिचे आणि देवयानीचे भांडण झाले असता हिने देवयानीला कूपात ढकलून दिले, त्यामुळे शुक्राचार्य संतप्त झाला. ज्ञातीच्या कल्याणास्तव हिने देवयानीचे दास्यत्व पत्करले आणि देवयानीबरोबर दासी म्हणून ही ययातीकडे गेली. 'शर्मिष्ठेला शयन कामासाठी कधी बोलवू नको', असे शुक्राचार्याने ययातीला बजावले असताही हिला ययातीपासून तीन मुलगे झाले. रामायणात फक्त एकाच पुत्राचा –पुरूचा– उल्लेख आहे. ही ययातीची आवडती होती.

पहा – देवयानी.

## १३६ शिबी

उशीनर व माधवी याचा पुत्र. मत्स्य, ब्रह्माण्ड व वायू ह्या पुराणात आईचे दृषद्वती असे नाव दिले आहे. हा मंत्रद्रष्टा होता. ह्याची परीक्षा पाहण्याच्या उद्देशाने अग्नीने कपोताचे व इंद्राने श्येनाचे रूप घेतले आणि श्येन कपोताचे मागे लागला, तेव्हा कपोत शिबीला शरण गेला. त्याला ह्याने संरक्षण दिले. तेव्हा श्येनाने शिबीकडे 'माझे अन्न मला कपोत दे किंवा त्याच्या वजनाइतके तुझ्या शरीरातील मास दे' अशी मागणी केली. शिबीने थोडे थोडे मास देता देता श्येनाला आपले संपूर्ण शरीर देऊन कपोताचे रक्षण केले तेव्हा अग्नी व इंद्र यांनी रूपे टाकून दिली व ते प्रकट झाले. त्यांनी ह्याची स्तुती केली. शिबीच्या मोठेपणाच्या कथा अन्यत्रही आढळतात. इंद्राने काही काल ह्याला इंद्रपद सांभाळावयास सांगितले होते. हा संपन्न, उदार पराक्रमी व उत्तम राजा होता. ययातीला स्वर्गप्राप्तीसाठी ह्याने अंतरिक्षातील प्रदेश देऊन टाकले. पद्म पुराणानुसार हा ब्रह्मदेवाच्या यज्ञातील प्रतिष्ठाता होता.

## १३७ शुक (राक्षस)

रावणाचा एक अमात्य. सारणाबरोबर ह्याने हेरगिरी केली. हा प्रथम ब्राह्मण होता पण अगस्त्याने ह्याचे जवळ मांसाशन मागितलेले वज्रदंष्ट्राने ऐकले व ह्याच्या स्त्रीच्या रूपाने त्यास नरमांस घातले म्हणून अगस्त्याने ह्यास राक्षस होण्याबद्दल शाप दिला, पण रामाचे दर्शन व रावणास उपदेश केल्यावर उःशापामुळे हा मुक्त झाला. रावणाने राम-सेनेकडे हेर म्हणून ह्याला पाठविले असता रामाचे व सुग्रीवाचे सैन्य पाहून ह्याने आपला स्पष्ट अभिप्राय रावणाला सांगितला. बिभीषणाने ह्याला हेर म्हणून ओळखल्यानंतरही रामाने ह्याला आपले सर्व सैन्य अवलोकन करण्याची संधी दिली आणि 'मरणाला सिद्ध हो' असा निरोप रावणाला सांगण्यास सांगितले. ह्याने रामाचा जयजयकार केला. रामाला जिंकणे किती अवघड आहे, हे रावणाला सांगितले असता त्याने ह्याची निर्भर्त्सना करून आपल्या दृष्टीसमोरून निघून जाण्यास सांगितले.

## १३८ शुक्राचार्य (उशनस, भार्गव)

मत्स्य व ब्रह्म पुराणांच्या मते वारुणी भृगू आणि पुलोमा यांचा पुत्र. भृगूपासून दिव्येला झालेला शुक्र आणि हा एकच असे ब्रह्माण्ड पुराणात दिले आहे निरनिराळ्या ग्रंथातून ह्याच्या आईवडिलांची नावे वेगवेगळी आढळत असली तरी उश[illegible] असले

तरी रामायणात ज्या भार्गवाचा दंड राजा आणि दंडकारण्य यांच्या संदर्भात उल्लेख येतो तो भार्गव शुक्राचार्यच होय. हा दानवांचा पुरोहित होता आणि भृगूपासूनच ह्याला संजीवनी विद्या प्राप्त झाली आणि तिचा लाभ देव-दानवांच्या युद्धात दानवांना मिळाला. देवांचा गुरू बृहस्पती याचा मुलगा कच संजीवनी विद्या प्राप्त करून घेण्यासाठी शुक्राचार्याकडे शिष्य म्हणून राहिला. त्याला विद्या प्राप्त झाली, परंतु देवयानीच्या शापामुळे ती फलदायी होऊ शकली नाही. वामनाला बळीने त्रिपाद भूमीचे दान देऊ नये, यास्तव हा झारीच्या तोटीत गोळा होऊन बसला होता. ह्याची कन्या देवयानी ही ययातीची भार्या, तिच्याशी तो निष्ठेने वागत नाही, असे कळताच ह्याने त्याला वृद्धत्वाचा शाप दिला.

दंड राजाचा पुरोहित असता ह्याची कन्या अरजा हिचा राजाने बलात्काराने उपभोग घेतला. त्यामुळे क्रोध येऊन दंड राजा व त्याचे वास्तव्य असलेले दंडकारण्य ह्यांना शाप दिला. आश्रमवासियांना बाहेर जाण्यास सांगून सात दिवसांत इंद्राकडून धूलवृष्टी करवून दंडकारण्य उध्वस्त केले व राजाचा वध करविला.

हा काही सूक्तांचा द्रष्टा होय. हजारो वर्षे तपश्चर्या करून ह्याने शंकराला प्रसन्न करून घेतले आणि प्रजेशत्व, धनेशत्व आणि अवध्यत्व मागून घेतले. हा धर्मशास्त्रकार होता. उशनस धर्मशास्त्र, औशनस स्मृती हे ग्रंथ ह्याच्या नावावर आढळतात. राजकीय विषयावरील शुक्रनीती हा ग्रंथ प्रसिद्ध आहे. शतपर्वा, आंगी, उर्जस्वती, जयंती, गौ अशा ह्याच्या अनेक भार्या असून देवयानी ही जयंती-पासून झालेली कन्या. ह्याला इतर अपत्येही पुष्कळ होती.

## १३९ शुनःशेप

भृगुकुलोत्पन्न ऋचीकाचा मधला मुलगा. हरिश्चंद्राला मुलगा होईना म्हणून त्याने मुलगा झाल्यास ‘ तुला बळी देईन ’ असा नवस वरुणाला केला होता. परंतु मुलगा झाल्यावर नवस फेडण्याचे हा पुढे पुढे ढकलू लागला. ह्याचा मुलगा रोहित. याला नवसाचे वृत्त कळताच तो घरातून पळून गेला. हरिश्चंद्राला उदर रोग झाला. अशा स्थितीत रोहिताने शुनःशेपाला बळी देण्याकरिता ऋचीक (अजीगर्त) ऋषीकडून विकत घेतले. पण विश्वामित्राने शुनःशेपाला यज्ञस्तंभापासून सोडवून आणले व आपला पुत्र मानले. ह्याचे नाव देवरात असे ठेवले, अशी माहिती ऐतरेय ब्राह्मणात मिळते.

ही कथा अनेक ग्रंथांत थोड्या फार फरकाने दिलेली आढळते.

शुनःशेपाने आपल्या मामाला–विश्वामित्राला आपले प्राण वाचविण्याची विनंती केली असता त्याने ह्याला दोन गाथा शिकविल्या आणि त्या यज्ञीय यूपापाशी गेल्यानंतर गाऊन अग्नीची स्तुती करण्यास सागितले. शुनःशेपाला लाल वस्त्रे

नेसवून अंबरीषाने यूपाला बांधले. त्या गाथा गाऊन ह्याने इंद्र व विष्णूची स्तुती केली असता संतुष्ट होऊन इंद्राने ह्याला दीर्घायुष्य दिले.

## १४० श्रवण, श्रावण

श्रवण नावाचा एक ब्राह्मण कुरुजांगल देशात राहात होता. त्याची स्त्री कुंडा आणि मुलगा श्रावण. भाऊ कुरंटक हा आचारहीन होता. परंतु गाईला चिखलातून वर काढल्याने हे सर्व मुक्त झाले, असे पद्मपुराणात दिले आहे. वाल्मीकी रामायणात श्रवणाच्या नावाचा उल्लेख नाही परंतु ब्रह्मपुराणात ह्याचे नाव 'श्रवण' असे दिले आहे. पुत्रशोक करीत असता ह्याने मुलाला 'ब्राह्मण' न म्हणता 'ब्राह्मणासमान' असे म्हटले आहे. त्यावरून हा ब्राह्मण नसावा. श्रावणानेही तो ब्राह्मण नसल्याचे स्पष्ट शब्दांत सांगितले आहे. श्रावणाला मर्मी बाण लागल्याचे समजताच दशरथाला आपल्या हातून ब्रह्महत्या झाली की काय अशी भीती वाटू लागली. तेव्हा श्रावण त्याला म्हणाला–

न द्विजातिरहं राजन्मा भूत्ते मनसो व्यथा। (अयोध्या.) ६३–५०
शूद्रयामस्मि वैश्येन जातो नरवराधिप। ६३–५१

'राजा मी ब्राह्मण नव्हे. तुझ्या मनाला ब्रह्महत्येची रुखरुख नको. हे राजाधिराज, वैश्यापासून शूद्र स्त्रीचे ठिकाणी मी उत्पन्न झालो आहे.'

## १४१ संपाती

ब्रह्माण्ड पुराणात हा अरुण व गृध्री यांचा पुत्र असल्याचे तर वायुपुराणात ह्याची माता श्येनी असल्याचे दिले आहे. जटायूबरोबर हा निशाकर ऋषीची सेवा करीत होता. वृत्रवध करून स्वर्गाला जाणाऱ्या इंद्राशी ह्याने युद्ध केले, परंतु वज्राघाताने जखमी झाला. एकदा ह्याची व जटायूची उंच उडण्याची स्पर्धा झाली असता जटायू कासावीस होऊन पडू लागला. त्या वेळी ह्याने आपले पंख पसरून जटायूचे रक्षण केले. परंतु निष्काळजीपणामुळे सूर्यतापाने ह्याचे पंख दग्ध झाले आणि हा विंध्य पर्वतावर दक्षिण समुद्रतीरी आणि जटायू जनस्थानात पडला. देहत्याग करण्यास हा सिद्ध झाला असता निशाकर ऋषीने रामकार्यासाठी ह्याला त्या विचारापासून परावृत्त केले. जटायूच्या मृत्यूची वार्ता वानरांकडून समजल्यावर अंगदाच्या साहाय्याने समुद्रतीरी ह्याने भ्रात्याचे तर्पण केले. निशाकराच्या वरामुळे ह्यास पुन्हा पंखप्राप्ती झाली.

## १४२ संवर्त

अंगिरसाच्या पुत्रांपैकी एक. नारदाच्या सांगण्यावरून मरुत्ताने यासच आपला पुरोहित केले. इंद्राने मरुत्ताच्या यज्ञात विघ्न आणण्यासाठी अग्नीची योजना केली होती. परंतु संवर्ताच्या शापाच्या भीतीने तो परत गेला. संवर्ताचा मरुत्ताला पूर्ण पाठिंबा असल्याने त्याच्या यज्ञात विघ्ने आणणाऱ्याचे सर्व प्रयत्न निष्फळ ठरले.

## १४३ सगर

च्यवन भार्गव ऋषीच्या आशीर्वादाने असित या राजाला कालिंदी या भार्येपासून हा मुलगा झाला. कालिंदी गरोदर असताना तिच्या सवतीने तिला विष दिले होते. परंतु विषाचा विपरीत परिणाम न होता त्यासह (स+गर) जन्माला आल्याने याचे नाव सगर पडले. हा पराक्रमी, सत्यधर्मी, सत्यवक्ता, दानशूर व विचारज्ञ असा अयोध्येचा राजा होता. केशिनी व सुमती या त्याच्या दोन भार्या. केशिनीचा मुलगा असमंज दुर्वृत्त असल्याने राजाने त्यास हद्दपार केले होते. ह्याने अश्वमेध यज्ञ केला असता इंद्राने ह्याचा अश्व अपहरण करून नेला. त्याच्या शोधार्थ सुमतीच्या साठ सहस्र पुत्रांना धाडले असता कपिलाने त्यांना भस्मसात केले. अंशुमान नावाच्या नातवाने सगराचा अश्वमेध पूर्ण केला.

## १४४ सारण

लंकेतील एक राक्षस. रामाच्या सैन्यात हेरगिरी करण्यासाठी हा शुका-बरोबर गेला होता. दोघांनीही वानररूप घेतले होते. हा रावणाचा एक अमात्य होता. रामाला जिंकणे फार कठीण आहे, असे रावणाला ह्याने सांगितले असता रावणाची ह्याच्यावर खप्पामर्जी झाली.

## १४५ सालकटंकटा

विद्युत्केश राक्षसाची भार्या. हिच्या आईचे नाव संध्या. विद्युत्केशापासून राहिलेला गर्भ हिने टाकून दिला.

## १४६ सीता

ही सीरध्वज जनकाची कन्या म्हणून जानकी आणि जमीन नांगरत असता नांगराच्या पाळीतून वर आलेली भूमिकन्या, म्हणून सीता अशा नावाने ख्यात आहे. पूर्वजन्मीची वेदवती म्हणजेच सीता असेही मानले जाते, त्याचप्रमाणे ही

मंदोदरीची कन्या असल्याची, अयोनिसंभव असल्याची—अशा अनेक कथा—आख्यायिका हिच्या विषयी सांगितल्या जातात. ही उपवर झाली असता जनकाने शिवधनुष्याचा पण लावून योग्य वराची निवड करण्याचे योजिले. रावण स्वयंवरास आला होता. परंतु त्याला तो पण जिंकता आला नाही. रामाने ते सहज पेलले. दशरथाच्या अनुमतीने जनकाने सीता रामाला भार्या म्हणून दिली. ही लावण्यवती होती, तशीच अत्यंत बुद्धिवान, निष्ठावंत, रामावर निस्सीम प्रेम करणारी व त्याच्या सुखदुःखाची साथीदार होती. रामाला यौवराज्यपद मिळणार म्हणून हरखली असली तरी तितक्याच आनंदाने रामाबरोबर वनवासात जाण्याचाही हिने आग्रह धरला. ही पतीला दैवत मानत असे. तिच्या पतिनिष्ठेचे कौसल्या आणि अनसूया यांनी कौतुक केले आहे. वनवासात संन्यस्त वृत्तीने राहणाऱ्या रामाला, तो ऋषींच्या संरक्षणार्थ राक्षसांचा वध करण्याचे योजित असता हिने असे करणे अयोग्य असल्याचे स्पष्ट सांगितले. आपणहून कोणत्याही परपुरुषांचा स्पर्श स्वताच्या शरीराला होऊ देण्याचे तिने कटाक्षाने टाळले असल्याचे हनुमानाला दिलेल्या नकारावरून स्पष्ट होत असले तरी हिच्या इच्छेविरुद्ध रावणाने हिला उचलून घेतल्याने व विराधाने आपल्या हातांनी ओढून अंकावर बसविल्यामुळे परपुरुष-स्पर्श हिला टाळता आला नाही. लक्ष्मणाचा सेवाभावी, शुद्धाचरणी, निष्ठावंत आणि निष्पाप स्वभाव माहीत असूनही रामाच्या शोधार्थ तो जेव्हा जाईना तेव्हा हिने अत्यंत कठोर बोलून त्याला जे व्यथित केले आहे, ते न शोभणारे आहे. कांचनमृगाविषयीचा तिचा लोभ स्त्रीसुलभ असला तरी त्यासाठी तिला जबर किंमत द्यावी लागली. रामाविषयीच्या अव्यभिचारी निष्ठेने हिने लंकेतील आपले वास्तव्य व्यतीत केले. रावणाकडून वध केला जाईल, तो भ्रष्ट करील ही भीती सदैव टांगत्या तलवारीसारखी हिच्या मनावर लटकत होती. त्याच्या हातून वध होण्यापेक्षा आत्मत्याग करणे हिला योग्य वाटले. परंतु ब्रह्मदेवाने इंद्राला धाडून अन्नत्याग, पर्यायाने आत्मत्याग करण्यापासून हिला परावृत्त केले व देवकार्य सिद्धीस जाण्यासाठी हविष्यान्नाचा स्वीकार करून धीराने जिवंत राहाण्यास प्रोत्साहित केले. रावणवधानंतर रामाला भेटण्यास ही अत्यंत उत्सुक झाली असता रामाची कठोर वाणी ऐकून अतिशय व्यथित झाली. परंतु रामाखेरीज अन्य कोणत्याही परपुरुषाचा विचारही तिच्या मनाला कधीही शिवला नसल्याने आपली शुद्धता पटवून देण्यासाठी हिने अग्निदिव्य केले. डोहाळे पुरविण्याच्या निमित्ताने रामाने लोकाराधनासाठी हिचा त्याग केला असता सीता अत्यंत शोकाकुल झाली. वाल्मीकीने हिचे स्वागत केले, आश्रय दिला. सीतेने लव-कुशांना जन्म दिला. त्या दिवशी शत्रुघ्न वाल्मीकीच्या आश्रमात होता. रामाने निरोप धाडल्याने वाल्मीकी ऋषी सीतेला घेऊन राजसभेत आला. आपल्या तपाची शपथ घेऊन ही शुद्ध असल्याबद्दल त्याने ग्वाही दिली. सीतेने हात जोडून भूदेवीला प्रार्थना केली—

'रघूत्तम रामाशिवाय मी जर इतर पुरुष मनात आणला नसेल, मनाने, कायेने, वाचेने मी जर रामाचेच आराधन करीत असेन, रामाशिवाय दुसऱ्या पुरुषाची मला ओळखही नाही, हे जर माझे म्हणणे सत्य असेल, तर विष्णुपत्नी भूदेवीने मला आपल्या उदरात प्रवेश करण्यास मार्ग द्यावा', अशी शपथ वाहून तिने आपले उज्ज्वल चारित्र्य सिद्ध करून दाखवले. कर्तव्यनिष्ठेत ही रामापेक्षा यत्किंचितही उणी नव्हती.

## १४७ सुकेतू

हा एक महान यक्ष होता. ताटका ह्याची मुलगी.

आणखी एका सुकेतूचा उल्लेख आढळतो. हा सुबाहूचा भाऊ. शत्रुघ्न आणि सुबाहू यांचे अश्वमेधप्रसंगी युद्ध झाले असता हा तेथे होता. हा गदायुद्धात प्रवीण होता.

## १४८ सुकेश

सालकटंकटा आणि विद्युत्केश राक्षस यांचा मुलगा. गर्भावस्थेत असतानाच ह्याचा त्याग आईने केला, तेव्हा शिव-पार्वतीने ह्याचे पोषण करून वाढवले. त्यांनी एक विमान दिले तेव्हा ह्याचा सर्वत्र अनिबंध संचार चालू झाला. ग्रामणी गंधर्वाची कन्या देववती हिच्याशी ह्याचा विवाह झाला व तिच्यापासून माल्यवान माली आणि सुमाली हे तीन पुत्र झाले.

## १४९ सुग्रीव

सूर्यापासून ऋक्षरजस् वानराच्या ग्रीवे (माने) पासून याची उत्पत्ती झाल्याने ह्याला सुग्रीव असे नाव प्राप्त झाले. वाली ह्याचा ज्येष्ठ भ्राता. दोघा भावांत बराच काळपर्यंत सख्य होते. परंतु दुंदुभी नावाच्या मायावी राक्षसाशी वालीचे युद्ध झाल्यानंतर दोघांत गैरसमज निर्माण होऊन वितुष्ट आले व परिणामतः वालीने ह्याची भार्या रुमा हरण करून ह्याला राज्याबाहेर हाकलून दिले. तेव्हापासून हा ऋष्यमूक पर्वतावर राहू लागला. तेथे राम–लक्ष्मणाची व ह्याची प्रथम भेट झाली. हनुमानाच्या मध्यस्थीने उभयतांची माहिती एकमेकास समजल्यावर रामाशी ह्याची मैत्री झाली. अग्नीला साक्षी ठेवून दोघांनी मैत्रीचा स्वीकार केला. सीता शोधार्थ रामाला ह्याने साहाय्य करण्याचे व वालीचा वध करून सुग्रीवाला त्याची भार्या व राज्य मिळवून देण्याचे रामाने कबूल केले. सुग्रीवाने रामाला वालीच्या पराक्रमाची सोदाहरण माहिती दिली, तर रामानेही एका बाणाने सात

ताड वृक्षांचे छेदन करून आपल्या सामर्थ्याची ह्याला चुणूक दाखविली. वालीला ठार करण्यास रामाने अनुकूल संधी प्राप्त करून दिली असताही त्याचा फायदा सुग्रीवाला घेता आला नाही. हा पळून आला. रामाने आपल्या बाणाने वालीला मूर्च्छित केले. वालीच्या वधाने तारेने-त्याच्या भार्येने विलक्षण शोक केला आणि सुग्रीवालाही पश्चात्ताप झाला. रामाने त्यांचे सांत्वन करून सुग्रीवाकडून त्याचे और्ध्वदेहिक करविले व वालीच्या अखेरच्या इच्छेप्रमाणे त्याचा मुलगा अंगद याचा स्वताच्या पुत्राप्रमाणे प्रतिपाल करण्यास सुग्रीवाला सांगितले अंगदाचे मन मात्र सदैव सुग्रीवाबाबत साशंकच होते. वालीची पत्नी तारा सुग्रीवाजवळ भार्याप्रमाणे राहू लागली. राज्यप्राप्तीनंतर काही काल विषयमग्नतेमुळे ह्याला कर्तव्याचे भान राहिले नाही. परंतु हनुमानाने रामाला दिलेल्या वचनाची आठवण करून दिली. सीतेच्या शोधार्थ वानरांच्या साहाय्याने ह्याने कसोशीने प्रयत्न केले. ह्याला सर्व भूखंडाची माहिती होती. रामाला दिलेल्या वचनाबाबत सुग्रीव कुचराई करू लागलेला दिसताच लक्ष्मणाने सुद्धा ताळ्यावर आणले. सीतेचा शोध घेऊन हनुमान परत आल्यावर सीतेच्या सुटकेसाठी ह्याने आपले सर्वस्व पणाला लावून वानरांचे प्रचंड सैन्य घेऊन हा रामाच्या साहाय्यार्थ पुढे आला. बिभीषण रामाच्या आश्रयाला आला असता त्याचा स्वीकार न करण्याची ह्याने रामाला विनंती केली. कारण त्याच्याविषयी सुग्रीवाचे मनात शंका होती. रावण दृष्टीस पडताच त्याच्यावर झडप घालून ह्याने त्याचा मुकुट खाली पडला आणि रावणास चांगलेच दमवले. राम-लक्ष्मण मूर्च्छित झाले असता भीतीने पळून जाणाऱ्या वानरसेनेला ह्याने प्रोत्साहित केले. युद्धात रावणाकडून व कुंभकर्णाकडून त्यांच्या बाणांनी हा मूर्च्छित झाला. कुंभकर्णाने ह्याला पकडून ठेवले होते, परंतु हा त्याच्या तावडीतून निसटला. कुंभकर्णाच्या वधानंतर ह्याच्या सांगण्यावरून हनुमानाने लंका जाळली. भीतीने पळ काढणाऱ्या राक्षसांना बाहेर पडता येऊ नये म्हणून वानरांकरवी सर्व द्वारे ह्याने बंद करविली, कुंभकर्णाचा मुलगा कुंभ याचा वध केला, विरूपाक्षाला ठार केले आणि महोदराचा शिरच्छेद केला. रावण-वधानंतर रामाबरोबर हा अयोध्येस गेला. राज्याभिषेकाच्या वेळी रामाने ह्याचा यथायोग्य सत्कार करून किष्किंधेला परत धाडले. अनेक वर्षे रामाने राज्य केल्यानंतर निजधामाला जाण्यास तो निघाला असता सुग्रीवानेही किष्किंधेच्या राज्यपदी अंगदाची योजना करून रामाबरोबर स्वताला झोकून देऊन सूर्यमंडलात प्रवेश केला.

## १५० सुतीक्ष्ण

अगस्त्याचा एक शिष्य. रामकुंडावर तप करून त्रैलोक्यात गमन करण्याचे सामर्थ्य ह्याने प्राप्त करून घेतले. ह्याच्या आश्रमात राम दोनदा राहिला होता.

शरभंग मुनीच्या सांगण्यावरून रामाने ह्या मुनीची भेट घेतली. रामाने आपली ओळख करून देताच आलिंगन देऊन मुनीने त्याचे स्वागत केले. अगस्त्याश्रमाचा ठावठिकाणा रामाला सुतीक्ष्ण मुनीनेच सांगितला.

## १५१ सुंद

वाल्मीकी रामायणात सुंदोपसुंदांच्या पित्याचे नाव जंभ असे दिले आहे. हे जन्माने यक्ष होते. अगस्त्याच्या शापामुळे राक्षस झाले. महाभारतात संदोपसुंद हे हिरण्यकशिपूच्या वंशातील निकुंभ दैत्याचे पुत्र असल्याचा उल्लेख आहे. ह्यांनी विंध्य पर्वतावर उग्र तप केल्यामुळे ब्रह्मदेवाने प्रसन्न होऊन ह्यांना माया, अस्त्र, अतुल शक्ती, हवे ते रूप घेण्याचे सामर्थ्य आणि एकमेकांस न मारता अमर राहण्याचा वर दिला होता. हे इतरांना अवध्य होते. वरप्राप्तीमुळे हे यज्ञयागात विघ्ने आणत व ऋषींना निवांत राहणे अशक्य करून सोडीत. ह्याचा त्रास अतिशय झाल्याची तक्रार ब्रह्मदेवाकडे आली असता त्या उभयतांत वितुष्ट निर्माण करण्याकरिता ब्रह्मदेवाने विश्वकर्म्याला एका अत्यंत रूपवती स्त्रीची निर्मिती करण्यास सांगितले. पदार्थमात्रातील तिळतीळ सौंदर्य एकत्र करून त्याने जी सुंदर स्त्री निर्माण केली तीच तिलोत्तमा. तिचे सौंदर्य पाहून तिच्या प्राप्तीसाठी सुंदोपसुंद एकमेकांशी लढू लागले व त्यातच दोघेही मरण पावले. तारका ही सुंदाची भार्या.

## १५२ सुमती

विदर्भ–राजकन्या. सगराची दुसरी पत्नी. हिला और्वकृपेने साठ हजार पुत्र झाले असे पद्मपुराणात दिले आहे तर महाभारताच्या वनपर्वात शंकराच्या वराने हिला भोपळा झाला व त्या भोपळ्यातील बियांचे साठ हजार पुत्र झाले, अशी माहिती दिली आहे. ब्रह्मवैवर्त पुराणात शंकराच्या प्रसादाने शंभर वर्षांनी हिला एक मांसपिंड झाला व त्याने त्याचे साठ हजार पुत्र केले, असे वर्णन आढळते.

## १५३ सुमंत्र

दशरथ राजाच्या अष्टप्रधानांपैकी एक. खेरीज दशरथ राजाचा सारथी आणि स्तुतिपाठक. वनवासात जाणाऱ्या रामाला पोहोचविण्यासाठी हा रथ घेऊन गेला होता. पुराणात ऋत्विजांकडून ऐकलेला दशरथाच्या पुत्र-प्राप्तीचा भविष्य–वृत्तांत ह्याने राजाला एकांतात सांगितला होता. अयोध्येला परत धाडताना रामाने माता-पित्यांना सांगण्यासाठी सुमंत्राबरोबर निरोप दिला असता तो रामाला म्हणाला–‘ कोणत्या तोंडाने हा मोकळा रथ मी अयोध्येला नेऊ ? लोकांन

तो पाहून केवढे दुःख होईल ! शिवाय तू नसताना हे घोडे रथ तरी कसा ओढतील ?–म्हणून तुला सोडून मी अयोध्येला जाऊ इच्छित नाही.' ह्या उद्गारावरून त्याची रामावरील श्रद्धा स्पष्ट होते. त्याची समजूत घालून रामाने ह्याला परत धाडले. अयोध्येतून जाताना ह्याने आपले तोंड झाकून घेतले होते. दशरथ राजाला ह्याने सर्व वृत्त कथन केले आणि कौसल्येचे सांत्वन केले. रामाच्या अश्वमेध यज्ञात हा शत्रुघ्नाचे बरोबर होता. रामाला वनवासात धाडण्याच्या हट्टापासून परावृत्त न होणाऱ्या कैकेयीचा ह्याने अत्यंत कडक शब्दांत धिक्कार केला. तिच्या हट्टाचे होणारे दारुण परिणाम किती दूरगामी होणार आहेत, याची स्पष्ट कल्पना तिला सुमंत्राने विशद करून सांगितली.

## १५४ सुमाली

लंकेत राहणारा एक राक्षस. रावणाचा मातामह. ह्याच्या पत्नीचे नाव केतुमती आणि कन्या कैकसी अथवा केशिनी. खेरीज राका, पुष्पोत्कटा, बलाका, या ह्याच्या मुली विश्रव्यास दिल्या होत्या.

हा सुकेशाचा दुसरा मुलगा. ह्याने तपाने ब्रह्मदेवाला संतुष्ट केले. ह्याला प्रहस्त, अकंपनादी अकरा पुत्र व तीन कन्या झाल्या. वैश्रवण कुबेराला पाहून त्याच्यासारखे आपले श्रेय व्हावे, या हेतूने ह्याने आपल्या कन्येला आपणहून विश्रवा मुनीला वरण्यास सांगितले. त्यायोगे तिला वैश्रवणासारखे पुत्र होतील असे त्याला वाटत होते. रावणादींना वर मिळाल्याचे ऐकून हा रसातळातून वर आला आणि रावणाला म्हणाला. ' विष्णूपासूनचे राक्षसांचे भय संपले. आता लंका ही राक्षसांचीच झाली. तेव्हा भल्याबुऱ्या मार्गाने ती वैश्रवणाकडून परत घेऊन तू लंकाधिपती हो. ' हनुमानाने ह्याच्या घराला आग लावली होती. देवसेनेशी युद्ध करताना सावित्र वसूने ह्याचा वध केला आणि ह्याच्याच गदेने ह्याच्या शरीराचे भस्म केले.

## १५५ सुरसा

कश्यप आणि क्रोधवशाची मुलगी. हनुमानाच्या सामर्थ्याची परीक्षा घेण्याच्या उद्देशाने देवांनी सुरसेला राक्षसी होण्यास सांगितले. आकाशाला भिडेल इतका मोठा जबडा पसरून, लंकेला जाणाऱ्या हनुमानाला विघ्न आणण्याची कामगिरी हिच्याकडे सोपवली. देवांच्या सांगण्याप्रमाणे आपला जबडा पसरून उड्डाण करणाऱ्या हनुमानाला हिने आपल्या मुखातून जाण्यास सांगितले. तेव्हा हनुमानाने आपले शरीर हिच्या जबड्याहून मोठे केले आणि ही जेव्हा जबडा आणखी मोठा करू लागली. तेव्हा त्याने आंगठ्याएवढे रूप धारण केले. हिच्या मुखात

प्रवेश करून तो लगेच बाहेर आला. तेव्हा हिने त्याचे सामर्थ्य जाणून त्याला यश चिंतिले.

## १५६ सोमदा

उर्मिला गंधर्वीची मुलगी. चूली मुनीच्या तपःसामर्थ्याने हिला ब्रह्मदत्त नावाचा मुलगा झाला. हिच्या उत्कृष्ट सेवेने चूली संतुष्ट झाला व हिला जे प्रिय असेल ते मागण्यास सांगितले. ही कुणाचीही भार्या झालेली नव्हती व पुढेही हिला कुणाची पत्नी व्हावयाचे नव्हते. तरीही पुत्र हवा होता. हिने चूली मुनीजवळ पुत्रप्राप्तीची इच्छा प्रकट केली व त्याने आपल्या सामर्थ्याने हिला हिच्या इच्छेनुसार एक पुत्र दिला.

## १५७ सौदास (कल्माषपाद)

सुदास राजाचा पुत्र. मत्स्यपुराणात हा ऋतुपर्ण राजाचा पुत्र असल्याचे, म्हटले आहे. वसिष्ठाला प्रतिशाप देण्याकरिता हाती घेतलेले उदक ह्याने स्वता पायावर ओतून घेतल्याने ह्याचे पाय चित्रविचित्र वर्णाचे झाले, म्हणून कल्माषपाद हे नाव पडले आणि हा याच नावाने हा प्रख्यात झाला. वसिष्ठाने ह्याला शाप देण्याचे कारण (पहा : शाप—वसिष्ठ८सौदास) वाल्मीकीहून वेगळे असे अन्य ग्रंथांत दिले आहे. रेवा व नर्मदा नद्यांच्या काठी मृगयेसाठी गेला असता ह्याने एक वाघाचे मैथुनासक्त जोडपे पाहिले आणि त्यातील वाघिणीला ह्याने मारले. पण ती मरता मरता मोठी झाली. वाघ राक्षस झाला आणि तुझा सूड मी केव्हातरी घेईन, असे बजावून गुप्त झाला, असे नारद पुराणावरून समजते. महाभारतात तो राक्षस होण्याचे कारण वेगळेच दिले आहे. मृगयेहून परत येत असता हृयाची व वसिष्ठ-पुत्र शक्ती यांची समोरासमोर गाठ पडली. रस्ता इतका अरुंद होता की एका वेळी फक्त एकच मनुष्य जाणे शक्य व्हावे. हृयाने शक्तीला बाजूला सरण्यास सांगितले. परंतु तो बाजूला तर सरला नाहीच उलट रस्ता ब्राह्मणांचा आहे, राजाने प्रथम वाट ब्राह्मणाला करून द्यावी असा धर्म असल्याचे सांगू लागला असता राजाने त्यास राक्षसाप्रमाणे झोडपले; तेव्हा 'तू नरमांसभक्षक राक्षस होशील' असा शक्तीने शाप दिला. विश्वामित्राने हृयाच्या यज्ञाचा अंगीकार केल्याने वसिष्ठ–विश्वामित्रांत वैर आले. शाप देणारी व्यक्ती–शक्ती वसिष्ठपुत्र असल्याचे कळल्यावर हृयाने उःशाप मागितला. पुढे नरमांसभक्षक होण्याचा शाप ज्या शक्तीने दिला त्याच्यापासूनच हक्काने नरमांस खाण्यास प्रारंभ केला. पुढे हृयाने वसिष्ठाचे शंभर पुत्र खाऊन टाकले. एकदा क्रीडेत निमग्न असलेले एक ब्राह्मणदांपत्य दिसले असता त्यापैकी पुरुषाचे हृयाने भक्षण केले, तेव्हा त्या ब्राह्मणीने त्याला शाप दिला—

'तुझा स्त्रीशी समागम होताच, तू मृत होशील' आणि ती सती गेली. अंगावर गंगाबिंदू पडल्यास तू शापमुक्त होशील, असा वसिष्ठाने उःशाप दिला असला तरी ब्राह्मणीने तू सदा राक्षसच राहशील असा शाप दिला होता. तेव्हा ह्याने पुत्रासह तू पिशाची होशील, असा तिला प्रतिशाप दिला. गर्गमुनी गंगा घेऊन जात असता गंगोदक शिपडल्याने दोघेही मुक्त आले. ह्याच्या पत्नीचे नाव मदयंती तिने वसिष्ठ ऋषीला प्रतिशाप देण्यापासून ह्यास परावृत्त केले.

राक्षसत्व संपल्यावर वसिष्ठाने ह्यास राज्याभिषेक केला. पतिव्रतेच्या शापामुळे ह्यास अपत्यप्राप्ती होईना, तेव्हा मदयंतीच्या ठायी वसिष्ठाकरवी ह्याने गर्भस्थापना करविली. तिचा हा पुत्र म्हणजे अश्मक. महाभारताच्या आश्वमेधिक पर्वात ह्याच्याविषयी आणखी एक प्रसंग सांगितला आहे. तो असा—अहल्येने सांगितल्यामुळे गौतम-शिष्य उत्तंक हा मदयंतीची कुंडले आणण्यासाठी आला असता, हा राक्षस त्याला खाण्यासाठी धावला. परंतु 'कार्य झाल्यावर तुझ्याकडे येईन', असे आश्वासन दिले असता राक्षसाने ह्याच्या कार्याची विचारपूस करून ह्यास मदयंतीकडे धाडले. तिने तिच्या पतीकडून एक खूण घेऊन येण्यास सांगितले खूण पटताच तिने आपली कुंडले दिली व ती जपून नेण्यास सांगितले. राक्षसाने उत्तंकास प्रतिज्ञेतून मुक्त केले.

## १५८ स्थूलशिरा

एक ऋषी. अश्वशिराचा पुत्र. ह्याने विश्वावसूला शाप देऊन 'कबंध' राक्षस केले.

## १५९ स्वयंप्रभा

मेरू सावर्णीची कन्या व हेमा अप्सरेची सखी. स्वर्गाला जाताना हेमाने स्वयंप्रभेला मयाने बांधलेले स्थळ व त्याचे रक्षण करण्याचे सामर्थ्य दिले होते. हिने अंगदादी वानरांना समुद्रतीरी पोहोचविले. रामाचे दर्शन घेऊन ही स्वर्गाला गेली. हिचे 'प्रभावती' असेही नाव आढळते. बुभुक्षित वानरांना मुळे—फळे देऊन हिने त्यांचे उत्तम आदरातिथ्य केले. हनुमानाने प्रत्युपकारार्थ हिला काय हवे, म्हणून विचारले असता 'धर्माने वागत असलेल्या मला सर्व काही प्राप्त झाले आहे', अशी तृप्तता व्यक्त केली असून हनुमानाने देऊ केलेल्याचा स्वीकार करण्यास हिने विनयपूर्वक नकार दिला.

## १६० हनुमान

सप्त चिरंजीवांपैकी एक. सुमेरूचा राजा केसरी याच्या अंजनी नावाच्या भार्येला वायूपासून झालेला पुत्र. ह्याच्या जन्माविषयीच्या कथा निरनिराळ्या ग्रंथांतून वेगवेगळ्या दिल्या आहेत. सूर्य हे एक पिकलेले फळ आहे, असे समजून ते खाण्यास धावला असता राहूच्या सांगण्यावरून इंद्राने ह्याच्यावर वज्रप्रहार केल्याने ह्याची हनू भंग पावली. त्यावरून ह्यास 'हनुमान' असे नाव पडले. हा वज्रप्रहाराने मूर्च्छित झाला असता वायूने विरोध केला. त्यामुळे सर्व लोक प्राण-संकटात आले. ब्रह्मदेवाच्या विनंतीवरून वायूने निरोध थांबविला असता ब्रह्मदेवाने हनुमानाला ब्रह्मदंडापासून अवध्यत्वाचा वर दिला आणि इतर देवांनाही वर देण्यास सांगितले. इंद्राने वज्रापासून अवध्यत्व; सूर्याने आपल्या तेजाचा शंभरावा अंश, शास्त्राध्ययनाचे वेळी शास्त्राचे ज्ञान, वरुणाने वरुणपाश अथवा उदकापासून अवध्यत्व; यमाने यमदंडापासून अवध्यत्व, आरोग्य, संग्रामात थकवा न येणे; शंकराने दीर्घायुष्य व त्याच्या आयुधापासून अवध्यत्व; कुबेराने त्याच्या गदेपासून अवध्यत्व; विश्वकर्म्याने दिव्य शस्त्रे व त्यामुळे चिरंजीवित्व इत्यादी अनेक वर ह्याला लाभले. खेरीज ब्रह्मदेवाने अन्य वर देऊन भयोत्पादकत्व, मित्रभयनाशकत्व यथेष्ट गमन, कामरूपधारित्व आणि ब्रह्मास्त्राचे बंधन झाले तर त्यातून मुक्तता होणे इत्यादींचा त्यास लाभ करून दिला. वरप्राप्तीने हनुमान अधिकच बलवान झाला. त्याचा लंकेचा प्रवास सुकर व निर्भय झाला. परंतु वरप्राप्तीमुळे भृगू व अंगिरस गोत्री ऋषींना ह्याने त्रास दिल्याने त्यांनी 'आपल्या बलाची तुला आठवण राहणार नाही', असा ह्याला शाप दिला.

हनुमान अत्यंत बुद्धिमान होता. व्याकरण, सूत्र, सूत्रवृत्ती, भाष्य, संग्रह इत्यादींचे ह्यास उत्तम ज्ञान होते. हा वाक्पटू होता, दूतकार्यात निपुण होता. सीतेचा शोध आणि लंकेतील परिस्थितीची इत्थंभूत वार्ता केवळ हाच काढू शकला. रामाचा निस्सीम भक्त होता. सुग्रीव आणि राम ह्यांचे सख्य ह्यानेच घडवून आणले आणि ते टिकवण्यासाठीही योग्य सल्ला सुग्रीवाला दिला. ह्याने अनेक राक्षसांचा वध केला आणि लंका नगरी दग्ध केली. इंद्रजिताने ब्रह्मास्त्राने ह्याला बांधले असता अन्य राक्षसांनी तो निश्चेष्ट झालेला पाहून इतर बंधनांनी बांधले असता ब्रह्मास्त्रपाशापासून हा आपोआप मुक्त झाला. मृत झालेल्या वानरवीरांना जिवंत करण्यासाठी व मूर्च्छित झालेल्या लक्ष्मणासाठी द्रोणगिरी उचलून आणून ह्याने औषधी पुरविल्या. लंकेहून अयोध्येला परत जाताना भरता-कडे रामाने ह्यास मुद्दाम प्रथम धाडले. 'जोपर्यंत माझ्या कथा जगतामध्ये प्रचलित राहतील तोपर्यंत माझ्या आज्ञेचे परिपालन करून तू सुप्रसन्न मनाने भूतलावर

स्वस्थ रहा ', असा रामाने त्याला आशीर्वाद दिला आणि त्यामुळे ह्यास विशेष आनंद झाला.

## १६१ हेती–प्रहेती

हेती व प्रहेती हे दोघे भाऊ–भाऊ. प्रहेती हा धार्मिक वृत्तीचा असल्यान राक्षसाधिप असूनही तप करण्याकरिता अरण्यात गेला. हेतीची भार्या भया, आणि पुत्र विद्युत्केश. हा वृत्राचा एक अनुयायी. विष्णूने त्याचा पराजय केला होता.

## १६२ हेमा

भरताच्या स्वागतार्थ बोलावलेल्या अनेक अप्सरांपैकी एक. मय नावाच्या राक्षसाची भार्या. देवांनीच त्याला ही अप्सरा दिली होती असा एक उल्लेख आढळतो. परंतु वाल्मीकी रामायणात मय तिच्याशी लंपट झाल्यामुळे इंद्राने त्याचा वध केला, असे दिले आहे. मयाने एक सौवर्णवन व कांचनगृह निर्माण केले व तेथे तो हेमाबरोबर राहात असे. मयाच्या वधानंतर ब्रह्मदेवाने ते सौवर्णवन, अक्षय्य भोग्य पदार्थ आणि सुवर्णमय वसतिस्थान हेमाला दिले. त्यांचे रक्षण तिची प्रियसखी स्वयंप्रभा करीत असे. स्वर्गाला जाताना हेमाने ते स्वयंप्रभेला दिले. हेमा नृत्य गायनात प्रवीण होती. हिच्यापासून मयाला झालेली कन्या–मंदोदरी ही रावणाची भार्या.

# स्थलविशेष

## १ ऋक्षबिळ

प्रयागपासून सुमारे १५० मैल अंतरावर मध्यप्रदेशातील रामगढ पर्वताजवळ विंध्य पर्वतात ही गुहा आहे. 'सीताबेंग्रा' गुंफा, हाथीफोड या नावांनीही ही गुहा ओळखली जाते. या गुहेत राम, लक्ष्मण, सीता अशा तीन स्वतंत्र नैसर्गिक गुंफा आहेत. मय राक्षसाने या गुहेत एक सौवर्णवन आणि कांचनमय वसतिस्थान निर्माण केले. त्या स्थळाचे सौंदर्य व वैभव पाहून हनुमानादी वानर आश्चर्यचकित झाले. त्या स्थळाचे रक्षण करणाऱ्या तपस्विनीकडून–स्वयंप्रभेकडून–त्या स्थळाची सर्व माहिती हनुमानाने मिळविली, आणि विवराबाहेर सुखरूपपणे जाण्यासाठी साहाय्य करण्याची तिला विनंती केली. येथे प्रविष्ट झालेला प्राणी जिवंत बाहेर पडण्याची अशक्यता तिने बोलून दाखवली, तथापि आपल्या सामर्थ्याने तिने त्यांना बिळाबाहेर आणून सोडले. बिळाबाहेर विंध्यगिरीजवळचा जलाशय येथे वानरांच्या दृष्टीस पडला, तेथून पुढे जाण्याचा मार्ग स्वयंप्रभेने दाखविला.

## २ ऋक्षवान

ह्या पर्वताचे स्थान विंध्य पर्वताच्या पूर्व व मध्यभागी असावे. सातपुडा पर्वताचाही काही भाग ह्यात येत असावा. गोंडवन पर्वत श्रेणी म्हणजे ऋक्षवान पर्वत. मार्कंडेय पुराणानुसार भारतातील सहा कुल पर्वतांपैकी हा एक होय. ह्याचा विस्तार नर्मदा नदीच्या उगमापासून बंगालच्या खाडीपर्यंत दिसतो. निरनिराळ्या प्राचीन ग्रंथांतून ह्या पर्वताची नामांतरे आढळतात. ऋक्ष म्हणजे अस्वल. ह्यावरूनच ह्या पर्वतास ऋक्षवान असे नाव पडले. धूम्र हा एक वानरगटाचा सेनापती ह्या पर्वतावर राहात असे. अस्वलाला ग्रीक भाषेत अर्क्तोस असा शब्द असून टॉलेमीच्या ग्रंथात आर्क्सेंतीन हे नाव आढळते, ते ह्या पर्वताचेच नामांतर आहे. नर्मदा, तापी, धसन, दमुदा, सोन, महानदी, मंदाकिनी, तमसा आदी गंगा–यमुना यांच्या उपनद्या ह्या पर्वतात उगम पावल्या आहेत.

## ३ ऋष्यमूक

बेल्लारी जिल्ह्यातील हंपीजवळचा एक पर्वत. हा तुंगभद्रा नदीकाठी आहे. सह्य पर्वताच्या दक्षिण भागाचा एक उपपर्वत. येथे सुग्रीव रहात असे. राम–लक्ष्मणांनी येथेच त्याच्याशी मैत्री केली. मतंग मुनीच्या शापामुळे वालीला येथे

येण्यास मज्जाव केला होता. महाभारतात ह्या पर्वताचा 'तीर्थ' म्हणून उल्लेख आहे.

## ४ कनखलतीर्थ

हरिद्वारपासून चार कि. मी. अंतरावर हे तीर्थ आहे. येथे दक्षप्रजापतीने यज्ञ केला व त्या वेळी सतीने देहार्पण केल्याने शंकराने त्या यज्ञाचा विध्वंस केला अशी आख्यायिका आहे. या तीर्थात स्नान केल्यास पुनर्जन्मापासून मुक्ती मिळते अशी श्रद्धा आहे. दक्षप्रजापतीचे येथे एक मंदिर आहे. श्राद्धविधी करण्यास हे स्थल अतिशय उत्तम असल्याचे अनेक पुराणांनी म्हटले आहे. स्कंद पुराणानुसार हे तीर्थ अरुणाचल पर्वतावरील शिवस्थान होय. नृग राजाने दान केलेल्या गाईंपैकी एका दरिद्री ब्राह्मणाची गाय या तीर्थावर सापडली. सनत्कुमार ऋषी या तीर्थावर राहात असत.

## ५ किष्किंधा

वानरराज वाली आणि सुग्रीव यांची राजधानी. दक्षिण भारतात पंपा सरोवराजवळचे एक नगर–आसमंतात पंपा नदी, तुंगभद्रा नदी, प्रस्रवण पर्वत, मातंगाश्रम इ. हे नगर पर्वत आणि खंदक यांनी वेढलेले होते व तेथे रत्ने आणि उपवने यांची समृद्धी होती. चित्रावशास्त्रींच्या मते कर्नाटकातील हंपी (अनेगुंदी) हे गाव म्हणजेच किष्किंधा नगरी. येथून जवळच तुंगभद्रेच्या तीरावर वालीप्रसाद व सप्ततालवेध ही स्थाने आहेत. ब्रह्मदेवाच्या आनंदाश्रूने जन्मलेल्या ऋक्षराज वानराधिपतीसाठी ब्रह्मदेवाच्या आज्ञेने विश्वकर्म्याने हे नगर निर्माण केले, असे भावार्थ रामायणात दिले आहे. 'पर्वताच्या मागे मृत्यू' अशा अर्थाचा 'किष्किंधा' हा शब्द शंबर भाषेतील आहे. जैन ग्रंथांतून या नगरीचे नाव 'खखूंद' असे आढळते.

## ६ केकय

उदीच्य देशातील पंचनद्यांच्या प्रदेशातील वितस्ता (आधुनिक नाव झेलम) नदीच्या पूर्वेकडील एक जानपद. अनेक नामांतरे आढळतात. कैकय, कैकेय, केकय-स्थापित देश इत्यादी. उशीनर आणि शिबी या लोकांबरोबर या देशाचा समावेश. राजधानी राजगृह. विपाशा नदीच्या काठी असलेला हा देश रामायणकाली बाल्हीक आणि इक्षुमती नदीच्या पश्चिमेस असावा. सदोदित होणाऱ्या परकीय आक्रमणांमुळे येथील लोक युद्धकुशल व धनुर्विद्याप्रवीण होते. पूर्व गांधारचा राजा

आंभी ह्याला वश करून सिकंदर पश्चिम सरहद्दीवर असलेल्या वितस्ता नदीकाठी आला होता. दशरथाचा सासरा कैकय अश्वपती हा ह्या देशाचा राजा होता.

## ७ गंगा

**'गमयति भगवत्पदमिति गंगा'** – स्नान–कर्त्या जीवाला भगवत्पदापर्यंत पोहोचविते ती गंगा.

**'गम्यते प्राप्यते मोक्षार्थिभिरिति गंगा'** –मुमुक्षू जिच्याकडे जातात ती गंगा'– अशा गंगा शब्दाच्या व्युत्पत्ती दिल्या जातात.

ही भारतातील सात पवित्र नद्यांपैकी सर्वात श्रेष्ठ पवित्र नदी. हिला विष्णुपदी, त्रिपथगा, भागीरथी, जान्हवी अशीही अन्य नावे आहेत. हिचा उगम उत्तर प्रदेशातील टेहरी गढवाल भागातील गंगोत्रीजवळ समुद्रसपाटीपासून ४२०० मीटर उंच जागी झाला आहे. हृषिकेशपाशी ती सपाट प्रदेशात प्रवेश करते. गंगा–यमुना संगमापर्यंतच्या मध्यभागाला अंतर्वेदी म्हणतात. हा भाग सुपीक असून येथे वैदिक संस्कृतीचे केंद्र होते. हिला यमुना, ब्रह्मपुत्रा, मेघना इत्यादी लहानमोठ्या अनेक नद्या मिळतात. ही गंगासागराला सहस्रमुखांनी मिळते. हिच्या मुखावर सागर नावाचे बेट असून तेथे कपिल मुनीचा आश्रम होता, असे म्हणतात. गंगेचे पावित्र्य सर्व साधुसंतानी, महापुरुषांनी मानले आहे. आरोग्यदृष्ट्या गंगाजल अतिशुद्ध, रोगनिवारक आणि शक्तिदायक आहे. हिच्या काठावर साडे तीन कोटी तीर्थे आहेत अशी धार्मिक दृष्टीच्या लोकांची श्रद्धा आहे.

गंगेने अग्नीचे बीज धारण करून स्कंदाला जन्म दिला. ही महासागराची पत्नी असून वेदाची उजवी बाजू आहे. पुराणात गंगेचे माहात्म्य विस्ताराने वर्णिले आहे. ऋग्वेदात हिचा उल्लेख आहे. ही एक स्वर्गीय देवता मानली जाते. एकदा सर्व देव ब्रह्मदेवाकडे गेले. त्यांच्या बरोबर गंगा व इक्ष्वाकुकुलोपन्न महाभिषही होता. वाऱ्याने हिचे वस्त्र उडाले असता सर्व देवांनी माना खाली घातल्या परंतु महाभिष तिच्याकडे निःशंकपणे पहात राहिला तेव्हा ब्रह्मदेवाने त्याला शाप दिला 'तू मृत्युलोकी जन्म घेशील व गंगा तुझी स्त्री होईल. ती तुला अप्रिय अशी कृत्ये करील आणि जेव्हा कृत्याचा राग येईल तेव्हा तू मुक्त होशील'. शाप ऐकून महाभिषाने प्रतीपाच्या पोटी जन्म घेण्याचे ठरविले. वाटेत वसिष्ठ-शापाने मृत्युलोकी येणारे अष्टवसू गंगेला भेटले. त्यांनी तिच्या पोटी जन्म घेण्याचे योजिले. त्यांनी आपली इच्छा तिला सांगितली, परंतु एक अट घातली. जो मुलगा जन्माला येईल त्याला तिने पाण्यात टाकले पाहिजे. तिनेही एक मुलगा वगळता इतर मुलांना त्यांच्या इच्छेनुसार पाण्यात टाकण्यास अनुमती दिली. अष्टवसूंनीही त्यांच्या

प्रत्येकाचा अंश असलेला एक मुलगा देण्यास मान्यता दिली. महाभिषाने प्रतीपाच्या पोटी जन्म घेतला, त्याचे नाव शांतनू. गंगेचा शांतनूशी विवाह झाला. परंतु तिने आपल्या सासऱ्याला विवाहापूर्वी अशी अट घातली होती–' विवाहानंतर मी जे जे करीन त्याला पतीने आडकाठी करता कामा नये आणि या अटीचे पालन जोपर्यंत होत राहील तोपर्यंतच त्याला माझा सहवास लाभेल.' हिला शांतनूपासून आठ पुत्र झाले. त्यांपैकी सात तिने पाण्यात बुडविले. आठव्या मुलास बुडविण्यास शांतनूने हरकत घेतली तेव्हा ही त्यास सोडून स्वर्गलोकी गेली. हा आठवा पुत्र म्हणजे भीष्म. त्याला हिने आपल्याबरोबर स्वर्गलोकी नेऊन सर्व तऱ्हेचे शिक्षण दिले आणि शांतनू मृगयेस आला असता त्याचे स्वाधीन केले.

## ८ गोदावरी

दक्षिण भारतातील एक अत्यंत पवित्र नदी. ही दक्षिण गंगा मानली जाते. नासिकजवळ त्र्यंबकेश्वरी हिचा उगम असलेले स्थान ब्रह्मगिरी म्हणून प्रसिद्ध आहे. गौतम ऋषींच्या हातून एका गायीचा वध झाला असता, त्या पापातून मुक्त होण्यासाठी गौतमाने शंकराच्या मस्तकावरील गंगा आणली. म्हणून या नदीला 'गौतमी' असेही म्हटले जाते. हिच्या तीरावर शंभर पवित्र तीर्थे आहेत. गंगा नदीचे पाणी मेलेल्या गायीच्या अंगावरून गेल्याने गाय जिवंत झाली, म्हणून 'गोदावरी' नाव पडले अशी एक आख्यायिका आहे. रेवा तीरी तप, गंगा तीरी मरण, आणि कुरुक्षेत्री दान केल्यास मोठे पुण्य लाभते, अशी हिंदूंची श्रद्धा आहे. ह्या तिन्ही गोष्टी गोदावरीच्या तीरावर घडल्यास मोक्षप्राप्ती होते असे मानतात. हिच्या तीरावरील पैठण नगर दक्षिण काशी मानले जाते. तर सिंहस्थामुळे नासिक पवित्र क्षेत्र म्हणून प्रसिद्ध आहे. महाराष्ट्र, आंध्र आणि कर्नाटक या तिन्ही राज्यातून ही नदी जात असून तिची लांबी ९०० मैल, आहे. प्रवरा, वर्धा, वैनगंगा, धारणा, इंद्रावती अशा अनेक उपनद्या हिला मिळतात. हिच्या सान्निध्याने बराच मोठा भूप्रदेश अत्यंत सुपीक झाला आहे. ही गंगासागराला मिळते. राजमहेंद्री येथे पुष्कर महोत्सव केला जातो.

## ९ चैत्ररथवन

ह्याच्या स्थानाबाबत निरनिराळ्या ग्रंथांतून वेगवेगळी माहिती आढळते. हे वन उत्तरकुरू प्रदेशात होते. चित्ररथ गंधर्वाने या वनाची निर्मिती केली म्हणून चैत्ररथवन असे नाव पडले. ब्रह्मपुराणातील माहितीप्रमाणे हे उद्यान चंद्रप्रभ पर्वतावर होते, आणि तेथे उर्वशी–ऐल यांची भेट झाली. मत्स्यपुराणात हे वन मंदार पर्वतावर असल्याचा उल्लेख आहे. वायुपुराणात हे वन इलावृत्ताच्या पूर्वेस

असलेल्या अच्छोदा नदीकाठी असल्याचे दिले आहे. येथे इंद्रादी देव विहारासाठी येत असत. भागवत पुराणानुसार हे वन मेरुमंदर पर्वतावर होते.

## १० ताटकावन

अगस्त्य ऋषीने शाप दिल्यानंतर ताटका ज्या मलद व करूष प्रदेशात येऊन राहिली होती, तो प्रदेश उजाड झाला होता. तोच ताटकावन म्हणून ओळखला जातो. विश्वामित्राचा आश्रम या वनाजवळच होता. अलाहाबादपासून शहाबाद जिल्ह्यापर्यंतचा गंगा नदीच्या दक्षिणेकडील अरण्यमय भूभाग म्हणजे पूर्वीचे हे ताटकावन असावे.

## ११ दंडकारण्य

प्राचीन संस्कृत वाङमयात विंध्य पर्वताच्या दक्षिणेकडील भागाला दक्षिणापथ असे नाव होते. तेच दंडकारण्य असावे, असे एक मत आहे. वाल्मीकीने, ज्या प्रदेशाला भार्गवाने शाप दिला तो प्रदेश विंध्य व शैवल यांच्या मध्यभागी आहे', असे वर्णिले आहे. या अरण्यात तपस्वी वास्तव्य करीत म्हणून ते जनस्थान या नावाने प्रसिद्ध झाले. दंड राजाने याच वनात भार्गव-कन्या अरजा हिच्यावर बलात्कार केला. दंड राजाला भार्गवाने जो शाप दिला, त्याबरोबरच दंडकारण्यालाही त्या राजाच्या वास्तव्यामुळे शाप भोगावा लागला आणि हा प्रदेश इंद्राच्या धूलिवृष्टीमुळे स्थावर–जंगमादी प्राण्यांसह उध्वस्त झाला. राजाच्या नावावरूनच ह्या प्रदेशाला दंडकारण्य असे नाव प्राप्त झाले. रामायणकाली या भागात राक्षस व वानरांची वस्ती होती. आर्य व द्रविड यांची प्रथम भेट दंडकारण्यात झाली असे काही संशोधकांचे मत आहे. महाभारतकालीन विदर्भ, अश्मक, मूलक, कुंतल, गोपराष्ट्र, मल्लराष्ट्र हे भाग या प्रदेशातच असावेत. यादव वंशाच्या भिन्न भिन्न शाखांची राज्ये येथे होती.

हे वन नर्मदा ते गोदावरी या नद्यांच्या दरम्यान पसरलेले आहे. चित्रकूट पर्वतापासून गोदावरीच्या मुखापर्यंत याचा विस्तार होता, असे मानले जाते. या वनात राम दहा वर्षे राहिला.

## १२ निकुंभिला

कोलंबोपासून ४० मैलांचे अंतरावर निकुंभिला देवीचे स्थान असून इंद्रजित या देवीची पूजा करीत असे. तेथे त्याने यज्ञ केला होता. निकुंभिला देवीचे स्थान

असलेले वन आज पूर्वीसारखे राहिलेले नाही. समुद्राचे उल्लंघन केल्यावर हनुमानाला जे विविध प्रदेश लागले, त्यांच्या वर्णनात निकुंभिलेचा उल्लेख आहे.

## १३ (द्यावा-) पृथिवी

द्यावा-पृथिवी यांना ऋग्वेदात माता–पिता असे संबोधिलेले आढळते. हे इंद्रादी देवता व सर्व लोकांचे माता-पिता होत. शंकर व उमा यांच्या रतिक्रीडेत देवांनी विघ्न आणले असता पृथ्वीने शंकराचे तेज (वीर्य) धारण केले. त्यामुळे उमेने हिला शाप दिला. त्यामुळे तिला अनेक पती व अस्थिर स्वरूप प्राप्त झाले आणि पुत्र-प्राप्ती होऊ शकली नाही.

## १४ प्रस्रवण

तुंगभद्रा नदीचे काठी किष्किंधेजवळ प्रस्रवण हा पर्वत आहे. माल्यवान पर्वताचाच हा एक भाग आहे. ह्याच्यापासून अनेक नद्या उगम पावल्या आहेत. ह्या पर्वताच्या माथ्यावर एका गुहेत राम-लक्ष्मण पावसाळ्यात चार महिने राहिले होते. तिच्यात पुष्कळ हवा खेळत असे. ऋक्ष बिळातून सर्व वानरांना बाहेर काढल्यावर तापसी स्वयंप्रभेने महासागर दाखविताना या पर्वताचा उल्लेख केला आहे.

नदीच्या नावाचा उल्लेख नाही.

## १५ भृगुतुंग

भृगुतुंग पर्वतावर ऋचीक मुनीचा आश्रम होता. अंबरीषाला या पर्वतावर ऋचीक मुनीचे दर्शन झाले.

## १६ मधुपुरी (मथुरा)

मधुदैत्याचा पुत्र लवण ह्याची नगरी. यमुनेच्या तीरावर असून मधुरा, मधुपुर, मधूषिका, मधूपघ्ना अशी नामांतरे आढळतात. अर्वाचीन मथुरा हे सप्त पुऱ्यांतील एक पुण्यक्षेत्र असून संस्कृतीचे एक प्रमुख केन्द्र. शूरसेन प्रदेशाची राजधानी. सोमवंशीय यादवांची सत्ता ह्या नगरीवर बराच काळ होती. हूण, हर्षवर्धन, वर्म, गुर्जर-प्रतिहार यांची व नंतर मुसलमान, इंग्रज ह्यांची सत्ता येथे होती शक–क्षत्रपांच्या राजवटीत मथुरा हे जैन, बौद्ध व भागवत धर्मांचे प्रमुख केंद्र होते. अद्यापिही येथे हिंदूंची अनेक देवालये व बौद्ध स्तूप आहेत.

## १७ मरुकांतार

ह्याला द्रुमकुल्य देश असेही नाव आहे. दक्षिण समुद्र शरण आल्यावर त्याच्या सांगण्यावरून रामाने आपला बाण ह्या देशावर सोडला. दिसण्याला भयंकर असे आभीर नावाचे दस्यू लोक येथे रहात असत व ते घोर कर्मे करीत. ह्या देशाचे स्थान नक्की सांगणे कठीण आहे पंजाबातील हिस्सार जिल्हा, प्राचीन सरस्वती नदीच्या काठचा प्रदेश, वायव्य भारतातील हेरात-कंदहार प्रदेश, सिंधूचे खोरे, कच्छचा त्रिभुज प्रदेश अशा अनेक ठिकाणी आभीरांची वस्ती असल्याचे उल्लेख निरनिराळ्या ग्रंथांतून आढळतात. त्याचप्रमाणे हैद्राबाद (पाकिस्तान) आणि गुजरातेतील सुरतच्या परिसरातही आभीरांची वसतिस्थाने होती.

## १८ मलद, करूष

ह्या दोन देशांचा उल्लेख एकत्र करण्यात येतो, कारण वृत्रवधानंतर इंद्राची क्षुधा व मल या देशात टाकण्यात आला. मल धारण करणारा म्हणून मलद आणि क्षुधा (कारूष) सहन करणारा म्हणून करूष अशी नावे पडली. मध्यप्रदेशातील शोण–केन या नद्यांच्या दुआबातील रेवा गावाच्या परिसरातील प्रदेश. पश्चिमेस केन, पूर्वेस बिहार, दक्षिणेस कैमूर व उत्तरेस विंध्य अशा करूष देशाच्या सीमा होत्या. या प्रदेशात राहणारे लोक करूष. मनु–वैवस्वतपुत्र करूष याने या देशाची स्थापना केली. या देशाची अनेक नामांतरे झाली दंतवक्राचा पिता वृद्धशर्मन् हा करूषाधिपती होता. या देशाला 'अंगमालज' असेही नाव होते. अगस्त्य मुनींची ही तपोभूमी होती.

## १९ मिथिला

मिथ म्हणजे युग्म. विदेह–वैशाली दोहोंची मिळून मिथिला असे एक मत आहे निमी राजाच्या देहमंथनातून निर्माण झालेल्या मिथ पुत्राने ही नगरी निर्माण केली म्हणून मिथिला असे दुसरे मत. ही जनक राजाची राजधानी होती व गौतमाचा आश्रम जवळच होता. जनकपूर हे नेपाळमधील एक तीर्थक्षेत्र. त्याला विदेहनगर असेही नाव आहे. हे विद्येचे केंद्र होते. बौद्ध, जैन यांच्या दृष्टीनेही एक महत्त्वाचे नगर.

## २० मेरू

जम्बुद्वीपातील सात कुलपर्वतांपैकी मेरू हा पहिला. सुदर्शन हे वैकल्पिक नाव. –महामेरू, सुमेरू ही आणखी काही नामांतरे. हा सुवर्णमय असून तेथे पवित्र उद्याने

व पुण्यवान लोकांची विहारस्थाने होती. या पर्वताच्या पूर्वेला मंदर व दक्षिणेला गंधमादन पर्वत आहे. हा विशाल पर्वत जम्बुद्वीपाच्या मध्यभागी आहे. त्याचा आकार घंटाकृती फुलासारखा आहे. पायथ्याजवळचा घेर सोळा हजार योजने तर माथ्याजवळ बत्तीस हजार योजने, उंची चौऱ्याऐंशी योजने असून जमिनीत सोळा हजार योजने खोल आहे. हा पर्वत म्हणजे उंच विस्तीर्ण पठार असून त्याच्या सीमेवर उंच उंच डोंगर आहेत. हे पठार गोलाकार असून त्याच्या काही बाजू सपाट व काही कोनयुक्त आहेत. या पर्वताच्या दक्षिणेस हिमालय, हेमकूट व निषध पर्वत, तर उत्तरेस नील, श्वेत व शृंगी पर्वत. याच्या भोवती चार शिखरे चार रंगांची आहेत. ती त्याची मुखे होत. मेरूच्या तीन शिखरांवर ब्रह्मा, विष्णू, महेश यांची नगरे असून अष्ट दिशांना दिक्पालांची पुरे आहेत.

मेरू पर्वताच्या निश्चित स्थानाबाबत विद्वानांत मतभेद आहेत.

## २१ मैनाक

मैनाक पर्वताच्या निश्चित स्थानाबाबत विद्वानांत मतभेद आढळतात. श्री. नंदकुमार डे यांच्या मते हा पर्वत म्हणजे हिमालयाची शिवालिक पर्वतश्रेणी. पार्जिटरच्या मते आलमोडा या नावाने ओळखल्या जाणाऱ्या जिल्ह्यातील पर्वतश्रेणी म्हणजे मैनाक पर्वत होय. वाल्मीकी रामायणातील उल्लेखांचा विचार करता त्याचे स्थान भारत आणि लंका यांतील समुद्रात आहे. पूर्वी पर्वतांना पंख असत व ते इच्छेनुसार भ्रमण करीत. इंद्राने पर्वतांचे पंख कापण्यास प्रारंभ केला असता भयभीत होऊन मैनाक समुद्रात जाऊन लपला, अशी एक कथा आहे.

## २२ लंकानगरी

लंका ही राक्षसाधिपती रावणाची नगरी. दक्षिण सागराच्या किनाऱ्यावर शंभर योजने दूर असलेल्या समुद्रातील द्वीपात विश्वकर्म्याने निर्मिलेली ही नगरी शत योजने विस्तीर्ण अशा त्रिकूटाचलावर वसलेली आहे. दहा योजने रुंद आणि वीस योजने लांब अशी ही सुवर्णमय लंका तटा–बुरुजांनी वेढलेली होती. सुकेश-पुत्रांच्या तपश्चर्येने संतुष्ट होऊन विश्वकर्म्याने त्यांना लंकानगरी दिली. देवांनी मालीचा वध केल्यानंतर माल्यवान आपल्या बंधूंसह येथे वास्तव्य करीत होता. तो देवांना पीडा देऊ लागल्याने विष्णूने त्याचा वध केला. पुढे वैश्रवण कुबेराने वडिलांकडून लंका मागून घेतली, परंतु रावणाने त्याचा पराभव करून लंका आपल्या आधीन करून घेतली. रावणवधानंतर बिभीषणाकडे लंकेचे राज्य आले.

लंकेच्या भौगोलिक स्थानाविषयी विद्वान संशोधकांत बरेच मतभेद आहेत. मालदीव व जावा ह्या बेटांना काही संशोधकांनी लंका मानले आहे, तर काहींच्या

तर्क लंका मध्यभारतात विंध्यपर्वताजवळ असावी असा आहे. मुंबईजवळील बोरीवलीपाशी लंका असावी, असेही मत आहे. सिंहलद्वीप हीच लंका असल्याची पूर्वापार समजूत आहे, व ह्या विधानाला पोषक असे अनेक उल्लेख वाल्मीकी रामायणात आहेत. (श्रीरामकोश खंड २ भाग ३/१ परिशिष्ट पृ. ७६–८६ मध्ये या सर्व मतांचा तपशिलासह विचार केला आहे. जिज्ञासूंनी तो मुळात पहावा.)

सर्वसामान्यपणे श्रीलंका (सिलोन) हीच रावणाची लंका होय, असे मानले जाते. रावणाची लंका पाण्यात बुडाली असावी, असाही एक तर्क आहे. गुप्त व मौर्य राजांचाही लंकेशी संबंध होता. विजयनगरचा राजा दुसरा देवराय याच्या आधिपत्याखाली हा देश होता. नंतर पोर्तुगीज, डच व इंग्रज येथे काही काल राज्य करीत होते. आता श्रीलंका हे स्वतंत्र सार्वभौम राष्ट्र आहे. निकुंभिला देवीचे स्थान कोलंबोपासून चाळीस मैलांच्या अंतरावर आहे. येथे सीता-स्यानेही अनेक आहेत. अशोक काळात हा देश 'ताम्रपर्णी' या नावाने ओळखला जात होता.

## २३ विंध्य

मध्यभारतातील एक पर्वत. उत्तर भारत व दक्षिण भारत असे दोन भाग या पर्वतामुळे झाले. याचा विस्तार गुजरात, मध्यप्रदेश आणि बिहार या राज्यांत झाला आहे. मेरूपेक्षा अधिक उंच होण्याच्या इच्छेने तो वाढू लागला. परंतु गुरू अगस्त्य यांच्या दर्शनाने तो नम्र होऊन स्थिर झाला अशी कथा मत्स्य, पद्म व वायुपुराणांत दिली आहे. हा अत्यंत प्राचीन पर्वत असून सप्त कुलपर्वतांपैकी एक आहे. हा दक्षिणगिरी या नावानेही ख्यात आहे. तापी, नर्मदा, शोण, महानदी इत्यादी नद्या ह्या पर्वतात उगम पावतात. ह्याची समुद्रसपाटी पासून उंची २५०० फूट व लांबी ७०० मैल आहे. ऋक्षवान व पारियात्र हे ह्याच पर्वताचे भाग आहेत. येथे आरण्य लोकांची वस्ती होती. प्राचीन काळी दशार्ण, भोज, कोसल ही अनेक जनपदे येथे होती.

## २४ वैजयंतनगर

दण्डकारण्यातील एक राजधानीचे नगर निमी राजाने गौतमाश्रमाजवळ हे बसविले होते.

## २५ सिद्धाश्रम

मुगलसराय आणि पाटणा या लोहमार्गावर बक्सर नावाचे एक स्थानक आहे. त्रेतायुगात हे स्थान सिद्धाश्रम म्हणून प्रसिद्ध होते. पौराणिक कालात हे तपोवन

म्हणून ओळखले जात होते. महातपस्वी विष्णू या ठिकाणी तपाने सिद्ध झाल्यामुळे याचे नाव ' सिद्धाश्रम ' झाले. विश्वामित्र येथेच राहात असे. हे थोरा नदीच्या काठी असून वामनाचेही निवासस्थान होते.

## २६ हिमवान

भारताच्या उत्तर सीमेवरील प्रसिद्ध हिमालय पर्वताचे पौराणिक नाव हिमवान. खेरीज हिमवत्, हिमाचल, हिमाद्री, हैमवत अशीही नावे निरनिराळ्या ग्रंथांत आढळतात. याची उंची दहा हजार योजने असून तो इलावृत्ताच्या दक्षिणेला पूर्व–पश्चिम विस्तारला आहे. मार्कंडेय पुराणात त्याचा विस्तार पूर्वसमुद्रापासून पश्चिमसमुद्रापर्यंत असल्याचे दिले आहे. कूर्मपुराणात त्याची लांबी एक हजार ऐंशी योजने असल्याचे वर्णिले आहे. ऋग्वेद, अथर्ववेद, यजुर्वेद, ऐतरेय ब्राह्मण इत्यादी ग्रंथांतून ह्याचे उल्लेख आढळतात. तैत्तिरीय, शतपथ ब्राह्मण, पाणिनीची अष्टाध्यायी या ग्रंथांतूनही ह्या पर्वताविषयी माहिती कळते.'स्थावराणां हिमालय:' असे श्रीकृष्णाने स्वताला गीतेत म्हटले आहे. कालिदासाच्या रघुवंशात हिमालयाचे सुंदर वर्णन आढळते. अनेक ऋषींनी ह्या पर्वतावरच आपले आश्रम निर्माण केले. गौरीशंकर, कांचनगंगा, धवलगिरी अशी याची गगनचुंबी शिखरे असून गंगा, यमुना, काली, घाग्रा, गंडक, कोसी, ब्रह्मपुत्रा, सरयू, झेलम अशा अनेक नद्यांचे उगम ह्याच पर्वतातून झाले आहेत. यावरील अरण्यांत अनेक आयुर्वेदिक वनस्पती आढळतात. केदारनाथ, पशुपतिनाथ, बदरीनाथ अशी अनेक पवित्र तीर्थे या पर्वतराजीवर आहेत. हिंदूंप्रमाणे बौद्धांचीही अनेक तीर्थक्षेत्रे येथे आहेत. धर्म, संस्कृती, साहित्य, कला, दैवते इत्यादींच्या दृष्टीने ह्या पर्वताचे महत्त्व अनन्यसाधारण आहे.

# शंकास्पद शाप/वर

[ वाल्मीकी रामायणातील काही घटना-प्रसंग असे आहेत की त्यांचे स्वरूप शाप/वर यांसारखे भासले तरी त्यांना शाप/वर मानावे किंवा नाही याविषयी संदेह उत्पन्न व्हावा. यांना शाप/वर मानणे न मानणे, याबाबत मतभेद होऊ शकतील. ]

## काक पक्ष्याला शिक्षा सुन्दरकाण्ड/३८

लंकेत गेलेल्या हनुमानाची व सीतेची निश्चित गाठभेट झाली, याबाबत रामाची खात्री पटवून देण्यासाठी हनुमानाने सीतेला काही तरी खूण देण्याची विनंती केली असता तिने त्याला एक कथा सांगितली व ती रामाला कथन केल्यास त्याची खात्री पटेल, असा विश्वास व्यक्त केला.

राम, लक्ष्मण, सीता चित्रकूट पर्वताच्या पायथ्याशी मंदाकिनीच्या जवळील प्रदेशात वास्तव्य करीत असताना भोजनोत्तर उर्वरित मांस-खंडांचे रक्षण करीत सीता बसली असता, रामही सन्निध होता. पति-पत्नीचा नर्म विनोद, शृंगार चालू असता मांसाच्या लोभाने एक काक पक्षी तेथे आला. सीतेने मातीच्या ढेकळांनी त्याचे निवारण करण्याचा प्रयत्न केला. तेव्हा तो अधिकच लगट करू लागला. त्याने तिच्या चेहऱ्यावर आपल्या चोचीने व नखांनी ओरखाडे काढले. सीतेला त्याचा विलक्षण राग आला. काक पक्ष्याने बराच छळ केल्याने ती खूप श्रान्त झाली होती. रामाच्या अंकावर पहुडली असता उभयतांचा डोळा लागला. तेव्हा—

स तत्र पुनरेवाथ वायसः समुपागमत् ।
ततः सुप्तप्रबुद्धां मां राघवाङ्कात्समुत्थिताम् ।
वायसः सहसागम्य विददार स्तनान्तरे ।। २२

पुनरपि तो काक पक्षी तेथे आला आणि सीता झोपेतून जागी होऊन रामाच्या मांडीवरून उठून बसली असता एकाएकी तिच्याकडे येऊन त्याने तिचे वक्षःस्थल ओरबाडले.

पुनः पुनरथोत्पत्य विददार स मां भृशम् । –२३

अशा रीतीने वारंवार तो पक्षी उडून जाई आणि वारंवार तिचे वक्षःस्थल ओरबाडून टाकत होता. तिच्या रक्ताचे थेंब अंगावर पडल्याने राम जागा झाला आणि सीतेचे स्तन ओरखडलेले पाहून अत्यंत संतप्त झाला. तो तिला म्हणाला,

केन ते नागनासोरु विक्षतं वै स्तनान्तरम् ।
कः क्रीडति स रोषेण पञ्चवक्त्रेण भोगिना ।। २५

'हे रंभोरू, तुझ्या स्तनांमध्ये कोणी ओरखडले ? पंचमुखी क्रुद्ध नागासह-वर्तमान कोण बरे क्रीडा करीत आहे ?' रामाची नजर त्या पक्ष्याकडे फिरताच तो भूमीच्या बिळात प्रविष्ट झाला. **पुत्रः किल स शक्रस्य वायसः पततां वरः ।–२७** 'पक्ष्यांमध्ये वस्ताद असलेला तो काकपक्षी इंद्राचा पुत्र होता.'

संतप्त झालेल्या रामाने ब्रह्मास्त्राने अभिमंत्रित एक दर्भ त्या पक्ष्याला अनुलक्षून सोडला असता तो बिळातून बाहेर येऊन आकाशात उडाला. जाईल तेथे दर्भाने त्याचा पिच्छा पुरवला. तो सारे त्रैलोक्य हिंडला. परंतु कुठेही त्याला आश्रय मिळाला नाही. तो जाईल तेथे दर्भाने पाठलाग केला. शेवटी तो रामालाच शरण गेला, व त्याने प्राण वाचवण्याची विनंती केली. शरणागताला अभय देण्याचे रामाचे ब्रीद असल्याने आणि त्याची दया आल्याने राम त्याला म्हणाला–

मोघमस्त्रं न शक्यं तु ब्राह्मं कर्तुं तदुच्यताम् ।।–३४

'हे ब्रह्मास्त्र व्यर्थ होणे शक्य नाही तेव्हा ह्या अस्त्रापासून कशाचा नाश व्हावा हे तू मला सांग. तू जर तुझ्या एका अवयवाची आशा सोडून देत असशील तर माझ्या अस्त्राचे सार्थक होईल व तुझेही प्राण वाचतील.' रामाचे भाषण ऐकून त्या पक्ष्याने रामाला त्याच्या अस्त्राचे सार्थक एका डोळयावर करण्यास सांगितले. त्यानुसार काक एकाक्ष झाला.

हा प्रसंग शापासारखा भासला तरी शाप नव्हे. रामाने काक पक्ष्याला शाप दिला नसून त्याच्या अतिप्रसंगास्तव शिक्षा केली आहे. रामाचे ठायी शाप देण्याचे सामर्थ्य असूनही त्याने कोणालाही शाप दिलेला नाही. त्याचप्रमाणे कोणी वर देऊ केले तरी त्याने ते विनयपूर्वक नाकारले व जेव्हा स्वीकारले तेव्हा त्याचा फायदा व्यक्तिगत सौख्यासाठी घेतला नाही. समाज-कल्याणासाठीच उपयोग करून

---

ही कथा अयोध्याकांड/९५ नंतर प्रक्षिप्त सर्गातही आली आहे. प्रस्तुतचा सर्ग गीता प्रेस, गोरखपुर प्रतीत दिलेला नाही. मराठी अनुवादात ह्या सर्गाला 'वनक्रीडा' असे शीर्षक दिले आहे. यात काक पक्ष्याची मजल तिच्या गळयातील हारापर्यंतच गेल्याचे वर्णिले असून रामाने त्या पक्ष्याला शिक्षा करण्यासाठी ऐषीकास्त्राने अभिमंत्रण केलेली बाणाची एक काडी त्याचे पाठीमागे सोडल्याचे वर्णिले आहे. काक पक्ष्याविषयी विशेष माहिती दिलेली नाही.

घेतला आहे. रामाने प्रस्रवण पर्वत आणि नदीला उद्देशून जी शापतुल्य वाणी उच्चारली, ती एक तर सशर्त आहे आणि दुसरे म्हणजे त्यांनी शर्तीचे अवलंबन केल्याने प्रत्यक्षात शाप देण्याची वेळही आलेली नाही. काक पक्षी मनुष्यवाणीने बोलत होता ही गोष्ट सूचक असून त्याचे खरे स्वरूप वेगळेच असावे, हे स्पष्टच झाले आहे.

वाल्मीकीने शाप शब्द योजलेला नाही तसेच मराठी अनुवादातही 'शाप' शब्द नसून 'शिक्षा' शब्द योजला आहे.

## उमा, रंभा, वरुणकन्यांचे शाप युद्धकाण्ड/६०

रामाच्या बाणांनी भयभीत झालेला आणि पराजयामुळे खचलेला रावण इतर राक्षसांना आपली व्यथा बोलून दाखवताना म्हणतो– 'ज्या अर्थी महेंद्रासमान असलेल्या माझा मानवाने पराजय केला, त्या अर्थी मी केलेली पराकाष्ठेची तपश्चर्या खरोखर व्यर्थ झाली.' ब्रह्मदेवापाशी वर मागताना मानवाचा उल्लेख न केल्याने 'मानवापासून भय आहे, हे तू जाणून ठेव' हे त्याचे शब्द त्याला आठवतात. त्याचप्रमाणे अनरण्य, वेदवती यांनी दिलेले शाप–याविषयी सांगताना तो पुढे म्हणतो–

उमा नन्दीश्वरश्चापि रम्भा वरुणकन्यका ।।–११
यथोक्तास्तन्मया प्राप्तं न मिथ्या ऋषिभाषितम् ।।–१२

'त्याचप्रमाणे उमा, नंदिकेश्वर, रंभा आणि वरुणकन्या ह्यांनी जे सांगितले (शाप दिले) तेच मला प्राप्त झाले आहे. कारण तपस्वी जनांचे भाषण असत्य होणार नाही.'

नंदिकेश्वराने दिलेल्या शापाचा विचार स्वतंत्रपणे केला आहे. (पहा-शाप-क्र.४२ नंदिकेश्वर < रावण पृ.५६) येथे नंदिकेश्वराबरोबर उमा, रंभा व वरुणकन्यका यांच्या शापांचा उल्लेख केला असला तरी त्यांनी रावणाला कोणत्या कारणास्तव, केव्हा आणि कोणते शाप दिले याबाबत वाल्मीकी रामायणात अधिक काहीही माहिती मिळत नाही, आणि म्हणून त्याचा स्वतंत्रपणे विचार केलेला नाही. रावणाने रंभेवर केलेल्या बलात्कारामुळे क्रुद्ध झालेल्या नलकूबराने त्याला दिलेला शाप जर रंभेच्या संदर्भात अभिप्रेत असेल तर त्याचे विवेचन केलेले आहेच. (पहा-शाप–क्र–४६ नलकूबर < रावण पृ. ६४) रंभेने वेगळा शाप दिल्याचा आणि उमा व वरुणकन्यांनी दिलेल्या शापांबाबत अन्यत्र कोठेच उल्लेख नाहीत.

## पायसप्राप्ती — बालकाण्ड/१६

दशरथाने पुत्रप्राप्तीच्या उत्कट इच्छेने पुत्रकामेष्टी यज्ञ केला असता अग्निकुंडातून एक महापुरुष प्रकट झाला. त्याचे रूप प्रज्वलित अग्निज्वालेप्रमाणेच होते. दिव्य पायसाने परिपूर्ण असलेली, रुप्याचे झाकण घातलेली एक सुवर्णमय स्थाली त्याच्या हातात होती. प्रजापतीने मला तुझ्याकडे धाडले आहे' असे त्याने यज्ञमंडपात येऊन दशरथ राजाला सांगितले. दशरथानेही त्याचे यथोचित स्वागत केले. तो दशरथ राजाला म्हणाला–

इदं तु नृपशार्दूल पायसं देवनिर्मितम् ।
प्रजाकरं गृहाणत्वं धन्यमारोग्यवर्धनम् ।। १९

भार्याणामनुरूपाणामश्नीतेति प्रयच्छ वै ।
तासु त्वं लप्स्यसे पुत्रान्यदर्थं यजसे नृप ।। २०

" राजा, देवांचे अर्चन करीत असल्यामुळे आज तुला हे प्राप्त झाले आहे. हे नृपश्रेष्ठा, धनदायक, आरोग्यवर्धक आणि संतानकारक असे हे देवनिर्मित पायस तू ग्रहण कर आणि 'भक्षण करा' असे सांगून तू ते आपल्या प्रिय पत्नींना अर्पण कर. म्हणजे राजा, ज्याकरिता तू याग करीत आहेस. ते पुत्र तुला त्या पत्नींचे ठिकाणी प्राप्त होतील."

पायस हे यज्ञाचे फलित असून पुत्रप्राप्ती हा पायसाचा परिणाम आहे. वरासारखा भासत असला तरी पायसप्राप्तीला वर म्हणता येणार नाही. हा प्रसाद आहे, अनुग्रह आहे. पुत्रप्राप्ती पायसाच्या ठिकाणी असणाऱ्या गुणधर्मांमुळे होणार होती. वाल्मीकी रामायणात अपत्यप्राप्तीसाठी दिलेले जे दहा वर आढळतात. त्यांतील एकही प्रसंगात अपत्यप्राप्तीसाठी पायसासारख्या माध्यमाचा उपयोग केलेला आढळत नाही.

* पहा : वर क्र. ६,८,९,१०,११,१२,१३,१४,२० व ४५

## त्रिशंकूचे स्वर्गगमन — बालकाण्ड/६०

सदेह स्वर्गाला जाण्याच्या तीव्र इच्छेने प्रेरित होऊन यज्ञ करण्यास उद्युक्त झालेल्या त्रिशंकूला वसिष्ठाने ... त्याच्या पुरोहिताने– 'असे होणे अशक्य' असल्याचे सांगितले असता कष्टी होऊन तो त्याच्या पुत्रांकडे गेला. वसिष्ठपुत्रांनीही त्याची विनंती धुडकावून तर लावलीच, खेरीज 'चांडाल होशील' असा

शापही दिला. चांडालत्वाची प्राप्ती झालेला त्रिशंकू विश्वामित्राला शरण गेला आणि त्याने स्वताचे रक्षण व इच्छापूर्तीसाठी साहाय्य देण्याची विनंती केली. विश्वामित्राने त्याच्या रक्षणाची जबाबदारी स्वीकारून स्वता संपादन केलेल्या तपाच्या सामर्थ्याने गुरुपुत्रांच्या शापामुळे प्राप्त झालेल्या देहासह स्वर्ग प्राप्त करून देण्याची प्रतिज्ञा केली. त्याने त्रिशंकूला स्वर्गात धाडलेही, परंतु इंद्रादी देवांनी 'स्वर्गात राहण्याची तुझी लायकी नाही' असे सांगून खाली डोके वर पाय अशा अवस्थेत त्याला पृथ्वीवर ढकलून दिले. शरण आलेल्या त्रिशंकूचे रक्षण करणे व त्याची इच्छा पूर्ण करणे हे विश्वामित्राला कर्तव्य वाटले. आणि म्हणूनच तो म्हणाला–

**पश्य मे तपसो वीर्यं स्वार्जितस्य नरेश्वर।**
**एषं त्वां सशरीरेण नयामि स्वर्गमोजसा ।। १३**

**दुष्प्रापं स्वशरीरेण स्वर्गं गच्छ नरेश्वर।**
**स्वार्जितं किंचिदप्यस्ति मया हि तपसः फलम् ।। १४**

'राजा, स्वता संपादन केलेल्या माझ्या तपाचे सामर्थ्य आता पहा. हा मी आपल्या सामर्थ्याच्या योगाने स्वताच्या शरीरासहवर्तमान तुला स्वर्गाला नेतो. राजा, स्वशरीरासहवर्तमान प्राप्त होण्याला दुर्घट असलेल्या स्वर्गाला तू जा. तपाचे फल मी काही स्वसंपादित करून ठेविले आहे. करिता त्याच्या तेजाने तू शरीरासहवर्तमान स्वर्गास गमन कर.'

विश्वामित्राची प्रतिज्ञा ही केवळ सदिच्छादर्शक आहे, कारण त्याचे प्रयत्न अयशस्वी झाले आहेत. वाल्मीकीनेही वर शब्द योजिलेला नाही, हे लक्षात घेणे अगत्याचे आहे. वर अथवा शाप यांचे फलित निश्चित असते, ते निष्फल होऊच शकत नाही. विश्वामित्राचा प्रयत्न यशस्वी झाला असता तरच त्याला 'वर' ही संज्ञा प्राप्त होऊ शकली असती.

## शुनःशेपाला दीर्घायुष्याची प्राप्ती बालकाण्ड/६२

शुनःशेप हा ऋचीकाचा मधला मुलगा आणि विश्वामित्राचा भाचा. यज्ञात नरबळी देण्यासाठी अंबरीषाने त्याला विकत घेतले आणि त्याला घेऊन जात असता विश्वामित्राची भेट होताच तो त्याला शरण जाऊन म्हणाला– 'हे मुने, मला माता नाही व पिताही नाही, तेव्हा नातेवाईक आणि बांधव कोठून असणार? हे सौम्य, हे मुनिश्रेष्ठ, धर्माने आपण माझे रक्षण करा. हे पुरुषश्रेष्ठा, माझा रक्षक

तूच असून शरण आलेल्या सर्वांचे पालन करणाराही तूच आहेस. राजा कृतकृत्य व्हावा आणि मीही अक्षय्य दीर्घायू राहून व उत्कृष्ट तपश्चर्या करून स्वर्ग लोकाप्रत जावे, ह्यास्तव उदार अंतःकरणाने आपण मज अनाथाचे नाथ व्हा आणि हे धर्मनिष्ठ, पुत्राचे रक्षण करणाऱ्या पित्याप्रमाणे आपण माझे या संकटापासून रक्षण करा.' विश्वामित्राला त्याची अनुकंपा आली आणि त्याने आपल्या मुलांना शुनःशेषाला वाचविण्याच्या कार्यात साहाय्य करण्यास सांगितले. ज्यांनी त्याच्या विनंतीचा अव्हेर केला, त्यांना ऋषीने शाप दिला.

सर्वदुःखनाशक रक्षामंत्राने शुनःशेपाचे विश्वामित्राने स्वता रक्षण केले. तो त्याला म्हणाला –' दर्भरज्जूंनी बद्ध आणि रक्तपुष्पे व रक्तगंध यांनी युक्त होऊन तू विष्णुदेवत्य यूपापाशी आलास म्हणजे मंत्रांनी अग्नीचे स्तवन कर. अंबरीषाच्या यज्ञामध्ये हे दोन मंत्र-गाथा म्हटल्यास तुझा मनोरथ पूर्ण होईल.' शुनःशेषाने इंद्र आणि विष्णू ह्या देवांची उत्कृष्ट मंत्रांनी स्तुती केली.

ततः प्रीतः सहस्राक्षो रहस्यस्तुतितोषितः ।
दीर्घमायुस्तदा प्रादाच्छुनःशेपाय वासवः ॥ २६

' तेव्हा गुप्त स्तुतीच्या योगाने इंद्र संतुष्ट झाला व शुनःशेपावर प्रसन्न होऊन त्या इंद्राने त्याला दीर्घायुष्य दिले.'

शुनशेःपाला लाभलेले दीर्घायुष्य हा मंत्राचा प्रभाव आहे. त्याने दीर्घायुष्याची याचना इंद्राकडे केली नसून विश्वामित्राकडे केली आहे, त्यामुळे हा इंद्राने शुनःशेपाला दिलेला वर न मानता आशीर्वाद मानणे योग्य वाटते. मात्र या आशीर्वादाचे स्वरूप वरासारखे भासते. वाल्मीकीनेही ' वर ' शब्द योजलेला नाही.

## रावणाला मंत्रप्राप्ती — उत्तरकाण्ड/प्रक्षिप्त ४,५

रावण दिग्विजयार्थ चंद्रलोकी गेला असता चंद्रकिरणांची शीतलता त्याला सहन होईना तेव्हा आपले धनुष्य सज्ज करून तो चंद्राचा वेध घेऊ लागला असता, चंद्राची पीडा सहन न होऊन ब्रह्मदेव चंद्रलोकी आला व रावणाला म्हणाला– ' तू चंद्राला पीडा देऊ नकोस. हा महातेजस्वी द्विजराज जगताच्या हिताची इच्छा करीत असतो. मी तुला एक मंत्र देईन. प्राण जाण्याचा प्रसंग आला असता, जो पुरुष ह्या मंत्राचा जप करील, त्याला मृत्यू प्राप्त होणार नाही.' मंत्राचा स्वीकार करण्याची इच्छा व्यक्त करताना रावण ब्रह्मदेवाला म्हणाला, ' तू जर माझ्यावर संतुष्ट झाला असशील आणि मला मंत्र देण्याचे जर तुझ्या

मनात असेल, तर तो मंत्र तू मला दे. म्हणजे सर्व देव, असुर व दानव आणि सर्व पक्षी यांच्या संबंधाने मी निर्भय होईन. तुझ्या प्रसादामुळे मी ह्यांना अजिक्य होईन, यात संशय नाही.' ब्रह्मदेवाने मंत्राचा जप कसा करावयाचा या संबंधी आवश्यक त्या सूचना दिल्यानंतर रावणाने मंत्र स्वीकारला.

दत्त्वा तू रावणस्यैवं वरं स कमलोद्भवः ।
पुनरेवागमात्क्षिप्रं ब्रह्मलोकं पितामहः ।। ५/१

ह्या प्रसंगी वाल्मीकीने 'वर' शब्द योजिला आहे. अनुवादकानेही 'ह्याप्रमाणे रावणाला 'वर' दिल्यानंतर पितामह ब्रह्मदेव सत्वर ब्रह्मलोकी गेला' असे स्पष्ट म्हटले आहे. असे असताही वरांच्या विवेचनात खालील कारणास्तव ह्या प्रसंगाचा अंतर्भाव केलेला नाही. मंत्राची सिद्धी त्याच्या यथायोग्य जपामुळे, नियमांच्या पालनानेच होत असते, त्यात प्रमाद घडल्यास इच्छित फलप्राप्ती होत नाही. वरप्राप्तीनंतर वरप्राप्त व्यक्तीवर कोणतीही बंधने नसतात, पथ्ये पाळावयाची नसतात. वराचे फल वरप्राप्त व्यक्ती कशीही वागली तरी निश्चित मिळतेच. जप हे मंत्रसिद्धीचे साधन आहे, साध्य नाही हा सशर्त वरही म्हणता येत नाही.

## हनुमानाची इच्छापूर्ती उत्तरकाण्ड/४०

राज्याभिषेकानंतर रामाने अतिथींचा यथोचित मानसन्मान करून त्यांना निरोप दिला. वानरांचे मानसन्मान झाल्यानंतर हनुमान रामाला म्हणाला– 'राजा, तुझे ठिकाणी सर्वदा माझे पराकाष्ठेचे प्रेम असो. माझी भक्ती अचल राहो, आणि माझ्या मनाचा कल तुझ्याशिवाय दुसरीकडे न जावो. हे वीरा, जोपर्यंत भूतलावर रामकथा सुरू राहील, तोपर्यंत माझ्या शरीरामध्ये प्राण राहोत, ह्याविषयी संशय नसावा. हे रघुनंदना, हे तुझे कथारूप दिव्य चरित्र मला अप्सरा कथन करोत ... मी ते तुझे चरित्रामृत श्रवण करून तुझ्या दर्शनासंबंधीची आपली इच्छा पूर्ण करून घेईन.' रामाने सिंहासनावरून उठून हनुमानाला आलिंगन दिले.

एवमेतत्कपिश्रेष्ठ भविता नात्र संशयः ।
चरिष्यति कथा यावदेषा लोके च मामिका ।। २१

तावत्ते भविता कीर्तिः शरीरे ऽप्यसवस्तथा ।
लोका हि यावत्स्थास्यन्ति तावत्स्थास्यन्ति मे कथाः ।। २२

'हे वानरश्रेष्ठा, ह्या तुझ्या म्हणण्याप्रमाणे होईल, ह्यात संशय नाही. ही माझी कथा जोपर्यंत जगतामध्ये राहील, तोपर्यंत कीर्तिसहवर्तमान तुझ्या शरीराचे ठिकाणी प्राण राहतील आणि जोपर्यंत त्रैलोक्य राहील, तोपर्यंत तेथे माझ्या कथा राहतील', असे म्हणून वैदूर्य मण्याने झळकत असलेला व प्रभेने चंद्रासारखा असलेला हार रामाने आपल्या गळयातून काढून हनुमानाच्या गळयात घातला.

हनुमानाने प्रकट केलेली इच्छा रामाने पूर्ण केली हे खरे असले तरी ह्या इच्छापूर्तीचे स्वरूप आशीर्वादात्मक आहे. ह्याला वर म्हणता येणार नाही. वाल्मीकीनेही 'वर' शब्द योजिलेला नाही. खेरीज 'हार' हा अनुग्रह आहे, वर नाही.

## रामाची बिभीषणाला आज्ञा उत्तरकाण्ड/१०८

महाप्रस्थानाचा निश्चय झाल्यानंतर रामाने निरवानिरव केली. सुहृदांच्या गाठीभेटी घेतल्या. त्या वेळी राम बिभीषणाला म्हणाला.

**यावत्प्रजा धरिष्यन्ति तावत्त्वं वै विभीषण।**
**राक्षसेन्द्र महावीर्य लङ्कास्थः स्वं धरिष्यसि ॥ २७**

**यावच्चन्द्रश्च सूर्यश्च यावत्तिष्ठति मेदिनी।**
**यावच्च मत्कथा लोके तावद्राज्यं तवास्त्विह ॥ २८**

'बिभीषणा, हे महावीर्यवान राक्षसाधिपते, जोपर्यंत भूतलावर प्रजा आहे तोपर्यंत लंकेमध्ये राहून तू आपला देह धारण कर. सूर्य, चंद्र व पृथ्वी ही जोपर्यंत आहेत आणि जोपर्यंत जगतामध्ये माझी कथा प्रचलित आहे तोपर्यंत तुझे तेथे राज्य असो.' वाल्मीकीने रामाच्या वरील अभिप्रायाला 'वर' शब्द योजिला नसून 'आज्ञा' शब्द योजिला आहे. राम पुढे म्हणतो,

**शासितश्च सखित्वेन कार्यं ते मम शासनम् ।–२९**

'मित्रत्वाने मी तुला आज्ञा केली आहे व तू माझ्या आज्ञेप्रमाणे वागणे अवश्य आहे.' हनुमानाच्या इच्छापूर्तीप्रमाणेच (पहा: उत्तरकाण्ड/४०) येथेही रामाने आपले उत्कट प्रेम व सद्भाव प्रकट केला आहे. ही त्याची सदिच्छा आहे, आशीर्वाद म्हणावयासही हरकत नाही. परंतु वर निश्चित नव्हे.

| क्रमांक | काण्ड/सर्ग | शापद व्यक्ती | शापद योनी/अधिकार | शापप्राप्त व्यक्ती | शापप्राप्त योनी/अधिकार | शापाचे कारण |
|---|---|---|---|---|---|---|
| **बालकाण्ड** | | | | | | |
| १ | २ | वाल्मीकी | मानव ऋषी | निषाद | मानव | क्रौंच पक्ष्याचा वध |
| २ | १९ | विश्वामित्र | मानव ऋषी | मारीच | यक्ष | यज्ञात विघ्न |
| ३ | १९ | विश्वामित्र | मानव ऋषी | सुबाहू | यक्ष | यज्ञात विघ्न |
| ४ | २५ | अगस्त्य | मानव ऋषी | मारीच | यक्ष | आक्रमण |
| ५ | २५ | अगस्त्य | मानव ऋषी | सुंद | यक्ष | ? |
| ६ | २५ | अगस्त्य | मानव ऋषी | ताटका | यक्षिणी | पतिवधाच्या क्रोधाने ऋषीला भक्षण करण्याचा यत्न |
| ७ | २६ | ? | ? | ताटकावन | वन | ताटकेचे वास्तव्य |
| ८ | ३२ | कुशकन्या | मानव राजकन्या | वायू | देव | वायूचे अमर्याद वर्तन |
| ९ | ३६ | उमा | देवी | देव | देव | पुत्रप्राप्तीच्या इच्छेने पतीशी संगत असता रतिक्रीडेत विघ्न |
| १० | ३६ | उमा | देवी | पृथ्वी | देवी | शंकराने सोडलेले तेज (वीर्य) धारण करून रतिक्रीडेतील विघ्नास साहाय्य |
| ११ | ४३ | ? | ? | ? | ? | ? |
| १२ | ४८ | गौतम | मानव ऋषी | इंद्र | देव देवराज | **बाल.** : अहल्येच्या (पत्नीच्या) संमतीने इंद्राने समागम केला **उत्तर.** : अहल्येला (पत्नीला) फसवून तिचा उपभोग घेतला |

# शाप

| शापाचे परिणाम | शापाची वैशिष्टचे उःशाप/सशर्त/न दिलेला | पुनरुल्लेख/अन्य माहिती |
|---|---|---|
| लवकर मृत्यू, प्रतिष्ठा, कीर्ती, शांती न लाभणे | -- | रामायणाच्या रचनेस प्रेरणा |
| — | व्रतस्थ असल्याने शाप दिला नाही. | — |
| — | व्रतस्थ असल्याने शाप दिला नाही. | -- |
| राक्षस योनीची प्राप्ती | — | — |
| वध | -- | — |
| असलेले रूप नष्ट होणे, घोर रूपाची प्राप्ती, | -- | रामाच्या हातून वध |
| नरमासभक्षक राक्षसी | -- | -- |
| निर्जन वृक्षरहित स्थिती | रामाच्या वास्तव्याने शापमुक्ती | इंद्राच्या चैत्ररथ वनाप्रमाणे रमणीय |
| — | तपक्षय होऊ नये यास्तव शाप दिला नाही | क्रोधाधीन वायूने कुशकन्यांचा अंगभंग करून त्यांना कुबड्या केले. |
| अपत्य-प्राप्ती होणार नाही | — | सर्व देव दुःखी |
| एकच रूप कायम न राहणे, अनेक पती, पुत्र-सुख नाही | -- | -- |
| ? | गंगाजलात स्नान केल्याने शापमुक्ती | केवळ एक उल्लेख |
| **बाल.** : वृषणरहित अवस्था | -- | पितृदेवतांना विनंती केल्याने त्यांच्या कृपेने मेषवृषणाची प्राप्ती |
| **उत्तर.** : युद्धात शत्रूच्या हस्तगत, इतरांच्या जारकर्माचे अर्धे पातक, अक्षय स्थान नाही, देवराजपद अस्थिर. | -- | उत्तर / ३० |

| क्रमांक | काण्ड/सर्ग | शापद व्यक्ती | शापद योनी/अधिकार | शापप्राप्त व्यक्ती | शापप्राप्त योनी/अधिकार | शापाचे कारण |
|---|---|---|---|---|---|---|
| १३ | ४८/४९ | गौतम | मानव ऋषी | अहल्या | मानव ब्रह्मदेवाची मानसकन्या | बाल. : परपुरुषाशी स्वेच्छेने समागम उत्तर. : पतिवेषात आलेल्या इंद्राला ओळखले नाही म्हणून परपुरुषाशी रत |
| १४ | ५८ | वसिष्ठपुत्र | मानव ऋषिकुमार | त्रिशंकू | मानव राजा | गुरू आणि गुरुपुत्रांचा त्याग करून अन्य गुरूचा स्वीकार |
| १५ | ५९ | विश्वामित्र | मानव ऋषी | वसिष्ठपुत्र, महोदय | मानव ऋषिकुमार | क्षत्रियाने चांडालाचा याज्ञिक होणे नापसंत म्हणून यज्ञाचे निमंत्रणास नकार |
| १६ | ६० | विश्वामित्र | मानव ऋषी | यज्ञासाठी आलेले ऋषी | मानव ऋषी | आज्ञाभंग (केला तर) |
| १७ | ६२ | विश्वामित्र | मानव ऋषी | विश्वामित्राचे पुत्र | मानव ऋषिकुमार | पित्राज्ञेचे उल्लंघन, निंद्य भाषण |
| १८ | ६४ | विश्वामित्र | मानव ऋषी | रंभा | अप्सरा | तपश्चर्येत विघ्न |
| **अयोध्याकाण्ड** | | | | | | |
| १९ | २१ | कौसल्या | मानव राजपत्नी | राम | मानव राजपुत्र | मातेच्या इच्छेविरूद्ध वनवासगमन (केले तर) |

| शापाचे परिणाम | शापाची वैशिष्टचे/<br>उःशाप/सशर्त/न दिलेला | पुनरुल्लेख/अन्य माहिती |
|---|---|---|
| **बाल.** : हजारो वर्षे आहार-विरहित स्थिती, केवळ वायु-भक्षण, इतरांना अदृश्य<br>**उत्तर** : आश्रमाजवळच विध्वंस, एकटीच रूपवती राहणार नाही, सौंदर्य इतर प्रजा वाटून घेईल | बाल. : रामाच्या दर्शनाने शुद्धी, पूर्वरूपाची प्राप्ती<br>**अयाचित** उःशाप<br>उत्तर. : रामाच्या दर्शशाने शुद्धी, पतीशी पुनर्मिलन<br>**याचित** | उत्तर./३० |
| चांडाल योनीत जन्म | -- | शरीर व वस्त्र नीलवर्ण झाले. देहाची कांती नष्ट. शरीरावर भस्मरूप उटी, केस आखूड, भूषणे लोहमय |
| भस्म होऊन यमसदनी गमन, मृतांवर उपजीविका करीत सात शे जन्म श्वानयोनी, निर्दय, डोंब, कुरूपता. महोदयास निषादत्व, बरात्र काळ दुःख, निर्दय, प्राणी–घातक | --<br>सशर्त | -- |
| -- | फक्त शाप मिळेल ही भीती व्यक्त, शाप दिलेला नाही | -- |
| श्वान मांसभक्षक मुष्टिक जातीत जन्म, वसिष्ठ-पुत्रांप्रमाणे एक हजार वर्षे पृथ्वीवर वास्तव्य. | -- | -- |
| एक हजार वर्षे पाषाणमय | अयाचित : एका तेजस्वी तपस्वी ब्राह्मणाकडून उद्धार | -- |
| लोकविख्यात नरकाची प्राप्ती | सशर्त | शर्तींचे उल्लंघन करूनही शापाचा परिणाम झालेला नाही. |

| क्रमांक | काण्ड/सर्ग | शापद व्यक्ती | योनी/अधिकार | शापप्राप्त व्यक्ती | योनी/अधिकार | शापाचे कारण |
|---|---|---|---|---|---|---|
| २० | ४२ | दशरथ | मानव राजा | कैकेयी | मानव राजपत्नी | रामाला वनवासात पाठविण्याचा अट्टहास (न सोडल्यास) |
| | | | | भरत | मानव राजपुत्र | यौवराज्यपद (स्वीकारले तर) |
| २१ | ६३ | श्रावण | मानव ब्राह्मणतुल्य-ब्राह्मण नाही | दशरथ | मानव राजा | मर्मी बाण लागून एकुलता एक पुत्र मृत झाल्याचे (कळले तर) शाप देण्याची शक्यता |
| २२ | ६४ | श्रवण (श्रावण-पिता) | मानव वैश्य | दशरथ | मानव राजा | एकुलत्या एक निरपराध पुत्राचा अजाणता वध |
| २३ | ७४ | भरत | मानव राजपुत्र | कैकेयी | मानव राजपत्नी | रामाला वनवासात धाडण्याचा मातेचा अट्टहासच पित्याच्या निधनास कारणीभूत |
| अरण्यकाण्ड | | | | | | |
| २४ | ४ | वैश्रवण | लोकपाल | तुंबरू (विराध) | गंधर्व | रंभेविषयीच्या आसक्ती-मुळे वैश्रवणाच्या सेवेत खंड |
| २५ | १० | दंडकारण्या-तील मुनी | मानव ऋषी | दंडकारण्यातील राक्षस | राक्षस | तपात विघ्न, राक्षसां-कडून भक्षण |
| २६ | ४७ | रावण (यतिवेष-धारी) | राक्षस लंकाधीश | सीता | मानव राजपत्नी | अतिथी ब्राह्मणाच्या प्रश्नांना उत्तरे (न दिल्यास) |
| २७ | ६४ | राम | मानव राजपुत्र | प्रस्रवण नदी | पर्वत, नदी | सीता कोठे आहे हे (न सांगितल्यास) |
| २८ | ७१ | स्थूलशिरा | मानव ऋषी | कबंध (पूर्वजन्मी-विश्वावसु) | गंधर्व | ऋषीला संतप्त करणे, भय दाखवणे, आक्रमण |

| शापाचे परिणाम | शापाची वैशिष्टचे उ:शाप/सशर्त/न दिलेला | पुनरुल्लेख/अन्य माहिती |
| --- | --- | --- |
| पत्नीचा व पत्नीसंबंधाचा त्याग, श्राद्धादी न पोहोचो | सशर्त | कैकेयी आणि भरत यांना शापाची झळ लागू नये अशी रामाची विनंती युद्धकाण्ड/११९ |
| -- | सशर्त, शाप दिलेला नाही. दिला जाईल अशी भीती व्यक्त | — |
| पुत्र-वियोगाचे दुःख व त्यामुळे मृत्यू | -- | वध अजाणता झाला असल्याने ब्रह्महत्येचे पातक नाही. |
| भ्रूणहत्येचे पातक, इह-परलोकी दुःख, नरक प्राप्ती, पित्याला प्राप्त झालेल्या लोकात मातेला स्थान नाही. | — | केवळ तळतळाट, भरताचे उद्‌गार शापतुल्य आहेत परंतु त्याला शाप देण्याचा अधिकार कसा प्राप्त झाला ? |
| घोर राक्षसी शरीर | याचित उःशाप. | – |
| — | रामाने वध केल्यानंतर पूर्व रूपाची प्राप्ती | |
| -- | चिरकालीन तपाचा व्यय होऊ नये म्हणून शाप दिलेला नाही, | – |
| | शाप दिलेला नाही. शाप देईल अशी भीती व्यक्त | – |
| -- | सशर्त खुणेने सुचविल्यामुळे शाप दिलेला नाही. | बाणरूप अग्नीने दग्ध होणे, तृण-वृक्ष-पल्लवहीन अवस्था, पाणी आटणे इत्यादी होण्याची शक्यता |
| शरीर राक्षसांप्रमाणे निंद्य व दुष्ट होणे | याचित उःशाप, रामाच्या हातून मृत्यू आल्यावर पूर्व रूपाची प्राप्ती | -- |

